# निवेदन.

कांहीं मित्रांच्या आग्रहामुळें गेल्या चातुर्मास्यांत मुंबई येथील दाक्षिणी ब्राह्मण सभेपुढें ‘ धर्मशास्त्राचा इतिहास ’ या विषयावर दर आठवड्यास एक याप्रमाणें व्याख्यानें देण्याचें मी कबूल केलें. प्रत्येक व्याख्यान सुमारें सवा तास होत असे याप्रमाणें एकवीस व्याख्यानें झालीं. व्याख्यानें जशींच्यातशींच लिहून काढणें मला इतर व्यवसायांमुळें अशक्य होतें. कोणी लघुलेखकही मिळाला नाहीं. अशा वेळीं माझे बालमित्र रा. केशव लक्ष्मण ओगले ह्यांनीं सर्व व्याख्यानांना हजर राहून टिपणें घेऊन व्याख्यानांचा सारांश लिहून काढण्याचें आपल्या अंगावर घेतलें. त्याप्रमाणें त्यांनीं एकोणीस व्याख्यानें लिहून मला दाखविलीं. माझ्या व्याख्यानांतील सुमारें निम्मे मजकूर त्यांनीं बहुतेक माझ्याच शब्दांत लिहिला आहे. शेवटचीं दोन समारोपाचीं व्याख्यानें मी स्वतांच लिहिलीं आहेत. व्याख्यानात आधारास घेतलेल्या सर्व वचनांबद्दल एकटा मी जबाबदार आहें, कारण मीच ती रा. ओगले यांना पुरविलीं आहेत. येथें छापलेल्या वचनांपेक्षां प्रत्येक विषयावर दुप्पट, चौपट किंवा अधिकही मला देतां आलीं असतीं परन्तु माझा उद्देश सर्वसाधारण समाजासाठीं व्याख्यानें देण्याचा असल्यामुळें इतका विस्तार करण्याची आवश्यकता वाटली नाहीं. रा. ओगले यांनीं माझे विचार यथातथ्य व थोडक्यांत उतरून घेतले आहेत, अशी मीं खात्री करून घेतली आहे. रा. ओगले यांनीं फार परिश्रम घेऊन व्याख्यानाचा मजकूर जुळवून छापण्यासाठीं दिला याबद्दल मी त्यांचा अत्यन्त आभारी आहें. ह्या व्याख्यानांचा बराचसा गोषवारा ‘ प्रभात ’ दैनिकानें छापून धर्मशास्त्राविषयीं आस्था समाजांत पसरविण्याला फार मोठी मदत केली, व हें पुस्तक त्वरित छापून प्रकाशित केलें याबद्दल प्रभातचे चालक रा. पांडोबा भागवत यांचाही मी आभारी आहें.

सुमारें वीस वर्षें मी धर्मशास्त्राचा अभ्यास करीत आहें. परंतु गेल्या सहा महिन्यांतील काळ मला फार आनंदाचा गेला. या सहा महिने मी ही व्याख्यानमाला गुंफीत आहें. या सहा महिन्यांत अनेक ग्रंथकाराच्या संगतींत काळ घालवितां आला. ज्या सामाजिक व धार्मिक प्रश्नांनीं सर्व समाजांत खळबळ उडवून दिली आहे, त्या प्रश्नांबद्दल माझे विचार समाजापुढें ठेवण्याची संधी मला ब्राह्मणसभेच्या चालकांनीं दिली, याबद्दल त्यांचे मी शतशः आभार मानतों. विचारी, जिज्ञासु व समाजहितदक्ष अशा श्रोतृवर्गानें सतत येऊन मला अंगीकृत कार्यांत मोठें प्रोत्साहन दिलें, त्या उपकारांची फेड कशी करावी तें समजत नाहीं. श्रीकृष्णासारख्या परमवन्द्य पुरुषानें ही अर्जुनासारख्या आपल्या मित्राला ‘ यथेच्छसि तथा कुरु ’ असेंच स्वातंत्र्य शेवटीं दिलें; मग माझ्यासारख्याची गोष्ट काय! समाजांत उत्पन्न झालेले बिकट प्रश्न सोडविण्याची माझी दिशा मी आपणांपुढें ठेविली आहे. ती आपल्याला मान्य असेल तर आपण या मताचा प्रसार करण्याला मदत करा, व आपण जें मजकडून ऐकलें किंवा या पुस्तकांत वाचलें असेल त्यांत आपल्या विचारांची व ज्ञानाची भर घालून अशा विचारांच्या लहरी समाजाच्या अगदीं खालच्या थरांपर्यंत पोंचतील असें करावें; आणि सर्वांनीं मिळून संघटन करून एकच विचार मनांत आणून त्या विचाराला सर्वत्र वाचा फुटेल असें करावें, अशी वेदमंत्रानें आपल्याला विनंति करितों.

‘ संगच्छध्वं संवदध्वं सं वो मनांसि जानताम् ’ ( ऋ. १०. १९१. २ ).

पांडुरंग वामन काणे.

# ‘ माझे दोन शब्द ’

प्रस्तुत पुस्तकाची घटना आगाऊ केलेल्या कोणत्याही संकल्पित योजनेनुसार न होतां अगदीं आयत्यावेळीं घडलेल्या गोष्टीमुळें झाली. माझे मित्र प्रो. काणे याचा हिंदुधर्मशास्त्रावरील व्यासंग आज निदान वीस वर्षें तरी चालू असून त्याचें फळ कित्येक पुस्तकें व अनेक लहान लेख याच्या रूपानें प्रसिद्ध आहे. पण तें लिखाण अद्यापि केवळ इंग्रजींतच आहे. त्यांचा हिंदुधर्मशास्त्राच्या इतिहासाचा पहिला भाग इंग्रजींत पाच वर्षांपूर्वीं प्रसिद्ध झाला व दुसरा लिहिण्याची तयारी होत आहे. दोन भागांत येणाऱ्या सर्व विषयांचें सार या पुस्तकांत आलें आहे. अलीकडे कित्येक वर्षे धर्मशास्त्राची चर्चा सामान्य लोकांपर्यंत येऊन पोंचली असली तरी ती बहुतेक धर्मशास्त्रपंडिताच्या उसन्या आधारावर चाललेली असते. सामान्य लोकाना त्यांत फार खोल जाणें शक्यच नसतें. तेव्हां त्या शास्त्रावर दृढ व्यासंग केलेल्या विद्वानापासून तो विषय अथपासून इतिपर्यंत संक्षेपानें कां होईना पण साग्र ऐकावा अशी इच्छा त्याना असल्यास नवल नाहीं. या इच्छेचें फल म्हणजेच या पुस्तकाला आधारभूत झालेली हिंदुधर्मशास्त्राच्या इतिहासावरील रा. काणे याची गेल्या चातुर्मास्यांतील व्याख्यान माला होय. पण हीं व्याख्यानें पुस्तक रूपानें प्रसिद्ध होण्याचा योग मात्र अगदी अकल्पित असून पहिल्या व्याख्यानाच्या आरंभीं थोडाच वेळ त्याची पुसट कल्पना मला आली. त्या कल्पनेला ठळक व स्पष्ट रूप देण्याचें कार्य माझे मित्र प्रभातचे सहसंपादक रा. श्रीपादराव नवरे याचा आग्रह आणि प्रभातचे संपादक रा. पांडुरंगराव भागवत याची पुस्तक छापून काढण्याची तयारी यानीं केलें.

ज्या उद्देशानें रा. काणे यानीं व्याख्यानमाला गुंफण्याचें मान्य केलें, तो उद्देश अधिक सफल व्हावा ह्मणून माझ्यावर अचानक आलेलें हे कार्य अंगावर घेऊन मी यथाशक्ति वाटेस लाविलें. अस्पृश्यता निवारणाचा प्रश्न, लग्नविषयक शारदा कायदा, परदेशगमन, मिश्रविवाह, पतितपरावर्तन, इत्यादि अनेक धर्मशास्त्रात आलेल्या गोष्टी आता सामान्य चर्चेचा विषय झालेल्या आहेत तर स्त्रीशिक्षण, विधवाविवाह इत्यादि गोष्टी यापूर्वींच सिद्ध होऊन गेलेल्या आहेत. त्यामुळें समाजांत सनातनी आणि नवमतवादी किंवा श्री. कोकजेशास्त्री याच्या परिभाषेंत बोलावयाचें तर रूढिवादी व तत्ववादी असे दोन पक्ष उत्पन्न झाले असल्याचें सुप्रसिद्धच आहे. सामान्य जनसमाज सनातनी पक्षाचा अंध अनुयायी आहे, तर सुशीक्षित समाज बहुतांशीं तत्ववादी पक्षाचा अनुयायी, अर्थात् सनातनी पक्ष संख्या दृष्टीनें प्रबल आहे. पण हा प्रबलपणा एकंदर हिंदु-समाजाच्या उत्कर्षाच्या दृष्टीनें आजच्या परिस्थितींत तरी (आणि ही परिस्थिति आणखी

शेंकडो वर्षे तरी पालटेल असें वाटत नाहीं ) अहितकारक आहे असे मला मनःपूर्वक वाटल्यामुळें तत्ववादीपक्ष सबल करण्याच्या गोवर्धनोद्धरणासारख्या कार्याला आपली करांगुलि लावून तरी नेट द्यावा असा हेतु धरून महाभारतांतील गणपतीचें कार्य करण्यास मी प्रवृत्त झालों. या कामीं अधिक कसलेला गणपति मिळाला असता तर अर्थात्च चांगलें झालें असतें. पण त्याच्या अभावीं रा. काणे यांना व्याख्यानमालेच्या पायीं होणारे श्रम व कालक्षेप अगदींच वाऱ्यावर जाऊं देणें मला इष्ट वाटलें नाहीं. व्याख्यानें पुस्तकरूपानें छापण्याच्या योजनेमुळें त्यांना आणखी बरेच श्रम करावे लागले पण त्यामुळें पहिल्या श्रमाचें थोडें तरी सार्थक्य झालें.

जातां जातां धर्मशास्त्रविषयाशीं संबंध असलेल्या एका लहानशा प्रश्नाचा थोडा विचार करणें अवश्य वाटतें. अशा व्याख्यानावर किंवा चर्चेवर कित्येकांचा असा आक्षेप आहे कीं हा वावदूकपणा आमच्या सारख्या अज्ञ लोकां पुढें कशाला ? या आक्षेपला रा. काणे यांनीं एका ठिकाणीं उत्तर दिलें असून तें आज फार महत्त्वाचें आहे. हे आक्षेपक पुढें ह्मणतातच कीं, तुम्हीं पंडित पंडित जमून काय तें डोक्यावर डोकीं आदळा आणि काय निर्णय झाला तो आम्हाला सांगा, आम्हाला तेवढा पुरे, आम्हीं त्या प्रमाणें वागूं. पण हें म्हणणें पूर्वकाळीं केव्हां योग्य वाटलें असलें, तरी आतां त्यात कांहीं राम राहिलेला नाहीं. पंडिता पंडिता मध्येंच वाद माजून आपसात निकाल होणें अशक्य झाल्यामुळें आता जनतेच्या न्यायासनापुढें न्याय मागावयास येण्याचा प्रसंग पंडितांवर आला आहे. पंडित झाले तरी शासनसंस्थेच्या आनुकूल्याशिवाय कांहीं करूं शकत नाहीत. या पुढें शासनसत्ता हळुहळू तरी जनतेकडे येणार हें निश्चित होय. हें लक्षांत ठेऊन जनतेला त्या बाबतींत जागें करणें अवश्य आहे. ‘ आम्हाला का विनाकारण त्रास देतां ’ असें ती झोंप मोडल्यामुळें रागानें म्हणाली तरी त्याविषयीं क्षिति बाळगून चालणार नाहीं. म्हणून असलीं व्याख्यानें देणें आणि तीं छापून प्रसिद्ध करविण्याचा अट्टाहास धरणें भाग पडतें.

के. ल. ओगले.

# प्रास्ताविक

विद्वद्वर्य प्रो० पांडुरंग वामन काणे एम्. ए. एल्एल् एम्. यांचा हिंदुधर्मशास्त्रावरील व्यासंग केवढा दांडगा आहे ते प्रसिद्ध आहे. या विषयावर बोलणारीं जीं दोन चार अधिकारी माणसें महाराष्ट्रांत आहेत, त्यांत त्यांची प्रामुख्यानें गणना होते. आज कित्येक धार्मिक आणि सामाजिक प्रश्न उपस्थित झाले असून सनातनी आणि नवमतवादी यांचेमध्यें वादाचें मोठें रण माजून राहिलें आहे. सनातनी लोक प्रत्येक वेळीं तोंडावर शास्त्रवचन फेकून देऊन देशकालपरिस्थित्यनुरूप होणाऱ्या प्रत्येक सुधारणेला विरोध करीत असतात. याच्या उलट नवमतवादी पूर्वपरंपरा मुळींच विचारांत न घेतां पाश्चात्य सुधारणाची येथें बरोबर नक्कल उठविण्याचा अट्टाहास धरतात. कित्येक वेळा तर शास्त्रवचनावर विश्वास असणाऱ्या सनातनी लोकांमध्येंच तट पडून एक दुसऱ्याला सुधारक आणि दुसरा पहिल्याला दुर्धारक म्हणून हिणवूं लागतो. अशा स्थितींत सामान्य माणसाची मन:स्थिति स्वाभाविकपणेंच गोंधळून जाऊन खरा कोण आणि खोटा कोण याचा निवाडा करणें त्याला कठीण होऊन बसतें. अशा स्थितींत पूर्वीची शास्त्रपरंपरा पूर्ण परिचित असलेला, व नवीन परिस्थिति ओळखणारा कोणी अधिकारी माणूस मार्गदर्शकाचें काम करण्यास मिळाला तर सर्वांनाच आनंद होईल यांत शंका नाहीं.

प्रो. काणे यांनीं हें मार्गदर्शकाचें काम करावें अशी कित्येक स्नेह्यांनीं त्यांना विनंति केल्यावरून येथील ब्राह्मणसभेच्या दिवाणखान्यांत प्रत्येक आठवड्याला एक याप्रमाणें व्याख्यानें देण्याचें कबूल करून त्याप्रमाणें चातुर्मास्यारंभापासून त्यांनीं व्याख्यानें सुरूहि केलीं. हीं व्याख्यानें ऐकण्यास सर्वमतांच्या लोकांची गर्दी होऊं लागली. व्याख्यान प्रत्यक्ष ऐकल्यावर तीं आपल्या संग्रहीं असावीं असें कित्येक श्रोत्यांना वाटूं लागलें. व्यवसायामुळें हीं व्याख्यानें प्रत्यक्ष ऐकण्याचा लाभ ज्यांना घेतां आला नाहीं त्यांनाहि तीं कोठें विस्तृत वाचावयास मिळालीं तर बरें होईल, अशी उत्कट इच्छा उत्पन्न झाली. या दोन्ही प्रकारच्या लोकांच्या इच्छा पुरवावयाच्या तर व्याख्यानें टिपून घेऊन तीं प्रसिद्ध करणें जरूर आहे असें आम्हांस वाटलें. हीं टिपणें घ्यावयाचीं तर संक्षेपानें न घेतां शक्य तेवढ्या विस्तारानें घेणें जरूर होतें, कारण त्यावांचून व्याख्यानें प्रत्यक्ष ऐकण्यापासून होणारें समाधान लोकांना होणें शक्य नव्हतें. तसेंच घेतलेल्या टिपणामध्यें कोणताहि विपर्यास झालेला नाहीं हेंहि पहाणें जरूर होतें. सुदैवानें आम्हाला या दोन्हीही अडचणींतून पार पडतां आलें. आमचे मित्र श्री. केशव लक्ष्मण ओगले बी. ए. यांनीं आपल्या अनेक घरगुती अडचणी बाजूस ठेऊन व्याख्यानांचीं

टिपणें घेण्याचें काम स्वयंस्फूर्तीनें अंगावर घेतलें, आणि टिपणांवरून त्यांनीं तयार केलेल्या मजकूर तपासून देण्याचें काम स्वतः प्रो. काणे यांनीं पत्करलें. त्यामुळें वैगुण्याला कोठेंच जागा राहिली नाहीं. प्रो. काणे यांनी याच विषयावर स्वतंत्र पुस्तक लिहिलें असतें, तर तें यापेक्षां निराळें झालें असतें ही गोष्ट निर्विवाद असली तरी व्याख्यानांना स्वतःचें असें कांहीं माधुर्य असतेंच. शिवाय निबंधांत आणि व्याख्यानांत अभिप्राय एकच असणार.

व्याख्यानें आमच्या ' प्रभात ' दैनिकांत त्याच आठवड्यात प्रसिद्ध करावीं, इतकाच पहिला बेत होता, पण कायम वाङ्मय म्हणून त्याला नंतर ग्रंथाचें स्वरूप द्यावें अशा सूचना येऊं लागल्यामुळें आम्हीं पुस्तकाची दृष्टि पुढें ठेवली. दैनिकांत मजकुराच्या गर्दीमुळें सर्वच व्याख्यानें आणि तींहि त्याच आठवड्यांत प्रसिद्ध होऊं शकलीं नाहींत. या ग्रंथांत सर्व व्याख्यानें आलेलीं आहेत, हें सांगावयास नकोच. पुस्तकाची संपूर्ण कल्पना प्रारंभीं डोळ्यांसमोर नसल्यामुळें विशिष्ट रचना प्रथम आंखून पुस्तकाची मांडणी करतां आली नाहीं. तथापि यामुळें पुस्तकाला वैगुण्य येण्याचें अर्थातच कारण नाहीं.

' दैनिकांत ' छापलेला मजकूरच पुस्तकांकडे घ्यावा लागल्यामुळें टाईपाची फार झीज झाली आणि त्यामुळें प्रारंभीं मुद्रणदोष बरेच झाले. पण पुढें हे दोष पुष्कळच कमी झालेले आढळतील. प्रो. काणे यांनीं वेळांत वेळ काढून मुद्रितें तपासलीं, व श्री. ओगले यांनीं टिपणें घेऊन हें पुस्तक छापून काढण्याचें कामीं आम्हाला अमोल साहाय्य केलें याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे. माझ्या अनेक सहकाऱ्यांचीहि या कामीं मला फार मदत झाली आहे हें कळविण्यास आनंद वाटतो.

' प्रभात ' कचेरी
२४-२-३५

**पां. म. भागवत.**

# अनुक्रमणिका


| | |
|---|---|
| प्रास्ताविक | १—३ |
| सनातन किंवा आर्यधर्माचें सामान्य स्वरूप | ४—५ |
| धर्म म्हणजे काय | ५—६ |
| शास्त्र म्हणजे काय | ६—७ |
| धर्ममूल काय | ७—८ |
| श्रुतींचें धर्ममूलकत्व | ९—१७ |
| वेद म्हणजे काय | ९—११ |
| वेदांचे विषयानुरूप अन्तर्विभाग | ११—१२ |
| कित्येक आचारांचें वेदांतील मूळ | १२—१७ |
| श्रुति, स्मृति आणि सदाचार यांचा परस्परसंबंध | १८—३६ |
| श्रुतींतील ईश्वरविषयक कल्पना | १८—१९ |
| स्मृतींचें स्वरूप व त्यांचा विस्तार | १९—२२ |
| पुराणें | २२—२४ |
| शिष्टाचार | २४—२५ |
| श्रुत्यादिकांचा परस्पर संबंध | २६—३६ |
| कलिवर्ज्य प्रकरण | ३७—३८ |
| धर्मशास्त्रवाङ्मय | ३९—४५ |
| सूत्रकाल | ४०—४१ |
| स्मृतिकाल | ४१—४२ |
| निबन्धकाल | ४२—४५ |
| वर्णाश्रमव्यवस्था | ४५—६४ |
| सामान्यधर्म अथवा नीति | ४५—४७ |
| वर्णधर्म—प्रास्ताविक | ४७—४८ |
| जातिसंस्थेचा इतिहास | ४८—४९ |
| जाति कशा होतात | ५० |
| वेदांतील वर्ण | ५२–६१ |
| दास आणि आर्य | ५२–५३ |
| ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य | ५३–५५ |
| वर्ण धंद्यावर अवलंबून नव्हता | ५५–५७ |

शूद्र ५६–५८
तीनवर्णांचा परस्परसंबन्ध ५८–६०
राजांचा वरचढपणा ६०–६१
चातुर्वर्ण्य कल्पनेंतील मूलभूत सिद्धान्त ६१–६२
श्रेष्ठपणाची मनूची कल्पना ६२–६४
संस्कार ६५–६६
संस्कारांचा उद्देश काय ६६–६७
संस्कार किती आहेत ६७–६९
स्त्रियांचे संस्कार ६९–७१
शूद्राचे संस्कार ७१
उपनयन ७२–७४
विवाह ७४–९९
विवाहाचा उद्देश ७४–७५
विवाहाला अवश्य गोष्टी ७५–७६
शारदा कायद्याचा थोडा विचार ७७–७९
विवाहांगभूत कर्मे ८०–८२
विवाहाची उदात्त कल्पना ८२–८३
विवाहाचे प्रकार ८३–८६
वधूवर परीक्षेचे नियम ८७–८९
गोत्र व प्रवर ८९–९०
असवर्ण विवाह ९०–९१
विशिष्ट विवाहाचा कायदा ९१–९३
नोंदणीच्या लग्नाचे परिणाम ९३
मिश्रविवाहाचा प्राचीन इतिहास ९३–९४
मिश्रविवाहाचीं ऐतिहासिक उदाहरणें ९४–९६
मिश्रविवाहाचीं वाङ्मयांतील उदाहरणें ९६
विवाहाचें गांभीर्य ९७
सुधारणेची पहिली पायरी ९८–९९
सती ९९–१०३
विधवापुनर्विवाह १०४–१११
घटस्फोट १११–११२

| | |
|---|---|
| विविधपुत्र | ११३–११४ |
| मिश्रजाति | ११६–१२७ |
| वर्ण व जाति | ११८–१२० |
| मिश्र जाति कशा झाल्या | १२०–१२६ |
| जात्युत्कर्षाची कल्पना | १२६–१२७ |
| वर्ण व जाति यांचे व्यवसाय | १२७–१४१ |
| अस्पृश्यताविचार | १४२–१५६ |
| अस्पृश्यता म्हणजे काय | १४२–१४३ |
| श्रुति व अस्पृश्यता | १४३–१४४ |
| चाण्डाल विचार | १४४–१४९ |
| अस्पृश्यतेच्या कल्पनेचा उगम | १४९–१५० |
| अस्पृश्यतेचे प्रकार | १५१–१५३ |
| अस्पृश्यता निवारणाचीं महत्वाचीं स्थळें | १५३–१५६ |
| आश्रमविचार | १५७–१७३ |
| वर्णधर्म व आश्रमधर्म यांतील भेद | १५८ |
| आश्रमधर्म सागण्याची आवश्यकता | १५८–१५९ |
| आश्रमाच्या कल्पनेचा इतिहास | १५९–१६४ |
| चार आश्रमाचें संक्षिप्त वर्णन | १६५–१६९ |
| संन्यासाला महत्त्व कां आलें | १६९–१७० |
| संन्यास कोणी घ्यावा | १७१–१७२ |
| भक्ष्याभक्ष्यविचार | १७४–१९० |
| प्राचीन परिस्थिति | १७६–१७७ |
| ऐतिहासिक दृष्ट्या विचार | १८०–१८२ |
| अहिंसातत्त्वाचा उगम | १८२–१८४ |
| हिंसा व अहिंसा यांची तडजोड | १८४–१८७ |
| शाकाहारांतील भक्ष्याभक्ष्य विचार | १८७–१९० |
| स्त्रिया, त्यांचीं कर्तव्यें व हक्क | १९१–२०९ |
| सामान्य विचार | १९४–१९७ |
| स्त्रियांचें पारतंत्र्य | १९८–१९९ |
| स्त्रियाची स्तुति | १९९–२०० |
| स्त्रियाची निन्दा | २००–२०१ |
| पडद्याची चाल | २०१–२०२ |

| | |
|---|---|
| माता | २०२–२०३ |
| भार्या | २०३–२०४ |
| बहुपत्नीकत्वाची चाल | २०४–२०५ |
| स्त्रीधर्म | २०५–२०६ |
| स्त्रियांचे हक्क | २०६–२०७ |
| मुलींची स्थिति | २०७–२०८ |
| पाप, प्रायश्चित्त आणि पतितपरावर्तन | २१०–२२५ |
| पाप म्हणजे काय | २१० |
| पापाच्या कल्पनेचा इतिहास | २१०–२१४ |
| स्वर्ग व नरक | २१४–२१६ |
| समाजनियंत्रणविषयक दोन पक्ष | २१६–२१८ |
| प्रायश्चित्त | २१८–२२१ |
| पतितपरावर्तन | २२१–२२५ |
| धर्मशास्त्र व पूर्वमीमांसादि शास्त्रें | २२६–२५९ |
| पूर्वमीमांसेचे काहीं सिद्धान्त | २३७–२३९ |
| अर्थनिर्णयाचे नियम | २४०–२५० |
| धर्मशास्त्र आणि वेदान्त | २५१–२५२ |
| धर्मशास्त्र आणि तर्क | २५२–२५३ |
| धर्मशास्त्र व योग | २५३–२५४ |
| धर्मशास्त्र आणि व्याकरण | २५४ |
| धर्मशास्त्रांतील काल्पनिक सिद्धान्त | २५५–२५९ |
| समारोप | २६०–३१० |
| आमची भूमिका | २६० |
| सनातनपक्षाची भूमिका | २६१–२६२ |
| वेदप्रामाण्याची चर्चा | २६२–२६६ |
| धर्मशास्त्र व लोकशाही स्वराज्य | २६६–२७१ |
| लोकशाहीवरील आक्षेप | २६७ |
| समाजसत्तावाद आणि धर्म | २७१–२७७ |
| समाजसत्तावादाचे स्वरूप | २७१–२७३ |
| समाजसत्तावादावरील आक्षेप | २७३–२७६ |
| समाजसत्तावादाविषयीं आमची भूमिका | २७६–२७७ |
| आधुनिक सनातनवादाचे परीक्षण | २७७–२९९ |

| | |
|---|---|
| मतभेदाचें स्वरूप | २८१–२८२ |
| रा. जोशी यांचे कित्येक अपसिद्धान्त | २८२–२९७ |
| रा. जोशांची बौद्धिक गुलामगिरी | २८७–२९१ |
| वडाची साल पिंपळाला | २९१–२९३ |
| रा. जोशी याची हातचलाखी | २९२–२९७ |
| रा. जोशी याचे विलक्षण सिद्धान्त | २९७–२९९ |
| नीत्शेचीं काहीं मतें | २९९–३०२ |
| संस्कृति म्हणजे काय | ३०३ |
| आमच्या संस्कृतीचीं वैशिष्टयें | ३०३–३१० |

---

# हिंदु धर्मशास्त्राचा इतिहास

## व्याख्यान पहिलें

( ता २८ जुलै १९३४ )

### प्रास्ताविक

सांप्रत हिंदु समाजाची स्थिति फार चमत्कारिक झाली आहे. त्यात सर्वत्र दैन्य आढळत असून अशी स्थिति त्याला पूर्वी हजारों वर्षांत आलेली नव्हती. हिंदुधर्मावर पूर्वी पुष्कळ घाले आले, पण त्या वेळीं आजच्यासारखी क्षुब्धता दिसली नाहीं. ऐतिहासिक कालांतील पहिला हिंदुधर्मावरील हल्ला बौद्ध धर्माचा होय. त्यानें तत्कालीन धर्माचें मुख्य अंग जें यज्ञ त्याची निंदा करून वेदांचें धर्मप्रामाण्य नाकारलें आणि नीतीनें वागावें म्हणजे निर्वाणाची प्राप्ति होईल असें प्रतिपादिलें. पण या बौद्ध मताला हिंदुसमाजानें पचवून टाकिलें आणि बुद्ध आमच्या दशावतारांपैकीच एक होऊन बसला. या धर्मक्रान्तीच्या प्रसंगीं हिंदुसमाजावर आर्थिक अवनतीची आपात्ति आलेली नव्हती. यापुढें शक, हूण इत्यादिकांच्या स्वाऱ्या हिंदुस्थानावर झाल्या आणि त्यानीं येथें बरीच झोड उठविली. हूणादि म्लेच्छांच्या त्रासाचा परिहार व्हावा म्हणून विशाखदत्तानें मुद्राराक्षसांत प्रार्थनाहि केली आहे. पुढें यशोधर्मादि राजांनीं त्यांचा पराभव करून त्यांना वाटेस लाविलें. या शकहूणांच्या स्वाऱ्यांच्या वेळींहि आजच्या इतकी खळबळ उडाली नव्हती. पुढें इस्लामी लोकाच्या स्वाऱ्या होऊन राजकीय क्रान्ति झाली. तथापि आर्थिक क्रान्ति तेव्हां आजच्यासारखी झाली नाहीं. त्या लोकांनीं लूट करून एक एकदां द्रव्य नेलें पण अखेर ते येथेंच स्थाईक झाल्यामुळें बाहेर जाणारा द्रव्याचा ओघ बंद झाला. शहाजहान बादशहानें कोट्यवधि रुपये खर्चून ताजमहाल बांधिला, त्याचा सारा खर्च येथेंच झाला व तो पैसा येथचा येथेंच राहिला !

पण आजची परिस्थिति फारच निराळी आहे. आज इंग्रजी अमदानींत राजकीय क्रांतीबरोबर सामाजिक व आर्थिक क्रांति झाली असून धार्मिक क्रांति होऊं पहात आहे. आजमितीस हिंदुस्थानांत आठ तरी प्रमुख धर्म आहेत. अशी स्थिति दुसऱ्या कोणत्याहि देशात आढळणार नाहीं. येथील परंपरागत वैदिक धर्माबरोबर जैन, बौद्ध, शीख इत्यादि एतद्देशीय धर्म चालू आहेत, पण त्यात

संस्कृतिसाम्य तरी पुष्कळ आहे. परंतु बाहेरून आलेले भिन्न संस्कृतीचे असे ज्यू, पारशी, महंमदी व ख्रिस्ती हे चार धर्मंहि येथें चालत आहेत. या गोष्टींचा विचार केल्यास आपल्या धार्मिक परिस्थितीची योग्य कल्पना करतां येईल. पूर्वी अशा प्रकारच्या खळबळी येथें उडाल्या, त्या वेळीं आजच्या सारखा आमच्यात मतभेद नव्हता; असला तरी तो किरकोळ स्वरूपाचा असून धर्मावर आलेलें परकी अरिष्ट परतविलें पाहिजे अशीच सर्वांची मनःस्थिति होती. पण याहि बाबतींत आज फार निराळी स्थिति झाली आहे. आपल्या समाजातच आज चार भिन्न पक्ष झालेले आहेत. पहिला सनातनी म्हणविणाराचा आहे. आचारांत कोणत्याहि रीतीचा बदल करण्याचा आपल्याला अधिकार नाहीं, श्रुतिस्मृतिपुराणादि ग्रंथांत जें काहीं सांगितलें आहे, त्याचा मीमांसापद्धतीनें समन्वय केला पाहिजे व त्या बाहेर काहीं एक आपल्याला करता येणार नाहीं असें या पक्षाचें मत असून त्यात बहुजन समाजाचा अंतर्भाव होत असल्यामुळें इतरापेक्षा फार सबळ आहे. दुसरा पक्ष याच्या उलट मत असणाऱ्या क्रांतिवाद्यांचा. या पक्षाला धर्माचें वावडें असून रशियांतील सोव्हियट मताप्रमाणें समाजात साम्यता स्थापिली म्हणजे त्याचा उत्कर्ष होईल, त्यांत धर्मासारख्या गोष्टीचें काहीं काम नाहीं असें त्याचें म्हणणें आहे. हा पक्ष अजून अल्प आहे. तिसरा पक्ष तटस्थ अशा उपेक्षाशीलांचा. आपण कितीहि केलें तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं, तरी निष्कारण काहीं तरी उपद्व्याप करण्यापेक्षा उगीच स्वस्थ बसावें हें चांगलें, ईश्वराच्या मनात येईल तेव्हा तो अवतार घेऊन पुनः सारी घडी नीट बसवील, तेथपर्यंत विरोधी गोष्टींची उपेक्षा करीत रहावें, असे या पक्षाचें मत आहे. हा पक्षहि फारसा मोठा नाहीं. चवथा पक्ष विचारशीलांचा. ईश्वरानें आपल्याला बुद्धि दिली आहे, तिचा आपण योग्य उपयोग केला पाहिजे. हिंदुस्थानच्या ३५ कोटी लोकसंख्येपैकीं पंचवीस कोटी तरी आपण हिंदु आहों. आपण मनात आणूं तर कोणत्याहि प्रकारची अवनति आपण घालवूं शकूं. परिस्थिति ओळखून आपण आपली कार्याची दिशा ठरविली पाहिजे. अशी या पक्षाच्या विचाराची दिशा असून त्याला विवेकवादी पक्ष म्हणतां येईल. या भिन्न भिन्न पक्षांमुळें सामान्य मनुष्य भांबावून जातो व काय करावें हें त्यास समजत नाहींसें होतें. अशा प्रकारच्या सामान्य लोकांसाठीं प्रस्तुतची व्याख्यानमाला गुंफण्याचें योजिलें आहे. साग्र वस्तुस्थिति त्यांच्यापुढें मांडली म्हणजे कोणता पक्ष ग्राह्य व कोणता त्याज्य हें त्यांना समजण्याला सुलभ जाईल.

प्रत्येक देशाचें कांहींना कांही वैशिष्ट्य असतें. प्राचीन ग्रीक राष्ट्रांचा नगरराज्य व कलाकौशल्य यांवर भर असे. प्रत्येक नगर हें स्वतंत्र राज्य आहे असें त्यांचें मत होतें. शिल्पादि कलांचा त्यांनीं चांगला उत्कर्ष केला. रोमन लोकांना साम्राज्याची आवड होती. रोमन साम्राज्यांतील नागरिक म्हणजे कांहीं एक विशेष असून इतर देशांतील

सामान्य जनतेहून तो स्पष्टपणें निराळा दिसला पाहिजे असें त्यांचें ह्मणणें असे. प्राचीन हिंदुस्थानाचा विशेष म्हणजे धर्म, तत्वज्ञान व विविध वाङ्मय हा होता व तदनुसार खोल धर्मविचार, विविध दर्शनें व शास्त्रें येथें निर्माण झालीं. ज्योतिष, गणित, स्थापत्य इत्यादि शास्त्रांचा उदय येथें त्या वैशिष्ट्यामुळेंच झाला. जैन, बौद्ध यांनीं खोदलेलीं भव्य लेणीं, वैष्णव, शैव इत्यादि पंथीयांनीं बांधिलेलीं प्रचंड मंदिरें, हीं पाहिल्यास या विधानाची साक्ष पटेल. या गोष्टींमुळेंच आपल्याला जगात वैशिष्ट्य मिळालें आहे. असें हें आपलें वैशिष्ट्यच आपण सर्वथैव सोडून द्यावें असें म्हणणारे लोक आपल्यात फार थोडे आहेत. हें वैशिष्ट्य जपून ठेवावें, धर्म म्हणून जो आहे तो सोडूं नये. असें म्हणणारेच कोट्यवधि लोक आहेत. म्हणून धर्म म्हणजे काय आहे हें अवश्य समजून घेतलें पाहिजे. धर्माशिवाय जगतां येईल की नाहीं असा प्रश्न कोणी विचारतात. त्याला उत्तर असें की धर्माशिवाय जगता येत नाहीं असें नाहीं. पण त्याबरोबर हेंहि लक्षांत ठेविलें पाहिजे कीं समाजाच्या प्रगतीत—किंवा अगदी कांटेकोरपणें बोलावयाचें तर समाजाच्या गतीत—सर्व ठिकाणीं धर्म ही एक अवश्य गोष्ट ह्मणून होऊन राहि-लेली आहे. समाजाच्या आद्यावस्थेंत असा एक काळ होता कीं त्या वेळीं कायदा ह्मणून काहीं नव्हता: असल्याच तर 'बळी तो कान पिळी' एवढाच तो होता. पण पुढें त्याची आवश्यकता वाटूं लागल्यामुळें तो उत्पन्न करण्यात आला. तीच स्थिति धर्माचीहि आहे. ह्मणून धर्म जर कोठें नसेल तर तो उत्पन्न करावा असें निक्षून मागणें अवश्य वाटतें. तत्वदृष्ट्या विचार करता ईश्वर म्हणून कोणी खरोखर नसला, तरी तो उत्पन्न केला पाहिजे. धर्म व ईश्वर या कल्पना समाजधार-णेला अत्यंत अवश्य आहेत. सामान्य व्यवहारी लोकाना त्याची जरूरी आहे. काहीं काही गोष्टींशिवाय कित्येक व्यक्तींचें चाललें, तसें ईश्वराशिवाय कोणाकोणाचें चालू शकेल: पण सामान्यतः तो पाहिजे असें मला वाटतें. अशा दृष्टीनें विचार करून सनातन धर्म म्हणजे काय हें आता पहावयाचें आहे. त्यांत इतर धर्मांशी त्याची तुलना अशी करावयाची नाहीं. ओघाओघानें अवश्य वाटेल तितकाच त्याचा उल्लेख करावयाचा आहे.

## सनातन किंवा आर्यधर्म याचें सामान्य स्वरूप

आर्यधर्माचें स्वरूप सांगतांना प्रथम थोडेंसें तुलनात्मक विवेचन केलें पाहिजे. उदाहरण म्हणून महंमदी धर्म घेतला, तर त्यात ईश्वर म्हणजे राजाचा राजा अशी कल्पना दिसते. कुराणाच्या द्वारा त्यानें जें सांगितलें, त्याच्या बाहेर जातां यावयाचें नाहीं व त्यात कोणाला बदलहि करतां यावयाचा नाहीं. ज्यू लोकांची देवाची कल्पना ख्रिस्ती लोकांच्या जुन्या करारांत दिसून येत असून तो देव मोठा मानी व रागीट आहे. माणसाच्या बारीक सारीक अपराधांबद्दल त्यांना देवानें शिक्षा दिल्याची उदाहरणें

जुन्या करारात जिकडे तिकडे आढळतात. ईश्वराची ज्ञानफळ न खाण्याची आज्ञा ईव्हच्या सांगण्यावरून मोडल्यामुळेंच ॲडमला मृत्यूची शिक्षा झाली. त्यानंतर ख्रिस्ती लोकांच्या देवाचा विचार केला तर त्यांतील दोन प्रमुख पंथ जे रोमन कॅथॉलिक व प्रॉटेस्टंट, त्यांत रोमन कॅथॉलिक त्याला आईसारखा मानतात (God as mother) तर प्रॉटेस्टंट त्याच्याकडे पिता म्हणून पहातात ( God as father ). पण हिंदुधर्मात देवाविषयींची कल्पना अशा कोणत्याहि प्रकारें आकुंचित नाही. त्यात एक देव मानतात, तसें अनेकहि मानतां येतात. पण त्या अनेकांत एकत्व अनुस्यूत आहे. 'मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः।' [ ४, ११ ] म्हणजे सर्व माणसें माझ्याच मार्गाचें अनुकरण करतात असें या संबंधात गीतेंत सांगितलें असून कालिदासानें तीच कल्पना 'बहुधाप्यागमैर्भिन्नाः पन्थानः सिद्धिहेतवः। त्वय्येव निपतन्त्योघा जाह्नवीया इवार्णवे॥' ( र. १०, २६ ) या सुंदर श्लोकात उत्तम रीतीनें सांगितली आहे. भिन्न भिन्न आगमानुसार ईश्वरप्राप्तीचे मार्ग भिन्न वाटले तरी, गंगेचे विविध ओघ जसे शेवटीं समुद्रांतच पडतात, तसे ते सारे मार्ग, हे परमेश्वरा, तुलाच येऊन मिळतात, अशा रीतीनें सहिष्णुतेनें ही मांडणी हिंदुधर्मात केलेली आहे. इंग्रज लोकात कॅथॉलिक व प्रॉटेस्टण्ट असे पंथ झाले, तेव्हा आरंभीं उभयतांनीं उभय पक्षाच्या लोकांना संधि मिळाली त्याप्रमाणें जाळून टाकण्यासहि मागें पुढें पाहिलें नाहीं. लॅटिमर, रिडले यांना कॅथोलिकांनीं जाळून मारल्याचें इंग्लंडच्या इतिहासात प्रसिद्धच आहे. ख्रिश्चन व महंमदीय यांच्यामध्येंहि धर्मावरून झालेलीं क्रुसेड्स् नावाचीं घनघोर युद्धें सर्वास ठाऊक आहेतच. हिंदुस्थानांत धर्मकारणावरून तंटे मुळींच झाले नाहींत असें नाहीं. पण त्यांची मजल यूरोपातल्या इतक्या प्रमाणावर कधींहि गेली नाहीं. आपल्या प्राचीन इतिहासाकडे पाहिल्यास बौद्ध राजांनीं वैदिकाना व वैदिक राजानीं बौद्ध भिक्षूंना दानें दिल्याचीं उदाहरणें अनेक मिळतात. अशा रीतीनें इतर धर्मांत न दिसणारी सहिष्णुता ही हिंदुधर्माचें मुख्य वैशिष्ट्य आहे. इतर धर्म आपल्या प्रमाणें सर्वांना करून घेण्याचा आग्रह धरितात, पण हिंदुधर्म इतरधर्मीयानीं आपल्या सारखें होऊं नये असें म्हणतो, हा त्याचा दुसरा विशेष होय. अशोकानें आपल्या आज्ञांमध्यें ब्राह्मण आणि श्रमण म्हणजे बौद्ध भिक्षु याना सारखाच मान द्या, असा उपदेश केलेला आढळतो. यातील रहस्य हेंच आहे.

हिंदुस्थान देशांत भिन्न पन्थाचे भिन्न लोक आहेत हें खरें, पण त्या सर्वांना एकत्र गोंवणाऱ्या तीन महत्त्वाच्या गोष्टी आहेत. पहिली गोष्ट अशी कीं, त्या सर्व पंथांची संस्कृत म्हणजे दैवी वाक् ही धर्मभाषा आहे. वैदिकांचा तर प्रश्नच नाहीं, पण बौद्ध व जैन यांचेही धर्मग्रंथ संस्कृत भाषेंत आहेत, व सर्व पंथ संस्कृत भाषेला विद्वानाची भाषा समजतात. दुसरी गोष्ट म्हणजे सर्व साधारण संस्कृति. पंथ

भिन्न असले तरी त्यांच्या सामान्य चालीरीति व समजुती एकाच साच्याच्या आहेत. तिसरी गोष्ट ग्रंथप्रामाण्याची. वैदिक धर्मातील वैष्णव, शैव, अद्वैती, द्वैती असे भिन्न भिन्न पंथ आपापल्या मतानुसार ग्रंथ लावीत असले, तरी सर्वजण वेद, उपनिषदें यांचीच कास धरतात. ' तत्त्वमासि ' म्हणजे ' तें ब्रह्मच तू आहेस ' असा अर्थ करून कोणी अद्वैत प्रतिपादो, किंवा ' तस्य त्वं असि ' म्हणजे 'त्या परमेश्वराचा तूं आहेस' असा करून कोणी द्वैत स्थापो, दोघेही एकाच उपनिषदाला प्रामाण्य देतात. हा सर्व प्रकार वृक्ष व रान यांतील संबंधासारखा असून तो आज अडीच तीन हजार वर्षे तसा चालत आलेला आहे. पण रानाकडे पहातांना आह्मांला वृक्षाचा विसर पडतो व वृक्षाचा विचार करतांना एकेक वृक्ष डोळ्यापुढें ठेवून सर्वोमिळून होणाऱ्या रानाला आह्मी विसरतों, अशी स्थिति मात्र आमची झाली आहे.

## धर्म म्हणजे काय ?

धर्माचा विचार करतांना त्या शब्दाचे निरनिराळे अर्थ लक्षात घेतले पाहिजेत. महाभारतात यक्षानें विचारलेल्या प्रश्नाला उत्तर देतांना युधिष्ठिरानें ' धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पंथाः ।' असें म्हटलें. धर्माचें खरें स्वरूप अत्यंत गूढ आहे, म्हणून श्रेष्ठ पुरुष जसें वागतात तसें वागावें असा त्याचा आशय असून तैत्तिरीयोपनिषदाच्या शीक्षाध्यायांतही तसेंच सांगितलें आहे. कारण धर्मासाठीं श्रुति पहाव्या तर त्या भिन्न भिन्न आहेत व स्मृतींचाही तोच प्रकार आहे. एका ऋषीचें मत एक, तर दुसऱ्याचें दुसरेंच. तेव्हां प्रमाण तरी कोणाला मानावयाचें असा पूर्वपक्ष करून ' महाजनो येन गतः स पंथाः ' असा निष्कर्ष त्यात काढिलेला आहे. यांत धर्म म्हणजे एकंदर आचार असा अर्थ दिसतो. महाभारतातच पुढें ' धारणात् धर्म इत्याहुः ' असें सांगितलें असून धारण करतो म्हणून धर्माला धर्म ह्मणतात असा त्याचा अर्थ आहे. हें धारण शारीरिक तसेंच आध्यात्मिकहि असेल. ' यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ' हें पुरुषसूक्तांतील ऋगर्ध सर्वांना ठाऊक असेलच. त्यांत यज्ञाला धर्म म्हटलें असून तो शब्द ' धर्मन् ' अशा रूपानें नपुंसकलिंगी योजलेला आहे. हे यज्ञरूपी धर्म पूर्वीचे होत असें त्यात म्हटलें आहे. म्हणजे यज्ञ हें वैदिक धर्माचें पूर्वीचें स्वरूप होतें. पुरुषसूक्त हें ऋग्वेदाचा अगदीं मागूनचा भाग आहे व त्याच्या भाषेवरून तें ऋग्वेदांतील आश्विनसूक्ताच्या मानानें फार अलीकडचें आहे असें उघड दिसतें. आश्विनसूक्तें सामान्य संस्कृतज्ञास मोठ्या प्रयासानेंच समजणें शक्य आहे, पण पुरुषसूक्त सहज समजेल इतक्या सोप्या भाषेंत आहे. यात जो यज्ञरूप धर्म आहे तोच मीमांसकांच्या ' चोदनालक्षणोऽर्थो धर्मः ' या व्याख्येंत आहे. ' ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत ' असें जें वेदांत सांगितलें आहे त्यावरून ज्याला स्वर्ग पाहिजे असेल तो ज्योतिष्टोम यज्ञ करी. अशा प्रकारची चोदना ह्मणजे नेटाचा उपदेश

त्याविषयीं वेद करतात तो धर्म ह्मणजे यज्ञ होय. यानंतरचा धर्माचा अर्थ उचित आचरण असा असून 'धर्मस्य गोप्ता अजनि' म्हणजे धर्माचें रक्षण करणारा (Defender of the Faith) सिद्ध झाला असें जें वचन राजाविषयीं राज्याभिषेकानंतरचें म्हणून ब्राह्मणात येतें, त्यात तो आढळून येतो. धर्माचा तिसरा अर्थ आश्रमधर्म असा असून 'त्रयो धर्मस्कन्धाः' इत्यादि वचनात तो दिसून येतो. धर्माचे तीन स्कंध म्हणजे ब्रम्हचर्यधर्म, गृहस्थधर्म आणि वानप्रस्थ धर्म हे होत. धर्माचा चवथा अर्थ वर्णाश्रमानुसार व्यक्तीकडे आलेलें किंवा तिनें अंगीकारलेलें कर्तव्य असा आहे. 'स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि। (२, ३१) किंवा 'श्रेयान स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात्। स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' (३. ३५. १८, ४७) या प्रसिद्ध गीतावचनात तोच अभिप्रेत आहे. अशा धर्माचें प्रतिपादन करणारें जें शास्त्र तें आमचें धर्मशास्त्र असून तें या आर्यावर्तालाच लागू आहे, इतर देशाना नाहीं. या आमच्या धर्मशास्त्रात हक्कापेक्षा (right) कर्तव्यावरच (duty) मोठा भर दिलेला आहे. कर्तव्य म्हणजेच धर्म होता. हक्काचा संबंध कर्तव्याच्या अनुषंगानें येईल तेवढाच आणिला जाई. या आमच्या धर्मशास्त्रात आणखी एक विशेष असा आढळतो कीं त्यात धर्म व नीति हीं पृथक् मानिलीं आहेत. पण याचा अर्थ असा नव्हे कीं तें धर्माचा व नीतीचा संबंधच जोडीत नाहीं. नीतीचा अन्तर्भाव धर्मात होऊन जातो. सामान्य व विशेष असा त्याचा संबंध आहे. उदाहरणार्थ, 'सत्यं वद, धर्मं चर' म्हणजे सत्य बोल आणि धर्माचेंहि आचरण कर असें तैत्तिरीयोपनिषद् सांगतें. सत्य बोलणें हें तर पाहिजेच, पण त्यानंतर धर्माचेंहि आचरण केलें पाहिजे. अशा रीतीनें नीति व धर्म याचा संबंध येतो. पण आमच्या धर्मशास्त्रात त्यावर भर कमी आहे एवढें खरें. आमच्या धर्मशास्त्रातील धर्म शब्दाचा थोडक्यात अर्थ सांगावयाचा तर तो वर्ण व आश्रम यांची कर्तव्यें. जबाबदाऱ्या व अधिकार असा सांगता येईल. वर्णाश्रमधर्मात सर्वांचा अन्तर्भाव होतो. वैशेषिक दर्शनात 'यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः स धर्मः।' अशी धर्माची व्याख्या केली आहे. इहपरलोकींचा उत्कर्ष व परमात्मप्राप्ति हीं ज्याच्या योगानें साधतात तो धर्म होय.

## शास्त्र म्हणजे काय?

आता शास्त्र म्हणजे काय तें पाहूं. वेदादि ग्रंथांना शास्त्र ही संज्ञा असून 'शास्त्रयोनित्वात्' या ब्रह्मसूत्रात [१-१-३] शास्त्र म्हणजे वेद असा अर्थ आहे. ब्रह्माला त्यांत शास्त्रयोनि म्हणजे ज्याच्यापासून शास्त्र झालें किंवा शास्त्रामुळे ज्याचें ज्ञान होऊं शकतें तें असें म्हटलें आहे. पण शास्त्र शब्दाचा दुसरा अर्थ 'शासन म्हणजे नियमन करणारें तें' असा आहे. ब्रह्मसूत्रावरील शांकरभाष्या-

वरच्या भामती नामक टीकेंत . ' प्रवृत्तिर्वा निवृत्तिर्वा नित्येन कृतकेन वा। पुंसा येनोपदिश्येत' तें शास्त्र अशी शास्त्राची व्याख्या केली. प्रवृत्तीचा किंवा निवृत्तीचा नित्य अथवा नैमित्तिक साधनांनीं किंवा नित्य म्हणजे वेद व अनित्य म्हणजे स्मृति यांनीं जें उपदेश करतें तें शास्त्र होय.

आमचा धर्म म्हणजे इतर धर्मांप्रमाणें कित्येक विशिष्ट मताचा समुच्चय नसून जीवनपद्धति हे त्याचें स्वरूप आहे. खावें, प्यावें, चैन करावी, हें कोणी सांगावें लागत नाहीं. या गोष्टी स्वाभाविकपणेंच समजतात. पण आचाराचें नियमन कसें करावें हें धर्म सांगतो. हा आशय मनूनें ' न मांसभक्षणे दोषो न मद्ये न च मैथुने। प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला। ' [ ५, ५६ ] या श्लोकांत व्यक्त केला आहे. या गोष्टीचा विचार केल्यास जन्मजात अशा स्वाभाविक प्रवृत्तीला आळा घालून भारतीय आर्यांनीं मांसवर्जन केलें हा त्यांनीं फार मोठा विजय संपादन केला असें म्हणावें लागतें. हा त्यांचा विजय सोडून देणें अवश्य असेल तर सोडून द्या. पण तो विजय आहे हें उघड आहे. 'मां स भक्षयिताऽमुत्र यस्य मांसमिहाद्म्यहम्। एतन्मांसस्य मांसत्वं प्रवदन्ति मनीषिणः' [ मनु. ५,५५]– मीं ज्याचें मांस या लोकीं खातों, तो [ सः ] मला स्वतःलाच [ मा ] परलोकीं खाऊन टाकील असें आहे, म्हणून मांसाला ' मां सः ' असें ज्ञात्यांनीं म्हटलें आहे. आमच्या धर्मशास्त्रांत व्यक्ति व समाज यांचा बरोबरीनें विचार केलेला आहे. याच्या उलट आज कोणी एका बाजूनें व्यक्तिनिष्ठ तर कोणी दुसऱ्या बाजूनें समाजनिष्ठ अशीं परस्परविरुद्ध मतें प्रतिपादीत आहेत. प्रेमोत्तर विवाह कीं विवाहोत्तर प्रेम असे प्रश्न करून त्यांचें उत्तर व्यक्तिनिष्ठेनें द्यावयाचें व त्यांत समाजाचा काय संबंध असें विचारावयाचें आणि दुसरे बाजूनें व्यक्तीनें चढाओढीच्या जोरावर विपुल द्रव्य मिळविलें, तर तसें त्याला मिळविण्याचा काय अधिकार, असें म्हणून तें सर्व्या समाजांत वाटून देण्याचा प्रयत्न करावयाचा यात सुसंगतपणा तो काय ? पण असा प्रकार आमच्या धर्मशास्त्रांत नाहीं.

## धर्ममूल काय ?

आमच्या धर्मशास्त्रांत सांगितलेल्या धर्माला आधार काय, म्हणजे त्याचें मूल काय या प्रश्नाचा म्हणजे धर्मप्रामाण्याचा आता विचार करूं. याविषयीं आपस्तंबधर्मसूत्रांत ' धर्मज्ञसमयः प्रमाणं वेदाश्च ' ( १, १, १, २ ) म्हणजे धर्म जाणणाऱ्यांची वहिवाट व वेद हे धर्माविषयीं प्रमाण होत. श्रुति व स्मृति या मूल प्रमाण व त्यांच्या अभावीं ' शिष्टाचारः प्रमाणम्' ( १, ५ ) असें वसिष्ठधर्मसूत्रांत सांगितलें आहे. यांत शिष्ट म्हणजे ' अकामात्मा ( १, ६ )' अर्थात निष्काम असा ज्ञाता पुरुष होय. वसिष्ठानें धर्माला ' अगृह्यमाणकारण ' म्हणजे ज्याचें कारण समजणें शक्य नाहीं असा

अदृष्ट अर्थ असें म्हटलें आहे. 'वेदोऽखिलो धर्ममूलं स्मृतिशीले च तद्विदाम्। आचारश्चैव साधूनामात्मनस्तुष्टिरेव च'। (म. २, ६) या श्लोकांत मनूनें व 'श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः। सम्यक्संकल्पजः कामः धर्ममूलमिदं स्मृतम्।' [याज्ञ. १, ७] या श्लोकात याज्ञवल्क्यानें तोच आशय सांगितला आहे. यातील सदाचार किंवा साधूंचा आचार हा श्रुतिस्मृति ज्या विषयीं मुग्ध आहेत किंवा ज्या विषयीं त्या विकल्प सांगतात त्याच धर्मविषयांत प्रमाण मानावयाचा आहे. तसाच 'सम्यक्संकल्पजः कामः' हे शब्दहि महत्त्वाचे आहेत. योग्य प्रकारच्या संकल्पानें उत्पन्न केलेली इच्छा असेल तर ती धर्ममूल होऊं शकते, अयोग्य विचाराअन्तीं झालेली इच्छा नव्हे !

धर्मशास्त्रांत अनेक विषयांचा अन्तर्भाव होतो. या चातुर्मास्यीय व्याख्यानमालेंत त्यांतील कोणते विषय प्रामुख्यानें घेतले जातील तें हस्तपत्रकांत दिग्दर्शित केलेंच आहे. पुढील व्याख्यानांत धर्माचें श्रुतिस्मृतिमूलकत्व हा विषय येईल.



# श्रुतींचें धर्ममूलकत्व

## १ विषयप्रवेश

पहिल्या व्याख्यानांत हिंदुधर्म म्हणजे काय व त्या धर्माचें मूळ कोणतें याचा विचार झाला. श्रुति, स्मृति व सदाचार हीं जी धर्माचीं प्रधान प्रमाणें त्याचा विचार आतां करावयाचा आहे. पण हा सर्व विचार एका व्याख्यानांत पूर्ण होण्यासारखा नसल्यामुळें श्रुति या धर्ममूल कशा एवढेंच प्रथम पाहूं.

### वेद म्हणजे काय ?

'श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः' असें मनूनें ( २, १० ) सांगितलें आहे. श्रुति म्हणजे वेद आणि स्मृति म्हणजे धर्मशास्त्र होय. या सर्व श्रुति ऊर्फ वेद धर्माचें मूल होत असें मनु म्हणतो हें पूर्वी सांगितलें आहे. ( वेदोऽखिलो धर्ममूलम् ). हे वेद म्हणजे काय तें आता पाहूं. आपल्या वाङ्मयाचे वैदिक व वैदिकेतर असे दोन भाग करता येण्यासारखे असून त्यांविषयीं सविस्तर विवेचन करावयाचें तर वीस तरी व्याख्यानें द्यावीं लागतील. अर्थात त्याचा येथें संक्षेपानेंच विचार केला पाहिजे. आज वेद चार आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद. पण त्यांविषयीं ग्रंथोक्त कल्पना पाहिल्या तर 'अनंता वै वेदाः' म्हणजे वेद हे अनन्त आहेत असें तैत्तिरीयब्राह्मणांत ( ३, १७, ११ ) म्हटलें आहे. याविषयीं भारद्वाजाची गोष्ट प्रसिद्ध आहे. भारद्वाजानें तीन पिढ्या वेदांचें अध्ययन केलें, तेव्हां 'तूं किती अध्ययन केलेंस' असें इन्द्रानें त्याला विचारिलें असता त्यानें समोर दिसणाऱ्या तीन पर्वतांतील एक एक मूठ घेऊन 'एवढें माझें अध्ययन झालें' असें उत्तर दिलें. तीन पर्वत हे तीन वेदांचे दर्शक व त्यांतून एक एक मूठ काय तें अध्ययन झालें असें म्हणून वेदविस्ताराची कल्पना या कथेंत सांगितली आहे. या कथेंत अतिशयोक्ती असली तरी आजहि वेदशाखांचीं अनेक

नांवें आढळतात. वैयाकरण पतंजलीनें आपल्या महाभाष्यांत वेदविस्तार सांगतांना ' एकशतमध्वर्युशाखाः सहस्रवर्त्मा सामवेदः एकविंशतिर्बाह्वृच्यम् नवधाऽथर्वणो वेदः ' । असें म्हटलें आहे व चरणव्यूह नामक ग्रंथांतहि तसाच विस्तार दिला आहे. त्याप्रमाणें पहातां ऋग्वेदाच्या एकवीस शाखा, यजुर्वेदाच्या १०१, सामवेदाच्या एक हजार व अथर्ववेदाच्या नऊ शाखा होत्या. त्यांतील ऋग्वेद घेतला तर त्याच्या शाकल व बाष्कल अशा दोन शाखा प्रसिद्ध असून शाकल ही सर्वत्र आढळते. खिल सूक्तें जींत आहेत ती बाष्कल शाखा होय. यजुर्वेदाच्या शुक्ल व कृष्ण अशा दोन शाखा प्रसिद्ध असून शुक्लांत पुनः माध्यंदिन व काण्व अशा उपशाखा आहेत. कृष्णयजुर्वेदाच्या शाखा पुष्कळ होत्या, पण तैत्तिरीय शाखाच मुख्यत्वें राहिलेली आहे. त्याची मैत्रायणी शाखा क्वचित् कोठें आढळते. सहस्रशाखात्मक सामवेदाची सांप्रत एकच शाखा आढळते. अथर्व वेदाचीहि आतां एकच शाखा असून, तिचें अध्ययन क्वचितच होतें. तिचें अध्ययन केलेले दोन ब्राह्मण सांगलीकडे होते. तो वेद अभिचारात्मक म्हणजे जारणमारण इत्यादि विषयांनी भरलेला विशेषें करून आहे. तत्वज्ञानासारखे इतर विषयहि अल्प प्रमाणांत त्यात आहेत, नाही असें नाहीं. हा वेद सर्वांच्या मागून मान्यता पावला. प्रथम तीनच वेद विशेषेंकरून मानीत होते व त्याला अनुसरून ' त्रैविद्या मां सोमपाः पूतपापाः ' इ० [ ९,२० ] गीतेंत म्हटलें असून सांप्रतचें त्रिवेदी हें नांव तदर्थक आहे. पुढें अथर्ववेदाची भर पडून चार वेद झाल्यावर चतुर्वेदी ऊर्फ चोबे हें नाव प्रचलित झालें.

'मंत्रब्राह्मणात्मको वेदः' अशी वेदाची व्याख्या केली असून तिला अनुसरून मंत्रसंग्रहाला संहिता व इतर वेदभागाला ब्राह्मण अशा संज्ञा दिलेल्या आहेत. वेदाच्या निरनिराळ्या शाखा व संहिता ब्राह्मण इत्यादि भाग याची आरंभींचीं वाक्यें प्रतीकें म्हणून घेऊन तीं ब्रह्मयज्ञात एकत्र गुंफिलेलीं आहेत. प्रथम ' अग्निमीळे पुरोहितं ' इत्यादि नऊ ऋचा ऋग्वेदाच्या घेऊन नंतर ऐतरेय ब्राह्मणाचें पहिलें वाक्य [ अग्निर्वै देवानामवमो विष्णुः परमः ] व ऐतरेय आरण्यकांतील पाच अध्यायांचीं पहिलीं वाक्यें देऊन ' अथ महाव्रतम् । एष पंथा एतत् कर्म । अथातः संहिताया उपनिषत् । विदा मघवान्विदा । महाव्रतस्य पंचविंशतिं सामिधेन्यः । ], पुढें यजुर्वेद [ इषे त्वोर्जे त्वा ], सामवेद [ अग्न आयाहि वीतये ], अथर्ववेद ( शन्नोदेवीरभिष्टये ), यांचीं प्रतीकें आणि नंतर ऋग्वेदाच्या निघण्टु व सहा अंगांचीं पहिलीं वाक्यें दिलेलीं आहेत. [ कल्प—अथैतस्य समाम्नायस्य; निरुक्त-समाम्नायः समाम्नातः । छंदः—मयरसतजभनलगसंमितं । निघण्टु-गौः ग्मा । ज्योतिष-पंचसंवत्सरमयं । शिक्षा-अथ शिक्षां प्रवक्ष्यामि । व्याकरण-वृद्धिरादैच् ।]. हारीतधर्मसूत्र किंवा वैशेषिक सूत्र , पूर्व व उत्तर मीमांसा [ अथातो धर्मं व्याख्यास्यामः । अथातो धर्मजिज्ञासा । अथातो ब्रह्मजिज्ञासा ]. महाभारत ( नारायणं नमस्कृत्य ।,

याज्ञवल्क्यस्मृति [ योगीश्वर याज्ञवल्क्यं ] इत्यादि ग्रंथांचीहि आद्यवाक्यें ब्रह्मयज्ञांत गोंवून साऱ्या अध्ययनक्रमाची कल्पना एकत्र दिली आहे. वेदविद्येचें अध्ययन निर्हेतुक करावें [ निष्कारणं षडंगो वेदोऽध्येयो ज्ञेयश्च ] असें सांगितलें असून कलियुगांत पुरुषांची शक्ति क्षीण झाली असल्यामुळें त्या विस्ताराचा संक्षेप करून निदान एक तरी ऋचा प्रत्यहीं म्हणावी असा दंडक घालून देण्यात आला. असो.

संहितेनंतर येणारा वेदाचा भाग जी ब्राह्मणें त्याचा आतां उपलब्ध विस्तार पाहूं. ऋग्वेदाची ऐतरेय व कौषीतकि किंवा शांखायन अशीं ब्राह्मणें प्रसिद्ध असून यजुर्वेदापैकीं शुक्ल यजुर्वेदाचें शतपथ ब्राह्मण नावाचें फार मोठें ब्राह्मण आहे. त्याचें इंग्रजी भाषान्तर महा मोठया पुस्तकांच्या रूपानें छापिलेलें असून एक हजार पानांचा मूळ ग्रंथ वेबरनें स. १८५९ या वर्षी छापून प्रसिद्ध केला. तसेंच कात्यायन श्रौतसूत्रहि त्यानें छापिलें. हिंदुस्थानांतील आधुनिक वैदिक धर्माभिमान्यांपेक्षां जर्मन पंडितांनीं वैदिक वाङ्मयाचा विशेष अभ्यास केलेला आढळतो असो. प्रत्येक वेदशाखेची एक, दोन किंवा अधिकहि ब्राह्मणें आहेत. कृष्णयजुर्वेदाचें तैत्तिरीय ब्राह्मण, सामवेदाचें तांड्य महाब्राह्मण आणि अथर्ववेदाचें गोपथ ब्राह्मण अशीं प्रसिद्ध आहेत. हे सर्व ग्रंथ पूर्वी पाठ करीत असत. हे ग्रंथ ' अर्थतः शब्दतश्च ' अभ्यासावे असें सांगितलें असून केवळ शब्दतः पाठ करणाऱ्याची निंदाहि केलेली आढळते. ' स्थाणुरयं भारहारः किलाभूत् अधीत्य वेदं न विजानाति योऽर्थम् ' म्हणजे अर्थ न जाणतां जो वेदांचें पठण करतो तो केवळ भारवाही लाकडाचा ओंडा समजावा, असें निरुक्तांत म्हटलें आहे. पण ही केवळ शब्दपाठकाची निंदा नसून अर्थ जाणणाऱ्याची स्तुति आहे. निंदा ही केवळ निंदा करण्यासाठीं नसून इष्ट गोष्ट करणाराला प्रोत्साहन देण्यासाठीं असते व तदनुसार अर्थ जाणणारा पुरुष स्वर्गास जातो, असें म्हटलेलें आढळतें.

मंत्र, ब्राह्मण ( आरण्यकें व उपनिषदें धरून ) याशिवाय प्रत्येक वेदशाखेला कल्पसूत्र म्हणून आणखी एक भाग जोडलेला आहे. आश्वलायनसूत्र, शांखायनसूत्र इत्यादि कल्पसूत्रें असून त्यांत आणखी तीन भाग असतात. [१] सोमयागादि मोठया यज्ञयागांचे विधि सांगणारीं तीं श्रौतसूत्रें, [२] उपनयनविवाहादि गृह्यसंस्कारांचे विधि सांगणारीं तीं गृह्यसूत्रें आणि [ ३ ] वहिवाटी व आचार सांगणारीं धर्मसूत्रें, यांपैकीं पहिलीं दोन म्हणजे श्रौत व गृह्य हीं सर्व शाखांची असून तिन्ही सूत्रें एका यजुर्वेदांत मात्र आढळतात. इतर वेदांचीं धर्मसूत्रें उपलब्ध तरी नाहींत. याप्रमाणें श्रुति व तदनुषंगिक सूत्रग्रंथांचा विस्तार आहे.

## ३ वेदांचे विषयानुरूप अंतर्विभाग

यज्ञ हा वेदांतील मुख्य धर्म होता हें ' यज्ञेन यज्ञमयजन्त देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् । ' ( ऋ. १०. ९०·१६ ) या ऋग्वचनाला अनुसरून पूर्वी

सांगितलेंच आहे. त्या धर्माच्या दृष्टीनें मीमांसकांच्या मताप्रमाणें वेदांतील वचनांचे पांच प्रकार करतां येतात. पहिला प्रकार मंत्र. देवतेची पूजा करतांना तिच्या वर्णनपर किंवा स्तुतिपर जें म्हणावयाचें तो मंत्र. प्रस्तुत मात्र बऱ्याच मंत्रांचा प्रकार चमत्कारिक झाला आहे. उदाहरण केतूचें आवाहन करताना ' केतुं कृण्वन्नकेतवे' इत्यादि मंत्र म्हणतात; पण त्यांत केतु म्हणजे ध्वज, झेंडा, असा अर्थ असून राहू—केतूपैकीं केतूचा कांहींच संबंध नाहीं. इतरही अनेक मंत्रांचा असाच प्रकार झाला आहे. दुसरा प्रकार विधि. अमुक गोष्ट अमक्यानें करावी, उदाहरणार्थ, ' ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत ' असें सांगणारें वचन म्हणजे विधि. वैदिक ग्रंथांत आलेले बहुतेक विधि श्रौत म्हणजे यज्ञ-विषयक आहेत. ' न मलवद्वाससा संवसेत् ' म्हणजे रजस्वला स्त्रीला स्पर्श करूं नये, ब्रह्मचाऱ्यानें मद्य पिऊं नये, मांस खाऊं नये ( वर्जयेन्मधु मांसं च । मनु. २, ११७; ६·१४ ) अशासारखे स्मार्त म्हणजे स्मृतींत सांगितलेले विधी वेदांत फार थोडे आहेत. तिसरा प्रकार अर्थवाद. वेदांत ' अग्निर्हिमस्य भेषजं ' म्हणजे अग्नि हा थंडीवरील उपाय होय अशासारखी अगदीं सामान्य गोष्टी सांगणारीं वचनें आढळतात. पण वेद म्हणजे त्या परमेश्वररूपी महाभूताचा निश्वास होय असें जें वर्णन आहे, त्याला तीं जुळणारीं अर्थात् नाहींत. अशीं वाक्यें म्हणजे विधींच्या स्तुतिपर होत (विधिना तु एकवाक्यत्वात् स्तुत्यर्थेन विधीनां स्युः ) असें म्हणून त्यांना मीमांसक अर्थवादांत गणतात. ऐतरेय ब्राह्मणांतील नाभानेदिष्ठाची कथाहि अशीच आहे. तो गुरुगृहीं असतां त्याच्या इतर भावांनीं पित्याच्या द्रव्याची आपसांत वाटणी केली व नाभानेदिष्ठाला कांहीं ठेविलें नाहीं. तो घरीं परत आल्यावर आपली वांटणी मागूं लागला, तेव्हां ' पिता हाच तुझी वांटणी ' असें ते भाऊ म्हणाले. अशा कथांना पुराकल्प म्हणतात व त्यांचा अन्तर्भाव अर्थवादात करतात. चवथा प्रकार प्रतिषेध [ उदाहरणार्थ, नातिरात्रे षोडशिनं गृह्णति ] हा विधीच्या उलट असून अमुक करूं नये असें सांगणारें वचन होय. पांचवा प्रकार नामधेय. यागांचीं नांवें ज्यांत सांगितलीं असतात त्यांना नामधेय म्हणतात. [ चित्रा, उद्भिद्, इत्यादि ]. अशा रीतीनें वेदवाक्यांची विभागणी करण्यांत येते.

## ४ कित्येक आचारांचें वेदांतील मूळ

वेदांत स्मार्त असे सामान्य आचार विधिरूपानें फारसे आलेले नाहींत हें पूर्वी सांगितलेंच आहे. पण अन्यरूपानें ज्या आचारांचा उल्लेख आढळतो त्यांतील कांहींचा आतां विचार करूं. प्रथम विवाह घेऊं. विवाह हा अनेक संस्कारांपैकीं एक असून सांप्रतच्या व्यवहारांत तोच मुख्यत्वेंकरून उरला आहे. विवाहाविषयीं याज्ञवल्क्य म्हणतो ' अनन्यपूर्विकां कांतां असपिंडां यवीयसीम् । अरोगिणीं भ्रातृमतीं असमानार्षगोत्रजाम् ' । ( या. १,५२–५३ ). कोणत्या

प्रकारची भार्या करावी हें सांगतांना यांत भ्रातृमती म्हणजे 'भाऊ असलेली' हा जो शब्द योजलेला आहे तो महत्त्वाचा असून त्याचें मूळ वेदांत सांपडतें. 'अभ्रातेव पुंस एति प्रतीची गर्तारुगिव सनये धनानाम्'। (ऋ. १,१२४,७), 'अभ्रातर इव जामयास्तिष्ठन्तु हतवर्चसः'। (अथर्ववेद १,१७,१) अशीं जीं वचनें वेदांत आहेत त्यांवरून भ्रातृहीन कन्येच्या विरुद्ध असलेला कटाक्ष दिसून येतो. जिला भाऊ नाहीं अशा कन्येशीं विवाह केल्यास ती पित्याच्या घरीं परत जाण्याचा संभव असतो. त्या काळीं संततीचें महत्त्व फार असल्यामुळें अशी मुलगी करण्यास कोणी धजत नसे. 'प्रजाभिरग्नेअमृतत्वमश्याम्' (ऋ. ५,४,१०) म्हणजे संततीच्या योगें आम्ही अमृतत्व भोगूं, किंवा 'नापुत्रस्य लोकोस्ति' [ऐ. ब्रा.] म्हणजे पुत्रहीनाला स्वर्ग मिळत नाहीं, किंवा 'जायमानो ह वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते' [तै. सं.] म्हणजे द्विजाला जन्मतःच तीन ऋणें उत्पन्न होतात; पितरांचें, ऋषींचें व देवांचें-त्यांपैकीं पितरांचें ऋण संततीनें फिटतें, स्वाध्यायानें ऋषींचें व यज्ञानें देवांचें; अशीं जीं वैदिक वचनें आहेत, त्यावरून संततीचें तत्कालीन महत्त्व समजून येतें. पण भ्रातृहीन कन्येचा पुत्र आपल्या पितामहाकडे पिंडदानासाठीं यावयाचा असल्यामुळें तिच्या पतीला त्या पुत्राचा उपयोग होत नसे. यामुळें अशा कन्यांना दोषी समजून त्यांच्याशीं विवाह करणें अयुक्त ठरविण्यांत आलें होतें व हा वेदांतील आशय 'भ्रातृमती' या शब्दानें याज्ञवल्क्यानें व्यक्त केला आहे. 'धर्मप्रजासंपत्तिः प्रयोजनं दारसंग्रहस्य' म्हणजे विवाहाचा उद्देश धर्मसंपत्ति व प्रजारूपसंपत्ति मिळविणें हा होता. तो भ्रातृहीन कन्याविवाहानें तत्कालीन पुत्रिकापुत्रपद्धतीमुळें साधतां येईना, म्हणून अशा प्रकारचा निर्बंध वेदकालीं पडला होता व तो पुढें वसिष्ठधर्मसूत्रांत (१७,१६) 'विज्ञायते अभ्रातृका पुंसः पितॄनभ्येति प्रतीचीनं गच्छति पुत्रत्वम्।' नमूद केलेला आहे. या पद्धतीमुळें वेदकाळीं वृद्धकुमारी (old maidens) आढळून येत व त्यांचा वाचक असा 'अमाजूः' म्हणजे पित्याजवळ राहून वृद्ध होणारी असा शब्द वेदांत आढळतो.

ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळांत (सू. ८५) एका सूक्तांत विवाहविषयक बऱ्याच ऋचा आहेत. त्यांतील एक अशी आहे-'गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं मया पत्या जरदष्टिर्यथासः। भगो अर्यमा सविता पुरंधिर्मह्यं त्वाऽदुर्गार्हपत्याय देवाः।' (१०,८५,३६). ज्याला आपण सांप्रत पाणिग्रहण म्हणतों त्याचें वर्णन तींत आहे. 'तुझा हात सौभाग्यासाठीं मी ग्रहण करतों, माझ्यासह तूं वृद्धपणापर्यंत नीटपणें रहा. भग, अर्यमा, सविता, पुरंधि या देवांनीं गृहस्थधर्म चालविण्यासाठीं तुला माझ्या साह्याला दिलें आहे' असा तिचा आशय असून या विवाहप्रकाराला ब्राह्म म्हणतात व तोच प्रस्तुत प्रामुख्यानें आढळतो. पण या शिवाय धर्मशास्त्रग्रंथांत सांगितलेले इतर प्रकार म्हणजे ज्यांत द्रव्य देऊन कन्या विकत

घेतात तो आसुर विवाह, गांधर्व विवाह, हेहि वेदात आढळतात. ‘ या पत्युःक्रीता सती अथान्यैश्चरति ’ इ० [ मैत्रायणीय संहिता ]—जी पतीनें विकत घेतली असूनहि इतराबरोबर फिरते ती अनृत करिते—असें जें म्हटलें आहे. त्यात क्रयाचा उल्लेख स्पष्ट आहे. पण हा खरोखर क्रय नव्हे, पत्नी विकत कधींच घेता येत नाहीं असें पुढील ग्रंथकारांनीं ठरविलें. याविषयीं ‘ क्रयस्य धर्ममात्रत्वं ’ असें मीमांसासूत्र आहे [ जै. पू. मी. ६, १, १५ ]. पत्नी ही पतीच्या बरोबरीची मानिलेली असून ‘ अर्धो वा एष आत्मनो यत्पत्नी ’ हें ब्राह्मण वचन, व ‘ अर्धं भार्या मनुष्यस्य ’ [ महाभारत ] इत्यादि वचनांत ती कल्पना स्पष्ट दिसून येते. महाभारतातील यक्षाच्या प्रश्नांपैकीं ‘ मित्र कोण ’ या प्रश्नाचें उत्तर देताना युधिष्ठिरानें ‘ भार्या मित्रं गृहे सतः ’ म्हणजे गृहस्थाचा मित्र त्याची भार्या होय असें म्हटलें आहे. अशा रीतीनें स्त्री ही पुरुषाचा अर्धा भाग पुरुषापेक्षा पाश्चात्य कल्पनेप्रमाणें श्रेष्ठ नसला ( better half ) तरी निदान त्याच्या बरोबरीचा होता ही कल्पना प्राचीन काळीं होती. गांधर्व म्हणजे स्त्रीपुरुषाच्या परस्पर प्रेमामुळें झालेला विवाह ‘ भद्रा वधूर्भवति यत्सुपेशाः स्वयं सा मित्रं वनुते जने चित् ’ ( ऋ. १०, २७, १२ ) म्हणजे जी स्त्री सुंदर वस्त्र धारण करून लोकामधील आपला मित्र स्वतः पसंत करते या वचनात आढळून येतो. सुंदर अशा उषेच्या मागून येणाऱ्या सूर्याला तरुण स्त्रीच्या मागून येणाऱ्या तरुणाची उपमा ऋग्वेदांत दिली असून [ सूर्यो देवीमुषसं रोचमानां मर्यो न योषामभ्येति पश्चात् ] हीवरूनहि गांधर्व विवाहपद्धतीचें अनुमान होतें.

वेदात पुरुषानी एकाच वेळी अनेक स्त्रिया करण्याची प्रथा होती. पण स्त्रीला एका वेळीं एकच पति असे. ऐतरेय ब्राह्मणांत वर्णिलेल्या हरिश्चंद्र राजाला शंभर स्त्रिया होत्या—[ तस्य ह शतं जाया बभूवुः ]. ही चाल क्षत्रियांतच केवळ नसून ब्राह्मणांतहि होती. उपनिषत्प्रसिद्ध याज्ञवल्क्याला कात्यायनी व मैत्रेयी अशा दोन पत्न्या होत्या, असें बृहदारण्यकात वर्णन आहे. या चालीचा दर्शक ‘ सपत्नी ’ हा शब्द ऋग्वेदात अनेकवार येतो. ऐतरेय ब्राह्मणांत यूपाला एका वेळीं दोन दोऱ्या बांधतां येतात, पण एक दोरी अनेक यूपांना बांधता येत नाहीं, असें कारण सांगून त्यावरून ‘ तस्मादेको द्वे जाये विन्दते ’, पण ‘ तस्मान्नैका द्वौ पती विन्दते ’ म्हणजे एका पुरुषाला दोन स्त्रिया करतां येतात, पण ‘ एका स्त्रीला दोन पती करतां येत नाहीत ’ किंवा ‘ तस्मादेकस्य बह्व्यो जाया भवंति नैकस्यै बहवः सहपतयः ’ म्हणजे एका पुरुषाला अनेक भार्या होतील, पण एका स्त्रीला एका वेळीं अनेक पति होणार नाहींत ’ असें निष्पन्न केलें आहे.

पूर्वकाळीं औरस, कानीन, पुत्रिकापुत्र इत्यादि बारा प्रकारचे पुत्र मानीत असत, पण त्यांत औरसाची पदवी श्रेष्ठ असून त्याची सर्वजण प्रथम इच्छा करीत.

औरस पुत्रानें पितृऋण फिटतें ( ऋणमस्मिन् संनयति । ऐ. ब्रा. ७,१३ ) असें ऐतरेय ब्राह्मणांत म्हटलें असून ' न हि ग्रभायारणः सुशेवोऽन्योदर्यो मनसा मन्तवा उ ।' ( ऋ. ७,४,८ या ऋचेंत परक्याच्या उदरीं झालेल्या पुत्राचा विचारहि नको असें म्हटलें आहे. पण औरसाच्या अभावीं दत्तक पुत्र घेण्याची चाल होती. अत्रीला एकच पुत्र होता, पण तो त्यानें और्वाला दिला व पुढें त्याला यज्ञ केल्यावर दुसरा पुत्र झाला अशी कथा तैत्तिरीय संहितेंत आहे. ( ७,१,८,१ ). ऐतरेय ब्राह्मणांतील हरिश्चंद्राच्या कथेंतहि विश्वामित्रानें शुनःशेपाला दत्तक घेतल्याचें वर्णन आहे. यावरून एकच मुलगा असताहि तो दत्तक देतां येत असे व विश्वामित्राप्रमाणें पहिले शंभर मुलगे असून आणखी दत्तक घेतां येत असे. विश्वामित्राच्या पन्नास मुलांनीं या दत्तकाला अनुमति दिली, पण दुसरे पन्नास तसें करीनात, म्हणून त्याना त्यानें पुलिंद इत्यादि व्हाल असा शाप दिला, असें पुढें ऐतरेय ब्राह्मणात सांगितलें आहे. याशिवाय गूढज व क्षेत्रज या पुत्रांचाहि ऋग्वेदात उल्लेख आहे. ( २, २९, १ व १०, ४०, २ ) धृतव्रता आदित्या इषिरा आरे मत्कर्त रहसूरिवागः ( २, २९, १ ऋ. ) यात रहसूः शब्द महत्त्वाचा आहे. [' गुप्तपणें पुत्र प्रसविणाऱ्या स्त्रीप्रमाणें'] यावरून गूढज पुत्राचा बोध होतो.

को वां शयुत्रा विधवेव देवरं मर्यं न योषा कृणुते सधस्थ आ [ऋ. १०,४०,२] यांत विधवेनें दिरापासून प्राप्त करून घ्यावयाच्या पुत्राचा संबंध आहे.

आतां दायभाग घेऊं. सांप्रत बापाच्या वडिलार्जित धनाची वाटणी केवळ मुलांतच होते. म्हणजे चार मुलगे असतील तर प्रत्येकाला त्या धनाचा चवथा भाग मिळतो; पण मुलीला मात्र कांहीं मिळत नाहीं. वेदात याविषयीं उल्लेख आढळतात. ' मनुः पुत्रेभ्यो दायं व्यभजत् ' ( तै. सं. ३।१, ९, ४ )—मनूनें पुत्राना आपलें धन वाटून दिलें. ' न जामये तान्वो रिक्थमारैक् ' ( ऋ. ३,३१,२ )—बहिणीला भाऊ पितृधन देत नाहीं. ' कल्याणी हि जाया, कृपणं हि दुहिता ' अशी म्हण होती. मुलगी दुसऱ्याच्या घरीं जाणारी असल्यामुळें तिला गौणत्व देत असत. ' तस्मात् स्त्रियो निरिंद्रिया अदायादीः अपि पापात्पुंस उपस्तितरं वदन्ति ' । ( तै. सं. ६, ५, ८, २ ) असें तैत्तिरीय संहितेंत सोमयागप्रकरणीं म्हटलें असून स्त्रियांना दायभाग मिळावयाचा नाहीं, एखाद्या पामर पुरुषांपेक्षांहि ती हलु बोलते असें त्यांत सांगितलें आहे. या वैदिक वचनाचा मनूनें ' निरिंद्रिया ह्यमन्त्राश्च स्त्रियोऽनृतामिति स्थितिः । ' ( ९,१८ ) असा अनुवाद केला असून ' निरिंद्रिया ह्यदायादाश्च स्त्रियो मता इति श्रुतिः ' असें बौधायन धर्मसूत्रांत म्हटलें आहे. पण तैत्तिरीय संहितेवरील भाष्यांत सायणानें जो अर्थ केला आहे, त्याहून निराळा अर्थ माधवाच्या पराशरस्मृतीवरील एतद्विषयक टीकेंत केलेला आढळतो. यावरून माधवाच्या नांवावर मोडणाऱ्या या दोन लेखांचे खरे लेखक बहुधा भिन्न असावेत असें दिसतें.

स्त्रीधनासंबंधाची कल्पनाहि वैदिक वाङ्मयापासून आढळून येते. तैत्तिरीय संहितेंत ' पत्नी अन्वारभते पत्नी हि पारीणह्यस्येशे ' ( ६,२,१-१ ) असा पत्नीच्या धनाचा म्हणजे पारीणह्याचा उल्लेख आहे. पारीणह्य म्हणजे घरांतील उपकरणें, वस्त्र-प्रावरण, भांडींकुंडीं इत्यादि. पूर्वमीमांसेंत ' स्ववत्तां हि दर्शयति ' या सूत्रांत ( ६,१,१६, ) स्त्रीधनविषयक श्रुतीचा निर्देश केला असून मनूनें स्त्रियांच्या भागी-दारीसंबंधानें लिहितांना ' अर्थस्य संग्रहे चैनां व्यये चैव नियोजयेत् । शौचे धर्मेऽन्न-पक्त्यां च पारिणाह्यस्य वेक्षणे ' । असें लिहून घरांतीलच बहुतेक गोष्टींत स्त्रियांची भागीदारा सांगितली आहे. जर्मनींत सांप्रत कुचे ( स्वयंपाक घर ) , किर्चे ( धर्म ), आणि किंडेर ( मुलें ) यांचीच व्यवस्था स्त्रियांकडे सोंपवावी असा जो प्रयत्न चालला आहे, तो या मनुमताला अनुसरूनच दिसतो !

ब्रह्मचर्यादि आश्रमांचा विचार करता असें दिसतें कीं, ब्रह्मचर्य व गृहस्थ या आश्रमांसारखी यतींची स्थिति नव्हती. यति वैदिक वाङ्मयांत आले आहेत. 'ब्रह्मचारी चरति वेविषद्विषः स देवाना भवत्येकमंगम् । ' [ ऋ. १०,१०९,५ ] इत्यादि ऋचेंत बृहस्पतीच्या ब्रह्मचर्याचें वर्णन आहे. बृहस्पति ब्रह्मचर्याचें आचरण करून देवांना संतुष्ट केल्यावर विवाहबद्ध होऊन गृहस्थ झाला. मध न खाण्या-सारखे निर्बंध ' न ब्रह्मचारी सन् मध्वश्नीयात् ' ( शतपथ ब्रा. ११, ५, ४.१८ ) वेदाप्रमाणेंच मनूनें पुढें सांगितले.—' वर्जयेन्मधु मांसांच ' इत्यादि म[illegible]वचन याविषयीं प्रसिद्ध आहे. ( २, १७७. ) यतींसंबंधानें तैत्तिरीय संहितेंत ' इन्द्रो यतीन् सालावृकेभ्यः प्रायच्छत् ' । म्हण[illegible] इन्द्रानें यतींना लांडग्यापुढें टाकलें असें सांगितलें आहे ( ६, २, ८, ५ ). त्या यतींना लांडगे खात असतां त्यांचा घोडा झाला; म्हणून घोडा आपली लीद हुंगतो, त्याना लांडग्यानीं खाल्ल्यावर त्यांचीं मस्तकें पडलीं व ते खजुरीचीं झाडें बनले. या कथेचा अर्थ काय हें नीट समजत नाहीं. पण तीवरून यतिवर्गाची एका काळीं निंदा होत होती असें स्पष्ट दिसतें. पण पुढें त्यांना प्रव्राजक किंवा परिव्राजक असें नांव मिळून महत्त्वहि आलें. बृह-दारण्यकोपनिषदांत याज्ञवल्क्य संन्यास घेऊं लागल्याची कथा आहे ( ४, ५, १, २) तींत त्याचें महत्त्व सांगितलें आहे.

आतां दानविषय घेऊं. दानाचें माहात्म्य पुढील ग्रंथांत पुष्कळ सांगितलें असून गीतेंत ' यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः । भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात् ' । ( ३, १३ ) असें दान करणाराचें माहात्म्य व न करणाराचें पाप वर्णिलें आहे. ऋग्वेदांत सुद्धां हा प्रकार आढळतो. दक्षिणा [ गाई ] देणारा आकाशांत उच्च स्थान मिळवितो, अश्वदान करणारा सूर्यलोकास जातो, सुवर्ण-दान करणाराला मोक्ष मिळतो, असें दानाचें माहात्म्य सांगितलें आहे ( उच्चा दिवि दक्षिणावन्तो अस्थुर्ये अश्वदाः सह ते सूर्येण । हिरण्यदा अमृतत्वंभजन्ते

वासोदाः सोम प्रतिरन्त आयुः' [ ऋ. १०, १०७,२ ]. उलट, दान न देणाऱ्याची निंदा केली असून जो अर्यमाला किंवा मित्राला कांही अर्पण करीत नाहीं व एकटाच खातो तो जणूं केवळ पापच खातो असें म्हटलें आहे. ' नार्यमणं पुष्यति नो सखायं केवलाघो भवति केवलादी ।' ( ऋ. १०, ११७, ६ ). दानाचें माहात्म्य सांगणारी कथा बृहदारण्यकोपनिषदात आली आहे. एकदा देव, असुर व मनुष्य प्रजापतीकडे जाऊन कांहीं उपयुक्त संदेश मागूं लागले. तेव्हा मेघाचा गडगडाट होऊन 'द' असा ध्वनि उत्पन्न झाला व तो मिळालेला संदेश होय असें प्रत्येकाला प्रजापतीनें सांगितलें. देवाना त्याचा अर्थ दाम्यत म्हणजे इंद्रियाचें दमन करावें असा सांगण्यांत आला कारण ते उच्छृंखल असल्यामुळें त्याना इंद्रियदमनाची जरूरी होती. असुराना द म्हणजे 'दयध्वम्' असें सांगण्यात आलें. कारण ते जात्या क्रूर असल्यामुळें सुधारणेसाठीं त्यांना दया पाहिजे होती. मनुष्यांनीं त्या द पासून दत्त म्हणजे दान करा असा बोध घेतला, कारण त्यांना त्या गुणाचीच वाण आपल्याला आहे असें वाटलें ! आता शेवटीं पंचमहायज्ञांचा विचार करून हा विषय पुरा करूं. देवयज्ञ, पितृयज्ञ, भूतयज्ञ, मनुष्ययज्ञ व ब्रह्मयज्ञ हे ते पांच यज्ञ असून ते नित्य करावे असें तैत्तिरीय आरण्यकात सांगितलें आहे [ २. १०.५ ]. पंचसूनादोषपरिहारार्थ म्हणजे दळण, कांडण, पेटवण इत्यादि पाच प्रसंगानीं अपरिहार्यपणें घडणाऱ्या प्राणिहत्यादि पापांचें क्षालन करण्यासाठीं हे यज्ञ करावयाचे असा प्रस्तुतचा संकल्प असतो. या यज्ञापैकीं मनुष्ययज्ञ म्हणजे अतिथिसेवा. यासंबंधानें 'तृणानि भूमिरुदकं वाक् चतुर्थी च सूनृता । एतान्यपि सतां गेहे नोच्छिद्यन्ते कदाचन ' ( मनु. ३,१०१ ) असें म्हणून अतिथिसेवा ही सज्जनांचें लक्षण होय असें सुचविलें आहे. मधुपर्क हा अतिथिसेवेचा प्रकार असून सहा प्रकारच्या पूज्य माणसांच्या ( षड् अर्घ्याः ) आगमनप्रसंगीं तो करावा असें सांगितलें आहे. या आदरातिथ्याचें माहात्म्य, ऐतरेय ब्राह्मणांत [१,१५] 'तद्यथैवादो मनुष्यराजे आगते अन्यस्मिन्वार्हति उक्षाणं वा वेहतं वा क्षदन्त एवमस्मा एतत्क्षदन्ते यदग्निं मथ्नन्ति । ' असें वर्णिलें असून वसिष्ठधर्मसूत्रांत (४,८) ' अथापि ब्राह्मणाय वा राजन्याय वाऽभ्यागताय महोक्षाणं महाजं वा पचेदेवमस्मा आतिथ्यं कुर्वन्तीति ' असा त्याचा अनुवाद केला आहे. यात सांगितलेला आदरातिथ्याचा विधि मांसवर्जनामुळें आज आपल्याला कसासा वाटेल, पण तो होता व आमच्या पूर्वजांविषयीं बोलतांना ते मांसाहारी होते असें कोणी म्हणेल तर तें खरें असल्यामुळें आपल्याला रागावण्याचें कारण नाहीं. आपल्या अलीकडच्या पूर्वजांनीं मांसभक्षण वर्ज्य करून एका प्रकारच्या साहजिक असणाऱ्या मनःप्रवृत्तीवर विजय मिळविला, याचा आपण अभिमान धरिला म्हणजे झालें. पूर्वींचे सर्व आचारविचार जसेच्या तसे आज राहिलेले नाहींत, तसे आजचेहि पुढें रहाणार नाहींत हें यावरून दिसून येईल. याविषयीं सविस्तर विचार पुढील व्याख्यानांत योग्य प्रसगानें येणारच आहे. वेद हे आमच्या धर्माचें मूळ कसे आहेत हें आज दाखवावयाचें होतें, तें थोडक्यांत दाखविलें. पुढील व्याख्यानात श्रुति, स्मृति आणि सदाचार याचा धर्मनिर्णयाच्या बाबतींत परस्परसबंध कसा आहे हें सागण्याचा प्रयत्न करूं.

# श्रुति, स्मृति आणि सदाचार ह्यांचा परस्परसंबंध

## व्याख्यान तिसरें

[ ता. ११ ऑगस्ट १९३४ ]

मागील व्याख्यानांत धर्माचीं मुख्य मूळें जीं श्रुति, स्मृति आणि सदाचार त्यांपैकीं श्रुतीचें स्वरूप सांगून त्या धर्ममूल कशा आहेत, म्हणजे ज्यांना धर्मशास्त्र असें प्रत्यक्ष म्हटलेलें आहे त्या स्मृतींतील आचारधर्मांतील बऱ्याच धर्मांचें मूळ त्यांत कसें दिसून येतें तें दाखविलें. प्रस्तुत स्मृति व शिष्टाचार यांचें स्वरूप सांगून त्या तिहींचा धर्माधर्मनिर्णयात परस्पर संबंध कसा आहे हें पहावयाचें आहे.

## श्रुतींतील ईश्वरविषयक कल्पना

पण त्यापूर्वीं काहीं सद्गृहस्थांनीं सूचना केल्यावरून वेदांत ईश्वरासंबंधानें कोणत्या कल्पना आढळतात, त्याचें थोडक्यात दिग्दर्शन करितों. ईश्वरविषयक कल्पनांच्या ऐतिहासिक विचाराचा आपल्या प्रस्तुत विषयाशीं म्हणजे धर्मशास्त्राशीं फारसा संबंध नाहीं. वेदाचे दोन भाग असून दुसऱ्यात ज्ञानकाण्ड म्हणजे तत्त्वज्ञानविषयक विचार आढळतो. पहिल्या मन्त्रमय वेदभागांत अग्नि ही मुख्य देवता आहे व त्याला उद्देशूनच ऋग्वेद संहितेच्या १०१७ सूक्तांपैकीं सुमारें एक तृतीयांश सूक्तें आहेत. अग्नीच्या खालोखाल इंद्र व वरुण या देवतांचीं सूक्तें असून बृहस्पति, सविता, पूषा, उषस्, मरुत्, विष्णु इत्यादिक देवतांचीहि कित्येक सूक्तें आहेत. या सूक्तांतून ऋषींनी देवताजवळ पुत्र, संपत्ति इत्यादि गोष्टी मागितलेल्या आढळतात. धन, रयि, द्युम्न, इत्यादि संपत्तिवाचक शब्द ऋग्वेदांत अनेकवार येतात. ज्या देवतेचें स्तोत्र सूक्तांत असेल, त्या देवतेला त्या ठिकाणीं सर्वश्रेष्ठ मानून तिच्याठायीं सर्व गुणांचा आरोप केलेला असतो. अशा रीतीनें अनेक देवता ऋग्वेदांत सांगितल्या

असल्या, तरी त्या सर्वांत एकच परमेश्वर आहे ही कल्पना देखील आढळून येते. उदाहरणार्थ, 'इंद्रं मित्रं वरुणमग्निमाहुरथो दिव्यः स सुपर्णो गरुत्मान्। एकं सद्विप्रा बहुधा वदन्त्यग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥ ही ऋग्वेदांतील ऋचा पहा (ऋ. १, १६४, ४६). परमेश्वर एक असून ज्ञाते त्याला अनेक प्रकारें म्हणजे अग्नि, यम, मातरिश्वा इत्यादि नांवांनीं संबोधितात असें तींत म्हटलें आहे. 'सुपर्णं विप्राः कवयो वचोभिरेकं सन्तं बहुधा कल्पयन्ति' ( ऋ. १०, ११४, ५ ] या ऋचेंतहि हीच कल्पना आहे. 'रूपं रूपं मघवा बोभवीति मायाः कृण्वानस्तन्वं परिस्वाम्'। [ऋ. ३, ५३, ८] या ऋचेंत इंद्र आपल्या शक्तीनें अनेक रूपें धारण करितो असें म्हटलें असून 'इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते।' [ ऋ ६, ७, १८] या प्रसिद्ध ऋचेंत शब्दांनीं तोच अर्थ व्यक्त केला आहे. याशिवाय ऋग्वेदाच्या 'नासदीय'नामक सूक्तांत सृष्टीच्या आधीं एकच परमेश्वरस्वरूप होतें व त्याला सत् किंवा असत् असें कांहींच म्हणतां येत नव्हतें—'नासदासीन्नो सदासीत्।' ( ऋ. १०, १२९, १ ). तें एक असें परमेश्वरस्वरूप वायू शिवायच आपल्या स्वतःच्या तेजानें श्वासोच्छ्वास करीत होतें—'आनीदवातं-स्वधया तदेकं' व त्याच्याशिवाय दुसरें कांहींहि तेव्हां नव्हतें—'तस्माद्धान्यन्न परः किंचनास।' [ ऋ. १०, १२९, २ ] अशा रीतीनें तात्त्विक विचार संहितेंत आले असून परमेश्वराची प्राप्ति करून घेण्यासाठीं यज्ञाची योजना केलेली होती. पण पुढें यज्ञापासून मिळणारें फल टिकाऊ नव्हे असें समजून यज्ञाना फुटक्या होड्यांची उपमा देण्यांत येऊं लागली. मुण्डकोपनिषदांत 'प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपा अष्टादशोक्तमवरं येषु कर्म ।[मुं. १, २,७ ] असें ह्मणून यज्ञांनीं जन्ममृत्यूच पुनः पुनः मिळणार असल्यामुळें ब्रह्मज्ञानाची कास धरिली पाहिजे म्हणजे परमात्म-पदाची प्राप्ति होईल असें सुचविलें आहे. 'ब्रह्मविदाप्नोति परम्' [ तै. उ. २. १ ] ब्रह्मवेत्त्यालाच परब्रह्माची प्राप्ति होते, म्हणून 'आत्मा वा रे द्रष्टव्यः इ०' [ बृ. उ. २, ४, ५ ] आत्मस्वरूपाचें श्रवण, मनन व निदिध्यास करून त्याचें दर्शन करून घ्यावें असें उपनिषदांत सांगितलें आहे. असो.

## स्मृतींचें स्वरूप व त्यांचा विस्तार

धर्मशास्त्र म्हणजे स्मृति असें 'धर्मशास्त्रं तु वै स्मृतिः।' [ मनु. २, १० ] या वचनांत मनूनें म्हटलें आहे. पण धर्मशास्त्राशिवाय इतरहि अनेक विषयांवरील ग्रंथांचा स्मृतींत अन्तर्भाव होतो. उदाहरणार्थ, पाणिनीच्या अष्टाध्यायीलाही स्मृति म्हणतात. महाभारत, पुराणें यांचाहि स्मृतींत समावेश करण्याची वहिवाट आहे. फार काय, पण सांख्यादि दर्शनांवरील ग्रंथानाहि स्मृति म्हणतात. पण अशा सर्व स्मृतींना मान्यता दिल्यास कशास कांहीं ठिकाण रहाणार नाहीं, हें लक्षात घेऊन धर्म-मूल म्हणून मानावयाच्या स्मृतिग्रंथांना वेदमूलकत्वाची मर्यादा घालण्यांत आली. मनूनें वेदार्थ लक्षांत आणून स्मृति लिहिली, म्हणून वेदमूलक स्मृति वेदतुल्य होत

असा आग्रह धरण्यांत आला. केवळ मनु मोठा होता असें म्हटलें तर सांख्य म्हणत आमचा दर्शनकार कपिल हाही फार मोठा होता. तेव्हां सांख्यादि दर्शनग्रंथ स्मृति असले, तरी ते वेदबाह्य म्हणून अप्रमाण होत असें त्याला उत्तर दिलेलें आहे [ मनु १२, ९५ ]. ब्रह्मसूत्रांतील ' स्मृत्यनवकाशदोषप्रसंग इति चेन्न, अन्यस्मृत्यनवकाशदोषप्रसंगात् ' [ वे. सू. २, १, १ ] या सूत्रात असा निर्णय दिला आहे.

उपलब्ध स्मृति ग्रंथ फार प्राचीन नाहींत. इ. सनापूर्वी ५००।६०० वर्षांनंतरच्या त्या सर्व आहेत असें माझें मत आहे. पण स्मृति हा शब्द इ. स. पूर्वी ७००।८०० वर्षें तरी प्रचारांत आहे. तैत्तिरीय आरण्यकात ' स्मृतिः प्रत्यक्षमैतिह्यम् ' ( १, २, १ ) यांत तो आलेला आहे. आपल्या समाजांत चालू असलेल्या अनेक पंथोपपंथाच्या ग्रंथांत त्या त्या पंथांचे अभिमानी लोक श्रुतींचे म्हणून आधार देतात. वरील तै० आरण्यकांतील वाक्य घुसवाघुसवी [Interpolations] चें असण्याचा संभव आहे. अप्पयदीक्षितासारख्या पंडितांनीं माध्वपथांच्या लोकांनीं श्रुति म्हणून दिलेलीं अवतरणें खोटीं आहेत असें म्हटलें आहे. सर्वांत जुनें असें गौतमधर्मसूत्र, त्यांत ' तस्य च व्यवहारो वेदो धर्मशास्त्राणि अंगानि उपवेदाः पुराणम् ' [ ९. २१ ] या शब्दांनीं राजानें व्यवहार कसा करावा तें सांगितलें आहे. त्यातील ' धर्मशास्त्र ' शब्दानें स्मृतींचाच बोध होतो. पाणिनीच्या अष्टाध्यायींत स्मृति शब्द आलेला नाहीं, पण इ. स. पूर्वी ३०० च्या सुमारास होऊन गेलेल्या वार्तिककार कात्यायनाचें ' धर्मशास्त्रं च तथा ' असें एक वार्तिक आहे. तात्पर्य स्मृतिग्रंथ धर्मशास्त्र या अर्थानें आज २५०० वर्षें चालू आहेत असें म्हणावयास हरकत नाहीं. प्राचीन संस्कृति इतक्या अविच्छिन्नपणें टिकून राहिलेली हिंदुस्थान व चीन या दोन देशांतच आढळते. इजिप्त देशातील प्राचीन मनोरे आज उभे असले, तरी तेथील प्राचीन संस्कृति नष्ट झालेली आहे. तिला सातत्य लाभलें नाहीं.

आतां स्मृतिग्रंथांचा विस्तार पाहूं जातां, वेद जसे अनंत म्हणून म्हटले आहेत, तशा स्मृतिहि अनन्तच म्हणाव्या लागतील. उपलब्ध स्मृतिग्रंथासंबंधानें अशी मौज आहे कीं, त्या एकमेकींचा नामनिर्देश करतात. उदाहरणार्थ, गौतमानें मनूचा उल्लेख केला आहे तर उलट मनूनें गौतमाचें वर्णन केलें आहे. या घोंटाळ्याचा उलगडा करावयाचा तर सांप्रतची मनुस्मृति ही मूळ मनुस्मृतीचें विकृत स्वरूप असून गौतम धर्मसूत्राच्या वेळची मनुस्मृति मूळची जुनी होय असें मानिलें पाहिजे. मनु—गौतमाच्या या प्रकारासारखे दुसरेहि प्रकार आढळतात. असो. स्मृतिकारांची संख्या शंभराच्या वर भरते. याज्ञवल्क्य स्मृतींत ( १, ४–५ ) मनु, विष्णु, यम इत्यादि वीस स्मृतिकार सांगितले असून स्वतःचाहि अंतर्भाव त्यांत केला आहे. मनुस्मृतींतहि अनेक धर्मशास्त्रांचा ( धर्मशास्त्राणि २, २३२ ) उल्लेख केला आहे. अपरार्कानें याज्ञवल्क्याच्या यादींत भर घालून ३६ स्मृति, तर प्रयोगपारिजातकारानें ५७ स्मृतिग्रंथ

सांगितले आहेत. मी आपल्या हिंदुधर्मशास्त्राच्या इतिहासांत सर्व निबन्धग्रंथांत मिळून आढळणारीं सुमारें शंभर स्मृतींचीं नांवें दिलेलीं आहेत.

स्मृतिग्रंथांतून म्हणून जेव्हां निबन्धकार उतारे देतात, तेव्हां असें आढळतें कीं, मूळ स्मृतिग्रंथ न पाहतां आपल्या पूर्वीच्या कोणत्यातरी निबन्धाचा हवाला द्यावयाचा. आजच्याप्रमाणें सर्व ग्रंथ लेखकाला एका वेळीं एका स्थळीं मिळणें दुरापास्त असल्यामुळें दुसऱ्या निबन्धकारांवरच भरंवसा ठेवावा लागे. मूळ ग्रंथ प्रत्येक वेळी कोणी पहात नसत असें दिसतें. एखादें वचन देतांना ' हेमाद्रौ कार्ष्णाजिनिः ' अशासारखा हवाला देत. पण कार्ष्णाजिनि आपल्या ग्रंथांत तसें ह्मणतो काय, हें पहात नसत. त्यामुळें कोणाचीं तरी मतें कोणाच्या तरी नांवावर पडत. त्यामुळें पुष्कळ घोंटाळा उत्पन्न झालेला आहे. उदाहरणार्थ, ' आत्मपितृष्वसुः पुत्रा आत्ममातुः स्वसुः सुताः ।' इत्यादि तीन बंधुविषयक श्लोक बौधायनाचे ह्मणून माधवानें पराशरस्मृतीवरील टीकेंत दिले आहेत; प' तेच श्लोक मदनपारिजातांत वृद्धशातातपाचे ह्मणून दिलेले आढळतात. अशा प्रकारें अनेक स्मृतिकारांच्या आज उपलब्ध नसलेल्या अनेक स्मृति उल्लेखित केलेल्या आढळतात. उदाहरणार्थ, शंख व लिखित यांच्या नांवावर आढळणारीं अनेक वचनें एकत्र करून व तीं वर्गवारीनें लावून मी त्याची पन्नास साठ छापील पानांची स्मृति तयार केली आहे. पण प्रत्यक्ष शंखलिखितधर्मसूत्र आज उपलब्ध नाहीं. अनेक स्मृतींपैकीं कोणती प्रमाण याविषयीं विचार करताना मनूंचें नांव प्रथम पुढें येतें. ' यद्वै किं च मनुरवदत् तद्भेषजम् ' असें श्रुतींतहि सांगितलें असल्यामुळें मनुवचनाला प्रामाण्य देण्यांत येतें. इ. स. च्या चवथ्या शतकाच्या सुमारास झालेल्या बृहस्पतीनें मनूचें प्रामाण्य मानून तो वेदाचें उपनिबंधन करितो असें ह्मटलें आहे. [वेदार्थोपनिबन्धृत्वात्प्रामाण्यं तु मनुस्मृतौ । मन्वर्थविपरीता या स्मृतिः सा न प्रशस्यते । तावच्छास्त्राणि शोभन्ते तर्कव्याकरणानि च । धर्मार्थमोक्षोपदेष्टा मनुर्यावन्न दृश्यते ॥]. या स्मृतिप्रामाण्यासम्बधानें पराशरानें युगभेदानें निरनिराळ्या स्मृति मानाव्या असें म्हटलें आहे. कृतयुगामध्यें मनुप्रणीत धर्म प्रमाण होते ' कृते तु मानवा धर्माः '; पण त्रेतायुगात गौतम प्रमाण होता. द्वापरात शंख व लिखित यांचें प्रामाण्य होतें आणि—'कलौ पाराशराः स्मृताः'—कलियुगांत पराशरस्मृतीचें प्रामाण्य आहे असें पराशर म्हणतो. युगभेदानें धर्मभेद मनूनेंहि सांगितले आहेत [ अन्ये कृतयुगे धर्माः ]. अशा रीतीनें स्मृतिस्मृतींमध्यें आपसांत असलेलीं भांडणें पाहूनच कीं काय युधिष्ठिरानें ' नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम् ' असें यक्षाला उत्तर देतांना म्हटलें आहे.

या खास स्मृति नांवानें प्रसिद्ध असलेल्या ग्रंथाशिवाय महाभारत व रामायण यांनाहि धर्मशास्त्रदृष्टीनें स्मृति मानतात. महाभारतातच त्या ग्रंथाला धर्मशास्त्र

असें म्हटलें आहे. महाभारत काव्य आहे, इतिहास आहे, राजनीतिशास्त्र आहे, तसेंच धर्मशास्त्रहि आहे. ' अर्थशास्त्रमिदं प्रोक्तं धर्मशास्त्रमिदं महत् ॥ ( आ. प. २, २८३ ) इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुध्दयः (२,२८५), अस्यकाव्यस्य कवयो न समर्था विशेषणे। (२,२९०), 'जयो नामेतिहासोयं श्रोतव्यो विजिगीषुणा'। इत्यादि वर्णन महाभारतातच आलें असून त्याच्या शांतिपर्वात व अनुशासनपर्वांत मिळून धर्मशास्त्रांत येणारे बहुतेक विषय प्रतिपादिलेले आहेत राज्याभिषेक, राजधर्म, आश्रमधर्म, आचारधर्म आपद्धर्म, उपवास, तीर्थ, दान, दायभाग, द्वादशपुत्र, प्रायश्चित्त, वर्णधर्म, विवाह, श्राद्ध इत्यादि विषय त्यांत आहेत. रामायणांतहि प्रसंगाप्रसंगानें धर्मशास्त्रांतील विषय आले आहेत. हनुमानाला अशोकवनात सीता दिसली ती प्रतिपदेला अध्ययन केलेल्या विद्येप्रमाणें रामावियोगामुळें कृश झालेली होती, असें वर्णन असून त्यांत प्रतिपदेच्या अनध्यायाचा निर्देश केलेला आहे. रामानें पित्याचें श्राद्ध केलें तें रानांत मिळालें त्या अन्नानें केलें, त्या प्रसंगानें ' यदन्नः पुरुषो भवति तदन्नास्तस्य देवताः। ' असें म्हटलें आहे, त्यांत धर्मशास्त्रदृष्ट्या रामाच्या कृतीचें आपद्धर्म म्हणून समर्थन केलें आहे. अशा रीतीनें स्मृतींचें क्षेत्र व्यापक व विचित्र आहे. स्मृतीत दिसून येणाऱ्या या वैचित्र्यामुळें आपल्या धार्मिक आचारांत कशा भानगडी उत्पन्न झाल्या आहेत त्या पुढें योग्य प्रसंगानें दिसून येतील.

## पुराणें

धर्मकार्याचा संकल्प सोडतांना आपण ' श्रुतिस्मृतिपुराणोक्तफलप्राप्त्यर्थं ' या शब्दांनी सोडतों. या शब्दांतील पुराणांचा अन्तर्भाव पुष्कळ निबन्धकार स्मृतींतच करितात. ' इतिहासपुराणाभ्यां वेदं समुपबृंहयेत् ' [ आ. प. १, २६७ ] असें महाभारतात व मनुस्मृतींत म्हटलें असून वेदार्थाचें स्पष्टीकरण करणारीं म्हणून पुराणेंहि श्रुतिमूल होत असें समजून त्यांना धर्मशास्त्रांत स्मृतींसारखें प्रामाण्य देतात. ' पुरा अपि नवं ' अशी पुराण शब्दाची व्युत्पत्ति देतात. पूर्वी जें नवें होतें तें पुराण. आज उपलब्ध असलेलीं पुराणें ज्या रूपांत आहेत, त्या रूपांत तीं पूर्वीपासून आहेत असें मात्र नाहीं. तथापि पुराण म्हणून कांहीं ग्रंथ अगदीं प्राचीनकाळींहि प्रसिद्ध होते यांत शंका नाहीं. तैत्तिरीय आरण्यकात ' ब्राह्मणानीतिहासान् पुराणानि कल्पान् ' असा पुराणांचा उल्लेख आढळतो, तसा प्राचीन अशा गौतमधर्मसूत्रांतहि आढळतो. त्याच्या पूर्वी बृहदारण्यक व छान्दोग्य या उपनिषदांतहि ' इतिहासपुराणं ' असा पुराणाचा अपराविद्येतील एक विषय म्हणून निर्देश केलेला आढळतो [ बृ. ४, १, २ ]. पण आजच्या भविष्यपुराणांत व्हिक्टोरिया राणी आलेली असल्यामुळें असल्या पुराणाचा त्या प्राचीन पुराणात अन्तर्भाव करितां येत नाहीं. आजचीं बरींच पुराणें इ. स. ४००–६०० वर्षांच्या सुमारास झालेलीं असून कांहीं तर त्याहूनहि अलीकडचीं आहेत. राजांच्या वंशावळी कित्येक पुराणांत दिलेल्या

आहेत, त्यांवरून त्यांच्या कालाची सामान्य कल्पना करतां येते. स्मृतीप्रमाणें पुराणांतहि फार भानगडी झालेल्या आहेत.

उदाहरणार्थ सांप्रतचें सत्यनारायणाचें व्रत स्कंदपुराणांतील म्हणून म्हटलें जातें. पण कांहीं शतकांपूर्वींच्या त्याच्या प्रतींत त्याचा मागमूसहि नाहीं. पुराण पूर्वी एकच होतें व नन्तर त्याचीं अनेक पुराणें झालीं अशी कथा मत्स्यपुराणांत आहे 'पुराणमेकमेवासीत्।' (अ. ५३). बाणभट्ट आपल्या कादम्बरींत व हर्षचरितांत वायुपुराणाचा उल्लेख करतो. महाभारताच्या वनपर्वांतहि एक वायुपुराण सांगितलें आहे.

पुराणांचीं नावें व त्याच्यातील श्लोकसंख्याहि कित्येक पुराणात दिलेली असून त्यांत पुष्कळ भिन्नता आढळते. मुख्य पुराणें अठरा म्हणून प्रसिद्ध आहेत. पण मत्स्यपुराणात [ अ. ५३ ] त्याचीं जी नावें आहेत त्यातील वायुपुराणाचें नाव विष्णु-पुराणात ( ३, ६ ) गाळलें असून त्याच्या ठिकाणीं शैवपुराण घातलें आहे. विष्णु पुराणाची श्लोकसंख्या ६००० पासून २८००० अशी विविध प्रकारें दिलेली आढळते. या पुराणाचीं भरमसाट वर्णनें आणि दुसऱ्या ग्रंथाचे लांबच लांब उतारे घेणें यांत मोठा हातखण्डा दिसतो. मृताच्या अशौचप्रसंगीं वाचण्यांत येणाऱ्या गरुड पुराणांतील नरकादिकांचीं वर्णनें वाचून अंगावर शहारेच येतात, अशीं तीं भयंकर आहेत. त्या पुराणांत याज्ञवल्क्यस्मृतीतील सुमारें ८०० श्लोक जसेच्या तसे घेतलेले आहेत. एकच गोष्ट जशीच्या तशी दोन ग्रंथात आढळल्यास कोणी कोणापासून ती घेतली याविषयी वाद होईल. पण याज्ञवल्क्यासारखा स्मृतिकार पुराणातून उसनवारी करील हें संभवनीय मानिता येत नाही. अग्निपुराणातहि राजधर्म व व्यवहारधर्म हे विषय याज्ञवल्क्यस्मृतींतून घेतलेले आहेत व कांहीं भाग नारदस्मृतीतीलही आहेत.

पुराणाचा विस्तार पहाता १०० स्मृतींप्रमाणें पुराणेंहि मुख्य अठरा व उप-पुराणें अठरा अशीं प्रसिद्ध आहेत.

महापुराणें:—ब्राह्म, पद्म, विष्णु, वायु, भागवत, नारदीय, मार्कण्डेय, अग्नि, भविष्य, ब्रह्मवैवर्त, लिंग, वराह, स्कंद, वामन, कूर्म, मत्स्य, गरुड व ब्रह्माण्ड ( मत्स्य पु. अ. ५३ ). कांहीं ठिकाणीं ब्रह्माण्डाबद्दल नारसिंहपुराण असें नांव आढळतें.

उप-पुराणें:—सनत्कुमार, नारसिंह, नन्दि, शिवधर्म, नारदीय, कापिल, वामन, ब्रह्माण्ड, वरुण, कालिका, माहेश्वर, साम्ब, सौर, पाराशर, मारीच, भार्गव, आदित्य, वासिष्ठ.

ह्याशिवाय गणेश पुराण, देवी पुराण, मौद्गल पुराण, अशींहि दुसरीं पुराणें आहेत. पुराणांचे सात्त्विक, राजस व तामस असेहि तीन वर्ग करण्यांत

आले आहेत. उदाहरणार्थ विष्णु, नारदीय, भागवत, गरुड, वामन व वाराह याना सात्त्विक पुराणें म्हणतात. अशा प्रकारचा हा धर्मशास्त्राला आधारभूत असा ग्रंथसमूह असून त्यांत वाटेल त्यानें वाटेल तें 'स्मृतिविरोधी' ही घुसडून दिलेलें आहे व तो प्रकार आज कित्येक शतकें चालू आहे. या प्रकाराचें एक उदाहरण घेऊं. जुळ्या मुलांत वडील कोण असा प्रश्न उत्पन्न झाला असता मागून जन्मतो तो वडील असें भागवतांत सांगितलें असून ( हिरण्याक्ष व हिरण्यकश्यपूची कथा पहा ) मनुस्मृतींत आधीं जन्मास येतो तो वडील असें म्हटलें आहे; ' यमयोश्चैव गर्भेषु जन्मतो ज्येष्ठता स्मृता'[ ९, १२६ ].

## शिष्टाचार

धर्माचें तिसरें मूळ सदाचार. सदाचार म्हणजे शिष्टांचा आचार. पण शिष्ट म्हणजे कोण ? या विषयाचा विचार करतानाहि मोठी मौज दिसून येते. कोणत्या देशातील आचार श्रेष्ठ याविषयीं स्मृत्यादि ग्रंथात जें सांगितलें आहे तें पाहिलें, तर आपण दक्षिण प्रांतात मुंबईस रहाणारे सर्वच अशिष्ट ठरूं; कारण हा देश पूर्वींच्या परिभाषेंत म्लेच्छ देश होता. अकामात्मा असेल तो शिष्ट अशी व्याख्या वासिष्ठधर्मसूत्रांत केली असून ज्याचें फल अदृष्ट आहे तो धर्म असें तो म्हणतो. असा धर्म सांगणारे अकामात्मे शिष्ट आर्यावर्तांत सापडतात असेंहि वसिष्ठ सांगतो. म्हणजे आर्यावर्त कोणता असा प्रश्न पुढें आला. याविषयीं अनेकांनीं अनेक मतें सांगितलीं आहेत. गंगा—यमुनाच्या मधील अन्तर्वेदीचा प्रदेश म्हणजे आर्यावर्त या अगदीं संकुचित व्याख्येपासून पूर्व पश्चिम समुद्र आणि हिमालय व विन्ध्य यांमधील विस्तीर्ण प्रदेशापर्यंत आर्यावर्ताची व्याप्ति वाढत आलेली दिसून येते. म्हणजे आपण दाक्षिणात्य सर्वजण अद्यापि त्या आर्यावर्ताच्या बाहेरच आहों. मनूनें शिष्ट लोकाच्या आचाराच्या देशिक मर्यादा ब्रह्मावर्त, ब्रह्मर्षिदेश, मध्यदेश व आर्यावर्त या एकाहून विस्तृत मर्यादेच्या नावानीं सांगितल्या आहेत व त्याच्या बाहेरच्या अनार्य देशात ब्राह्मणांनीं जाऊं नये असें म्हटलें आहे [ मनु २, १७—२४ ]. कृष्णसार म्हणजे काळवीट जेथें फिरतो तो यज्ञिय देश व त्याच्या बाहेर तो म्लेच्छ देश अशी त्यानें व्याख्या केलेली असून काळवीट नाहींत अशा देशांत आपण रहात असल्यामुळें अनार्य ठरणार काय ? अशी आपत्ती प्राप्त झाल्यामुळें पुढें जेथें चातुर्वर्ण्य आहे तो आर्यावर्त अशी व्यापक व्याख्या करण्यात आली. बौधायनधर्मसूत्रांत ( १. १. २९—३१ ) म्हटलें आहे कीं अवन्ति, अंग, मगध [ हल्लींचा बिहार ], सुराष्ट्र [काठेवाड], दक्षिणापथ सिन्धु व सौवीर हे देश संकीर्णयोनि आहेत. व आरट्ट, कारस्कर, पुण्ड्र, सौवीर, वंग, कलिंग, प्रानून [ ? ] या देशात गेल्यास यज्ञ करावा व कलिंग म्हणजे आजचा ओरिसा येथें जाणाऱ्या द्विजाला प्रायश्चित्त म्हणून वैश्वानर इष्टि केली पाहिजे असें सांगितलें आहे. याविषयीं ऐतिहासिक दृष्टि सोडून दिल्यास आपल्यामध्यें सना-

तनी किती राष्ट्रांतील याचा सनातनी म्हणविणारानीं अवश्य विचार केला पाहिजे. प्रत्येक गोष्टींत परिवर्तन होत आलें आहे ही गोष्ट ऐतिहासिक दृष्टीला सहज दिसून येणारी आहे. असो.

प्रादेशिक दृष्टीनें शिष्ट कोण हें पाहिल्यावर व्यक्तिशः शिष्ट कोण हें पाहूं. 'धर्मेणाधिगतो यैस्तु वेदः सपरिबृंहणः । ते शिष्टा ब्राह्मणा ज्ञेयाः श्रुतिप्रत्यक्षहेतवः ' म्हणजे ज्यांनीं धर्मनियमाना अनुसरून साग वेदाचें अध्ययन केलें आहे व श्रुतींचें अध्ययन करून जे उपदेश करितात ते शिष्ट असें मनु म्हणतो ( म. स्मृ. १२, १०८–९). ज्याना मत्सर नाहीं ते शिष्ट–'शिष्टाः खलु विगतमत्सराः निरहंकाराः कुंभी-धान्याः अलोलुपाः दम्भलोभमोहक्रोधविवर्जिताः' असें बोधायन सांगतो (१,१,५–६). कुम्भीधान्याः म्हणजे ज्यांच्याजवळ रांजणभरच धान्याचा सांठा आहे असे. असे निर्लोभी व विकाररहित असतील तेच शिष्ट होत. तैत्तिरीय उपनिषदाच्या शीक्षा-ध्यायांत ' ये ब्राह्मणाः संमर्शिनः युक्ता आयुक्ता अलूक्षा धर्मकामाः स्युः ' ते अनुक-रणीय पुरुष होत व त्यांच्याच कृतींचें संशयाच्या प्रसंगीं अनुकरण करावें असें ह्मटलें आहे. यात विचारी, योग्य रीतीनें वागणारे, स्वतःच्या बुद्धीनें चालणारे, दया-शील व धर्मसाधनाची इच्छा करणारे ते शिष्ट होत असें सुचविलें आहे. अशा शिष्टांपासून सर्व गोष्टीच घ्याव्या असें मात्र नाहीं. त्यांच्या चांगल्या गोष्टींचेंच अनु-करण करावें. अदृष्टार्थ जे धर्म तेच त्याच्यापासून घ्यावे असेंहि शीक्षाध्यायात (यान्य-स्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि । नो इतराणि ) व 'शिष्टाकोपेऽविरुद्ध-मिति चेन्न शास्त्रपरिमाणत्वात् ' । व ' अपि वा कारणाग्रहणे प्रयुक्तानि प्रतीयेरन् ' ( पूर्व मीमांसा १.३.५–७ ) इत्यादि ठिकाणीं सांगितलें आहे.

शिष्ट म्हणजे कोण व त्याचा कोणता आचार म्हणजे सदाचार हें सांगितल्यावर त्यानीं कोणत्या पद्धतीनें धर्मविषयक निर्णय द्यावा हें पाहिलें पाहिजे. धर्मनिर्णय एक-ट्यानें करूं नये मग तो कितीहि विद्वान असो प्रसंगीं एकच शिष्ट मिळण्यासारखा आहे, तर तो श्रेष्ठ असा अध्यात्मवेत्ता असल्यास चालेल, असें याज्ञवल्क्याचें मत आहे (एको वाऽध्यात्मवित्तमः), पण सामान्यतः दशावरा म्हणजे निदान दहाची परिषद असावी ( मनु. १२,११० ), त्यांत तीन आश्रमी [ त्रयश्चाश्रमिणः ], चार वेदवेत्ते व तीन धर्मपाठक असावेत. इतके न मिळाले तर चार किंवा तीनहि इसमाची परिषद् होते. अव्रती म्हणजे प्रजापतिव्रतादि-कांचें आचरण न केलेले व अमंत्र म्हणजे वेदाध्ययन न केलेले अशा हजारों ब्राह्म-णाचीहि [ सहस्रशः समेतानाम् ] परिषद होऊं शकत नाहीं ( मनु १२,११४ ) म्हणून योग्य अशा शिष्टांची परिषद् भरवून धर्म–निर्णय करावा असा याविषयींचा निष्कर्ष आहे.

# श्रुत्यादिकांचा परस्पर संबंध

श्रुति, स्मृति व सदाचार यांच्या धर्म–निर्णयांतील परस्पर संबंधाचा विचार करतांना तीन प्रकारचे विरोध येतात. ते कसे मिटवावे असा यापुढें प्रश्न येतो. पहिला विरोध म्हणजे श्रुति विरुद्ध श्रुति. 'अतिरात्रे षोडशिनं गृह्णाति' आणि 'नातिरात्रे षोडशिनं गृह्णाति' अशा दोन श्रुतीच एकमेकाविरुद्ध आल्या तर विकल्प मानिला पाहिजे. पण विकल्प हा आठ प्रकारें दुष्ट असतो. म्हणून अशीं विरोधी वचनें विषयव्यवस्थेनें लावावीं असें मीमांसाशास्त्रात सांगितलें आहे. 'मनुः पुत्रेभ्यो दायं व्यभजत' ( तै. सं.३-१-९-४ ) यांत सर्व मुलांत बापाचें द्रव्य सारख्या प्रमाणांत वांटून द्यावें असें आहे तर 'तस्माज्ज्येष्ठं पुत्रं धनेन निरवसाययन्ति' या त्याच संहितेंतील [ तै. सं. २. ५-२-७ ] वचनानें सर्व द्रव्य ज्येष्ठ पुत्रालाच द्यावें असें ठरतें. या विरोधांत विकल्प न मानतां पहिलाच नियम घ्यावा असें आपस्तम्बानें ह्मटलें आहे. मीमांसा आणि धर्मशास्त्र या विषयांचा विचार करताना याचें अधिक स्पष्टीकरण होईलच. वाक्यार्थनिर्णयार्थ विधि, अर्थवाद इत्यादि जे भाग ग्रंथाचे केले असतात, त्याच्यावरून असा निर्णय करण्यात येतो. दुसरा विरोध स्मृति विरुद्ध स्मृति. असा विरोध आला असतां तर्कानेंच ग्राह्याग्राह्य काय तें ठरवावें असें सांगितलें आहे. स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान् व्यवहारतः। (याज्ञ.). तिसरा विरोध शिष्टाचार विरुद्ध शिष्टाचार. अशा विरोधाला स्मृतिस्मृतींच्या विरोधाचाच नियम लागू आहे. याशिवाय इतर विरोध आले असता श्रुति स्मृतीपेक्षां श्रेष्ठ व स्मृति शिष्टाचारापेक्षा श्रेष्ठ समजून तसा निर्णय द्यावा असा सामान्य नियम ह्मणून योजना केलेली आहे.

---

# श्रुति, स्मृति, शिष्टाचारांचा धर्म निर्णयांत परस्परसंबंध



## व्याख्यान चवथें.

[ ता. १८ ऑगस्ट १९३४ ]

मागील व्याख्यानात श्रुति, स्मृति व शिष्टाचार, यांचा परस्परविरोध आला असतां धर्मनिर्णय कसा करावा यांविषयींच्या पूर्वग्रन्थांतील योजनेची थोडीशी कल्पना दिली होती. तोच विषय या व्याख्यानात अधिक विस्तारानें सांगावयाचा आहे. हा विषय अत्यन्त महत्त्वाचा असून धर्मशास्त्रासंबंधीं इतर सर्व विषयांचें सूत्र येथें आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. या विषयाच्या विवेचनांत पुष्कळ लोकांच्या प्रचलित कल्पनाना धक्का मिळणार आहे हें खरें, पण त्यामुळे घाबरून जाण्याचें कारण नाहीं. त्यावरून एवढेंच दिसून येणार आहे कीं, आजच्या परिवर्तनवादी पक्षासारखा पक्ष अगदीं पहिल्यापासून अस्तित्वात आहे. प्रस्तुतची व्याख्यानमाला मी एका विवक्षित पक्षाचा मनुष्य घेऊन चालू केलेली असली तरी 'मनःपूतं समाचरेत्' या मनुवचनाच्या लौकिक अर्थाचा आश्रय घेऊन तींत विवेचन करावयाचें नाहीं. धर्मशास्त्रनिर्णयांत तर्काचें काम नाहीं हा पक्ष मात्र आम्हीं स्वीकारणार नाहीं. पूर्वीच्या धर्मशास्त्रनिर्णयांत तर्कशास्त्राचा अवलंब सर्वत्र केलेला आढळतो. वेदांतील वचनांचे विधि, अर्थवाद इत्यादि भाग पाडण्याची कल्पना मीमांसकांच्या बुद्धीनेंच केली, ती कांहीं परमेश्वरानें सांगितलेली नाहीं. याविषयीं अधिक विवेचन पुढें यथाप्रसंग येणारच आहे. या ठिकाणीं एवढेंच सांगावयाचें आहे कीं, हा अत्यन्त गंभीर विषय आहे हें लक्षांत ठेऊन त्याच्या विवेचनाकडे लक्ष दिलें पाहिजे.

पूर्वीच्या व्याख्यानाव श्रुति, स्मृति व पुराणें यांचा विस्तार केवढा आहे हें सांगून शिष्टाचार म्हणजे कोणाचा व कोठील याचा विचार केला. आतां धर्माच्या या

मूळांत परस्पर विरोध आल्यास काय करीत असत हें पहावयाचें. एकाच जातीच्या म्हणजे श्रुतिश्रुतींचा, स्मृतिस्मृतींचा किंवा शिष्टाचार शिष्टाचारांचा विरोध आला असतां विकल्प मानावा असा एक पक्ष पूर्वी सांगितला; पण सर्वच ठिकाणीं या विकल्पाचा उपयोग होतो असें नाही. त्यासाठीं 'एकवशेन इतरा नीयेरन्' म्हणजे एक कोणतें तरी वचन वरिष्ठ मानून इतर गौण मानावीं असा न्याय उत्पन्न करण्यांत आला. याचें एक उदाहरण घेऊं. पुत्रहीन असा कोणी मरण पावल्यास त्याचें धन कोणाला मिळावें याचा विचार करतांना याज्ञवल्क्य म्हणतो कीं, [ २, १३५—१३६ ] 'पत्नी, मुली, आईबाप इत्यादिकांना क्रमानें मिळावें ( पत्नी दुहितरश्चैव पितरौ भ्रातरस्तथा । . . .स्वर्यातस्य ह्यपुत्रस्य सर्ववर्णेष्वयं विधिः ). पण दुसऱ्या स्मृतींत पत्नीला या क्रमांतून अगदीं वगळलेलें आहे. कालिदासानें शाकुन्तलात एका निपुत्रिक व्यापाऱ्याच्या मरणानंतर त्याच्या वित्ताचें काय करावयाचें असा प्रश्न उपस्थित केला असून दुष्यन्ताच्या अमात्यानें तें धन राजाकडे जावयाचें, असा निर्णय दिल्याचें वर्णिलें आहे. दुष्यन्तानें तो बदलून गर्भस्थ पुत्राचा पितृधनावर अधिकार आहे ( ननु गर्भः पित्र्यं रिक्थमर्हति । शा. ६,२३ ) असें ठरविलें; पण स्त्रियांना दोघानींहि गाळलें. अशा रीतीनें स्मृतीस्मृतींचा विरोध असता याज्ञवल्क्याला धरूनच सर्व इतर स्मृति लावण्यांत याव्या असें ठरविण्यांत आलें.

आतां श्रुति व स्मृति यांच्या विरोधात काय केलें आहे तें पाहूं. 'श्रुतिस्मृतिविरोधे तु श्रुतिरेव गरीयसी । अविरोधं तु कर्तव्यं स्मार्तं वैदिकवत्सदा ॥' असें एक जाबालवचन कुल्लूक भट्टानें मनुस्मृतीवरील टीकेंत ( २,१३ ) उद्धृत केलें आहे. त्याप्रमाणें स्मृति जर श्रुतिविरोधी असेल तर ती त्याज्य होय. 'जातपुत्रः कृष्णकेशोऽग्नीनादधीत' असें श्रुति म्हणते. ज्याला पुत्र झाला आहे अशा काळ्या केंसाच्या पुरुषानें अग्न्याधान करावें. यांत जातपुत्र व कृष्णकेश या विशेषणानीं विशिष्ट कालमर्यादा अग्न्याधानासाठीं सांगितली असून पुत्र झालेलाच प्रत्यक्ष असला पाहिजे असें नाहीं. तरुणपणीं अग्न्याधान करावें एवढाच त्याचा आशय आहे. या श्रुतिवचनाविरुद्ध स्मृति म्हणते कीं 'अष्टाचत्वारिंशद्वर्षाणि वेदब्रह्मचर्यम्' [ बो. ध. सू. ]. आता मनूनें सांगितल्याप्रमाणें आठव्या वर्षी उपनयन करून [ गर्भाष्टमेऽब्दे कुर्वीत ब्राह्मणस्योपनायनम् । २, ३६] पुढें बोधायनाच्या मताप्रमाणें अठ्ठेचाळीस वर्षे ब्रह्मचर्य पाळावयाचें म्हणजे गृहस्थाश्रमाला आरंभ करावयालाच छप्पन्नावें वर्ष उजाडणार, आणि क्षत्रिय व वैश्य यांना तर आणखीहि वर्षे लागणार. कारण त्याच्या उपनयनाचा काल ब्राह्मणाहून उशीरा सांगितलेला आहे. अशा स्थितींत अग्न्याधान केव्हा करावयाचें ? पण ही गोष्ट श्रुतिविरुद्ध आहे हें स्मृतिकारानीं ओळखलें व बोधायनवचनाकडे दुर्लक्ष केलें.

पण स्मृति जर वेदविरोधी नसेल म्हणजे स्मृतींत सांगितलेल्या विधीचा उल्लेखच उपलब्ध श्रुतींत नसेल, तर स्मृतींला अनुकूल अशी श्रुति होती असें अनुमान करावें असें मीमांसक म्हणतात. ' विरोधे त्वनपेक्ष्यं स्यात् असति हि अनुमानम् ' असें याविषयीं मीमांसासूत्र आहे ( जै. १, ३, ३-४ ). ' यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात् ' ही श्रुति अठ्ठेचाळीस वर्षें ब्रह्मचर्य पाळावें या स्मृतीला विरोधी आहे. अग्निहोत्र गृहस्थालाच घेतां येतें, ब्रह्मचाऱ्याला घेतां येत नाहीं. तेव्हां ही स्मृति कशी व कोणीं केली, असा प्रश्न करून त्याचें उत्तर पूर्वमीमांसा सूत्रांचा भाष्यकार जो शबरस्वामी त्यानें मोठ्या मजेचें दिलें. तो म्हणतो, स्मृतींत दिसणारा हा नियम ' आत्मनः अपुंस्त्वं प्रच्छादयद्भिः म्हणजे स्वतःचें पौरुषहीनत्व झांकूं इच्छिणाऱ्या कोणी तरी केला ! अर्थात् तो त्याज्य होय. स्मृतिविरोधाचें आणखी एक उदाहरण घेऊं. स्त्रिया, पुत्र, दास यांनीं मिळविलेलें धन कोणाचें असा प्रश्न घेऊन, ज्या पुरुषाचीं तीं स्त्रीपुत्रादि असतील त्यांचें तें होय, असें स्मृति सांगतात. भार्या, पुत्र व दास यांना त्यांच्यामतें धनाचा अधिकारच नाहीं. ' भार्या, पुत्रश्च दासश्च त्रय एवाधनाः स्मृताः । यत्ते समधिगच्छन्ति यस्य ते तस्य तध्दनम् ' असा श्लोक याविषयीं मनुस्मृतींत असून ( म. ८, ४१६ ) महाभारतांतहि तो आला आहे. पण याविषयींचें ' पत्नी हि पारीणह्यस्येशे ' म्हणजे पत्नीचें घरातील वस्तूंवर स्वामित्व आहे, असें श्रुतिवचन पूर्वी सांगितलें आहे. पूर्वी स्त्रियांना स्वतंत्रच नसला तरी पतिसमवेत यज्ञ करण्याचा अधिकार होता, आणि द्रव्याशिवाय यज्ञ करणें शक्य नाहीं. तेव्हां स्त्रियाना धनाचा अधिकारही श्रुतीनें दिलेला आहे असें ' स्ववत्तामपि दर्शयति ' असें मीमांसासूत्रात स्पष्ट सांगितलें आहे. बापाचें धन व कर्ज यांच्या वांटणीच्या विषयांतहि असाच विरोध आढळतो. बापाचें धन व कर्ज ( रिक्थ आणि ऋण ) हीं पुत्रानीं सारखीं वाटून द्यावीं असें स्मृति सांगतात. पण पूर्वी एकदां सागितल्याप्रमाणें ' तस्माज्ज्येष्ठं पुत्रं धनेन निरवसाययन्ति ' अशी ज्येष्ठ पुत्रालाच धन द्यावें म्हणणारी श्रुति आहे. या श्रुतिविरुद्ध ' मनुः पुत्रेभ्यो द्रयं व्यभजत् ' ही तैत्तिरीय श्रुति सर्व मुलांना सारखें धन द्यावें, असें सांगणारी आहे, व तीच ग्राह्य असें सागण्यांत आलें आहे. अशा महत्त्वाच्या विषयांवर श्रुतिस्मृतींचा विरोध क्वचित् येतो. पण श्रुति व स्मृति यांविरुद्ध शिष्टाचाराचीं उदाहरणें मात्र पुष्कळच असून तोच विषय फार भानगडीचा झाला आहे. ज्या शिष्टाचाराचा उल्लेख श्रुतींत नाहीं, त्यासंबंधानें श्रुति विरोधी कीं अनुकूल समजावयाच्या, या प्रश्नाचें उत्तर ' परमतं अप्रतिषिद्धं अनुमतं भवति' म्हणजे दुसऱ्याच्या मताचा जर प्रत्यक्ष निषेध केलेला नसेल, तर त्याला अनुमति असें समजतात, असें देता येण्यासारखें असून इतरत्रहि तोच न्याय लागू करावा. उदाहरणार्थ इंग्रजींतहि त्याच अर्थाचा 'Silence shows consent when it is a duty to speak' असा दंडक आहे. याविषयीं 'देशजातिकुलधर्माश्चाम्नायैरविरुद्धाः

प्रमाणम्।' म्हणजे आम्नायाला अर्थात् वेदांना जे देशधर्म जातिधर्म व कुलधर्म विरोधी नसतील तेच प्रमाण होत असें गौतमानें म्हटलें असून (गौ. ध. सू. ११, २०), 'देशधर्मजातिधर्मकुलधर्मान श्रुत्यभावादब्रवीन्मनुः।' म्हणजे देशधर्म इत्यादि श्रुतींत नसल्यामुळे मनूनें प्रमाण म्हणून सांगितले असें वसिष्ठानें म्हटलें आहे (व. ध. सू. १,१७). मनूनेंहि वेदांत सांगितलेल्या आचारधर्माशिवाय देशधर्म, जातिधर्म, कुलधर्म हेच काय पण पाखाडी म्हणजे वेदविरोधी लोकांचे धर्महि आपल्या स्मृतींत सांगितले आहेत. 'देशधर्मान् जातिधर्मान् कुलधर्मांश्च शाश्वतान्। पाषण्डगणधर्मांश्च शास्त्रेऽस्मिन्नुक्तवान्मनुः।' (म. १,११८). अशा रीतीनें मनु वेदांना अविरोधी अशा पाखांडी लोकांच्या आचारानाहि मान्यता देतो. आश्वलायन गृह्यसूत्रातहि 'अथ खलूच्चावचा जनपदधर्मा ग्रामधर्मांश्च तान् विवाहे प्रतीयात्। यत्तु समान तद्वक्ष्यामः' असें म्हणून देशाचारांना विवाहामध्यें मान्यता देऊन जे सर्वसाधारण आचार तेवढेच आपण सांगितले आहेत, असें आश्वलायन म्हणतो. आपस्तंबधर्मसूत्रात तर स्त्रिया सुद्धां ज्या गोष्टी विवाहादि प्रसंगीं सांगतील, त्या मानाव्या, असें म्हटलें आहे. 'स्त्रीभ्यः सर्ववर्णेभ्यश्च शेषधर्मान्प्रतीयात्' (आ. २,११,२९). लग्नांत सुपारी लपविण्याचा धर्म स्त्रियानींच सांगितलेला असावा. असल्या धर्मांचे उल्लेख श्रुतिस्मृतींत आढळणें कठीण, म्हणून ते त्या त्या स्थळीं मानाव असें ठरलें. अशा रीतीनें निरनिराळया परिस्थितींतील आचाराना धर्मांत स्थान मिळाल्यामुळें पुढे फार घोटाळे झाले आहेत. आर्यावर्तातील वेदज्ञ ब्राह्मण ते शिष्ट असें प्रथम सांगितलें. पण आर्यावर्ताची पहिली संकुचित व्याख्या पुढें वाढत वाढत त्याचें क्षेत्र आज साऱ्या भरतखंडाएवढें कसें झालें हें आतां माहीत झालें आहेच. अशा विस्तीर्ण क्षेत्रांत निरनिराळ्या देशधर्मांना मान्यता मिळाल्यामुळें कशी स्थिति होते हें आता पाहूं. एकमेकांनीं एकमेकाना नांवे ठेवावयाची हें भिन्न आचाराच्या मागोमाग स्वाभाविकपणेंच येतें. उदाहरणार्थ, दक्षिण व उत्तर या भागासंबंधानें बोधायनानें पाच प्रकारचे विरोधी आचार सांगितले आहेत [ बो. ध. १,१,१७–२४ ] 'पंचधा विप्रतिपत्तिः दक्षिणतस्तथोत्तरतः। यानि दक्षिणतस्तानि व्याख्यास्यामः। यथैतदनुपेतेन सह भोजनं स्त्रिया सह भोजन पर्युषितभोजनं मातुलपितृस्वसृदुहितृगमनामिति,'— 'बापानें मुलाला ताटात जेवावयाला घेणें, पत्नीबरोबर जेवणें, शिळें खाणें, आणि आतेबहीण व मामेबहीण यांशीं विवाह करणें, अशा चाली दक्षिण देशात आहेत.' कित्येक ठिकाणीं मामेबहीण मिळाली नाहीं तर भाडणेंहि होतात. या चाली उत्तरेकडे नाहींत. पण लोकरीची विक्री, मद्यपान, ब्राह्मणानी शस्त्रधारण करणें, समुद्रगमन इत्यादि गोष्टी तिकडे आहेत या गोष्टी एकमेकांच्या एकमेकानीं केल्यास दोष आहे, त्या त्या देशात मात्र त्या प्रमाण होत. असें कित्येक म्हणत, पण गौतमानें तें खोटें म्हटलें असून शिष्ट अशा आगमाशीं व स्मृतींशी त्यांचा विरोध असल्यामुळें त्या

सान्याच अनादरणीय होत असें बोधायनानें स्वतः सांगितलें आहे. उत्तरेकडे ब्राह्मण राजघराणीं कित्येक होऊन गेलीं असें इतिहासावरून दिसतें. कालिदासाच्या मालविकाग्निमित्रांता सांगितलेलें पुराणप्रसिद्ध शुंग घराणें ब्राह्मण असून त्यांत पुष्यमित्र, अग्निमित्र व वसुमित्र असे तीन प्रसिद्ध राजे झाले. अजंठ्याच्या लेण्यांत ज्यांचा उल्लेख आहे तें वाकाटकांचें घराणेंहि ब्राह्मणच होतें. आपल्याकडे पेशव्यांचें घराणें ब्राह्मणांचें होतें. पण ते आपल्याला राजे ह्मणवीत नसत.

मातुलकन्यापरिणय व समुद्रयान हे विषय प्राचीन काळापासूनच वादग्रस्त आहेत. काहींनीं त्यांच्या समर्थनार्थ श्रुतीचे आधारहि दाखविण्याचा खटाटोप केला आहे. मातुलसुतापरिणय हा सर्व स्मृतींच्या विरुद्ध आहे व श्रुतींच्याहि विरुद्ध आहे. पण ' एका पुरुषापासून होणारीं पुत्र व कन्या [ अत्ता व अद्य ] हीं मनांत म्हणतात कीं तिसऱ्या किंवा चवथ्या पिढींत आपला संयोग होईल ' अशा आशयाचें शतपथब्राह्मणांत जें वचन आहे, त्याचा अर्थ त्याच्या मुलांमध्यें पुढें विवाह होईल असा मातुलकन्यापरिणयवादी करीत असतात. ऋग्वेदाच्या खिलसूक्तातील एका ऋचेंत ( आ याहि इन्द्रपथिभिरीळितेभिः......मातुलस्येव योषा ) मातुलाची योषा म्हणजे मुलगी असे जे शब्द आहेत त्यांवरूनहि मातुलकन्या विवाहाचाच बोध होतो असें त्याचें म्हणणें आहे. पण याज्ञवल्क्यस्मृतीचा एक टीकाकार अपरार्क म्हणतो कीं, त्या ऋचेंत मातुलकन्याविवाहाचा निषेध आहे. उलट मातुलाच्या कन्येचें दान होत होतें असें दुसरा म्हणतो. तात्पर्य या वेदमंत्राचा अर्थ करणारांनीं त्याला फार क्लेश दिला आहे एवढें खरें.

पण एकंदरींत मातुलकन्याविवाह हा कांहीं देशांत शिष्टाचार म्हणून मानिला असला तरी एकंदरींत सर्व स्मृतींच्या विरुद्धच तो आहे. म्हणूनच तंत्रवार्तिककार कुमारिलभट्टानें अर्जुनसुभद्राविवाह, कृष्णरुक्मिणीविवाह इत्यादि धर्म्य कसे असा पूर्वपक्ष करून त्याचें उत्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. कृष्ण हा सर्वांना मार्ग लावून देणारा व अर्जुन त्याचाच मित्र व शिष्य. 'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः । स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ।' [ गी. ३, २१ ] असें स्वतः सांगणारा श्रीकृष्ण अधर्म्य गोष्ट करील कशी ? अर्थात् तो करणार नाहीं असें त्याचें उत्तर दिलेलें आहे. हें सांगतांना ' दुहिता वसुदेवस्य वासुदेवस्य च स्वसा ' ( आदिपर्व २१९·१८ ) असें महाभारतांत असलें तरी सुभद्रा अर्जुनाची सख्खी मामे बहीण नव्हती असें सांगून विरोधपरिहार करण्यात आला.

महाभारताच्या उद्योगपर्वांत कृष्ण व अर्जुन हे मद्य पिऊन मत्त झाले होते असें वर्णन आहे.* यावरहि पूर्वपक्षस्वरूपी आक्षेप घेऊन त्याचें खण्डन असें केलें आहे कीं, सुरा जरी वर्ज्य म्हणून सांगितली असली, तरी मधु व सीधु हे प्रकार

---

* उभौ मध्वासवक्षीबौ दृष्टौ मे केशवार्जुनौ ।

क्षत्रियांना निषिद्ध नव्हतें, म्हणून कृष्ण व अर्जुन यांनीं मधुपान केलें यांत अधर्म कांहीं नाहीं. कारण ते क्षत्रिय होत. कित्येकांनीं तर हें सारें वर्णन लाक्षणिक आहे असेंहि म्हटलें आहे. शिष्टाचार श्रुतिस्मृतिविरुद्ध असल्यास त्याच्या समर्थनार्थ कशा लटपटी खटपटी करण्यांत येत हें यावरून दिसून येतें.

श्रुतीनें अवश्य किंवा ऐच्छिक म्हणून सांगितलेल्या कित्येक आचाराना पुढें शिष्टाचारानें निषिद्ध मानिल्याचीं कित्येक उदाहरणें आतां घेऊं. ‘ गामनुवन्ध्यामालभेत ।’ म्हणजे जिला वत्स होत नाहींत अशा गाईचें आलम्भन करावें असें श्रुतींत सांगितलें आहे. मधुपर्कपूजेच्या वेळींहि शिष्ट अतिथीप्रीत्यर्थ प्राणिहत्या सांगितली आहे. थोरल्या एकाच मुलाला बापाचें धन मिळावें असाहि विधि सांगितलेला आढळतो. पाश्चात्य देशांत अद्यापि ही वहिवाट असून तिला प्रायमोजेनीचर (Primogeniture) म्हणतात. राज्याच्या बाबतींत तो नियम आपल्याकडेहि असून ‘ नहि राजसुताः सर्वे राज्ये तिष्ठन्ति भामिनि ’ असा त्याचा रामायणांत अनुवाद केलेला दिसतो. पण या सर्व गोष्टी शिष्टाचारानें निषिद्ध ठरविल्या आहेत. श्रुति व कांहीं स्मृति यांत नियोगाचा विधि सांगितला आहे, पण मनूनें त्याला पशुधर्म म्हटलें आहे. ऊढायाः पुनरुद्वाहं ज्येष्ठांशं गोवधं तथा । कलौ पंच न कुर्वीत भ्रातृजायां कमण्डलुम् ’ ( आदित्य पुराण ) असा श्रुतिकालीन पाच गोष्टींचा कलियुगांत निषेध केला आहे.

आतां यावर प्रश्न असा कीं हा निषेध कोणी व कां केला ? या प्रश्नाचें उत्तर असें दिलेलें आहे कीं हे निषेध ज्ञात्यांनीं समाजरक्षणासाठीं (लोकगुप्त्यर्थ) केले. म्हणजे ज्ञात्यांना तरी लोकरक्षणासाठीं श्रुतिविहित गोष्टींचाहि निषेध करतां येतो, असें निष्पन्न होतें. स्वतःच्या व समाजाच्या रक्षणाची बाब फार महत्त्वाची आहे. ‘ सर्वत आत्मानं गोपायेत् । ’ सर्व प्रकारें करून स्वतःचें रक्षण करावें, असें श्रुतिच सांगत आहे. ‘ आत्मानं सततं रक्षेद्दारैरपि धनैरपि ’ या महाभारतवचनाचाहि तोच इत्यर्थ आहे. तात्पर्य धर्माला अधर्म किंवा अधर्माला धर्म कालप्रसंगवशात् ठरवितां येतें; मात्र तें वाटेल त्याला करतां येत नसून ज्ञात्यांनाच करितां येतें हा सिद्धान्त प्राचीनांनीं मान्य केलेला आहे. मनु व याज्ञवल्क्य यांनीं हा दण्डक घालून दिला. मनु म्हणतो, ‘ परित्यजेदर्थकामौ यौ स्यातां धर्मवर्जितौ ।’ अर्थ व काम हे जर धर्माला विरोधी होतील, तर त्यांचा त्याग करावा. पण तोच मनु पुढें लगेच म्हणतो, ‘धर्मं चाप्यसुखोदर्कं लोकविक्रुष्टमेव च । ’ धर्म जर दुःखदायक किंवा दुःखपरिणामी आणि लोकांना अत्यंत अप्रिय होत असेल, तर त्याचाहि त्याग करावा. यज्ञ करणें हा धर्म आहे, पण त्याला लागणारें द्रव्य चोरीशिवाय मिळण्यासारखें नसेल तर तो त्याज्य समजावा. विश्वजित् यज्ञ करून सर्वस्वाचें दान करावें असा धर्म वेदांत सांगितला आहे. पण सर्वस्वांत नातेवाईकांचा व दासादिकांचा अंतर्भाव करतां कामा नये. पण शिवाय सर्व धनाचें दान करून बायकामुलांना उपाशीं रहाण्याची पाळी येत असेल तर तो

अधर्मच समजावा. याविषयीं याज्ञवल्क्यावरील मिताक्षरा टीकेंत चांगलेंच विवेचन केलें आहे.

मातापित्यांच्या मरणानंतर पुत्रांनी त्यांच्या धनाची व ऋणाची वाटणी समसमान करावी असें ( विभजेरन्सुताः पित्रोरूर्ध्वं रिक्थमृणं समम् । या. २,११७ ) याज्ञवल्क्यानें म्हटलें असून मनूनें ज्येष्ठ पुत्राला सर्व धन द्यावें निदान बराच मोठा भाग द्यावा असें सांगितलें आहे ( मनु.९,११२ ). तेव्हां मनूविरुद्ध याज्ञवल्क्य कसा, असा प्रश्न करून मिताक्षराकार म्हणतो, ' विषम विभाग शास्त्रानें ( श्रुतीनें ) सांगितला आहे खरा. पण तो लोकविद्विष्ट असल्यामुळें त्याचा अवलंब करूं नये. कारण धर्म झाला तरी तो जर अस्वर्ग्य व लोकविद्विष्ट असेल, तर त्याचें आचरण करू नये. ' असें म्हणून पुढें त्यानें मधुपर्कादि प्रसंगींचा गोवध , नियोगानें पुत्रोत्पत्ति, इत्यादिकांचा निषेध झाल्याचीं उदाहरणें दिलीं आहेत व विषम विभागणी टाकून समान विभागणीच करावी असा निर्णय दिला आहे. या सर्व गोष्टी शास्त्रशुद्ध असल्या तरी लोकांना त्या आता नको आहेत म्हणून त्या सोडून द्याव्या असा सिद्धान्तच मिताक्षराकारानें मांडिला आहे. यावर कित्येक शास्त्री लोकांचें असें म्हणणें आहे कीं, गवालम्भादि वेदविहित कार्ये काम्य असल्यामुळें तीं केलीच पाहिजेत असें नाही. पण याला उत्तर असें कीं, जर कोणी श्रुतींत सांगितल्याप्रमाणें काम्यबुद्धीनें तीं आज करूं पाहील तर तुम्ही त्याला तीं करूं द्याल काय ? स्वर्गाची इच्छा मला आहे असें म्हणून आज जर कोणी हिंदु गवालंभ करूं म्हणेल तर, तो लोकांकडून दगडाचा मार खाल्याशिवाय राहाणार नाहीं. गोहत्या हा पूर्वी काम्य धर्म असेल, पण आज तिला उपपातकांत पहिलें स्थान मिळालें आहे. म्हणून ती निषिद्धच मानिली पाहिजे आणि हा निषेध शास्त्रानीं लोकरक्षणाकडे दृष्टि देऊन केला.

यावर कोणी असें म्हणेल कीं, या जुन्या गोष्टी आपल्या आपणच उकरून कशाला काढाव्या ? पण आपण त्या नाहीं काढल्या तर जग त्या बाहेर काढल्याशिवाय थोडेंच रहात आहे ? आता श्रुतिस्मृति ग्रंथ सर्वांना सर्वत्र मिळतात व त्याचा अभ्यासहि पुष्कळ जण करितात अशा स्थितींत आपले दोष आपण हुडकून काढून ते दूर करण्याचा प्रयत्न न करूं तर डोळे मिटून दूध चोरून पिणाऱ्या मांजरासारखी आपली स्थिति होईल. आपले डोळे मिटून कोणी आतां आपल्याला पाहूं शकत नाहीं असें मांजरानें मनात कितीहि ठरविलें तरी त्याच्या डोक्यात धडगा बसल्याशिवाय रहात नाहीं, हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. आज उत्पन्न झालेली परिस्थिति नीट पाहून पुढील पंचवीस वर्षांत आपणाला काय परिवर्तन करणें जरूर आहे व आपण करूं शकूं याचा विचार सर्वांनीं अवश्य करण्याची वेळ आता आली आहे. असो.

श्रुतिमान्य असे अनेक धर्म आज बंद केलेले आहेत. त्याचीं कित्येक उदाहरणें पूर्वी दिलीं आहेत; आता आणखी काहीं देऊं. हेमाद्रीनें आपल्या चतुर्वर्ग-

चिंतामणींत व पराशरस्मृतीवरील आपल्या टीकेंत माधवानें अशा अनेक धर्मांची नामावली दिली आहे. नियोग, अक्षतयोनि कन्येचा पुनर्विवाह, असवर्ण कन्येचा विवाह, आततायी अशा ब्राह्मणालाहि न मारणें, नौकेंतून परदेशीं जाणाऱ्याची शुद्धि, सत्रदीक्षा, कमण्डलुधारण [ संन्यास ], महाप्रस्थान, सौत्रामणींतील सुरापान, अग्निहोत्र, वानप्रस्थाश्रम, दत्तक व औरस यांशिवाय इतर प्रकारच्या पुत्रांना मान्यता, सोमविक्रय, शूद्रान्नग्रहण, इत्यादि अनेक गोष्टी ज्ञात्यांनीं बंद केल्या असून ते निषेध आतां वेदाज्ञातुल्य झाले आहेत, असें त्या ग्रंथकारांनीं मत दिलें आहे. ' एतानि लोकगुप्त्यर्थं कलेरादौ महात्मभिः । निवर्तितानि कर्माणि व्यवस्थापूर्वकं बुधैः ॥ समयश्चापि साधूनां प्रमाणं वेदवद्भवेत् ॥" असें त्यांनीं म्हटलें आहे. [ शेवटीं पुरवणी पहा ].

पण यांतील कित्येक गोष्टींमुळें आपली आज काय स्थिति झाली आहे याचा विचार कोणी करीत नाहीं. बाली व जावा बेटांत आजहि चार वर्ण आढळून येतात, पण समुद्रयान आपणांत निषिद्ध झाल्यामुळें त्याचा व आपला संबंधहि तुटून गेला. नाना धर्मपंथ अस्तित्वांत आल्यामुळें परस्पर कलह उत्पन्न होऊन एकमेक एकमेकांचीं उणीं काढूं लागले. उदाहरणार्थ शैवांच्या पाशुपत शास्त्राला वराहपुराणांत विश्वमोहन म्हटलें आहे. तर शैवांनीं उलट अहेर करून ' चातुर्वेदोऽपि यो विप्रो दीक्षितो न शिवध्वरे । स तु शूद्रः प्रमंतव्यो न देयं तस्य शासनम् ' । असें शैवागमांत सांगितलें आहे. चारी वेदांचें अध्ययन केलेला ब्राह्मणहि जर शिवदीक्षा घेणार नाहीं, तर त्याला शूद्र समजावें. असें शैवांनीं म्हटलें तर ' कापालिक, पाशुपत, शैव व क्षुद्र कारागीर दृष्टीला पडले तर सूर्यदर्शन करून प्रायश्चित्त करावें, व त्यांचा स्पर्श झाला तर स्नानच करावें ' असें स्मृति सांगते. कित्येक वैष्णव शिवाला राक्षस म्हणतात. अशा विकोपाला आमच्यांतील पंथभेद गेले आहेत. या गोष्टीचा विचार करतां मला तर असें वाटतें कीं, सर्व देवदवता बंद करून अग्नि व सूर्य या दोनच देवता आपण मानल्या तर पुरे होईल. अग्नि आणि सूर्य यांच्याशिवाय आपल्याला नुसतें जगतांहि येणार नाहीं म्हणून त्यांची मात्र परमेश्वराचें प्रतीक म्हणून उपासना करावी, इतर सर्व बंद करावें असें विशिष्ट देवतांच्या भक्ताचा अंध अभिमान पाहून वाटूं लागतें.

भिन्नभिन्न आचारांतून धर्मनिर्णय करण्याचें काम कसें कठीण आहे हें वरील विवेचनावरून कळून येईल. तसें करतांना केवळ शास्त्रग्रंथांकडे बोट दाखविणें वेडेपणाचें होईल. बृहस्पतीनें आपल्या स्मृतींत ही गोष्ट स्पष्ट शब्दांनीं सांगितली आहे. ही स्मृति चवथ्या शतकाच्या सुमारास झाली असून मनुस्मृतीवरील वार्तिकासारखें तिचें स्वरूप आहे. त्यांत व्यवहारशास्त्र [ administration of justice ] उत्तम प्रकारें सांगितलें आहे. तो म्हणतो ' केवलं शास्त्रमाश्रित्य न कर्तव्यो हि निर्णयः । युक्तिहीने विचारे तु धर्महानिः प्रजायते ॥ देशजातिकुलाना च ये धर्माः प्राक् प्रवर्तिताः । तथै-

व ते पालनीयाः प्रजाः प्रक्षुभ्यतेऽन्यथा ॥.' धर्मनिर्णय करतांना केवळ शास्त्राकडे बोट दाखवूं नये. युक्ति सोडून निर्णय केल्यास धर्माची हानीच होते. देश, जाति, कुल इत्यादि धर्म पूर्वी ठरले असतील तसे पाळावे, नाहीं तर प्रजेंत क्षोभ उत्पन्न होईल व अनर्थ ओढवेल. समुद्रगुप्तासारखा सार्वभौम राजा उत्तरेकडून दक्षिणेकडे राज्यें जिंकीत आला व त्यानें उत्तरेकडील आचार जर दक्षिणेवर लादले, तर जनापरक्ति म्हणजे राजाच्याविषयीं लोकांच्या मनांत द्वेष ( Sedition ) उत्पन्न होईल. उत्तरेकडील ब्राह्मण मांसें खातात व मोटेमोठे महामहोपाध्याय नदीवरून स्नान करून शुचिर्भूत होत्साते येतांना शालजोडींतून ताजे मांसें घेऊन येतात. आम्ही त्यांचा तो दोष समजलों तर तें आमच्या कांदालसणीकडे बोट दाखवून आम्हांला दोष देतात. उत्तरेकडे मद्यपान निषिद्ध नाहीं व रजस्वला स्त्रियाहि स्पृश्य असतात, असें बृहस्पति म्हणतो. तिकडे हिंवाळ्यांत थंडीचा फार कडाका असल्यामुळें तशा चाली पडल्या असतील. ' न म्लेच्छभाषा शिक्षेत ' असें वसिष्ठ धर्मसूत्र म्हणतें ( ६,४१ ) पण आपण सर्व जण आज काय करीत आहों ? अकबराचा फडणीस राजा तोडरमल्ल यानें धर्मशास्त्रावर ग्रंथ रचिला आहे. पण तोहि पर्शियन ही म्लेच्छ भाषा शिकला होता. ' न म्लेच्छाशुच्यधार्मिकैः सह संभाषेत ।' या निषेधाची आपण कितीशी क्षिति बाळगतो ? पण हेंहि बाजूला ठेविलें तर ' न शूद्रराज्ये निवसेत् ' शूद्राच्या राज्यात राहूं नये या वचनाचें काय करावयाचें ? कोणी यावर अशी शकल लढवितात कीं आम्ही कोठें त्याच्या राज्यात रहावयास गेलों ? तेच आम्हाला जिंकून येथें राहूं लागले आहेत. या शकलेचा अर्थ असा होतो कीं, आम्ही मोठ्या बलाढ्याच्या लाथा खाऊं आणि गरीबाला लाथा मारूं! पण यांत कांहीं समंजसपणा आहे काय ? अग्निहोत्र जो न पाळील तो मोठा पातकी होय असें म्हटलें आहे [वीरहा वा एष देवानां योऽग्निमुद्वासयते];पण आज ब्राह्मणामध्यें तालुक्यालाहि एखादा अग्निहोत्री दिसत नाहींसा झाला आहे. पवित्र भस्मासाठीं एखाद्या कंपनीला कंत्राट देण्याची वेळ आली आहे. श्रौत व स्मार्त बहुतेक विधि आज बंद झालेले आहेत व ते सर्व आपण स्वतःच्या इच्छेनेंच सोडले आहेत. वेदाध्ययनाची तीच स्थिति. नित्य वेदाध्ययन राहिलें, पण एक ऋचा तरी रोज म्हणावी अशी सवलत मिळाली तरी किती तेवढें तरी नियमानें करितात ? ' सेवा श्ववृत्तिराख्याता । ' ' यद्यत्परवशं कर्म तत्तद्यत्नेन वर्जयेत् । ' [ मनु ४, १५९ ] असें सांगितलें आहे त्याची वाट काय ? धर्माचें आचरण मनःपूर्वक करावें व तो धर्म ' हृदयेन अभ्यनुज्ञात ' म्हणजे हृदयाला ( Conscience) पटणारा असला पाहिजे, तो केवळ रुपये आणे पैचा (balance sheet) धर्म नसावा असें धर्माविषयीं म्हटलें आहे. तेव्हां या गोष्टींची सांगड घालणें कांहीं अशक्य नाहीं. इन्द्रानें अहल्येशीं जार कर्म केलें, आत्मज्ञानी वसिष्ठानें पुत्रवधाबद्दल शोक करून आत्महत्या केली. विश्वा

मित्र क्षात्रिय असून त्यानें चांडाल झालेल्या त्रिशंकूचें पौरोहित्य केलें, कृष्णानें हजारो स्त्रियांशीं विवाह केले युधीष्ठिरानें द्रौपदीला पाची भावाची पत्नी केली, व्यास नैष्ठिक ब्रह्मचारी असुन त्यानें विचित्रवीर्याच्या स्त्रियाच्या ठिकाणीं संतति उत्पन्न केली, भीष्म हा आजन्म ब्रह्मचारी असतां त्यानें यज्ञ केला, रामानें सीतेशिवाय यज्ञ केला, धृतराष्ट्र अंध असताहि त्याने यज्ञ केला, या सर्व गोष्टी धर्मविरुद्ध होत. कित्येकांनी त्यांचे समर्थन करण्यासाठीं त्यांपैकीं कित्येकांना लाक्षणिक ह्मटलें आहे. इन्द्र म्हणजे परमेश्वर व अहल्या म्हणजे रात्र, असें असल्यामुळें त्यांच्या समागमाला व्यभिचार असें केवळ लक्षणेनें म्हटले आहे, विश्वामित्रानें तपाच्या जोरावर त्रिशंकुकडून यज्ञ करविला. द्रौपदी एक नसून पांच होत्या, व्यासानें वडिलांच्या सांगण्याप्रमाणें केलें, भीष्माला यज्ञापुरती स्त्री होती, रामानें सीतेची सुवर्णप्रतिमा जवळ ठेवून यज्ञ केला; धृतराष्ट्राला यज्ञापुरती दृष्टि मिळाली होती, अशा रीतीनें या धर्मविरोधी दिसणाऱ्या गोष्टींचे स्पष्टीकरण करण्याचा खटाटोप कुमारिल-भट्ट इत्यादि मीमांसकांनीं केला आहे. पण शेवटीं मोठ्यांचें दोष आपण घेऊं नयेत, तसें केल्यास गाय चिखलांत रुतते तशी आपली स्थिति होईल, ह्मणून त्यानीं लोकरक्षणार्थ जेवढें केलें याचें अनुकरण करावें असा निष्कर्ष काढलेला आहे, तो लक्षांत ठेविला पाहिजे. [ गौ. धर्मसूत्र १.३-४, आप. धर्मसूत्र २-६ १३.७-९, भागवत पुराण दशमस्कन्ध पूर्वार्ध ३३.३० धर्मव्यतिक्रमो दृष्ट ईश्वराणां च साहसम् । तेजीयसां न दोषाय वन्हेः सर्वभुजो यथा ]. आचाराचें परिवर्तन पाहिजे असें ह्मणणाऱ्यांना वैयक्तिक लहर फिरेल तशा प्रकारचें परिवर्तन नको आहे. परंतु सामान्य जनांची कृति व विचार यांचा मेळ असावा, ढोंगीपणा असूं नये, देशकाल-परिस्थिति पाहून समाजरक्षण व्हावें किंवा समाज मुळींच धर्मतत्वविमुख होऊं नये ह्मणून अनेक लोकांना लागू होतील-एका व्यक्तीसाठीं नव्हे-असे नवीन आचार सुरू करणें किंवा याच कारणानें झाले असतील ते निदान अधर्म्य नाहींत असें म्हणा इतकाच फक्त परिवर्तनवादी पक्षाचा आग्रह आहे व त्यांची सनातन म्हणविणाऱ्या विद्वान् शास्त्री पंडितांना इतकीच विनंति आहे.

---

# परिशिष्ट ( कलिवर्ज्य प्रकरणासंबंधीं )

—————:o:————

**पराशरमाधवीय** ( vol. 1, part 1 pp. 134-37 )

विधवायां प्रजोत्पत्तौ देवरस्य नियोजनम् ।
बालिकाक्षतयोन्योश्च वरेणान्येन संस्कृतिः ॥
कन्यानामसवर्णानां विवाहश्च द्विजातिभिः ।
आततायिद्विजाग्र्याणां धर्मयुद्धेन हिंसनम् ॥
द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्यापि संग्रहः ।
सत्रदीक्षा च सर्वेषां कमण्डलुविधारणम् ॥
महाप्रस्थानगमनं गोसंज्ञप्तिश्च गोसवे ।
सौत्रामण्यामपि सुराग्रहणस्य च संग्रहः ॥
अग्निहोत्रहवण्याश्च लेहो लीढापरिग्रहः ।
वानप्रस्थाश्रमस्यापि प्रवेशो विधिचोदितः ॥
वृत्तस्वाध्यायसापेक्षमघसंकोचनं तथा ।
प्रायश्चित्तविधानं च विप्राणां मरणान्तिकम् ॥
संसर्गदोषः स्तेनाद्यैर्महापातकनिष्कृतिः ।
वरातिथिपितृभ्यश्च पशूपाकरणक्रिया ॥
दत्तौरसेतरेषां तु पुत्रत्वेन परिग्रहः ।
सवर्णान्यांगनादुष्टौ संसर्गः शोधितैरपि ॥
अयोनौ संग्रहे वृत्ते परित्यागो गुरुस्त्रियाः ।
अस्थिसंचयनादूर्ध्वमङ्गस्पर्शनमेव च ॥

शामित्रं चैव विप्राणां सोमविक्रयणं तथा ।
षड्भक्ताशनेनान्नहरणं हीनकर्मणः ॥
शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्धसीरिणाम् ।
भोज्यान्नता गृहस्थस्य तीर्थसेवातिदूरतः ॥
शिष्यस्य गुरुदारेषु गुरुवद्वृत्तिरीरिता ।
आपद्वृत्तिर्द्विजाग्र्याणामश्वस्तनिकता तथा ॥
प्रजार्थं तु द्विजाग्र्याणां प्रजारणिपरिग्रहः ।
ब्राह्मणानां प्रवासित्वं मुखाग्निधमनक्रिया ॥
बलात्कारादिदुष्टस्त्रीसंग्रहो विधिचोदितः ।
यतेस्तु सर्ववर्णेषु भिक्षाचर्या विधानतः ॥
नवोदके दशाहं च दक्षिणागुरुचोदिता ।
ब्राह्मणादिषु शूद्रस्य पचनादिक्रियापि च ॥
भृग्वग्निपतनैश्चैव वृद्धादिमरणं तथा ।
गोतृप्तिमात्रे पयसि शिष्टैराचमनक्रिया ॥
पितृपुत्रविरोधेषु साक्षिणां दण्डकल्पनम् ।
यत्र सायंगृहत्वं च सूरिभिस्तत्त्वतत्परैः ॥
एतानि लोकगुप्त्यर्थं कलेरादौ महात्मभिः ।
निवर्तितानि कर्माणि व्यवस्थापूर्वकं बुधैः ॥
समयश्चापि साधूनां प्रमाणं वेदवद्भवेत् ॥

# धर्मशास्त्रवाङ्मय

आजच्या व्याख्यानाला आरंभ करण्यापूर्वी एका गृहस्थांनीं मागील व्याख्यानासंबंधानें लिहिलेल्या पत्राचा उल्लेख करून त्याचा थोडा परामर्श घेणें अवश्य आहे. आमचे पूर्वज मांसाहार करीत होते, आपण आज तो सोडला हा आपला आपल्या वासनांवरील विजय होय, या विधानावर पत्रलेखकाचा आक्षेप असून आमचे पूर्वज कंदमुळें खाऊन रहाणारे ऋषि होते, अर्थात ते मांसाहार करीत नसत, मांसाहार करणारे लोक वैदिक संस्काराच्या बाहेरचे होते, यास्तव ब्राह्मणसभेच्या पीठावरून असलीं विधानें मीं करूं नयें असा त्याचा मला सल्ला आहे. आपले वैदिक पूर्वज मांस खात असते, तर म. गांधींनीं आतां मांसाहार करूं नये असा उपदेश कसा केला असता ? असेंहि या लेखकाचें विचारणें आहे. या पत्रांतील तर्कपद्धति मला कळण्यासारखी नाहीं. तेव्हां त्याला उत्तर देण्यांतहि कांही अर्थ नाहीं. पण या पत्रांतून उत्पन्न होणाऱ्या प्रश्नासंबंधानें दोन शब्द सांगणें अवश्य आहे. आपण सत्यान्वेषणाच्या मागें लागलों म्हणजे कित्येक वेळीं आपले डोळे फाडून जातील अशीं सत्यें आपल्याला दिसून येतात. त्यांनीं आपण बिचकून गेल्यास सत्यान्वेषणाचा प्रयत्न बंदच करावा लागेल. प्रस्तुत व्याख्यानमाला चालू राहिल्यास आणखी किती तरी कटु सत्यें सांगावीं लागतील. तीं ऐकण्याची तयारी नसेल तर व्याख्यानमाला बंदच ठेवणें भाग पडेल. पण 'नामूलं लिख्यते किंचित्' म्हणजे आधाराशिवाय कांहीं बोलावयाचें नाहीं ही प्रतिज्ञा करून ही व्याख्यानमाला चालू केली आहे. सत्य किती कठीण असतें याविषयीं सत्यकाम जाबालाची छांदोग्योपनिषदांतील गोष्ट प्रसिद्धच आहे. हारिद्रुमत गौतमाकडे जाबाल गेला आणि मला विद्या शिकवा

असें म्हणाला, तेव्हां 'बाळा तुझें गोत्र काय,' असें गौतमानें त्याला विचारिलें असतां त्यानें त्याच्या आईनें त्याची जन्मकथा जशी सांगितली होती, तशी त्याला सांगितली. त्याची आई जबाला तरुणपणीं पतीची परिचर्या करण्यांत दंग असतां तो तिला झाला होता, व पुढें पति लौकरच मृत झाला, अर्थात् त्याचें गोत्र कोणतें हें तिला माहीत नव्हतें. पण हें वृत्त जसेंच्या तसें जाबालानें सांगितलेलें पाहून गौतम म्हणाला, 'नैतद-ब्राह्मणो विवक्तुमर्हति' असलें सत्य ब्राह्मणाशिवाय कोणी सांगू शकत नाहीं, वास्तव तूं ब्राह्मण आहेस, तर 'समिधं सोम्याहर, उप त्वा नेष्ये न सत्यादगाः।' "चल, आण पाहूं समिधा, तुझें मी उपनयन करतों, कारण तूं सत्यापासून चळला नाहींस.' तैत्तिरीय उपनिषदांतहि 'सत्यं वद' पासून उपदेशाला आरंभ केलेला असून मनूनें (४.१३८) 'सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयान्न ब्रूयात्सत्यमप्रियम्' असेंच सांगितलें आहे, व त्यालावरूनच ही व्याख्यानमाला होणार आहे. माझा प्रयत्न सत्य पहाण्याचा व दाखविण्याचा आहे. त्यांत आंधळे व हत्ती याच्या गोष्टीप्रमाणें सर्व सत्य मला सापडेलच असें नसलें, तरी जें मी सांगतों तें आधाराशिवाय सांगत नसल्यामुळें त्याचा पडताळा कोणालाही घेतां येण्यासारखा आहे. ज्या ग्रंथाचे आधार मीं देत असतों त्यांतील बरेच महत्वाचे ग्रंथ सुमारें वीस पंचवीस रुपयांत मिळण्यासारखे आहेत, व ते वाचणें पुष्कळांना शक्य आहे. मीं आपल्या हिंदुधर्मशास्त्राच्या इतिहासांत सुमारें १०० स्मृतिकार व निबंधकार यांची कालनिर्णयासह विस्तृत माहिती दिली असून शिवाय सुमारें ५००० ग्रंथांची आणि दोन हजार ग्रंथकारांची नांवें व त्रोटक माहिती दिली आहे. त्यांतील पन्नास पुस्तकें वाचावीं म्हणजे बहुतेक कार्य होईल.

## कित्येक धर्मशास्त्रग्रंथांची माहिती—[१] सूत्रकाल

पूर्वी धर्माचें मूळ सांगताना कल्पसूत्रें व त्यांत मोडणारीं श्रौत, गृह्य व धर्मसूत्रें यांचा उल्लेख केला होता. हीं सूत्रें वेदांगें होत. पण सर्वच वेदांना जोडलेलीं धर्मसूत्रें उपलब्ध आहेत असें नाहीं. उदाहरण ऋग्वेदाला धर्मसूत्र कोणतेंच नाहीं. ऋग्वेदी वसिष्ठधर्मसूत्र घेतात असें कुमारिलभट्ट तंत्रवार्तिकांत म्हणतात. सामवेदी गौतम धर्मसूत्र वाजसनेयी शाखेचे लोक शंखलिखितांचें याप्रमाणें धर्मसूत्रें घेतात. तैत्तिरीय शाखेची आपस्तंभ बौधायन व हिरण्यकेशी अशीं धर्मसूत्रें आहेत. यांतील गौतम धर्मसूत्र सर्वांत जुनें असून तें इ. स. पूर्वी ६०० ते ४०० पर्यंत झालें असावें. सूत्रग्रंथांपैकीं हीं पांच उपलब्ध सूत्रें वाचलीं म्हणजे पुरे. शंखलिखित सूत्र पूर्ण उपलब्ध नाहीं, पण विविध ग्रंथांत आढळणारे त्यांतील उतारे एकत्र करून मीं ते छापिले आहेत. सूत्रग्रंथ वाचावयास तसे कठीण नाहींत. कारण सूत्र म्हटलें म्हणजे थोडक्यांत अर्थ सांगणारें स्वल्पाक्षर असलें, तरी तें असंदिग्ध सारयुक्त व विश्वतोमुख म्हणजे सर्वव्यापक विचार करणारें असावें असें स्मृतिकारांनीं म्हटलें आहे. या सूत्रांवर भाष्यें

व वार्तिकें आहेत, पण त्यांकडे वळण्याचें कारण नाहीं. सूत्रग्रंथांत विष्णुधर्मसूत्र, हारीतधर्मसूत्र अशीं आणखीही आहेत. याशिवाय कौटिलीय अर्थशास्त्र हा ग्रंथहि जाणण्यासारखा आहे. तो धर्मशास्त्रावरील ग्रंथ नाहीं, राजकारणावरील आहे, [ Government and statecraft ] पण धर्मदृष्ट्या समाजाचें नियंत्रण करणें हें राजाचें कार्य असल्यामुळें त्यांत धर्मशास्त्राचाहि भाग बराच आहे. ' अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः ' या न्यायानें अर्थशास्त्र म्हणजे राजकारणशास्त्र व धर्मशास्त्र यांत विरोध येईल तर धर्मशास्त्र प्रमाण मानावें असा मात्र दंडक आहे. चाणक्याचा ग्रंथ इ. स. पूर्वी ३०० च्या सुमारास झाला. चाणक्यानें तो स्वानुभवानें म्हणजे प्रत्यक्ष राज्यकारभार कसा चालला होता तें पाहून लिहिलेला असल्यामुळें त्याला ऐतिहासिक महत्त्व फार आहे. त्यानें कित्येक सूत्रकारांचीं नावें सांगितलीं आहेत, पण तीं सूत्रें उपलब्ध नाहींत.

## ( २ ) स्मृतिकाल

धर्मसूत्रें व स्मृति यांपैकीं बहुतेक धर्मसूत्रांची भाषा गद्यपद्यमिश्रित असते व स्मृति पद्यमय असतात. सूत्रांची भाषा स्मृतींच्या भाषेपेक्षां पाणिनीय व्याकरणाला सोडून व अधिक कठीण असते. बहुतेक धर्मसूत्रें विद्यमानस्मृतींहून प्राचीन असून त्यांची रचना इ. स. पूर्वी ६०० पासून १०० पर्यंत झाली असली पाहिजे. स्मृतींपैकीं मनुस्मृति सर्वांत जुनी असून इ. स. पूर्व २०० पासून इ. स. २०० पर्यंत ती झाली असावी. प्रस्तुत उपलब्ध मनुस्मृति मूळस्मृतिहून नवीन बनविलेली आहे. तींत परस्परविरोध पुष्कळ बाबतींत आढळतात. उदाहरणार्थ, ती श्राद्धादिप्रसंगीं मांस भक्षावें असें एकदां म्हणते, तर पुढें केव्हाहि मांस खाऊं नये असें सांगते. 'नियुक्तस्तु यथान्यायं यो मांसं नात्ति मानवः । स प्रेत्य पशुतां याति संभवानेकविंशतिम् ।' (५, ३५ ); 'न च प्राणिवधः स्वर्ग्यस्तस्मान्मांसं विवर्जयेत् ।' (२, ४८ ), ' प्रसमीक्ष्य निवर्तेत सर्वमांसस्य भक्षणात् । (५, ४९ ); नियोगासंबंधानेंहि हाच प्रकार आढळतो. ' देवराद्वा सपिंडाद्वा स्त्रिया सम्यङ्नियुक्तया । प्रजेप्सिताधिगन्तव्या संतानस्य परिक्षये । ' ( ९, ५९ ) असा नियोगाचा विधि एकदां सांगितल्यावर लगेच पुढें ' नान्यस्मिन्विधवा नारी नियोक्तव्या द्विजातिभिः । अन्यस्मिन्हि नियुञ्जाना धर्मं हन्युः सनातनम् । ' [ ९, ६४ ] असा त्याचा निषेध केला आहे. पण यांत या नव्या आवृत्तिकाराचा प्रामाणिकपणा दिसून येतो. कारण त्यानें प्रथम पूर्वींची वहिवाट देऊन नंतर आपलें मत दिलें आहे. मनूनंतर याज्ञवल्क्याची स्मृति येते. ही इ. स. १०० ते ३०० पर्यंत झाली असावी. हिचा आधार पुढें पुराणांत पुष्कळ घेतलेला आहे. गरुडपुराणांत तर याज्ञवल्क्यानें सांगितलेले धर्मच येथें सांगितले आहेत असें म्हटलें आहे [ अ. ९३ ] ' याज्ञवल्क्येन यत्पूर्वं धर्मं प्रोक्तं कथं हरे । तन्मे कथय केशिघ्न यथातत्वेन माधव । ' असें म्हणून पुढें याज्ञवल्क्यस्मृतींतील

बराच धर्मशास्त्रविषय त्या पुराणांत दिला आहे. याज्ञवल्क्यानंतर पराशरस्मृति येते. ही इ. स. १०० पासून ५०० पर्यंतच्या काळांतील असावी. महाभारताचा अन्तर्भाव स्मृतींत केलेला असून त्याच्या शांति व अनुशासन या पर्वांत धर्मशास्त्राचे बहुतेक सर्व विषय आलेले आहेत. एकंदर स्मृतिकारांची नांवें सुमारें १०० आढळतात.

## ( ३ ) निबंधकाल

स्मृतीनंतर धर्मशास्त्रावरील निबंधकारांचा काळ येतो. त्यांतच स्मृतींवरील टीकाकारांचा अन्तर्भाव केला पाहिजे. धर्मशास्त्र वाङ्मयाचे जे तीन कालखंड पडतात, त्यांतील इ. स. पूर्व ६०० ते इ. स. १०० पर्यंतच्या पहिल्या खंडांत धर्मसूत्रें व मनुस्मृति हीं येतात. दुसऱ्या म्हणजे इ. स. १०० पासून ८०० पर्यंतच्या काळांत याज्ञवल्क्य व इतर स्मृति येतात आणि तिसरा खंड इ. स. ७००पासून १९०० पर्यंतचा असून त्यांत निबंधकारांचा अन्तर्भाव होतो. मीही स्वतःला निबंधकार समजतों ! !

निबंधकारांच्या या कालखंडांत पहिल्याप्रथम स्मृतींवरील टीकाकार येतात. त्यांत नारदस्मृतीवरील असहाय नामक टीकाकार सर्वांत जुना होय. त्याचा काळ इ. स. ६०० ते ७५० पर्यंतचा आहे. त्यानंतर याज्ञवल्क्य स्मृतीवरील विश्वरूपाची टीका येते. हिचा काळ ८०० ते ८५० पर्यंतचा दिसतो. विश्वरूप हा शंकराचार्यांचा एक शिष्य जो सुरेश्वर तोच होय. मेधातिथि हा मनुस्मृतीवरील प्राचीन टीकाकार असून त्याची टीका प्रचंड आहे. त्यानें शंकराचार्यांचा उल्लेख केला असून त्याचा काळ इ. स. ८२५ ते ९०० पर्यंतचा असला पाहिजे. याज्ञवल्क्यावरील मिताक्षरा नामक टीकेचा कर्ता विज्ञानेश्वर हा महत्वाचा असून ती टीका १०७० ते ११०० पर्यंत झालेली आहे. जीमूतवाहन हा बंगालकडील सर्वांत जुना विद्यमान धर्मशास्त्र-निबन्धकार होय. त्याचा ग्रंथ बंगालकडे प्रमाण समजतात. बंगाली दायभाग इकडच्याहून थोडा निराळा आहे. जीमूतवाहनाचे कालविवेक, दायभाग व व्यवहारमातृका असे ग्रंथ प्रसिद्ध असून व्यवहारमातृकेंत न्यायपद्धतीचें (Judicial procedure) स्वरूप बहुतेक आजच्यासारखें मांडलेलें आहे. त्याचा काळ १०९० ते ११३० हा होय.

अपरार्क हाहि याज्ञवल्क्यावरील एक टीकाकार असून त्याची टीका वाचण्यासारखी आहे. ठाणें येथें राज्य करणारा हा शिलाहार घराण्यांतील कोंकणचा राजा होता. त्याची टीका ११२५ च्या सुमाराची आहे. हा स्वतंत्र बुद्धीचा उत्तम ग्रंथ असून त्यावर स्मृतिचंद्रिका या मद्रासकडील देवणभट्टाच्या ग्रंथांत आक्षेप घेतलेले आहेत. देवण्णाची स्मृतिचंद्रिका इ. स. ११५० ते १२२५ च्या सुमारास झाली असून ती मद्रासाकडे प्रमाण मानतात. यानंतर १२६० ते १२७० पर्यंत झालेला हेमाद्रीचा चतुर्वर्गचिंतामणि हा प्रचंड ग्रंथ आहे, पण सामान्य वाचकाला तो वाचण्याचें कारण

नाहीं. हेमाद्री हा देवगिरीच्या यादव घराण्यांतील महादेव व रामचंद्र या राजांचा प्रधान होता. मनुस्मृतीवरील टीकाकार कुल्लूकभट्ट हाहि प्रसिद्ध असून त्यानें ११५० ते १३०० पर्यंत केव्हां तरी आपला टीका लिहिलेली आहे. सर विल्यम जोन्सनें कुल्लूकाची अतोनात स्तुति केली असून तिला तो बहुतांशीं पात्र आहे.

आपल्याकडे मिताक्षरा, मद्रासकडे स्मृतिचंद्रिका, बंगालकडे जीमूतवाहनाचा दायभाग तसा मैथिल देशांत चंडेश्वराचा स्मृतिरत्नाकर प्रमाण मानण्यांत येतो. चंडेश्वरानें इ. स. १३१४ यावर्षी स्वतःची सुवर्णतुळा केली होती. तो मिथिलेच्या हरिसिंहदेव राजाचा प्रधान होता. त्यानें म्लेंच्छाच्या पुरांत बुडालेलें राज्य वर काढिलें असें वर्णन आहे. [ मग्ना म्लेंच्छमहार्णवे व सुमती येनोध्दृता लीलया ] त्यावरून ' इदं ब्राह्मिदं क्षात्रं शापादपि शरादपि ' या वर्गातील तो पुरुष होता असें दिसून येतें. मिथिलेकडील दुसरा मोठा धर्मशास्त्रग्रंथकार वाचस्पातीमश्र हा होय. याचे ग्रंथ चिंतामणि नांवाचे विवादचिंतामणि, आचारचिंतामणि असे अनेक ग्रंथ असून त्याचा काळ पंधराव्या शतकाचें उत्तरार्ध होय.

मद्रासकडे प्रामाण्य असलेला धर्मशास्त्रग्रंथकार माधवाचार्य हा होय. याचे कालमाधव, पराशरमाधवीय [ पाराशर स्मृतीवरील टीका ] हे धर्मशास्त्रग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्याचा काळ १३३० ते १३८५ असून तो विजयानगरचा संस्थापक होता. उत्तरेकडे दिल्लीजवळच्या टाक येथील मदनपाल राजाच्या [ इ. स. १४०० ] नांवावर असलेला, पण विश्वेश्वरभट्ट नावाच्या पंडितानें लिहिलेला मदनपारिजात नावाचा ग्रंथ आहे. राजाच्या नांवावर पंडितांनी ग्रंथ लिहिण्याची पूर्वी वहिवाट होती. बंगालकडील जीमूतवाहनानंतरचा प्रमाणभूत धर्मशास्त्रग्रंथकार शूलपाणि हा आहे. त्याचे ग्रंथ विवेक नांवाचे अनेक ग्रंथ असून ते स्मृतिविवेक नावाच्या प्रचंड ग्रंथाचे भाग होत. याचा काळ १३७५–१४६० असा आहे.

ओरिसा प्रांतातील कटक येथें राज्य करणाऱ्या प्रतापरुद्रदेवाच्या नांवावर सरस्वतीविलास नांवाचा धर्मशास्त्रग्रंथ आहे. या राजाचा काळ १४९७ ते १५३९ असा आहे. प्रतापरुद्रदेवानें हा धर्मशास्त्रग्रंथ आपल्या प्रजेसाठीं मुद्दाम करविला व व त्याप्रमाणें सर्वांनीं वागावें अशी कडक आज्ञाहि केली. आस्टीन या ग्रंथकारानें कायद्याच्या शास्त्रावरील ( Jurisprudence )आपल्या ग्रथांत कायद्याची म्हणजे धर्माची जी व्याख्या केली आहे तिच्याशीं प्रतापरुद्रदेवाची ही कृति अगदीं जुळती आहे. राजकीय वरिष्ठानें राजकीय कनिष्ठाला दिलेली व दंडाच्या जोरावर कृतींत आणविलेली अशी जी आज्ञा, तिला कायदा म्हणावें, ( Law in a Command addressed by political superiors to political inferiors and enforced by a sanction ) अशी आस्टीनची कायद्याची व्याख्या आहे. नारायणभट्ट हा वाराणसी येथील भट्ट घराण्यातील अत्यंत प्रसिद्ध पुरुष असून तो

मूळचा पैठणाचा होता. त्याचा जन्म इ. स. १५१३ त झाला. हा व याचे वंशज यांच्या थोरवीमुळें दाक्षिणात्य पंडितांना काशीविद्यापीठांत बहुमानाचें स्थान प्राप्त झालें. नारायणभट्टाचें अन्त्येष्टिपद्धति, त्रिस्थलीसेतु व प्रयोगरत्न हे प्रमुख ग्रंथ असून त्याचा नातू कमलाकर भट्ट याचे शूद्रकमलाकर व निर्णय सिंधु [सन १६१२] हेहि प्रसिद्ध आहेत. अकबराचा मंत्री तोडरमल याचाहि तोडरानंद नावाचा धर्मशास्त्रविषयक व्यापक ग्रंथ आहे. तोडरमल इ. स. १५८६ त मरण पावला. सर्व हिंदुस्थानभर अंमल गाजविणारा धर्मशास्त्रग्रंथ म्हणजे नंदपंडिताची दत्तकमीमांसा होय. सर्व न्यायमंदिरात त्याचेंच प्रामाण्य मानिलें जातें.

कमलाकरभट्टाचा चुलत भाऊ नीलकंठभट्ट याचा भगवंतभास्कर नावाचा १२ भागांचा ( मयूख ) सुप्रसिद्ध ग्रंथ असून तो १६१० ते १६४० पर्यंतच्या काळांत झाला. वीरमित्रोदय हाहि असाच प्रसिद्ध धर्मशास्त्र ग्रंथ आहे. तो वीरसिंह राजाच्या आश्रयानें मित्रमिश्रानें लिहिला व त्याचें द्योतक अशें उभयताच्या नावाच्या मिश्रणाचें नाव त्याला देण्यांत आलें. याचा काळ १६०० ते १६२५ पर्यंतचा आहे. अनंतदेव हा आणखी एक महाराष्ट्रीय धर्मशास्त्रग्रंथकार होऊन गेला. तो सुप्रसिद्ध पैठणकर साधु एकनाथ याच्या कुळांतील होता. पण पुढें तो हिमालयाकडील कुमाऊन व गरवाल या प्रांतीं गेला व तिकडे त्यानें स्मृतिकौस्तुभ नांवाचा ग्रंथ लिहिला. याचा काळ १७ व्या शतकाची अखेर होय.

हिंदुस्थानांतील प्रचंड पंडितांपैकीं नागोजीभट्ट हा एक असून त्याचे अनेक शास्त्रांवर प्रमाणभूत ग्रंथ प्रसिद्ध आहेत. तो मुख्यत्वें वैयाकरण होता, तरी धर्मशास्त्रावरहि आचारेन्दुशेखर, आशौचनिर्णय, इत्यादि अनेक ग्रंथ त्यानें लिहिले. बालकृष्ण किंवा बालभट्ट याचा बालंभट्टी किंवा लक्ष्मीव्याख्यान नावाचा टीकाग्रंथ सुप्रसिद्ध आहे. याज्ञवल्क्यस्मृतीवरील विज्ञानेश्वराच्या मिताक्षरानामक प्रसिद्ध टीकेवरील ही टीका असून ती लक्ष्मीदेवी नावाच्या स्त्रीच्या नावावर मोडते. ही लक्ष्मी बालंभट्टाची बहुधा आई होती. बालंभट्टींत स्त्रियांचा कैवार अत्यंत मोठ्या प्रमाणावर घेतलेला असून ती टीका स्त्रियांनीं अवश्य वाचावी. बुल्हर नावाच्या जर्मन पण्डितानें बालंभट्टी टीकेंतील स्त्रियांच्या कैवाराला उद्देशून त्याला बायकी तत्त्वज्ञान ( Petticoat philosophy ) म्हटलें आहे. पण वस्तुतः तसा प्रकार नसून तें पुरुषी तत्त्वज्ञानच आहे. हा बालंभट्ट प्रसिद्ध इंग्रज संस्कृतज्ञ कोलब्रूक याला संस्कृत शिकविणारा पण्डित होता. तो पायगुंडे आडनांवाचा दक्षिणी ब्राह्मण असून त्याचा जन्म इ. स. १७४० चे सुमारास झाला व ९० व्या वर्षी तो मरण पावला.

दक्षिणेकडे सांप्रत सर्वमान्य असलेला धर्मशास्त्रावरील निबंधग्रंथ म्हणजे काशीनाथोपाध्याय अथवा बाबा पाध्ये यांचा धर्मसिंधुसार हा होय. त्याला धर्मसिंधु असेंच प्रायः म्हणतात. अलीकडे सामान्यतः धर्मशास्त्र निर्णय करतांना हाच ग्रन्थ

व चतात, पलीकडे कोणी जात नाहीत. बाबा पाध्ये मूळचे कोंकणांत संगमेश्वर जवळील रहाणारे असून पेशव्यांवर रागावून मंगळवेढे येथें मुसलमानी राज्यात जाऊन राहिले. तेथें त्यानीं धर्मसिंधु ग्रन्थ इ. स. १७९०–९१ च्या सुमारास लिहिला.

हिंदुधर्मशास्त्राचा विचार करावयाचा तर कोठपासूनचे ग्रन्थ पाहिले पाहिजेत हें या ग्रन्थवर्णनावरून दिसून येईल. धर्मसिंधुपर्यंतच जाऊन थबकल्यास व्यापक दृष्टि कशी येणार ? म्हणून अगदीं पहिल्यापासूनचे या शास्त्रावरील ग्रन्थ वाचणें अवश्य आहे. तसें केलें म्हणजे धर्मशास्त्र निर्णयात ऐतिहासिक दृष्टि उत्पन्न होते. तशी ती यावी म्हणून धर्मशास्त्रावरील अगदीं आरंभापासूनच्या प्रमुख ग्रन्थांची ही थोडथोडी माहिती दिली. आता आपला आजचा मुख्य विषय जो वर्णाश्रमव्यवस्था त्याकडे वळूं.

## वर्णाश्रम व्यवस्था

धर्म हा षड्विध म्हणजे सहा प्रकारचा सांगितला आहे. १ ला सामान्य धर्म. यालाच नीतिधर्म म्हणतात व तो सर्वांना सारखाच लागू आहे. २ रा वर्णधर्म. हा त्या त्या वर्णालाच लागू आहे. ३ रा आश्रमधर्म. हा विशिष्ट आश्रमापुरताच असतो. ४ था वर्णाश्रम धर्म. हा विशिष्ट वर्णांतील माणसाला विशिष्ट आश्रमांतच लागू असतो. ५ वा गुणधर्म, म्हणजे ज्य भूमिकेवर किंवा अधिकारपदावर मनुष्य असेल त्याला अनुसरून करावयाचें कर्तव्य. ६ वा निमित्त धर्म, म्हणजे प्रसंगोपात्त घडलेल्या गोष्टीमुळें करावें लागणारें आचरण यांचीं उदाहरणें द्यावयाचीं तर खरें बोलावें, क्षमा करावी, चोरी करूं नये, इत्यादि नीति (morality) म्हणजे सामान्य धर्म होत. ब्राह्मणानें मद्य पिऊं नये, हा वर्णधर्म होय. ब्राम्हण ब्रम्हचाऱ्यानें पळसाचा दंड व मृगाचें चर्म घ्यावें हा वर्णाश्रमधर्म म्हणावा राजानें प्रजापालन करावें, हा गुणधर्म झाला, कारण क्षत्रियच राजा असतो असें नाहीं; ब्राम्हण, वैश्य व शूद्र हेहि राजे झालेले आहत. कुत्रा चावला असता औषधोपचाराबरोबर त्याचा स्पर्श झाल्याबद्दल प्रायश्चित्त घेणें हा निमित्तधर्म होय. कारण तो कुत्र्याचा स्पर्श न झाला तर करावयाचा नसतो.

## सामान्य धर्म अथवा नीति

सर्व नीतिधर्मांचें सार दोन मुख्य तत्त्वांत आणतां येतें. तीं तत्त्वें म्हणजे आत्मौपम्य दृष्टि व सत्य हीं होत. ‘आत्मौपम्येन सर्वत्र यः पश्यति स पश्यति’। किंवा Do unto others as you would be done by आणि ‘सत्यं वद’। (तै. उ.) यांत सर्व नीति येते आत्मौपम्याच्या

तत्त्वालाच म. गांधी अहिंसा ह्मणतात. बृहदारण्यकोपनिषदांतील ' दाम्यत ( इंद्रियदमन ), दत्त ( दान ), दयध्वम् ' ( दया करा ) या आदेशांचा मथितार्थ तोच आहे. ख्रिस्ती धर्मांत श्रद्धा ( faith ), मुमुक्षुत्व ( hope ) आणि दया ( love ) हेंच मुख्य तीन गुण ( primary virtues ) मानिले असून चवथा सत्य ( truth ) हा मागाहून त्याना जोडण्यांत आला. मी बद्ध असलें तरी परमेश्वराच्या कृपेनें मुक्त होईन [ अहं बद्धः मुक्तः स्याम् ] या कल्पनेंत श्रद्धा व मुमुक्षुत्व यांचा समावेश होतो. आमच्या धर्मशास्त्रांत या सामान्य गुणांची ह्मणजे नीतिधर्मांची चर्चा मोठ्या विस्तारानें केलेली नसली, तरी सर्व धर्मशास्त्रकारांनीं त्याला इतर सर्व धर्मांचा पाया ह्मटलें आहे व त्याला कोणी विसरलेला नाहीं. वसिष्ठधर्मसूत्रांत ' पैशुन्यमत्सराभिमानाहंकाराश्रद्धानार्जवात्मस्तवपरगर्हादम्भलोभमोहक्रोधासूयाविवर्जनं सर्वाश्रमाणां धर्म इष्टः ' । [ १०,३० ] असें सांगितलें आहे. दुष्टपणा, मत्सर, वांकडेपणा, आत्मस्तुति, परनिंदा इत्यादिकांचा त्याग हा सर्व आश्रमाचा धर्म होय. विष्णुधर्मसूत्रांत [ २,१६-१७ ] क्षमा सत्यं दमः शौचं दानमिन्द्रियसंयमः । अहिंसा गुरुशुश्रूषा तीर्थानुसरणं दया । आर्जवं लोभशून्यत्वं देवब्राह्मणपूजनम् । अनभ्यसूया च तथा धर्मः सामान्य उच्यते । अशा रीतीनें सामान्य धर्मांची नामावली दिली आहे. त्यांतील देवद्विजगुरुपूजन हें पाहून कोणाला आश्चर्य वाटेल. पण नीतितदि तें सांगितलें आहेच. मनूनें हे सामान्य धर्म अथवा नीति ' अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः । एतं सामासिकं धर्मं चातुर्वर्ण्येऽब्रवीन्मनुः । ' ( १०, ६३ ) असे दिलेले आढळतात. गौतमधर्मसूत्रांत या नीतिधर्मांना ' आत्मगुण ' म्हटलें असून ' दया सर्वभूतेषु क्षान्तिरनसूया शौचमनायासो मंगलमकार्पण्यमस्पृहेति ' अशी त्यांची नामावली दिली आहे. यांत अनायास म्हणजे जिच्या योगानें नित्य क्लेश होतील अशा कोणत्याहि गोष्टीचा त्याग, कार्पण्य म्हणजे दैन्य, मंगल म्हणजे प्रशस्ताचरण आणि अप्रशस्तवर्जन इत्यादि अर्थ आहेत. गौतमानें एकंदर अठ्ठेचाळीस संस्कार सांगितले असून चार वेदव्रतें, हविर्यज्ञ, पाकयज्ञ सोमयज्ञ इत्यादि एकवीस आणि दुसरे पंधरा मिळून चाळीस आणि आत्मगुण आठ अशी त्यांची व्यवस्था सांगितली आहे. या संस्कारांपैकीं चाळीसाचें अनुष्ठान पूर्णपणें करूनहि जर आठ आत्मगुणाना मनुष्य पारखा असेल तर त्याला उत्तम गति प्राप्त होत नाहीं असें गौतम म्हणतो. ' यस्यैते चत्वारिंशत्संस्कारा न च अष्टावात्मगुणा न स ब्रह्मणः सायुज्यं सालोक्यं गच्छति । ' ( ८, २३—२४ ). येथें कांहीं वर्षांपूर्वी एका यूरोपीय पंडिताचें वेदान्तविषयावर व्याख्यान झालें, त्या वेळीं त्यानें सांगितलें कीं तत्त्वज्ञान सांगणाऱ्या एवढ्या उपनिषदांत शांतीचा उपदेश कोठेंच केलेला नाहीं ! केव्हां ' सर्वं खल्विदं ब्रह्म, तज्जलानिति शांत उपासीत । ' ( छां. ३, १४, १ ) म्हणजे हें सर्व नामरूपात्मक जग ब्रह्मच आहे; कारण तें त्या ब्रह्मापासून उत्पन्न

होतें, त्यांतच लय पावतें आणि त्याच्या योगानेंच रहातें, म्हणून आसक्ति, द्वेष इत्यादि टाकून शांत होऊन त्या ब्रह्माची उपासना करावी, हें वचन त्याला दाखवितांच 'हें मला माहीत नव्हतें,' असें तो म्हणाला! श्रुतिस्मृतींत मुरलेल्या भारतीयापुढें वेदान्तावर व्याख्यान द्यावयास येणाऱ्या पंडितानें इतकें अज्ञान प्रकट करावें हें धाष्टर्याचें व आश्चर्याचें नव्हे काय? आमच्याकडे सद्गुणाला किंमत देत नाहींत, केवळ विशिष्ट आचाराला व कवायतीला महत्त्व देण्यांत येतें असें म्हणण्याचा त्या लोकांचा आशय असतो. आज कित्येक लोकांच्या कृतींत तसा प्रकार दिसत असला, तरी आमच्या धर्मशास्त्रकाराची मात्र तशी दृष्टि नव्हती, हें उघड आहे. गौतमाच्या वचनावरून दुसरा काय बोध होणार? 'अश्वमेधसहस्रेभ्यः सत्यमेवातिरिच्यते'। या महाभारतवचनापेक्षां सत्याची योग्यता आणखी ती काय सांगावयाची! पण सुमारें तीस वर्षांपूर्वी कलकत्ता विद्यापीठाच्या व्यासपीठावरून पदवीदानप्रसंगीं लार्ड कर्झननीं पदवीधरांना उद्देशून केलेल्या भाषणांत भारतीयांना सत्याची कल्पनाच नाहीं, असे उद्गार काढले होते. अमृत बझार पत्रिकेनें या थोर गृहस्थाच्या विधानाला उत्तर म्हणून त्यांच्याच खोटेपणाचें भरपूर माप त्यांच्याच पुस्तकातून काढून वेशीवर टांगलें ती गोष्ट निराळी. इतरवर्णांना तर सत्यादि पाहिजेतच, पण शूद्रालाहि तीं पाहिजेत—तस्यापि [ शूद्रस्यापि ] सत्यमक्रोधः शौचम् । गौ. ध. १०, ५२ किंवा 'सर्वेषां सत्यमक्रोधो दानमहिंसा प्रजननं च ( वसिष्ठ ध. ४, ४ )इत्यादि वचनें सत्याची आवश्यकता सर्वांनाच प्रतिपादितात, हे कोणी विसरूं नये.

## वर्णधर्म—प्रास्ताविक

वर्णधर्माचा विचार करताना आज ग्रंथातील वर्णधर्म फारसे आढळत नसून जातिभेद मात्र दृष्टीस पडतो. जगातील इतर समाजांपासून आमचें वैशिष्ट्य असेल तर तें या जातिसंस्थेंत आहे. जपानांत व इतर देशात जाति होत्या असें म्हणतात, पण त्या अवघ्या दोन किंवा तीन. पण बावीस कोट लोकसंख्येच्या आजच्या हिंदुसमाजात १९०१ च्या लोकगणतीच्या वेळी २३७८ भिन्न जाति आढळून आल्या. म्हणजे सरासरीनें प्रत्येक जातीच्या वांट्याला आठ नऊ हजार माणसें येतात. पण खरोखर कांहीं जातींत पुरीं ५०० माणसेंहि आढळत नाहींत. अशी स्थिती का झाली याचा गंभीरपणें विचार करण्याची वेळ आज आली आहे. आपला देश परमेश्वराचा लाडका असें म्हणतात. पूर्वी तो तसा असेल, किंबहुना होताच. पण आता मात्र आमच्या कर्मानें तो त्याचा नावडता झाला आहे. आजच्या जातिसंस्थेचे तीन विशेष आहेत—१ जन्मजातत्व, २ विवाहनिर्बंध आणि ३ भक्षणानिर्बंध. आमची जात आज जन्मानें सिद्ध होते. डॉ. ॲनिबेझंट बाई 'माझा कृष्ण माझा कृष्ण' म्हणत जन्मभर राहिली, पण तिला हिंदु कोणी म्हटलें नाहीं! आमचीं लग्नें आज जातीबाहेर होत नाहींत आणि जातीबाहेरच्या

माणसाच्या हातचें आम्ही खात नाहीं. सामाजिक लग्नविधीच्या कायद्यानें होणारीं थोडीशीं लग्नें अपवादात्मक होत. माधवभटाकडे [ इराण्याकडे ] चहा बिस्किटें कोणी खात असलें तरी उघडपणें तसा व्यवहार होत नाहीं, हेंच खरें. तेव्हां वर्णधर्मासंबंधानें आज एवढयाच गोष्टी उरल्या आहेत. धंद्याकडे पाहिलें तर कोणतीहि जात कोणताहि धंदा करते आहे. धंदा हा आज जातीवर अवलंबून राहिलेला नाहीं. क्वचित् सुतार, तेली, लोहार, न्हावी इत्यादि थोड्या जातींत धंद्याचें स्वरूप थोडेफार दृष्टीस पडतें. खाण्या पिण्याच्या बाबतींत ' औषधं जान्हवीतोयं ' म्हणून सर्व प्रकार गुप्तपणें चालू आहेत. साहेबांच्या घरीं चहा बऱ्याच लोकांना चालतो, पण उघड मात्र एका जातीनें दुसरीच्या हातचें खावयाचें प्यावयाचें नाहीं, अशी आजची स्थिती आहे.

## जातिसंस्थेचा इतिहास

प्राचीन आर्यांनीं जातिसंस्था ही मोठी महत्त्वाची योजना बसविली होती. आज तिची उपयुक्तता संपली असें कदाचित् म्हणतां येण्यासारखें आहे. पण ती निघाली तेव्हां ती अत्यन्त उपयुक्त होती यांत शंका नाहीं. जेव्हां एका प्रबळ समाजाची दुसऱ्या दुर्बळ समाजाशीं गाठ पडते, तेव्हां त्या दुर्बळांच्या वांटयाला तीन प्रकार येणें संभवतात. पहिला प्रकार म्हणजे समूळ निःपात. स्पॅनिश लोक अमेरिकेंत गेले, तेव्हां त्यांच्या घोडेस्वारांना पाहून हे कोणी देवच होत असें वाटून रेड इंडियन हे तद्देशीय अडाणी लोक हजारोंनीं त्यांना नमस्कार करावयास आले. पण बंदूकवाल्या दोनशें स्पॅनिश लोकांनीं पटापट गोळ्या झाडून लक्षावधि रेड इंडियनांचा निःपात केला. दुसरा प्रकार दुर्बळांना हलके लेखून त्यांच्याकडून प्रबळांनीं आपलें अवश्य तेवढें काम करून घेण्यासाठीं त्यांची स्वतंत्र व्यवस्था लावणें. हा प्रकार आफ्रिकेंत आढळतो. तेथें गोरे लोक हिंदी लोकांना कमी लेखून रहाण्याच्या जागाहि चांगल्या ठिकाणीं देत नाहींत. प्रत्यक्ष हिंदुस्थानांतहि पुष्कळ बाबतींत हा प्रकार आढळतो. युरोपियन आरोपीला जे. पी. नसलेल्या मॅजिस्ट्रेटा-टापुढें न्यायदानासाठीं कांहीं वर्षांपूर्वी उभें करतां येत नसे, आणि सेशनकोर्टाला सुद्धां त्या आरोपीला एक वर्षाहून अधिक शिक्षा देतां येत नसे. ३ रा प्रकार तादा-त्म्याचा. पण या प्रकाराचें उदाहरण आजवर इतिहासांत घडलेलें नाहीं. पोर्तुगीज लोकांनीं हिंदी लोकांना धर्मान्तर करावयास लावून तसा थोडासा प्रयोग केला. पण त्या खिस्ती झालेल्या लोकांत मुळच्या जाति राहिल्या व त्यामुळें पूर्ण साम्य स्थापन झालें नाहीं. पोर्तुगीजांनींहि या खिस्ती झालेल्या लोकांशीं आपले पूर्ण साम्य घडवून आणलें नाहीं. या बाबतींत हिंदुस्थानांत प्राचीन आर्यांनीं जें केलें, तें दुसऱ्या कोठेंहि झालें नाहीं. प्राचीन भारतीय आर्यांनीं मूळच्या दासांना आप-ल्यांत मिसळून घेण्याचा प्रयत्न केला, आणि तो करतांना अतिशय सहन-शीलता दाखविली. त्या प्रयत्नाचा निष्कर्ष म्हणजे आज जिचें स्वरूप विकृत झालें

आहे अशी मूळची चातुर्वर्ण्यसंस्था होय. तेव्हां त्यासंबंधानें आज काय करावें असा मोठा प्रश्न आहे.

धर्मैक्य व एकजातित्व यावर समाजांचा उत्कर्ष व सहानुभूति सर्वस्वीं अवलंबून आहेत असें मात्र नाहीं. युरोपखंडांत सर्वत्र एकजातित्व व एकधर्मत्व आहे, कोणत्याहि देशांतील स्त्री दुसऱ्या कोणत्याहि देशातील पुरुषाशीं लग्न करूं शकते, कोणालाहि कोणाबरोबर जेवतां खातां येतें. सर्व एकाच देशूला तारक समजतात. पण असें असतांहि तेथें परस्परद्वेष व कलह हे सर्वत्र चालू आहेतच. धर्मैक्य व जात्यैक्य असेल तर त्याची मदत समाजोन्नतीला व सहानुभूति मिळविण्याला फार होते, पण त्यांवरच सर्व कांहीं अवलंबून आहे असें मात्र नाहीं. शिवाजीनें महाराष्ट्रांत स्वराज्य-स्थापना केली, तेव्हां येथें जाती होत्याच. पण त्यांचा वरपगडा न होतां दाक्षिणेंत स्वराज्यस्थापना होऊं शकला, तसें उत्तरेकडे मात्र झालें नाहीं. उलट चीन देशांत जातिभेद नसतांही चाळीस कोटी लोकांना पांच कोटी जपान्यांनीं लोळविलें अशी स्थिति असल्यामुळें जेव्हा कोणी जात्यैक्य हेंच सर्वस्व आहे असें सांगूं लागतात, तेव्हां त्यांचें म्हणणें कोणीही मान्य करीत नाहीं. उलटपक्षीं जातिभेद प्रबळ असल्यामुळें एका जातीच्या विचारी मनुष्यानेंही एखादी गोष्ट पुढें आणिली तर त्याच्या सद्धेतूबद्दल इतर जातींच्या मनात ताबडतोब किंतु उत्पन्न होतो अशी नाजूक परिस्थिति हल्लीं आहे. म्हणून या प्रश्नाचा खोल व निर्विकार मनानें विचार केला पाहिजे.

हिंदुस्थानांतील जातिसंस्थेविषयीं अनेक पाश्चात्य पंडितानीं श्रमपुरःसर ग्रंथ लिहिले आहेत. सेना ( Senart ) यांचें कास्ट इन् इंडिया, रिस्लेचें पीपल इन इंडिया, इबेटसनचें पंजाबातील जाती, इत्यादि पुस्तकें पाश्चात्यांचीं असून, डॉ० केतकराचा हिंदुस्थानातील जातिसंस्थेचा इतिहास, डॉ० घुर्ये यांचें जातिभेदावरील पुस्तक, इत्यादि एतद्देशीय विद्वानांचीं होत. जिज्ञासूंनीं हे व इतर तत्सम ग्रंथ अवश्य पढावे. याविषयीं त्या ग्रंथकारांची व माझी भूमिका एकच आहे असें नाहीं व त्यांनीं जातिसंस्थेचें जितकें विस्तृत विवेचन आपापल्या ग्रंथात केलें आहे तसें मला या व्याख्यानमालेंत करितां येणें शक्य नाहीं. मी फक्त या विषयाचें दिग्दर्शन करून प्राचीन काळापासून ग्रंथांवरूनच विशेषतः वर्णव्यवस्थेचें स्वरूप काय होतें तें थोडक्यांत दाखविणार आहे. ते ग्रंथ वाचल्यानें पुष्कळ गोष्टी कळून येतील. प्राचीन काळीं चंद्रगुप्ताच्या सभेंत असलेल्या मेग्यास्थेनिस नांवाच्या ग्रीक वकिलानें आपल्या हिंदुस्थानविषयक लेखांत येथील सात जातींचा उल्लेख करून त्यांच्यांत परस्पर विवाह होत नाहींत, व एकजात दुसरीचा धंदाहि करीत नाहीं असें म्हटलें आहे. त्यावरून चंद्रगुप्ताच्या वेळीं जातिसंख्या कमी असली तरी एकंदर जातिसंस्थेचें स्वरूप आजच्यासारखेंच बहुतेक होतें असें दिसून येतें. आज हिंदुसमाज जगाच्या लोकसंख्येच्या सप्तमांश असेल, पण अशी जातिसंस्था जगांत दुसरीकडे कोठेंहि नाहीं. जाति या परमेश्वरानें प्रथमपासूनच उत्पन्न केल्या असें मानून आमच्याकडे ' चातु-

र्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ' या गीतावचनाचा अनर्थ करून सोडण्यांत आला आहे. तेव्हां आतां वर्ण याचा अर्थ प्राचीन वाङ्मयांत काय दिसून येतो व जाति कशा बनतात याचा थोडा विचार करूं.

## जाति कशा होतात

आपल्यांत प्रस्तुत चालू असलेल्या जाती अनेक कारणांवरून पडलेल्या आहेत. कित्येक जाति धंद्यावरून पडल्या, तर कित्येक प्रदेशावरूनहि पडल्या आहेत. सुतार, तेली, माळी, लोहार, गवळी, तांबट, कोष्टी, माळी, कासार, इत्यादि जाति धंद्यांवरून झाल्या हें उघड आहे. जाट, अहीर, गुजर, लोहाणा, भाटिया, भिल्ल, गोंड, संताळ इत्यादि भिन्न वंशावरून झाल्या आहेत हेंहि सहज दिसून येईल. कनोजी, श्रीवास्तव, जौनपुरी, कऱ्हाडे, कोंकणस्थ, देशस्थ या जाति भौगोलिक भेदांनीं उत्पन्न केलेल्या आहेत. जोगी, गोसावी, मानभाव इत्यादि जाति धर्मपंथावरून झालेल्या होत. जातिभेदाच्या इतिहासांत इ. स. पूर्वी ६०० पर्यंतचा एक, तेथपासून इ. स. ६०० पर्यंतचा दुसरा व ६०० पासून नंतरचा तिसरा असे तीन कालविभाग स्थूलमानानें करणें अवश्य आहे. या तिसऱ्या विभागांत गिझनीचा महमुद गिझनीहून निघाला तो आगगाड्या वगैरे आजच्यासारखीं प्रवाससाधनें नसतांना थेट आटशें मैलावर सोमनाथापर्यंत आला व तेथील मूर्ति फोडून देवळाचा दरवाजा घेऊन गेला आणि त्या वेळच्या लोकांनीं त्याला तसें करूं दिलें याचें आश्चर्य वाटतें. मीं त्या वेळीं तेथें असतों तर कार्य केलें असतें हें सांगणें कठीण आहे !! पण आमच्या धर्माचा आत्यंतिक अभिमान आम्हाला तेव्हां नव्हता एवढी गोष्ट त्यावरून उघड होते. कोणत्याही गोष्टीचा अतिरेक करण्याची आमची फार प्राचीन काळापासून प्रवृत्ति आहे. उदाहरणार्थ, कलकत्त्यास बाळंत झालेल्या बाईचा सोहेर आम्हाला मुंबईस येऊन आमचीं लग्नमुंजीचीं कार्यें अगदीं ऐन वेळीं बंद करूं शकतो. असा आम्ही जननाशौचाचे बाबतींत अतिरिक्तपणा केला आहे. वस्तुतः सोहेर हा केवळ स्वतः बाळंतिणीलाच व फार तर तिच्या नवऱ्याला असावा असें प्राचीन धर्मशास्त्र सांगतें. तात्पर्य मूळ चातुर्वर्ण्यांतून जातिभेदाच्या ह्या भयंकर विस्तार पावलेल्या अश्वत्थवृक्षाचा पसारा कमी कमी करीत जाणें आतां अवश्य आहे.

## वेदांतील वर्ण

आतां जाति या ईश्वरानेंच उत्पन्न केल्या, त्या आपण कशा कमी करणार, अशी जी कल्पना आहे तिजकडे वळूं. १०५०० ऋचा असलेल्या सबंध ऋग्वेदांत ब्राह्मण, राजन्य, वैश्य व शूद्र यांचा विराट पुरुषाशीं संबंध व ब्राह्मणानंतरचीं तीन नांवें 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्' इत्यादि प्रसिद्ध ऋचेशिवाय कोठेंहि आलेलीं नाहींत. ज्या पुरुषसूक्तांत ही ऋचा आहे त्याची भाषा कालिदासाच्या भाषेसारखी सोपी व कोणालाहि सहज समजेल अशी आहे. त्याच्या मानानें इतर सूक्तांची भाषा कठीण आहे. तेव्हां हें सूक्त ऋग्वेदांत प्रथमपासून नसून मागाहून घातलेलें आहे असें

म्हणावें लागतें. पण तो प्रश्न सोडून दिला तरी त्या सूक्तांत एक रूपक सांगितलें असल्यामुळें त्याचा शब्दशः अर्थ घेणें शक्य नाहीं. वेदपठण करणारे ते समाजाचें मुख होत, लढवय्ये लोक त्याचे बाहु होत, कृषिगोरक्ष्यादि करणारे वैश्य ते मांड्या प्रमाणें त्याचे आधारस्तंभ होत व धावपळ करीत वामें करणारे शूद्र ते त्या समाजाचे अथवा विराट् पुरुषाचे पाय होत असें तें केवळ रूपक आहे. पण कोणी झाले तरी एकाच शरीराचे अवयव. ते एकमेकांपासून दूर राहिले तरी कितीसे रहातील ?

आतां वर्ण शब्दाचा अर्थ ऋग्वेदात काय आहे ते पाहूं. ‘ उभौ वर्णावृषिरुग्रः पुपोष सत्या देवेष्वाशिषो जगाम । ’ ( ऋ. १, १७९, ६ ) सामर्थ्यवान् अशा अगस्त्यानें दोन्ही वर्णांचा उत्कर्ष केला व देवलोकीं सत्य असे आशीर्वाद प्राप्त करून घेतले. यांत वर्ण शब्दाचा अर्थ वर्णनीय आकार म्हणजे काम आणि तप असा सायणाचार्यांनीं केलेला आहे. पण ही निव्वळ ओढाताण आहे. ‘उभौ वर्णौ ’ म्हणजे आर्य आणि दास हे दोन वर्ण. ‘ यो दासं वर्णमधरं गुहा कः । ’ ( ऋ. २, १२, ४ ) दास वर्णाचा ज्यानें पराभव करून त्याला गुहेत लपावयास लाविलें, यात वर्ण म्हणजे एका विवक्षित रंगाच्या कातडीचा लोकसमूह असा अर्थ आहे. ऋग्वेदकाळीं आर्य आणि दास किंवा दस्यु असे दोन परस्परविरोधी समाज होतेच, पण स्वतः आर्यांआर्यांतहि पक्ष पडून युद्धें होत. असें एक मोठें युद्ध सुदास विरुद्ध इतर दहा राजे यांच्यात झालेलें ऋग्वेदात वर्णिलें आहे. ‘ दासा च वृत्रा हतमार्याणि च सुदासमिन्द्रावरुणावसाऽवतम् । ’ [ ऋ. ७, ८३, १ ]‘ हे इंद्रावरुण हो ! दास वर्गांतील आणि आर्यांतील वृत्र ( शत्रु ) याना मारून तुह्मी आपल्या बलानें सुदासाचें रक्षण करा; ’ यात हा आर्यांआर्यांतील भेद दिसून येतो. ‘ प्र कृष्टिहेव शूष एति रोरुवदसुर्यं वर्णं निरिणीते अस्य तम् । ’(ऋ. ९, ७१, २ ) यांत असुर्यं वर्णं म्हणजे हरित रंग असा सायणानें अर्थ केला आहे. तैत्तिरीय ब्राह्मणांत ‘ दैव्यो वै वर्णो ब्राह्मणः असुर्यः शूद्रः ’ असें म्हटलें आहे. त्यावरून असुर्य वर्ण म्हणजे ऋग्वेदांत दस्यु किंवा यांस पुढें शूद्र म्हणूं लागले ते होत असें दिसतें. या वर्णनांतील दास हे परशियन लोक असावे असें मला वाटतें. ‘ न मां गरन्नद्यो मातृतमा दासा यदीं सुसमुब्धमवाधुः । शिरो यदस्य त्रैतनो वितक्षत्स्वयं दास उरो अंसावपि ग्ध । ’ [ऋ. १, १५८, ५] यांत दीर्घतमा मामतेय नावाचा ऋषि म्हणतो कीं, या दासांनीं मला बांधून पाण्यांत टाकिलें तरी आईसारखें प्रेम करणाऱ्या त्या नद्यांनीं मला बुडविलें नाहीं. माझ्या शिरावर या त्रैतनानें घाव घातला, पण दास आतां स्वतःच आपलें उर व खांदे बडवून घेईल. यांतील त्रैतन हा एक दास आहे दस्यूंचें वर्णन यज्ञ न करणारे [ अक्रतु ] अस्पष्ट किंवा अपमानकारक बोलणारे [ मृध्रवाचः ], पणि [ व्यापारी ] असें केलें आहे. त्यावरून त्रैतन या पार्शी नांवावरून दास म्हणजे पर्शियन लोक होत असें दिसतें. असो. वर्ण शब्दानें हेच लोक ऋग्वेदांत आलेले आढळतात. इतर वेदांचा विचार पुढें करूं.

---

# चातुर्वर्ण्यव्यवस्था



मागील व्याख्यानांत धर्माचे सहा प्रकार ह्मणजे सामान्य धर्म, वर्णधर्म, आश्रमधर्म, वर्णाश्रमधर्म, गुणधर्म व निमित्तधर्म ह्मणजे काय हें सांगून सामान्य धर्म ह्मणजे सर्व मानवजातीला लागू होणारे धर्म ह्मणून कोणते सांगितले आहेत याचें विवेचन केलें, आणि वर्णधर्म ह्मणजे काय हें पहाण्याला आरंभ करून वेदांत वर्ण शब्दाचा अर्थ रंग असा पुष्कळ वेळां असून एक समाज असाहि कांहीं ठिकाणीं आहे हें उदाहरणांनीं स्पष्ट केलें. त्या वेळीं दस्यु किंवा दास हे काळ्या वर्णाचे लोक आणि आर्य हे गौर वर्ण असे दोन समाज एकमेकांचे विरोधी असून त्रैतन हा एक दास ह्मणून वेदांत सांगितला आहे व त्यांच्या वर्णनावरून दास हे पर्शीयन सारखे लोक असावे असें दिसतें. प्रस्तुत व्याख्यानात तोच वर्णधर्माचा विचार पुढें चालवून वैदिक कालाच्या अखेरपर्यंत येऊं. त्या पुढील वर्णव्यवस्थेचा विचार विवाहाचा विषय जेव्हां येईल तेव्हां करूं; कारण विवाहांच्या भानगडींमुळें पुढें अनेक जाति निर्माण झाल्या असें दिसून येतें. असो.

## दास आणि आर्य

आतां दासांसंबंधानें कांहीं आणखी गोष्टी पाहूं. वैदिक आर्यांच्या दासांविषयींच्या कल्पना काय होत्या हें त्यानीं त्यांना अव्रत ह्मणजे यज्ञ न करणारे असें ह्मटलें आहे त्यावरून समजून येतें. ‘ क्षां दासाय उपबर्हणीं कः’ [ ऋ. १,१७४,७], ‘ दासीर्विशः सूर्येण सह्याः ’ [ ऋ. २,११,४ ] इत्यादि ठिकाणींहि आर्यांना त्यांच्या विषयीं काय वाटत होतें तें दिसून येतें. हे इन्द्रा, दासाला तू भूमी हीच उशी ( उपबर्हणी ) करून दिलीस ह्मणजे त्याला जमिनीवर लोळविलेंस. सूर्यासारख्या तेजस्वी वज्रानें, हे इंद्रा, ‘ दासीर्विशः ’ ह्मणजे दासवर्गांतील लोकांना मारून टाक. ‘विजानीह्यार्यान्ये च दस्यवो बर्हिष्मते रंधया शासदव्रतान् । ’ ( ऋ. १,५१,८ ). आर्य

आणि दस्यु यांना नीट ओळख आणि अव्रत अशा दस्यूंना शिक्षा करून यज्ञ करणाऱ्या आर्यांच्या स्वाधीन कर, असें एक ऋषि ह्मणतो. यात आर्य आणि दस्यु यातील भेद दाखविला असून दासांना अव्रत ह्मटले आहे. ऋग्वेदात व्रत ह्मणजे आतां यासारखीं ऋषिपंचमी आदिकरून व्रतें नसून नित्य स्वरूपाचे सृष्टीचे नियम असा अर्थ होता. दासांचा पराभव करून त्यांना हांकून द्यावें अशाच कल्पना त्या वेळीं दिसून येतात. दासाचा वर्ण काळा होता. त्यांना काळ्या कातडीचे लोक [त्वचं कृष्णां ] असे ह्मटलेलें आढळतें. 'मनवे शासदव्रतान्त्वचं कृष्णामरन्धयत्।' [ ऋ. १,१३०,८ ] इन्द्रानें या काळ्या अव्रत लोकांना मनवे ह्मणजे आर्यांच्या स्वाधीन करून दिलें व यज्ञ करणाऱ्या आर्यांचें सर्व युद्धात रक्षण केलें [ इन्द्रः समत्सु यजमानमार्यं प्रावद्विश्वेषु शतमूतिराजिषु ]. आर्य आणि दास यांचा असा संबंध ऋग्वेदांत आढळतो.

## ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य

पूर्वी सांगितलें आहे कीं, ऋग्वेदांत राजन्य, वैश्य आणि शूद्र हे शब्द एका पुरुषसूक्ताशिवाय दुसऱ्या कोठेंहि आलेले नाहींत. ब्राह्मण, क्षत्र किंवा क्षत्रिय हे शब्द मात्र बरेच वेळां आलेले आहेत. 'विशः' शब्द अनेक ठिकाणीं ऋग्वेदात येतो व त्याचा अर्थ वैश्य असा होय असें कांहींचें म्हणणें आहे. परंतु ऋग्वेदांत विशः म्हणजे सामान्य लोक, जनता असाच अर्थ आहे. 'दासीः विशः' म्हणजे दासवर्गातील लोक असा अर्थ उघड आहे. 'यच्चिद्धि ते विशो यथा प्रदेव वरुण व्रतं मिनीमसि द्यवि द्यवि।' [ ऋ. १, २५, १, ] या ऋचेंत विशः म्हणजे सामान्य लोक असा अर्थ अगदीं स्पष्ट आहे.

क्षत्रिय शब्द ऋग्वेदात पुष्कळ वेळां येतो व त्याचा अर्थ बलवान् असा दिसतो. उदाहरणार्थ, 'तथा राष्ट्रं गुपितं क्षत्रियस्य' ( ऋ. १०, १०९, ३ ), 'आ राजाना मह ऋतस्य गोपा सिन्धुपती क्षत्रिया यातमर्वाक्।' ( ऋ. ७, ६४, २ ), या ऋचा पहा. 'त्यान्नु क्षत्रियाँ अव आदित्यान्याचिषामहे' (ऋ. ८, ६७, १ ) यात आदित्यदेवाना क्षत्रिय म्हटलें आहे. इन्द्रालाहि क्षत्रिय हें विशेषण लाविलेलें आहे. मित्रावरुणांना ऋतस्य गोपा व क्षत्रिय म्हटलें असून त्याना यज्ञासाठीं इकडे या [ आयातमर्वाक् ] असें बोलावणें केलें आहे. या ठिकाणीं क्षत्रिय म्हणजे विशिष्ट वर्ग असा अर्थ नसून बलिष्ठ असा आहे. 'अग्निरीशे बृहतः क्षत्रियस्य अग्निर्वाजस्य परमस्य रायः। [ ऋ. ४, १२, ३ ], यांत तर क्षत्रिय शब्दाचा अर्थ बल असाच आहे; अग्नि हा मोठ्या बलाचा, अन्नाचा व उत्कृष्ट धनाचा स्वामी आहे असें त्यांत म्हटलें आहे.

आतां ब्राह्मण शब्द पाहूं. 'ब्राह्मणासो अतिरात्रे न सोमे सरो न पूर्णमभितो वदन्तः।' 'ब्राह्मणासः सोमिनो वाचमक्रत' [ऋ. ७, १०३, ७–८ ] असें अतिरात्र नांवाच्या

यागांत देवांची स्तुति गाणाऱ्या ब्राह्मणाचें वर्णन असून, 'हृदा तष्टेषु मनसो जवेषु यद् ब्राह्मणाः संयजन्ते सखायः।' [ ऋ. १०, ७१, ८ ] यांत हृदा म्हणजे मनानें तयार केलेल्या [ तष्टेषु ] स्तोत्राच्या साह्यानें ब्राह्मण यज्ञ करतात असें म्हटलें आहे. * याप्रमाणें ब्राह्मण शब्द ऋग्वेदांत अनेक वेळां आलेला आहे. पण वैश्य व राजन्य हे शब्द येत नाहींत.

ब्रह्म आणि क्षेत्र हे शब्द प्रस्तुत ब्राह्मण व क्षत्रिय यांचे दर्शक समजतात. हे शब्द ऋग्वेदांतहि आलेले आहेत. त्यांत ब्रह्म शब्दाचा अर्थ प्रार्थना किंवा सूक्त असा आहे. ऋ. ४, १६, २१ या ऋचेंत 'अकारि ते हरिवो ब्रह्म नव्यं।' म्हणजे, हे इन्द्रा, तुझें हें नवें सूक्त केलें आहे असें म्हटलें असून तोच अर्थ 'अकारि ब्रह्म समिधान तुभ्यं।' [ ४, ६, ११ ] यांतहि आला आहे. 'आदित्या रुद्राः सुदानव इमा ब्रह्म शस्यमानानि जिन्वत।' ( ऋ. १०, ६६, १२ )-हे आदित्य व रुद्र हो, तुह्मी मोठे उदार आहां. हीं सूक्तें रचण्याची तुह्मी प्रेरणा केली. इत्यादि ठिकाणीं ब्रह्माचा अर्थ स्तोत्र, सूक्त असाच आहे. सायणाचार्यहि असाच अर्थ पुष्कळ ठिकाणीं करतात. पण कांहीं ठिकाणीं त्यांनीं ब्रह्म म्हणजे अन्न असें म्हटलें आहे. उदाहरणार्थ 'अस्माकं ब्रह्म पृतनासु जिन्वतम्।' [ ऋ. १,१५७,२ ] म्हणजे आमच्या रणभूमीवर ( सैन्यात ) ब्रह्माची प्रेरणा करा, यांत ब्रह्म म्हणजे अन्न असें सायणाचार्य म्हणतात. पण येथेंहि ब्रह्माचा अर्थ स्तोत्र असा घेतां येतो. याच ऋचेंत 'घृतेन नो मधुना क्षत्रमुक्षतम्' म्हणजे आमच्या क्षत्रावर घृत व मद्य शिंपा असें म्हटलें आहे, त्यांत क्षत्र म्हणजे सैन्य असा अर्थ आहे. अर्थासंबंधानें असे मतभेद दिसतील, तेव्हां कोणता ग्राह्य हें श्रोत्यानीं स्वतःच्या सारासारबुद्धीनेंच ठरविलें पाहिजे. कारण अशा प्रसंगीं खरें काय व त्याज्य काय हें ठरविण्याची कामगिरी कालिदासानें 'तं सन्तः श्रोतुमर्हन्ति सदसद्व्यक्तिहेतवः' या श्लोकांत म्हटल्या-प्रमाणें संतश्रोत्यावरच येते. असो.

विशः शब्दाचा ऋग्वेदांतील अर्थ वैश्य नव्हे हें दाखविलेंच आहे. आणखीहि कित्येक उदाहरणें घेऊन तसें दाखवितां येईल. 'अग्निर्दीदाय मानुषीषु विक्षु' [ ऋ. ४, ६, ७ ] मनुष्यलोकांत अग्नि देदीप्यमान झाला; 'इन्द्र क्षितीनामसि मानुषीणां विशां दैवीनामुत पूर्वयावा।' [ ऋ. ३, ३४, २ ] हे इन्द्रा, तूं मनुष्य

---

* सोम शब्दाचा अर्थ मद्य असा नाहीं. वेदांत मद्यवाचक सुरा शब्द आहे. आपल्या हातून घडणाऱ्या चुका स्वतःच्या आपल्या नसून त्यांचा दोष दैव, मद्यपान, राग, भीति, दुर्लक्ष, सर्वकर्ता ईश्वर इत्यादींकडे लावणारा एक ऋषि म्हणतोः-'न स स्वो दक्षो वरुण ध्रुतिः सा सुरा मन्युर्विभीदको अचित्तिः। अस्ति ज्यायान्कनीयस उपारे स्वप्नश्च नेदनृतस्य प्रयोता।' [ ऋ. ७, ८६, ६ ].

लोक व देवलोक यांचा पुढारी आहेस, इत्यादि ठिकाणीं विश् शब्दाचा दुसरा अर्थ संभवनीय नाहीं. विश् म्हणजे जन, लोक, असा केवळ सामान्यार्थी शब्द आहे. याच अर्थाचे चर्षणि, ( हिंदी किसान ), कृष्टि ( शेती करणारे, कर्षणारे ), क्षिति, हेहि शब्द होत. पंचजन म्हणजे पाच प्रकारचे लोक ऋग्वेदात सांगितले आहेत. 'यत्पांचजन्यया विशेन्द्र घोषा असृक्षत।' हे इन्द्रा, पांच प्रकार ज्यांत आहेत अशा लोकसमुदायानें मोठा स्तुतिघोष केला ( ऋ. ८, ६३, ७ ), 'पंचजना मम होत्रं जुषध्वम्' [ ऋ. १०, ५३, ४ ] हे पंचजनहो, माझ्या होत्राला ( यज्ञाला ) स्वीकारा, इत्यादि ठिकाणीं पंचजन शब्द आला असून सामान्य सर्व प्रकारचे लोक असा त्याचा अर्थ आहे. ही वैदिक काळची म्हणजे ऋग्वेदकाळची स्थिति झाली. पण पुढें कालान्तरानें विश् शब्द वर्गवाचक झाला व 'ब्राह्मणक्षत्रियविशां' अशा रीतीनें त्याचा वर्गवाचक प्रयोग होऊं लागला. पण ऋग्वेदांत विशः म्हणजे वैश्य असा अर्थ कोठेंहि नाहीं असें मला वाटतें.

## वर्ण धंद्यावर अवलंबून नव्हता.

ऋग्वेदांत विश् शब्द धंद्याचा वाचक नव्हता तरी तेव्हां धंदेहि नव्हते असें मात्र नाहीं. पण धंदे असले तरी त्या धंद्यांवरून जात मात्र त्या वेळीं बनली नव्हती. ऋग्वेदात तक्षा व कर्मार म्हणजे लोहार हे आले आहेत. ( ब्रह्मणस्पतिरेता सं कर्मार इवाधमत् । ऋ १०,७२,२ ), एकाच कुटुंबांत अनेक धंदे करणारीं माणसेंहि असत. 'कारुरहं ततो भिषगुपलप्रक्षिणी नना । नानाधियो वसूयवोऽनु गा इव तस्थिमेन्द्रायेन्दो परिस्रव । [ ऋ. ९, ११२, ३ ] या मंत्रांत ऋषि म्हणतो, 'मी स्तोत्रकर्ता [ पुरोहित ] आहे, माझा बाप वैद्य आहे, आणि आई दळण करते. अशा रीतीनें द्रव्य मिळविण्यासाठीं आम्ही विविध कामें करून असतों. ऋग्वेदांत कारु म्हणजे स्तोत्रकर्ता, पुरोहित असा अर्थ आहे. विश्वामित्र आणि विपाट् व शुतुद्री यांच्या संवादांतील 'आ ते कारो शृणवामा वचांसि ययाथ दूरादनसा रथेन ।' ( ऋ. ३, ३३, १० ) या मंत्रांतहि विश्वामित्राला कारु म्हटलें आहे. या अनेक धंद्यापैकीं वैद्यकी करणारांची आज स्वतंत्र जात आपल्याकडे नाहीं, पण पूर्वी तशी होती व बंगाल प्रांतांत वैद्य नांवाची जात अद्यापि आहे. एकाच कुटुंबांत असे अनेक धंदे असणारांचें दुसरें ऋग्वेदातील उदाहरण शंतनु आणि देवापि यांचें होय. शंतनु हा धाकटा भाऊ व देवापि हा थोरला. थोरला देवापि राजा होण्यास कबूल नव्हता. शंतनुलाच त्यानें राजा हो म्हणून सांगितलें. पण थोरल्या मुलाला बाजूला सारून धाकट्यानें राज्य करणें अन्यायाचें आहे व त्यामुळेंच दुष्काळ पडला असें म्हणून लोक रागावले व मग मी स्वतःच्या इच्छेनें राज्य सोडिलें आहे, शंतनूचा त्यांत अपराध नाहीं. अशी देवापीनें त्यांची समजूत घातल्याची कथा आहे. हा देवापि

पुरोहित झाला व दुष्काळनिवारणार्थ त्यानें शंतनूकडून यज्ञ करविला. अशा रीतीनें एकाच घरांतील भाऊ पुरोहित व राजा असे झाले. ऋग्वेदाच्या १० व्या मंडळांतील ९८ व्या सूक्तांत ही कथा आली आहे. ' यद्देवापिः शंतनवे पुरोहितो होत्राय वृतः ' । ( ७ ) यज्ञासाठीं देवापीला शंतनूचा पुरोहित निवडण्यांत आलें आणि ' आर्ष्टिषेणो होत्रमृषिर्निषीदन्देवापिर्देव सुमतिं चिकित्वान् । ' [ ५ ] ऋष्टिषेणाचा पुत्र देवापि यानें यज्ञ करून देवांची कृपा [ सुमति goodwill ] संपादन केली.

## शूद्र

ऋग्वेदांतील या उदाहरणांवरून त्या काळीं विविध धंदे असले, तरी त्यांवरून जाति बनल्या नव्हत्या हें उघड आहे. आज पुनः तशी स्थिति आली आहे. तसें नसून पूर्वीच्या एका काळासारखा प्रकार असता, तर आज वकीलाची जात वेगळी, बॅरिस्टरांची जात वेगळी, व सॉलिसिटरांची वेगळी असें झालें असतें. असो. पण ऋग्वेदकालीन हा प्रकार पुढें पालटला. दास दस्यूंना आर्यांनीं जिंकून स्थिरस्थावर केल्यावर त्याचें काय करावयाचें असा प्रश्न आला. पूर्वी सांगितल्याप्रमाणें बलिष्ठ व दुर्बल असे दोन समाज एकत्र आले असतां दुर्बल अजिबात नष्ट होणें, किंवा त्यानीं बलिष्ठाच्या मानानें कनिष्ठ होऊन त्यांच्यांतच रहाणें किंवा बलिष्ठाशीं समरस होऊन जाणें असे तीन प्रकार संभवतात. यांतील पहिला प्रकार प्रत्यक्ष युद्ध असतां जेवढा आर्यांनीं केला असेल तेवढाच, त्यानंतर दासांना नष्ट करून टाकण्याचा प्रयत्न करण्यांत न येतां दुसऱ्या प्रकाराचा अवलंब करून त्याना आर्यांच्या समाजांत कनिष्ठ पदवी देऊन समाविष्ट करून घेण्यात आलें. त्याना जमीनदोस्त करून टाकण्याची जुनी भाषा ( क्षां दासायोपबर्हणीकः । १० ) जाऊन तिच्या जागीं तैत्तिरीय संहितेंत ' रुचं नो धेहि ब्राह्मणेषु रुचं राजसु नस्कृधि । रुचं विश्येषु शूद्रेषु मयि धेहि रुचा रुचम् ' अशी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांच्या बरोबरच शूद्रानाही तेजस्विता द्यावी अशी देवाची प्रार्थना होऊं लागली, [ तै. सं. ५, ७, ६, ३–४ ], दासदस्यूंना शूद्र नावानें आर्यांच्या समाजांत स्थान मिळालें, तेव्हा आर्यांतच ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य असें तीन वर्ग झाले होते व शूद्राचा स्वतंत्र वर्ग झाला तथापि दोन्ही समाजातील पूर्वीची युद्धकालीन तेढ बराच काळपर्यंत साफ मोडली नव्हती व त्याना कनिष्ठच समजत. ' शूद्रो मनुष्याणामश्वः पशूनां तस्मात्तौ भूतसंक्रामिणावश्वश्च शूद्रश्च तस्माच्छूद्रो यज्ञेऽनवक्लृप्तः । ' [ तै. सं. ७, १, १, ६ ]. मनुष्यांत शूद्र आणि पशूंत घोडा हीं वाहनें होत. म्हणून शूद्राला यज्ञाचा अधिकार नाहीं असें आर्य म्हणत. पण हें मतहि पुढें सर्वांचें राहिलें नाहीं. पूर्वमीमांसेंत यज्ञाधिकार प्रकरणांत सर्व वर्णांना यज्ञाचा अधिकार आहे असा बादरीचा म्हणून पूर्वपक्ष दिला आहे. म्हणजे बादरीसारखे कोणी शूद्रांनाहि यज्ञाचा व वेदाध्ययनाचा अधिकार आहे असें म्हणत होते.

शूद्रांच्या कनिष्ठ स्थितीचें द्योतक असें आणखीही कित्येक प्रकार दिसून येतात. शतपथ ब्राह्मणांत ' पशु वा एतच्छ्मशानं यच्छूद्रः । ' म्हणजे ' शूद्र हा चालतें [ पशु ] स्मशानच होय ' असें म्हटलें असून वसिष्ठ धर्म सूत्रांत ( १८, ११-१२ ) त्याचा अनुवाद करून ' तस्माच्छूद्रसमीपे नाध्येतव्यम् ' म्हणजे शूद्राच्या संनिध वेदांचें अध्ययन करूं नये ' असा निष्कर्ष काढिला आहे. शूद्रांच्या कनिष्ठ पदवीचें आणखी एक ज्ञापक ताण्ड्य ब्राह्मणांत सांपडतें. महाव्रत नामक यज्ञांत आर्य व शूद्र यांची लुटुपुटुची लढाई करीत व तींत आर्यांचा जय झाला असें दाखवीत, ' शूद्रार्यौ चर्मणि व्यायच्छेते ( व्यायाम करतात ) तयोरार्यं वर्णमुज्जापयन्ति ' ( ५, ५, १४ ) उज्जापयन्ति म्हणजे ' यथा ब्राह्मणो जयेत्तथा कुर्युरित्यर्थः ' ब्राह्मणाचा जय झाला असें करीत.

कनिष्ठपण पत्करण्याचें हें शूद्रांचें दुःख काय होतें हें कालिदासानें म्हटल्याप्रमाणें ' महदपि परदुःखं शीतलं सम्यगाहुः ' [ वि. ४ ] या न्यायानें पुष्कळांना समजत नाहीं. पण याविषयीं ऐतरेय ब्राह्मणांतील शुनःशेपाची कथा लक्षांत ठेवण्यासारखी आहे. हरिश्चंद्र राजाला पुत्र नव्हता, म्हणून पुत्र झाल्यास मी तो तुला बळी देईन असा त्यानें वरुणाला नवस केला. त्याप्रमाणें राजाला पुत्र झाला असतां वरुण बळी मागावयास आला. परंतु राजानें बराच काळ टाळाटाळ करून ती गोष्ट लांबणीवर टाकिली. मुलाला दात तर येऊं देत, मग बघूं, दात आल्यावर तो जरा मोठा तर होऊं दे अशा राजाच्या सबबी वरुणानें कांहीं वेळ ऐकिल्या. पण शेवटीं तो निकरावर आला, त्या वेळीं तो मुलगा जाणता झाला होता आणि आपलें काय होणार हें समजल्यामुळें तो पळून रानांत गेला. तेव्हां वरुणाला राग येऊन त्यानें राजाला उदर रोग उत्पन्न केला. राजपुत्र रोहिताला तें कळलें. तेव्हां आपल्या बदली बळी द्यावयास कोणी मिळेल तर पहावें म्हणून तो फिरत असता अजीगर्त नांवाचा एक दरिद्री ब्राह्मण त्याला आढळला. त्याला तीन मुलगे होते, त्यांतील एक रोहितानें मागितला. पण थोरला बापाचा लाडका आणि धाकटा आईचा लाडका म्हणून शुनःशेप नांवाच्या मधल्या बिनवारशी मुलावर तो प्रसंग आला. शंभर नाणीं घेऊन अजीगर्तानें शुनःशेपाला विकून टाकलें. यज्ञ चालू झाला व शुनःशेपाला खांबाशीं बांधण्यांत आलें. तेव्हां त्याला मारावयास कोणी सिद्ध होईना. म्हणून आणखी शंभर रुपयांच्या लालचीनें अजीगर्तच सुरा घेऊन पुढें सरसावला. त्यावेळीं दुसरा कोणी त्राता नाहीं असें पाहून शुनःशेपानें विश्वामित्राच्या सांगण्यावरून वरुणाची स्तुति केली. ' हे वरुणा, तूं आकाश व पृथ्वी यांचा राजा आहेस, तर माझी प्रार्थना ऐक आणि माझे हे वरचे मधले व खालचे असे सर्व पाश तोडून मी जीवत राहीन असें कर' ( ऋ. १. २५, २०, २१ ). त्याप्रमाणें वरुणानें शुनःशेपाची मुक्तता केली असतां विश्वामित्रानें त्याला दत्तक घेतलें. पण विश्वामित्राला आधींच

शंभर पुत्र असल्यामुळें हा आणखी कशाला असें तें म्हणूं लागले. तेव्हां अजीगर्त त्याला म्हणाला, ' बाळा, तूं लोकांकडे कशाला जातोस, घरींच चल; ' पण अनुभवानें शहाणा झालेल्या शुनःशेपानें उत्तर केलें. "यः सकृत्पापकं कुर्यात्कुर्यादेनत्ततोपरम्" ज्यानें एकदां पाप केलें, तो पुनः तें करणारच. पुनः तूं मला बळी म्हणून विकणाणार नाहींस कशावरून ? " नापागाः शौद्रादन्यायादसंधेयं त्वया कृतम्–" । तूं शूद्राच्या न्यायाचा ( कृतीचा ) अवलंब केलास, यास्तव तुझ्याशीं तडजोड करण्याची सोय नाहीं. यातील शौद्रात् न्यायात् या शब्दांवरून शूद्रांविषयींची जुनी कल्पना नष्ट झाली नव्हती असें दिसून येतें. शूद्रासंबंधानें शतपथ ब्राह्मणांत ' शूद्र हा अनृत होय, ' शूद्र म्हणजे श्रम ( काबाड कष्ट toil होय ' ) असेंहि म्हटलेलें आढळतें [ १३, ६, २, १० ]

## चातुर्वर्ण्याचा आरंभ

याप्रमाणें ऋग्वेदकालीन स्थिति पालटून तैत्तिरीय संहिता, तैत्तिरीय ब्राह्मण व इतर ब्राह्मणें यांच्या काळांत ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य असे तीन पृथक् वर्ण होऊन त्यांचे परस्पर संबंध बऱ्याच अंशीं ठरून गेले होते. त्यांच्या बाहेर शूद्र असून निषादादि समाजहि त्रैवर्णिक त न मोडता बाजूला त्यांच्याबरोबर वावरत असत. शूद्रापेक्षां निषादांना कांहीं विशेष अधिकार दिलेले होते व आजचे त्यांचे वंशज निखाद त्याविषयीं अभिमानहि दाखवितात. निषादांना रौद्र इष्टि करण्याचा अधिकार होता * पण तो सामान्य निषादांना नसून निषादस्थपतींना ( निषाद असून स्वामी असणाराला ) होता याविषयीं पूर्वमीमांसादर्शनात पूर्वपक्ष उत्तरपक्ष करून जैमिनीनें निषादांचा अधिकार ग्राह्य धरिला आहे. निषादस्थपति या शब्दाचे दोन अर्थ होऊं शकतात. एक षष्ठीतत्पुरुषानुसार व दुसरा कर्मधारयानुसार. निषादांचा स्थपति म्हणजे कोणी त्रैवर्णिक क्षत्रिय व त्यालाच तो अधिकार होता असें कांहींचें म्हणणें असून जैमिनीनें ' स्थपतिर्निषादः स्यात् ' असा सिद्धान्त स्थापित केला व रौद्र इष्टीचा अधिकारी स्थपति हा निषादवर्गांतीलच होय असें ठरविलें. पंचजन म्हणजे निषादांसहित चार वर्ण होत किंवा पंचजन म्हणजे देव, गंधर्व इत्यादि होत असेंहि निरुक्तांत म्हटलें आहे.

## तीनवर्णांचा परस्परसंबंध

तैत्तिरीय संहिता व ब्राह्मणें यांच्या काळीं त्रैवर्णिक व शूद्र यांचे परस्पर संबंध बहुतेक ठरून गेले म्हणून सांगितलें ते संबंध कसे होते तें आतां पाहू. प्रथम जेव्हां हे तीन वर्ण पृथक् झाले तेव्हां त्यांच्यांत उच्चनीच भाव नव्हता. पण हळुहळू ब्राह्मण

---

* एतया निषादस्थपतिं याजयेत् । ( मैत्रायणीय संहिता २, २, ४ या रौद्र इष्टीनें निषादस्थपतीकडून यजन करवावें. )

सर्वांत श्रेष्ठ आहेत अशी कल्पना होऊं लागली. 'एते वै देवाः प्रत्यक्षं यद् ब्राह्मणाः' 'ब्राह्मण म्हणजे प्रत्यक्ष देवच होत' ( तै. सं. १,७,३,११ ), "ब्राह्मणो वै सर्वा देवताः' (शतपथ ब्रा. १२,४,४,६) इत्यादि ठिकाणीं ही कल्पना आढळते. पण ब्राह्मण क्षत्रिय यांचीं श्रेष्ठत्वासाठीं पुष्कळ भांडणें झालीं. विश्वामित्र आणि वसिष्ठ, तसाच कार्तवीर्य आणि जमदग्नि यांमधील झगडा असाच प्रकारचा होय. वैश्य हे मात्र या दोन वर्णांहून कमी ठरून त्यांना त्याचे 'आद्य' म्हणजे खाण्यास योग्य असें म्हणण्यात येऊं लागलें. क्षत्रियांनीं त्यांचें द्रव्य करभार रूपानें घ्यावें व ब्राह्मणांनीं त्याच्याकडे जेवावें असा अर्थ 'आद्य' शब्दाचा आहे व तो अद् खाणें या धातूवरून झाला आहे. 'पशुकामः खलु वै वैश्यो जायते' ( तै. सं. २,५,१०,२ ) वैश्य हा पशूंची इच्छा करणारा होतो, म्हणून तो पहिल्या दोन वर्णांपेक्षा कमी. 'वैश्या मनुष्याणां गावः पशूनां तस्मात्त आद्या अन्नधानाद्ध्यसृज्यन्त तस्माद्भूयांसोऽन्येभ्यः' [ तै. सं. ७,१,१,५ ] वैश्य वर्णांतील लोकसंख्या इतर वर्णांहून अधिक होती, म्हणून वैश्य इतरांना अन्न पुरवू शकत. ताण्ड्यमहाब्राह्मण व शतपथब्राह्मण यांतहि वैश्यांविषयीं असेंच म्हटलें आहे. '...तस्माद् ब्राह्मणस्य च राजन्यस्यचाद्योऽधरो हि सृष्टः' ( तां. ब्रा. ६,१,१० ) वैश्य हे ब्राह्मणांचें व क्षत्रियांचें अन्न होत, कारण त्यांना खालच्या पदवीचेच ( म्हणजे ऊरुपासून निर्माण ) केलें आहे. अशा रीतीनें प्रथम वैश्यांची पदवी खालची ठरून त्यांना वरच्या वर्गांपासून निराळें रहाण्याचा प्रसंग आला. 'तस्माद् ब्राह्मणश्च क्षत्राच्च विशोऽन्यतोऽपक्रमिणोः।' [ तै. ब्रा. १,६,५ ], असें ब्राह्मणग्रंथांत वर्णन आहे. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य हे अनुक्रमें सामवेद, यजुर्वेद व ऋग्वेद यांपासून झाले असेंहि तैत्तिरीय ब्राह्मणांत (३,१२,९,२) सांगितलें आहे.

## ब्राह्मण व क्षत्रिय यांचा परस्पर संबंध

ब्राह्मण केवळ विद्येच्या मार्गे लागले, त्यामुळें 'न वै ब्राह्मणो राज्यायालम्' म्हणजे ब्राह्मण राज्य करण्यास पात्र नाहीं अशी हाण पडली [ शतपथ ब्रा. ५,१,१,१२ ). ते तोंडानेंच शौर्य दाखवितात ( तस्माद् ब्राह्मणो मुखेन वीर्यं करोति मुखतो हि सृष्टः × ( ताण्ड्यब्र. ६,१,६ ), 'तस्माद ब्राह्मणो मुख्यः' ( तै. सं. २,६,२,५ ) ब्राह्मण मुखापासून उत्पन्न झाला म्हणून तो मुख्य [ श्रेष्ठ ]; 'ब्रह्म हि पूर्वं क्षत्रात्'। ( तां. ब्रा. ११,१,२ ) क्षत्रापेक्षां ब्रह्म श्रेष्ठ. शुनःशेपाच्या कथेंतहि रोहित या क्षत्रियाच्या जागीं शुनःशेप

---

× भवभूतीनें उत्तररामचरितांत रामाच्या मुलाच्या तोंडीं परशुरामाविषयीं 'वाचि वीर्यं द्विजानाम्।' ब्राह्मणांचें शौर्य तोंडांतच असतें असे निंदात्मक शब्द घातले आहेत.

हा ब्राह्मण बळी मिळाल्यामुळे वरुणानें आनंदित होऊन 'भूयान् वै ब्राह्मणः क्षत्रियात्' क्षत्रियापेक्षां ब्राह्मण बरा, असे उद्गार काढिले ( ऐ. ब्रा. ३३, ४ ). ब्राह्मण दरिद्री होते व त्यांना क्षत्रियांवर अवलंबून रहावें लागे. पण यज्ञासारखी संस्थाहि गुंतागुंतीची झाली होती, त्यामुळें क्षत्रियांचेंहि ब्राह्मणावांचून चालत नसे. अशा स्थितींत दोघांचें सहकार्य असावें असेंहि सांगितलेलें आढळतें. श्रोत्रिय म्हणजे वेद जाणणारे ब्राह्मण आणि क्षत्रिय हे दोघे मनुष्यांत 'धृतव्रत' ( धृतव्रतौ ) होत असें शतपथ ब्राह्मणात म्हटलें असून ( ५, ४, ४, ५ ) गौतम धर्मसूत्रात [ ८, १ ] 'द्वौ लोके धृतव्रतौ राजा च ब्राह्मणश्च बहुश्रुतः'। असा त्याचा अनुवाद केला आहे. 'अर्धात्मो ह वा एष क्षत्रियस्य यत्पुरोहितः। ( ऐ. ब्रा. ३४, ८ ) पुरोहित हा क्षत्रियाचा अर्धा आत्माच होय, असें म्हटलेलें आढळतें. ज्या ब्राह्मणाला राजाचा आश्रय असेल तो इतर ब्राह्मणांहून श्रेष्ठ व जो राजा ब्राह्मणाला आश्रय देईल तो इतर राजांहून बलवान् अशा उभयतांच्या जोडगोळीचा प्रभाव 'तस्माद् ब्राह्मणो राजन्यवानति अन्यं ब्राह्मणम्। तस्माद् राजन्यो ब्राह्मणवानति अन्य राजन्यम' यात सांगितलें आहे. ब्राह्मणाचें तेज व क्षात्रतेज याचा संगम म्हणजे वायु व अग्नि याचाच संगम होय ( पवनाग्निसमागमो ह्ययं सहितं ब्रह्म यदस्त्रतेजसा।) असा कालिदासानेंहि (रघु.८) त्या श्रुतीचा अनुवाद केला आहे.

ब्रह्मक्षत्रांच्या जोडगोळीचा प्रसंग अश्वमेधप्रकरणांतहि दाखविलेला आहे. दोघांनीं वीणा घेऊन गावें, कारण तें दोघाचें कार्य आहे, एकट्यानें कांहीं होत नाहीं, अशा भावार्थ सांगतांना तैत्तिरीय ब्राह्मणांत म्हटलें आहे-( ३, ९, १४, १-२ ) 'यदा खलु वै पुरुषः श्रियमश्नुते वीणास्मै वाद्यते...न वै ब्राह्मणे श्री रमते इति ब्राह्मणोऽन्यो गायेद्राजन्योऽन्यः'...'न वै ब्राह्मणे राष्ट्रं रमते'–लक्ष्मी ब्राह्मणाच्या ठायीं रमत नाहीं; राष्ट्रहि एकट्या ब्राह्मणामुळें रमत नाहीं. संपत्ति असेल तरच त्या पुरुषाजवळ कोणी वीणा वाजवील. म्हणून दोघांनीं सहकार्य करून गावें. अभिषिक्त राजाचें वर्णन करतांना ऐतरेय ब्राह्मणात 'असा राजा आता सर्व लोकांचा अधिपति झाला, वैश्यापासून कर घेणारा झाला, ब्राह्मणांचें रक्षण करणारा झाला, धर्माचें रक्षण करणारा झाला' अशी त्याची थोरवी गाइली आहे ( ३९, ३ ).

## राजांचा वरचढपणा

ब्राह्मण व राजे यांच्या सहकार्याचें महत्त्व जसें सांगितलें आहे, त्याप्रमाणें कित्येक वेळां राजे ब्राम्हणांना छळीत असल्याचेंहि सांगितलें असून त्यांची निंदा केलेली आहे. 'यो ब्राह्मणं देवबंधुं हिनस्ति न स पितृयाणमप्येति लोकम्' जो राजा ब्राह्मणाची हिंसा करतो तो पितृलोकीं जात नाहीं असें अथर्ववेदांत सांगितलें

आहे (५,१८,१३) ‘ ब्राह्मणाची गाय तुझ्या उपभोगार्थ नाहीं. हे राजा ती तूं घेवूं नये ’ असा उपदेश राजाला करून तसें न केल्यास काय होईल तें ह्या अथर्वसूक्तांत सांगितलें असून ब्राम्हणांच्या गाई पळवून नेण्याच्या राजाच्या प्रयत्नाचा त्यावरून बोध होतो. कार्तवीय व विश्वामित्र यांनीं जमदग्नि व वसिष्ठ यांच्या गाई पळविल्याची कथा या प्रकारचीच होय. असे प्रकार चालत म्हणून, ब्राम्हणाचें अन्न तें इतरांचें विष होय, ब्रह्महत्यें एवढें दुसरें मोठें पातक नाहीं, ब्राह्मणाचा वध करूं नये, त्याच्या अंगातून रक्त हि काढूं नये ( न लोहित कुर्यात् ) इत्यादि कल्पना उत्पन्न झाल्या ( तै. सं. २,६,१०,२). ब्रह्महत्येचा कडकपणा अश्वमेघाची फलश्रुति सांगतांना दाखविला असून, जो अश्वमेध करील ( यो अश्वमेधेन यजते ) तो अमुक पापापासून मुक्त होईल, तमुक पाप पासून मुक्त होइल, असें म्हणून शेवटीं ब्रह्महत्येतूनहि मुक्त होईल ( तरति ब्रह्महत्याम् ) असें सांगितलें आहे. ( तै. सं. ५, ३, १२, १-२ ). राजांनीं वसिष्ठासारख्या ब्राह्मणाच्या गाई पळवून नेण्याच्या गोष्टींचा संबंध केवळ गाई पळविण्याशीं नसून तो त्यांच्या स्त्रियाच पळवून नेण्याशीं आहे, त्यांतील गो शब्दाचा अर्थ गाय असा नसून स्त्री असा आहे, असेंहि डॉ० शाम शास्त्री यांचें म्हणणें आहे.

अशा रीतीनें वर्णविभाग ब्राह्मण काळांत दृढ झाल्यावर त्याची व्याप्ति मनुष्य समाजाहून वाढत वाढत देव, प्राणी व वनस्पति यांपर्यंत हि गेली. उदाहरणार्थ, अग्नि व बृहस्पति हे देवांतील ब्राह्मण, इन्द्र हा क्षत्रिय, वसु विश्वेदेव, मरुत् हे वैश्य आणि पूषा हा शूद्र असें वर्णन आहे. ऐतरेय ब्राम्हणात ( २, ३ ) ‘ मरुतो वै देवाना विशः ’ मरुत् हे देवांतील वैश्य होत असें म्हटलें आहे. प्राण्यांत अश्व हा क्षत्रिय, रासभ हा शूद्र, बोकड हा ब्राह्मण असें शतपथ ब्राह्मणांत ( ६, ३, ५, १२ ) सांगितलें आहे.

## चातुर्वर्ण्य कल्पनेंतील मूलभूत सिद्धान्त

या प्रमाणें वैदिक काळीं चातुर्वर्ण्याची कल्पना उत्पन्न होऊन ती कशी वाढत गेली हें दाखविलें. आतां त्या कल्पनेंत मूलभूत तत्त्व काय दिसतें तें पाहूं आज जातींची प्रचंड संख्या पाहून त्या कमी करणें अवश्य आहे हें समजलें तरी तें करणें मात्र कठीण आहे. जातिभेदामुळें एक प्रकारचा पूर्वग्रह ( race prejudice ) उत्पन्न होतो; पण तो समाजोत्कर्षास उपयुक्त असल्यामुळें तो सर्वस्वी नाहींसा करूंच नये, असें सर आर्थर कीथ सारखे पाश्चात्य मानव-वंश-शास्त्री ( Anthropologists ) ह्मणूं लागले आहेत ! वांशिक अभिमानामुळें समाजांत जी चढाओढ उत्पन्न होते ती नष्ट झाल्यास सर्वत्र गुढघाभर पाणी होऊन राहील, असें त्यांचें

म्हणणें आहे. या दृष्टीनें विचार केल्यास चातुर्वर्ण्याच्या व्यवस्थेंत चार मुख्य तत्वें दिसून येतात. जो जितका ज्ञानी व स्वार्थत्यागी तितका तो श्रेष्ठ हें एक तत्व. हा श्रेष्ठपणा चढत्या क्रमानें महाभारतांत उद्योगपर्वांत व मनुस्मृतींत ( १,९६–९७ ) सांगितला आहे. पूर्वी ब्राह्मण ब-याच अंशीं स्वार्थत्यागी होते. त्यांनीं आपल्यापुढें ज्ञानार्जनाचें ध्येय ठेविलें व आपल्या ज्ञानाचा उपयोग करण्यासाठीं मोफत समाज-शिक्षणाचें कार्य अंगावर घेतलें. त्या वेळीं राजे लोक शिक्षणासाठीं स्वतंत्र व्यवस्था न करितां ब्राम्हणांना साह्य करीत. इंग्लंडसारख्या पुढारलेल्या देशांतहि सरकारी शिक्षणाची ( State education ) कल्पना गेल्या इतक्याइतक्यांत अलीकडे उत्पन्न झालेली आहे. लोकशाहीच्या ( Democracy ) आजच्या काळांत विद्वान व स्वार्थत्यागी लोकच राज्यें चालवितात व सर्वाधिकारी [ Dictator ] होतात. ज्ञान्याच्या हातीं अधिकार असावा असें सर्वांनाच मान्य आहे. तेव्हां ब्राह्मणांनीं आपल्या ज्ञानाच्या व स्वार्थत्यागाच्या जोरावर समाजांत श्रेष्ठपणा प्राप्त करून घेतला हें स्वाभाविकच झालें. ' अजापुत्रं बलिं दद्याद्देवो दुर्बलघातकः ' या न्यायाप्रमाणें ज्ञान्यानें अज्ञान्यावर सत्ता गाजवावी असा लौकिक न्याय्य आहे. मग ही सत्ता गाजवितांना भाषा कितीहि गोड वापरली जावो. रुडियर्ड किप्लिंग या इंग्लिश कवीनें गो-या माणसाच्या अंगावरील भाराचें [ White Man's Burden ) जें वर्णन केलें आहे, त्यांतील तत्व तरी काय आहे ? इंग्लंडांतहि पुरोहित वर्गाला आपल्याविरुद्ध दिवाणी व फौजदारी कामांत [ benefit of clergy ] स्वतःच्या कोर्टांत न्याय मिळावा असें मागण्याचा हक्क अगदीं अलीकडे [ १८२७ पर्यंत ] होता. पण आपल्या इकडे प्राड्विवाक म्हणजे न्यायाधीश कोणालाहि होता येत असे व त्याच्या-पुढें ब्राह्मण आरोपींचीहि चौकशी होई. ब्राह्मणाला वधाची शिक्षा देऊं नये एवढाच निर्बंध होता. पण हा मनूचा निर्बंधहि मृच्छकटिकांतील पालक राजानें मोडून ब्राह्मण चारुदत्ताला वधाची शिक्षा दिली आणि आपल्या न्यायीपणाची दवंडी पिटविली.

## श्रेष्ठपणाची मनूची कल्पना

मनु म्हणतो चराचर वस्तूंमध्यें प्राणी श्रेष्ठ, पण तुमच्या जगण्यांत पुरुषार्थ नसल्यामुळें त्यांत बुद्धिमान् प्राणी श्रेष्ठ होत–' भूतानां प्राणिनः श्रेष्ठाः प्राणिनां बुद्धिजीविनः ।' बुद्धिमान प्राण्यांतहि पुनः मनुष्य श्रेष्ठ व त्यांतहि आनुवंशिक गुणामुळें ब्राह्मण श्रेष्ठ होय—बुद्धिमत्सु नराः श्रेष्ठा नरेषु ब्राह्मणाः स्मृताः ' ब्राह्मणांतहि विद्वान् ब्राह्मण श्रेष्ठ होय; पण विद्या असून कर्तृत्व नसल तर ' ज्ञानं भारः क्रियां विना ' या न्यायानें ती विद्या म्हणजे एकप्रकारचें ओझेंच होईल. यास्तव विद्वानांमध्येंहि निश्चित बुद्धीचे व कर्तृत्वशाली पुरुष श्रेष्ठ असून त्या कर्तृत्वशाली पुरुषांतहि साम्य बुद्धीचे ब्रह्मवेत्ते श्रेष्ठ होत–' ब्राह्मणेषु च विद्वांसो विद्वत्सु कृतबुद्धयः । कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवा-

दिनः'. चातुर्वर्ण्यांतील श्रेष्ठ कनिष्ठ—भावाचा मूळ उद्देश अशा प्रकारचा होता. ते ब्राह्मण आपलें ज्ञान त्याचा सर्वाधिकार (patent) स्वतःकडे न घेतां समाजाला विनामूल्य देऊन टाकीत. पण आज सर्वत्र पेटंटचा अंमल चालू आहे. ॲडोच्या इंजेक्शनमध्यें असें काय मोठें आहे. पण तेवढ्याशा कल्पनेचें त्यानें पेटंट घेऊन त्यावर लक्षावधि रुपये कमाविले. पण अग्नीचा शोध लावणाऱ्या पुरुषानें त्याचें पेटंट घेतलें नाहीं. निःस्वार्थीपणाच्या ध्येयामुळें त्या काळीं ब्राह्मणाकडे स्वाभाविकपणेंच समाजाचें नेतृत्व आलें. ज्ञानी व निःस्वार्थी सर्वाधिकारी हिटलरप्रमाणे आपल्याकडे होईल तर पुष्कळशा भानगडी सहज मिटतील असें कधीं कधीं वाटूं लागतें. लोकशाहींतहि भानगडी मिटवावयाच्या तर सर्वाधिकाऱ्याचीच जरूरी असते. असो.

चातुर्वर्ण्यांतील दुसरें तत्त्व म्हणजे आनुवंशिक संस्काराची ( Heredity ) कल्पना. गुणविकास कसा होतो, या विषयीं संगोपन व परिस्थितीचा परिणाम ( Nurture and environment ) आणि निसर्ग व आनुवंशिक संस्कार ( Nature and heredity ) असे शास्त्रज्ञांत दोन पक्ष असून चातुर्वर्ण्य संस्थापक असे आमचे पूर्वज दुसऱ्या पक्षाचे होते. जन्मतः सर्व माणसें सारखींच असतात व शिक्षणादि संस्कारानीं त्यांचा करावा तसा विकास होऊं शकतो असें पहिल्या पक्षानें मत असून जन्मास येणारा माणूस आपल्या पूर्वजांच्या धंद्याचे व गुणाचे संस्कार आपल्या बरोबर घेऊन येतो अशी दुसऱ्या पक्षाची कल्पना आहे. प्रस्तुत जातिसंस्थेंत या दुसऱ्या कल्पनेचा अतिरेक झालेला आहे.

आनुवंशिक संस्काराशीं संलग्न असें श्रमविभागाचें तत्त्वहि वर्णव्यवस्थेच्या मुळाशीं आहे. याविषयीं मनु म्हणतो, 'लोकानां तु विवृध्द्यर्थं मुखबाहूरुपादतः। ब्राह्मणं क्षत्रियं वैश्यं शूद्रं च निरवर्तयत्।' (१,३१) म्हणजे समाजाच्या उत्कर्षासाठीं ब्राह्मणादि वर्ण उत्पन्न करण्यांत आले. या कल्पनेच्या जोडीला कर्म व पुनर्जन्माची आमच्यातील कल्पना येऊन त्याच्या जोड परिणामानें वर्णव्यवस्था जन्मावर अवलंबून आहे असें स्थापित करण्यांत आलें. आपस्तंबधर्मसूत्रांत 'धर्मचर्यया जघन्यो वर्णः पूर्वंपूर्वं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ। अधर्मचर्यया पूर्वो वर्णो जघन्यं जघन्यं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ'। ( २, ५, ११, १०–११ ), धर्मानें वागलें तर मनुष्य खालच्या वर्णांतून उत्तरोत्तर वरच्या वर्णांत जातो, आणि अधर्मानें वागलें तर उच्चवर्णीय क्रमाक्रमानें खालच्या वर्णांत जातो. खिस्ती धर्मांत पूर्व जन्म, पुढील जन्म, असला आगा पिछा नाहीं. तथापि त्यांतील आधुनिक पंडित तो आहे असें प्रतिपादूं लागले आहेत. तात्पर्य, ज्ञानाचें व स्वार्थत्यागाचें श्रेष्ठत्व, पूर्व संस्कार, श्रमविभाग व कर्मविपाक अशा चार कल्पनांच्या पायावर आमच्या चातुर्वर्ण्याची मूळ उभारणी झाली होती. त्या संस्थेंत

वर्णांच्या श्रेष्ठ कनिष्ठपणाबरोबर व्यावहारिक श्रेष्ठकनिष्ठपणाचाहि विचार केला असून व्यवहारांत ('विद्याकर्मवयोबंधुवित्तैर्मान्या यथाक्रमम्' त्या १. ११६ ) असा क्रम दिला आहे. रस्त्यातून जातांना प्रथम वाट कोणाला द्यावी हें सांगतांना अंध, बधिर, स्त्री, ओझेकरी, राजा, ब्राह्मण असा क्रम सांगितला आहे ( अंधस्य पंथा बधिरस्य पंथाः स्त्रियः पंथा भारवाहस्य पंथाः। राज्ञः पंथा ब्राह्मणेनासमेत्य समेत्य तु ब्राह्मणस्यैव पन्थाः ॥ (महाभारत ) यांतील ब्राह्मणासंबंधाच्या मजकुराखेरीज बाकीचा सर्व आजही सर्वांस पटण्यासारखा आहे. पुढील व्याख्यानांत संस्काराचें वर्णन करून मग भिन्न भिन्न संकर जातींचा विचार करूं.



# संस्कार

मागील व्याख्यानांत वर्णव्यवस्थेचा विचार करून निरनिराळ्या वर्णांचे परस्परसंबंध वैदिक काळांत कसे होते तें थोडक्यांत सांगितलें. त्यानंतर त्या वर्णव्यवस्थेंतून जातिसंस्था कशी निर्माण झाली हें सांगावयाचें. पण पुष्कळशा संकरजाति अनुलोम-प्रतिलोम विवाहामुळें उत्पन्न झालेल्या असल्यामुळें प्रथम विवाहा-संबंधाचें व तो विवाह ज्यांत मोडतो त्या संस्कारांचें विवेचन करणें बरें. या विषयाचा विचार करतांना स्पृश्यास्पृश्य जातीसंबंधानें साधकबाधक गोष्टी कोणत्या आहेत, तसेंच पतितपरावर्तनासंबंधानें कसा विचार केला आहे हेहि विषय केव्हांतरी घ्यावयाचे आहेतच. तरी प्रथम आतां संस्कारांकडे वळूं.

पूर्वीच्या व्याख्यानांत षड्विध धर्मांचा विचार करून सर्वांना लागू असणारे असे जे सामान्यधर्म अथवा नीतिधर्म ( Morality ) त्यांचेहि विवेचन केलें. त्यापुढें वर्णधर्म आले. त्या वर्णधर्मांचा विचार करतांना संस्कार हा विषय प्रथम पुढें येतो. 'प्रकृतिविशिष्टं चातुर्वर्ण्यं संस्कारविशेषाच्च ।' म्हणजे चातुर्वर्ण्य व्यवस्था जन्मावर आणि संस्कारावर बसविलेली आहे असें वसिष्ठधर्मसूत्र म्हणतें [ ४.१ ]. प्रकृति-विशिष्ट म्हणजे जन्मावर अवलंबून असलेलें. या संबंधानें 'जन्मना जायते शूद्रः संस्काराद्द्विज उच्यते ।' म्हणजे मनुष्य जन्मतः शूद्र असतो, पण संस्कारानें त्याला द्विजत्व येतें असे सांगितलें असून 'गायत्री छन्दापासून ब्राह्मण उत्पन्न केला, त्रिष्टुभा-पासून क्षत्रिय आणि जगतीपासून वैश्य केला. पण शूद्राला कोणत्याच छन्दानें उत्पन्न केलेलें नसल्यामुळें तो संस्कार करण्यासारखा नाहीं ' [ गायत्र्या ब्राह्मणमसृजत त्रिष्टुभा राजन्यं जगत्या वैश्यम । न केनचिच्छंदसा शूद्रमित्यसंस्कार्यो विज्ञायते ] असें वसिष्ठधर्मसूत्रात एक ब्राह्मणवचन दिलें आहे. चातुर्वर्ण्याचें हें जें जातिविशिष्टत्व त्याचा संकोच व विकास कसे झाले हें पुढें पाहूं. प्रथम संस्कारांचा उद्देश काय याचा विचार करूं.

## संस्कारांचा उद्देश काय ?

प्रत्येक धर्मांत प्रविष्ट होण्यापूर्वी कांहींतरी संस्कार करावयाचा असतोच. ख्रिस्तीधर्म घेतला तर 'बाप्तिस्मा' (Baptism) नांवाचा संस्कार झाला म्हणजेच मनुष्याला ख्रिस्ती म्हणतात. मुसलमान होण्यासाठीं करावा लागणारा सुंतनाविधि किंवा सुंता प्रसिद्धच आहे. असे प्रत्येक धर्माचे कांहीं विशिष्ट संस्कार आहेत. एखादा सामान्य संघ घेतला तरी त्याचा गणवेष (Uniform) तरी असतोच. उदाहरणार्थ आपली स्वस्तिक लीग घ्या. त्या लीगचा गणवेष घेऊन त्यांत प्रवेश मिळाला म्हणजे त्या विषयींचा अभिमान उत्पन्न होऊन तदनुरूप वर्तन करण्याची बुद्धि सभासदाला

होते. या दृष्टीनें संस्कारांचा उद्देश काय हें पाहिलें पाहिजे. संस्कारांविषयींमनु म्हणतोः—

**वैदिकैः कर्मभिः पुण्यैर्निषेकादिर्द्विजन्मनाम्**
**कार्यः शरीरसंस्कारः पावनः प्रेत्य चेह च ॥ २, २६**
**गार्भैर्होमैर्जातकर्मचौडमौञ्जीनिबन्धनैः**
**बैजिकं गार्भिकं चैनो द्विजानामपमृज्यते ॥ २७**
**स्वाध्यायेन व्रतैर्होमैस्त्रैविद्येनेज्यया सुतैः**
**महायज्ञैश्च यज्ञैश्च ब्राह्मीयं क्रियते तनुः ॥ २८**

गर्भादानापासून अन्त्येष्टीपर्यंतचे ( श्मशानान्ताः ) संस्कार द्विजांच्या बाबतींत वैदिक कर्मांनीं करावे. त्यांच्या योगानें या लोकीं, तसेंच परलोकीं पाप सर्व नाहींसे होतें आणि स्वाध्याय म्हणजे वेदाध्ययन, होम, पंचमहायज्ञ, ज्योतिष्टोमादि यज्ञ इत्यादिकांचे अनुष्ठानानें योग्यता येते व तेणेंकरून ब्रह्मप्राप्तीचा मार्ग मोकळा होतो. वैदिकधर्मी समाजाचें ध्येय अभ्युदय आणि निःश्रेयस असें दुहेरी होतें. अभ्युदय म्हणजे या लोकींचा व परलोकीय उत्कर्ष आणि निःश्रेयस म्हणजे ब्रह्मप्राप्ति किंवा मोक्ष. स्वर्गप्राप्ति व्हावी आणि ‘ पुनरपि जननं पुनरपि मरणं ’ अशा प्रकारच्या चक्रांतूहि सुटावें असा वैदिकधर्मीयाचा हेतु असतो. ‘ ब्रह्मविदाप्नोति परं ’ म्हणजे ब्रह्मवेत्यालाच ब्रह्माची प्राप्ति होते आणि ती झाली म्हणजे ‘ न स पुनरावर्तते ’ तो पुनः जन्ममरणाच्या फेऱ्यांत येऊन पडत नाहीं असें श्रुति सांगते. ही ब्रह्मप्राप्ति म्हणजे परमपुरुषार्थ होय. स्वर्गप्राप्ति हाहि पुरुषार्थच, पण तो कमी प्रतीचा. अपराविद्येनें म्हणजे यज्ञयागादिकांच्या साह्यानें तो मिळतो व बहुतेक लोक त्याच्याच मार्गे लागलेले असतात. पण आत्मानात्मविचार किंवा ब्रह्मज्ञान यानें परमपुरुषार्थ मिळतो. थोडेच लोक या पुरुषार्थाच्या मार्गे लागतात. या पुरुषार्थाची पात्रता आणणें हा संस्कारांचा हेतु सांगितला आहे. पुरुषार्थप्राप्तीला एक प्रकारची शिस्त लागते व ती शिस्त संस्कारांनीं लाविली जाते. दोष नाहींसे करून गुण उत्पन्न झाल्याशिवाय पुरुषार्थाची सिद्धि होत नाहीं. अपहतपाप्मा म्हणजे पाप नष्ट झालेला जो आत्मा असेल तोच मोक्षाचा अधिकारी होतो. शिस्तीच्या वागणुकीनें म्हणजे तपानें दोष जाऊन जशी कार्यक्षमता अंगीं येते, तसें संस्कारानें गुणवर्धन होतें. × संस्काराशिवाय मनुष्य जगणार नाहीं असें नाहीं. पण त्यांच्या योगानें मनुष्याच्या अंगी अधिक योग्यता येते.

---

× योग्यता च सर्वत्र द्विप्रकारा दोषापनयनेन गुणान्तरोपजननेन वा भवति । तत्र संस्कारा गुणान्तरमुपजनयन्ति । तपश्च दोषनिर्घातं करोति । तंत्रवार्तिक.

गर्भाधानादि संस्कार करावे हें सांगून याज्ञवल्क्य म्हणतो,

**एवमेनः शमं याति बीजगर्भसमुद्भवम् ( १, १३ ).**

या संस्कारांच्या योगें बीजविषयक व गर्भविषयक दोष नष्ट होतात. निरनिराळ्या रंगांच्या योगानें चित्र जसें हळूहळू खुलून दिसूं लागतें तसेंच संस्कारामुळें ब्राह्मण्यही विकास पावतें असें पराशरानें म्हटलें असून देवलानेंहि त्याचा अनुवाद केला आहे व इतर स्मृतींचाहि तसाच आशय आहे. ' चित्रकर्म यथाऽनेकै रङ्गैरुन्मील्यते शनैः । ब्राह्मण्यमपि तद्वत्स्यात्संस्कारैर्विधिपूर्वकैः । '. शंखस्मृति म्हणते ' संस्कारैः संस्कृतः पूर्वैरुत्तरैरनुसंस्कृतः । नित्यमष्टगुणैर्युक्तो ब्राह्मणो ब्रह्मलौकिकः । ब्राह्मं पदमवाप्नोति तस्मान्न च्यवते पुनः ॥ '. गर्भाधानादि संस्कारांनीं [ पूर्वैः ] प्रथम संस्कृत होऊन पुढें पाकयज्ञादि संस्कारांनीं ( उत्तरैः ) संस्कृत झालेला ब्राह्मण आठ गुणांनीं युक्त होतो व त्याला परब्रह्माची प्राप्ति होऊन तेथून पुनः तो कधींही ढळत नाहीं. संस्कारांचें महत्व पिण्याच्या पाण्याचा दृष्टान्तानेंहि दर्शविलेलें आढळतें. थंड पाणी प्याल्यानें समाधान वाटतें; पण त्यांत वाळा टाकल्यास तें अधिक आनंददायक होतें. आणि बर्फहि टाकल्यास त्याहूनहि आनंद होतो.त्याप्रमाणें गर्भाधानादि संस्कारांनीं शरीर संस्कृत केलें म्हणजे ( ' सर्वेषु अदृष्टार्थेषु योग्यतातिशयं कुर्वन्ति । फलातिशयो योग्यतातिशये च ।...यथा पानीयस्य गन्धादि ॥ ' रुद्रस्कन्द ) ते संस्कार अदृष्ट अशा पुरुषार्थाला मनुष्याला अतिशय योग्य करतात, आणि तशी मोठी योग्यता आली म्हणजे सहजच धर्माचें फळहि मोठें मिळतें.

## संस्कार किती आहेत ?

गौतमधर्मसूत्रांत ४८ संस्कार सांगितले आहेत. त्यांतील दया, क्षमा, अनसूया, शौच, अनायास, मंगल, अकार्पण्य आणि अस्पृहा हे आठ आत्मगुण होत. सात पाकयज्ञसंस्था,+ सात हविर्यज्ञसंस्था आणि सात सोमसंस्था मिळून २१ व आत्मगुण आठ मिळून २९ झाले. याशिवाय गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकरण, अन्नप्राशन, चौल, उपनयन, चार वेदव्रतें, स्नान किंवा समावर्तन, विवाह, आणि देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ, व ब्रह्मयज्ञ असे पंचमहायज्ञ मिळून

---

+ अष्टका, पार्वण स्थालीपाक, मासिक श्राद्ध, श्रावणी सर्पबलि, आग्रहायणी [ उत्सर्ग होम व प्रत्यवरोहण ], चैत्री शूलगव, आश्वयुजी [ आग्रयण व पशुपति स्थालीपाक ] ह्या ७ पाकयज्ञसंस्था होत. अग्न्याधेय, अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, आग्रयण, चातुर्मास्य, निरूढपशुबन्ध व सौत्रामणी या ७ हविर्यज्ञसंस्था होत. अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, वाजपेय, अतिरात्र आणि अप्तोर्याम या सात सोमसंस्था होत.

एकोणीस शरीरसंस्कार होतात. शंख स्मृतींत हेच ४८ संस्कार सांगितले आहेत. पण वैखानस शारीरसंस्कार अठरा व यज्ञसंस्कार बत्तीस मिळून एकंदर पन्नास संस्कार सांगतो. या संस्कारांची नांवें व संख्या याविषयीं अनेक मतभेद आढळतात. कांहीं जण स्नान व समावर्तन भिन्न समजतात. उदाहरण, मनु ह्मणतो 'गुरुणाऽनुमतः स्नात्वा समावृत्तो यथाविधि ' ( ३, ४ ): पण समावर्तनांत स्नान आहेच, ह्मणून ते एकच होत असें दुसरे ह्मणतात. बारा वर्षे ब्रह्मचर्य चाललें असतां नदींत नुसतें दंडाप्रमाणें उडी मारून स्नान करावयाचे असतें. पण विद्याभ्यास आटोपून घरीं आल्यावर विधिपुरःसर अभ्यंग स्नान ( ceremonial bath ) व्हावयाचें असे त्यामुळें तो स्वतंत्र संस्कार कांहींजण समजतात. दुसरें उदाहरण गर्भाधानाचें. वैखानसानें ऋतुसंगमन किंवा निषेक आणि गर्भाधान हीं भिन्न मानिलीं आहेत, तर मनु त्यांना एकच समजतो. निषेकाला तो पहिला संस्कार मानतो [ निषेकादिः... शरीरसंस्कारः २,२६ ]. याज्ञवल्क्यही निषेकाद्याः क्रियाः असें ह्मणून ( १,१० ) निषेक हाच पहिला संस्कार मानून त्यालाच पुढें गर्भाधान म्हणतो. गोदान किंवा केशान्त हा सोळाव्या वर्षी करावयाचा असून बहुतांशीं तो चौला सारखाच आहे. पण सर्वांनीं तो सांगितलेला नाहीं; गौतम ( २,१५ ), आश्वलायन ( १,१८ ), आपस्तंब गृह्यसूत्र ( ६,१६,१२ ) इत्यादिकांनीं मात्र तो सांगितला आहे.

हे संस्कार कमी होत होत शेवटीं सोळावर आले. त्यांचीं नावें वेदव्यासस्मृतींत दिलीं आहेत तीं अशीं:—

गर्भाधानं पुंसवनं सीमन्तो जातकर्म च ।
नामक्रिया निष्क्रमोऽन्नप्राशनं वपनक्रिया ॥
कर्णवेधो व्रतादेशो वेदारंभक्रियाविधिः ।
केशान्तः स्नानमुद्वाहो विवाहाग्निपरिग्रहः ॥
त्रेताग्निसंग्रहश्चेति संस्काराः षोडश स्मृताः । ( १,१४–१६ )

यांतील गर्भाधान सर्वांना ठाऊकच आहे. पुंसवन हा पुत्र व्हावा म्हणून करण्याचा कोयाड्यासारखा एक विधि आहे. सीमन्त म्हणजे भांग, यांत उंबराचीं फळें, साळीचे पीस व कुश यांनीं भांग काढावयाचा असतो, व वीणा घेऊन स्तोत्रगायन करावयाचें असतें. जातकर्मांत सोन्याच्या अंगठीनें मुलाच्या तोंडाला झाल्याबरोबर मध लावावायचा असतो. हा संस्कार झाल्यावर मग विटाळाला आरंभ होतो. हा संस्कार हल्लीं क्वचितच करितात. नामकरण सध्या बहुतेक बाराव्या दिवशीं करतात. पण तें अकराव्या दिवसापासून एक वर्षपर्यंत करावें असें सांगितलें आहे. एका महिन्यानें नामकरण केल्याचें उदाहरण जुन्या शिलालेखांत मला सांपडलें आहे. नांवें ठेवण्याचे अनेक प्रकार आढळतात. गुप्त म्हणजे आईबापास ठाऊक असलेलें नाव, व्यावहारिक म्हणजे सर्वांनी

हाक मारावयाचें नांव अशीं दोन नांवें असावीं असें एक ब्राह्मण वचन आहे ( तस्माद् द्विनामा ब्राह्मणोऽर्धुकः). वेदांत एकाच्या तीन चार नांवांचा निर्देश आढतो; नक्षत्रनाम, देवतानाम, गोत्रनाम व सोमयज्ञकेल्यावर मिळणारें नाम. पुष्यमित्र, स्वातिगुप्त हीं नक्षत्रनामें, सुरेन्द्र अग्निमित्र हीं देवतानामें, वासिष्ठ, कौशिक हीं गोत्रनामें होत. सोमयाजी, वाजपेयकृत्, अग्निचित इत्यादि नांवें यज्ञनामें होत. नावें ठेवण्याची ही वहिवाट बौद्धांनीं वैदिक परंपरा सोडून नवा धर्म स्थापिला तरी पाळलेली असून त्यांच्या जुन्या ग्रंथांत पुष्यगुप्त, आषाढ अशी नावें आढळून येतात. नांवें ठेवण्याच्या बाबतींत पुरुष व स्त्रिया यांना वेगवेगळे नियम सांगितलेले आहेत. पुरुषाचें नांव दोन किंवा चार अक्षरांचें असावें व त्यांत क, ख, ठ, ढ सारखे कठोर वर्ण नसावे: आजा किंवा पणजा यांचे नाव ठेवावे: अशा प्रकारचे पुरुषाचे नियम आहेत. स्त्रियांच्या नांवाचीं अक्षरें तीन पाच अशीं असावीं: त्यांत शेवटीं दा हें अक्षर असावें ( यशोदा, नर्मदा इत्यादि ). इत्यादि नियम स्त्रियांच्या नांवासंबंधानें सांगितलेले आहेत. पुरुषाच्या नांवापैकीं नक्षत्रनाम गुप्त असून त्याचा उपयोग उपनयनासारख्या प्रसंगींच करावयाचा असतो.

निष्क्रम म्हणजे मुलाचा प्रथम घराबाहेर नेणें. अन्नप्राशन म्हणजे उष्टावण, वपनक्रिया म्हणजे चौल, कर्णवेध म्हणजे कान टोंचणें. व्रतादेश म्हणजे उपनयन. पण हें झाल्याबरोबर वेदाध्ययनाला आरंभ होतोच असें नाहीं. म्हणून वेदारंभक्रिया निराळी सांगितली. केशान्त म्हणजे गोदान, स्नान म्हणजे गुरुगृहाहून परत येणें किंवा समावर्तन. या नंतर विवाह होईपर्यंतच्या काळाला स्नातककाळ म्हणतात. विवाह म्हणजे लग्न. अग्निपरिग्रह दोन प्रकारें होतो. एक विवाहाग्नि आणि दुसरा दायाग्नि. भाऊ एकच असतां अग्नि एकच असणार. पण ते वेगळे झाले म्हणजे प्रत्येकाला वेगळा अग्निपरिग्रह केला पाहिजे. अशा प्रकारचे सोळा संस्कार असून त्यांतील उपनयन व विवाह हेच आज विशेषें करून प्रसिद्ध आहेत व तेहि वेंकटाध्वरि कवीनें विश्वगुणादर्शचंपूंत म्हटल्याप्रमाणें महाराष्ट्रांत तरी ‘ उत्सवैकप्रधानौ ’ झाले आहेत, म्हणजे त्यांना संस्कारापेक्षां उत्सवाचें स्वरूप आलें आहे व अग्नि कोठें व जुला पडला आहे.

## स्त्रियांचे संस्कार

या सोळा संस्कारांपैकीं सीमन्तोन्नयन हा संस्कार स्त्रीविषयक असल्यामुळें तो एकदांच म्हणजे प्रथम गर्भाच्या वेळींच करावा असें विश्वरूप आणि अपरार्क म्हणतात व पारस्कर गृह्यसूत्राचाहि अभिप्राय तोच आहे ( १, १५ ). पण ‘ गर्भाधानमृतौ पुंसः सवनं ’ इत्यादि याज्ञवल्क्यस्मृतींतील

( १, ११ ) वचनावर टीका करताना मिताक्षराकारानें पुंसवन व सीमन्तोन्नयन हे दोन्ही संस्कार एकदाच करावयाचे असें ह्मटलें आहे. मुलींचेहि हे संस्कार करावे, पण त्यांतील पहिले नऊ ह्मणजे गर्भाधानापासून कर्णवेधापर्यंत अमंत्रक करावे असें सांगितलें आहे. हे संस्कार पूर्वी सर्वांचे करीत असत. फार काय पण व्रतबंध म्हणजे साम्प्रतची मुंज हा संस्कारहि पूर्वी स्त्रियांचा होई. ' पुराकल्पे तु नारीणां मौञ्जीबंधनमिष्यते " असें एक स्मृतिवचन आहे. पण ' कन्यार्णी जाया कृपणं हि दुहिता ' असा वेदांतच भेद होऊन मुलीचे संस्कार मागें पडत चालले आणि पत्नी या नात्याचा विवाहसंस्कार समंत्र होत राहिला. आजहि मुलींचे हे संस्कार न केल्याच्या दोषाचा परिहार विवाहप्रसंगीं प्रायश्चित्तानें करण्याचा प्रघात आहे. स्त्रियांना सांप्रत वेदाधिकार नाहीं असें समजतात, पण सर्वांत प्राचीन असा जो हारीतनामक धर्मसूत्रकार त्यानें स्त्रियांचे दोन प्रकार करून एकाला ' सद्योवध्वः ' म्हणजे लग्न करून संसारांत पडणाऱ्या व दुसऱ्या प्रकाराला ' ब्रह्मवादिन्यः ' ह्मणजे वेदाध्ययन करीत रहाणाऱ्या असें म्हटलें आहे. उपनिषत्प्रसिद्ध याज्ञवल्क्याच्या दोन स्त्रियांपैकी एक संसारी होती व दुसरी तत्वजिज्ञासु होती. तो संन्यास घ्यावयाला निघून आपल्या वित्ताची त्या दोघींमध्यें वाटणी करून देऊं लागला असतां ब्रह्मवादिनी मैत्रेयी त्याला म्हणाली ' येनाहं नामृतास्या किमहं तेन कुर्याम् ' ( बृ. उ. ४,५, ४ ) जेणें करून मला अमृतत्व मिळणार नाहीं तें वित्त मला काय करावयाचें ! तर तुह्माला जें ज्ञान आहे तेंच मला सांगा ( यदेव भगवान्वेद तदेव मे ब्रूहि ); पण आतां त्या गोष्टीचा लोप झाला आहे. चातुर्वर्ण्यांतील क्षत्रिय व वैश्य यांचा लोप होऊन ' कलावाद्यन्तयोः स्थितिः ' म्हणजे कलियुगांत पहिले ब्राह्मण व शेवटचे शूद्र एवढेच राहिले हें वचन जसें पुढें आलें तसाच प्रकार स्त्रियांच्या बाबतीतीहि झाला आहे. वस्तुतः तें वचन कोठलें आहे याचा पत्ता नाहीं. पण युद्ध व व्यापार हीं दोन्हीं कामें परकीयांनीं आपल्या हातीं घेतल्यामुळें जर क्षत्रिय व वैश्य हे राहिले नाहींत, तर दुग्धविक्रयादि गोष्टी करूनहि ब्राह्मणत्व कसें रहातें ? तात्पर्य सांगावयाचें एवढेंच कीं पूर्वी सर्व संस्कार स्त्रियानांहि होते; पण त्यांचा पुढें लोप झाला. या बाबतींत मनूनें मोठ्या खुबीनें लिहिलें आहे. स्त्रियांचे इतर संस्कार अमंत्रक करावे असें तो म्हणतोच; पण उपनयन, गुरुगृहवास, अग्निपरिचर्या इत्यादि संस्कारांची स्त्रियांसंबंधानें त्यानें निराळी व्यवस्था लाविली. विवाह म्हणजेच त्यांचें उपनयन, पतिशुश्रूषा म्हणजे त्यांचा गुरुगृहवास आणि मुलाबाळांचें संगोपन व स्वयंपाकादि गृहकृत्यें म्हणजेच त्यांची अग्निपरिचर्या होय. तो म्हणतोः—

अमंत्रिका तु कार्येयं स्त्रीणामावृदशेषतः ।
संस्कारार्थं शरीरस्य यथाकालं यथाक्रमम् ॥

वैवाहिको विधिः स्त्रीणां संस्कारो वैदिकः स्मृतः ।
पतिसेवा गुरौ वासो गृहार्थोऽग्निपरिक्रिया ॥ २.६६,६७

# शूद्रांचे संस्कार.

त्रैवर्णिकांचे सर्व संस्कार समंत्रक व्हावयाचे, पण त्यांत स्त्रियांचे बरेच संस्कार मंत्रहीन करावे असें सांगितलें व तोच प्रकार शूद्रांसंबंधानें केला. 'स्त्रीशूद्राश्च सधर्माणः'—स्त्रिया व शूद्र यांना कित्येक धर्मशास्त्रकारांनीं समान ठरविलें. त्यांतहि स्त्रियांचा विवाहविधि समंत्रक सांगितला आहे, पण शूद्रांना कोणताच संस्कार समंत्रक नाहीं. व्यासस्मृतींत म्हटलें आहेः—

विवाहो मन्त्रतस्तस्याः शूद्रस्यामत्रतो दश । १,१७

हीच कल्पना वृद्धिंगत करून गीतेंत स्त्री आणि शूद्र यांच्या वर्गांत वैश्यांनाहि आणखी गोवण्यांत आलें. शंखस्मृतींत 'नोन्मत्तमूकान संस्कुर्यात्' वेड लागलेले व मुके यांना संस्कार करूं नये असें सांगून 'मंत्रवर्जं शूद्रस्य' म्हणजे शूद्रांचे संस्कार मंत्रविरहित करावे असें म्हटलें आहे. गौतमधर्मसूत्रावरील (१०,५१) टीकेंत हरदत्तानें 'शूद्रस्यापि निषेकपुंसवनसीमन्तोन्नयन जातकर्मनामकरणान्नप्राशनचौलानि अमंत्रकाणि यथाकालमुपदिष्टानि । विवाहोऽपि अमंत्रको यथाचारं भवति' असें गृह्यकाराचें वचन या विषयीं उद्धृत केलें आहे. संस्कार हे पातकें दूर करण्यासाठीं आहेत. पण शूद्राला वेदाधिकार नसल्यामुळें त्याचे दोष वेदाधिकाराला बाधक होण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं व म्हणूनच त्या संस्कारांचीहि त्याला गरज नाहीं असा मनूचा आशय असून तो त्यानें 'न शूद्रे पातकं किंचित् न च संस्कारमर्हति' (१०,१२६) या श्लोकांत व्यक्त केला आहे. ब्रह्मपुराणांत शूद्राला विवाह संस्कार मात्र करावा (विवाहमात्रं संस्कारं शूद्रोऽपि लभतां सदा) असें सांगितलें आहे. पण कमलाकरभट्टांनीं शूद्रकमलाकरांत त्याला चिंत्य म्हटलें आहे. चिन्त्य म्हणजे जवळ जवळ अग्राह्यच. अशा रीतीनें संस्कारांच्या बाबतींतहि अनेक मतभेद प्राचीन काळापासून चालत आले असून त्यांत पुष्कळ परिवर्तन होत गेलेलें आढळून येतें. सुरापान हें मनूनें महापातकांत गणलें असून (११, ५४) लसूण कांदा इत्यादि निषिद्ध पदार्थांचें सेवन हें सुरापानासारखेंच होय (गर्हितानाद्ययोर्जग्धिः सुरापानसमानि षट् । ११, ५६) असेंहि सांगितलें आहे. पण आज लसूण कांदा खाणें हा शिष्टाचार बनला असून तसें चार लोकांत न करणारालाच अशिष्ट समजण्यांत येऊं लागलें आहे !! असो. संस्काराविषयीं एवढें सामान्य विवेचन केल्यावर आतां त्यांतील पहिले किरकोळ संस्कार सोडून महत्वाचा पहिला जो उपनयन संस्कार त्याच्याकडे वळूं.

# उपनयन

उपनयन म्हणजे काय हें प्रथम पाहूं. उप म्हणजे जवळ आणि नयन म्हणजे नेणें. म्हणजे उपनयन शब्दाचा अर्थ जवळ नेणें असा होतो. आचार्यांच्या किंवा गुरूच्या सन्निध वेदाध्ययनासाठीं मुलाला नेणें म्हणजे उपनयन किंवा ब्रह्मचर्याश्रमांत नेणें म्हणजे उपनयन. सत्यकाम जाबालाचें उपनयन करतांना ' उप त्वा नेष्ये ' तुझें उपनयन करतों, असेंच त्याच्या गुरूनें म्हटलें. उपनयन झाल्यावर ' ब्रह्मचर्य मागाम् ' हा मी ब्रह्मचर्याप्रत प्राप्त झालों असें बटु म्हणतो. शतपथब्राह्मण ११.५.४.१). त्यावरूनहि तेंच बोध होतो. हें जवळ जाणें अर्थात् वेदाध्ययनासाठीं असेल तरच तें उपनयन होतें ( उपनयनं श्रुतितः ). उपनयनाचा काळ भिन्नवर्णांना भिन्न भिन्न सांगितला आहे. ब्राह्मणाला आठपासून सोळा वर्षेपर्यंत तो सांगितला असून श्वेतकेतु आरुणेय हा बारा वर्षांचा असतांना त्याचें उपनयन झाल्याचें वर्णन आहे. ( ' स ह द्वादशवर्ष उपेत्य चतुर्विंशतिवर्षः सर्वान्वेदानधीत्य । छां. ६, १,१–२ ). त्यावरून या काळाला श्रुतीचा आधार आहे हें उघड झालें. क्षत्रियाच्या उपनयनाचा काळ अकराव्यापासून बाविसाव्या वर्षापर्यंत व वैश्याला तो बारापासून चोवीसपर्यंत असा सांगितलेला आहे ( मनु २. ३, ६, व ३८ ). पण विशिष्ट कारणास्तव हे काळ अनुक्रमानें पांचव्या, सहाव्या व आठव्या वर्षापर्यंतहि आणतां येतात. मनु म्हणतोः—

ब्रह्मवर्चसकामस्य कार्यं विप्रस्य पञ्चमे ।
राज्ञो बलार्थिनः षष्ठे वैश्यस्येहार्थिनोऽष्टमे ॥ २,३७

वर्षाच्या कोणत्या काळात कोणाचें उपनयन करावें या विषयीं विचार करतांना भारद्वाज–गृह्यसूत्र म्हणतें ' ब्राह्मणाला वसंत ऋतूंत, क्षत्रियाला ग्रीष्म किंवा हेमंत ऋतूंत, वैश्याला शरदृतूंत आणि रथकाराला वर्षाऋतूंत किंवा शिशिर ऋतूंत. ' यांत रथकाराचा म्हणजे सुताराचाहि उपनयनार्ह समाजांत समावेश केलेला आहे हें लक्षांत ठेवण्या जोगें आहे. पण बऱ्याच टीकाकारांनी रथकार म्हणजे त्रैवर्णिकांच्या कोणी बाहेर नसून क्षत्रिय किंवा वैश्य या वर्गांतच जे रथ करण्याचें काम करीत ते होत असा अर्थ केला आहे.

ब्रह्मचाऱ्याचा वेष ही एक लाक्षणिक गोष्ट होती ( Symbolism ) व तोहि भिन्न भिन्न सांगितलेला आहे. ब्राह्मणाला मृगाजिन ( काळ्या हरिणाचें कातडें ), क्षत्रियाला रौरवचर्म ( रुरुनामक हरिणाचें कातडें ) व वैश्याला अजाजिन म्हणजे बोकडाचें कातडें अशीं मनूनें ( २, ४१ ) सांगितलीं आहेत. पण बोधायन म्हणतो ' सर्वेषां वा कृष्णाजिनम् '. हीं कातडीं मूळ पांघरावयासाठीं घेत. पण आतां त्यांचा एक लहानसा तुकडा जानव्यांत अडकवितात. उपनयन झालेल्या बटूच्या कमरेंत जी मेखला म्हणजे दोरी बांधावयाची असते ती ब्राह्मणाला मुंज नामक गवताची

त्यावरूनच उपनयनाला मुंज किंवा मौंजीबंधन म्हणूं लागले; क्षत्रियाला मूर्वा गवताची व वैश्याला शणाची म्हणजे तागाची किंवा आवी म्हणजे मेंढयाच्या लोंकरीची असावी. ब्रह्मचाऱ्याला द्यावयाच्या दंडाविषयीं फार मतभेद आढळतात. ब्राह्मणाला पळसाचा किंवा बेलाचा, क्षत्रियाला वडाचा किंवा खैराचा व वैश्याला उंबराचा असे दंड कांहीं जण सांगतात, तर सांख्यायन ह्मणतो ' सर्वे वा सर्वेषाम् '–कोणताहि कोणालाहि चालेल ! दंडाची उंची ब्राह्मणाला शेंडीपर्यंत, क्षत्रियाला कपाळापर्यंत व वैश्याला नाकापर्यंत असावी ( मनु-२, ४६ ). ब्रह्मचर्याचा अवधि ' ग्रहणान्त ' म्हणजे विद्येचें ग्रहण होईपर्यंत सांगितला आहे. उपनयनाच्या वेळीं सावित्री मंत्राचा ह्मणजे ज्याला आपण गायत्री ह्मणतों त्या मंत्राचा उपदेश देतात. मंत्र व्याहृतींसह जपावयाचा असतो. ह्मणजे त्याचें स्वरूप ' ॐ भूर्भुवः स्वः तत्सवितुर्वरेण्यं भर्गो देवस्य धीमहि धियो यो नः प्रचोदयात् । ' असें होतें. या गायत्री मंत्राचा अर्थ सरळ व सोपा आहे. तथापि त्यावर मोठें भाष्यहि झालेलें आहे. त्याचा सरळ अर्थ, सवितुः देवस्य तत् वरेण्यं भर्गः ( वयं ) धीमहि, यः ( देवः ) नः धियः प्रचोदयात्—सविता देवाच्या त्या श्रेष्ठ तेजाचें आह्मी ध्यान करितों,तो आमच्या बुद्धीला चालन देवो, असा आहे.यांत धी म्हणजे कर्म असाहि अर्थ करतां येईल. सविता म्हणजे सूर्य किंवा परब्रह्म. सविता शब्दाचा अर्थ प्रेरक असा असल्यामुळें कोणाकडेहि तो लावितां येईल. ' भीषास्माद्वातः पवते भीषादेति सूर्यः ' म्हणजे त्याच्या भीतीनें वारा वाहतो व सूर्य उदयास येतो,असें तैत्तिरीय उपनिषदांत ( २,८ ) परब्रह्मासंबंधानें म्हटलें आहे. अशा परब्रह्माचें आ ण ध्यान करतों असें म्हणून त्याच्याकडे लक्ष लावणें कांहीं वाईट नाहीं. या गायत्री मंत्राच्या जपांत योगदृष्टि सांगितली आहे. त्याच्या योगानें चित्त आवरतां येईल. योग म्हणजे चित्तवृत्तींना आवरणें ( योगश्चित्तवृत्तिनिरोधः ) अर्थात् त्यासाठीं हा जप एकान्तात करावा असें सांगितलें आहे. असो ब्रह्मचाऱ्याचें रोजचें कार्य अग्नीला समिधा देणें हेंहि एक आहे. भिक्षाचर्य हें त्याच्या निर्वाहाचें साधन. पण ती भिक्षा प्रथम गुरूला अर्पण करून मग त्याच्या आज्ञेनें भक्षण करावयाची असते. ह्या सर्व गोष्टी शिस्तीसाठीं सांगितल्या आहेत. काळ हा मनुष्याला घेऊन जाण्याला नेहमीं टपलेला असतो. पण समिधा देणें, गुरुशुश्रूषा, सावित्रीजप, भिक्षाचर्या या गोष्टी ब्रह्मचारी करीत असतो म्हणून काळ त्याला नेऊं शकत नाहीं असें शतपथ ब्राह्मणांत एका ठिकाणीं म्हटलें आहे. गुरुशुश्रूषेसारखीं कामें गुरूच्या घरीं राजपुत्रांनाहि करावीं लागत. श्रीकृष्णाचें उदाहरण या विषयीं सुप्रसिद्धच आहे. आज शिक्षकांच्या पुढें प्राचीन काळचीं उदाहरणें ठेवून त्यांना मोठा पगार काय करावयाचा असा कोणी प्रश्न करतात, पण प्राचीन काळाचा नियम शिष्यांनाहि लावल्यास आजचे गुरू देखील फार पगार मागणार नाहींत, असें त्याचें सरळ उत्तर आहे. असो. योग्यकाळीं उपनयन

न झाल्यामुळें वेद व व्रतें या बद्दलच्या नियमांचें उल्लंघन झाल्यास मनुष्य व्रात्य होतो व त्याला शुद्ध करून घेण्यासाठीं व्रात्यस्तोम नांवाचा प्रायश्चित्त-विधि व उद्दालकव्रत सांगितलें आहे. पण उपनयनाविषयींच्या आजच्या कल्पना फारच चमत्कारिक झाल्या आहेत. ब्रह्मचारी असतांना मुलगा मेला तर तो पिशाच्च होतो, अशी खुळी कल्पना उत्पन्न झाल्यामुळें मुंज केल्यावर चार दिवसांतच सोडमुंज करण्याची वहिवाट कांहीं ठिकाणीं पडली आहे. कांहीं देशांत मात्र पुष्कळ ठिकाणीं लग्नाच्या वेळींच सोडमुंज होते. एकंदरींत ब्रह्मचाऱ्याला सांगितलेले नियम शिस्तीच्या दृष्टीनें चांगले आहेत. गायत्री जप हा वेदाध्ययनाचें प्रतीक असून 'नोद्यीक्षेतोद्यन्तमादित्यं' म्हणजे उगवणाऱ्या सूर्याकडे पहात बसूं नये, इत्यादि नियम त्यानें आळशी होऊं नये, प्रातःकाळीं लवकर उठून कामाला लागावें, भलत्याच वेळीं भलत्याच गोष्टी करीत राहूं नये अशा हेतूनेंच घालून दिलेले होते.

---

# विवाह

## थोडा इतिहास

प्राचीन काळीं विवाह संस्थाच नव्हती असें कित्येकांकडून दर्शविण्यांत येतें. महाभारतांत या संबंधीं कथा असून तींत 'पूर्वी स्त्रिया अगदीं मोकळ्या असत. त्यामुळें होणारे अनर्थ पाहून श्वेतकेतूनें विवाहाची प्रथा घालून दिली' असं म्हटलें आहे.

> अनावृताः किल पुरा स्त्रिय आसन्वरानने ।
> कामचारविहारिण्यः स्वतंत्राश्चारुहासिनि ॥
> तदाप्रभृति मर्यादा स्थितेयमिति नः श्रुतम् ॥ आदि प. १२२.

वेस्टरमार्क नांवाच्या समाजशास्त्रज्ञानेंहि असेंच मत दिलें आहे. पण ही गोष्ट काल्पनिक दिसते. विवाहसंस्था अत्यंत प्राचीन अशा ऋग्वेदकाळापासून अस्तित्वांत असून तिचें स्वरूप तेव्हांपासूनही मोठें उदात्त असें आहे. एका स्त्रीला पांच पती अशा गोष्टी ग्रंथांत आहेत, व हिंदुस्थानच्या कित्येक भागांत अजूनहि तशा चाली आहेत असें म्हणतात. केरल देशांत लग्नसंस्था नसून स्त्रीपुरुषांचा करार मात्र होतो व तो झाल्यापासून स्त्रीच्या घरीं दाराशीं पाण्याचा घडा ठेवितात. करार मोडला तर तो घट फोडतात. या कराराला संबंध असें तिकडे म्हणतात. पण सामान्यतः सर्व भारतीय समाजांत विवाह संस्था अगदीं प्राचीन काळापासून आढळून येते.

## विवाहाचा उद्देश

'धर्मप्रजासंपत्तिः प्रयोजनं दारसंग्रहस्य' असें मिताक्षराकारानें याज्ञवल्क्य स्मृतीच्या ( १,७८ ) टीकेंत म्हटलें आहे. धर्मसंपात्ति व प्रजासंपात्ति प्राप्त करून

घेणें हें विवाहाचें ध्येय आहे. आपस्तंबानेंही 'धर्मप्रजासंपन्ने दारे नान्यां कुर्वीत' असा नियम घालून हेंच ध्वनित केलें आहे. धर्मानें काय सांगितलें आहे तें लक्षांत ठेविलें पाहिजे. तसें न केल्यास त्याचा दोष धर्माकडे नाहीं. आंधळ्याला खांब दिसत नाहीं हा कांहीं खांबाचा अपराध नव्हे–'नैष स्थाणोरपराधो यदेनमन्धो न पश्यति।'-. विवाहाचे जे कित्येक प्रतिशब्द आहेत, त्यांवरून त्याचें स्वरूप कळून येण्यासारखें आहे. पाणिग्रहण, उपयमन, परिणयन, विवाह आणि उद्वाह असे ते शब्द होत. पाणिग्रहण म्हणजे हातांत हात घालणें. 'गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं' इत्यादि ऋग्मंत्रांत याचें स्वरूप दाखविलें आहे. उपयमन म्हणजे जवळ जाणें किंवा स्वीकार. परिणयन म्हणजे वाटोळे नेणें, अर्थात् अग्नीभोंवती फिरविणें. विवाह किंवा उद्वाह म्हणजे पित्याच्या घरून आपल्या घरीं नेणें. या शब्दावरून लग्नाच्या विधीचें स्वरूप कळून येतें. तांड्य ब्राह्मणांत द्यावा पृथिवी म्हणजे आकाश व पृथ्वी या जोडप्याच्या विवाहाची कथा आली आहे (७,१०,१). 'हे दोन्ही लोक प्रथम एकत्र होते. पुढें ते दूर जाऊं लागले, तेव्हां एकमेकांना म्हणाले आपण विवाह करूं व एकत्र राहूं' (इमौ वै लोकौ सहास्तां तौ वियन्तावब्रूतां विवाहं विवहावहै सह नावस्त्विति।) यांतहि विवाहाचें प्रयोजन दिसून येतें.

## विवाहाला अवश्य गोष्टी

प्रथम मुलीचें वय घेऊं. थोड्या वर्षांपूर्वी काशीक्षेत्रीं सनातन ब्राह्मणपरिषद् भरुन तींत कन्येच्या विवाहाचें वय आठपासून बारा वर्षांपर्यंत निश्चित करून त्याच्या पुढें वय गेल्यास कन्या वृषली होते असा निर्णय करण्यांत आला. पण प्राचीन धर्मशास्त्र ग्रंथ पहातां मुलीच्या लग्नाचें वय चार पासून वीस पर्यंत सुद्धा कोणतेंहि चालेल असें आढळून येतें. अमुकच वर्षी मुलीचें लग्न करावें असें निश्चयात्मक कोठेंहि सांगितलेलें नाहीं. मुलगी अंगावर वस्त्र घेऊं लागण्यापूर्वी (प्राग्वाससः प्रतिपत्तेरित्येके) लग्न करावें असें कांहींचें मत देऊन गौतमानें 'ऋतुप्राप्तीपूर्वी विवाह करावा' (प्रदानं प्रागृतोः) असा स्वतःचा अभिप्राय सांगितला आहे. बहुतेक स्मृतिकारांना हा सिद्धान्त मान्य आहे. या प्रकरणीं नग्निका हा जो शब्द मूळ विवाहयोग्यकन्येसम्बन्धानें योजिलेला आहे त्याचे अनेकांनीं अनेक अर्थ केले आहेत. गृह्यसंग्रहांत 'कुचहीना तु नग्निका' असें म्हटलें असून मातृदत्तानें 'नग्निकामासन्नार्तवाम्' असें सांगून 'तस्माद्वस्त्रविक्षेपणार्हा नग्निका मैथुनार्हा' असें स्पष्टीकरणहि केलें आहे. मानवगृह्यसूत्रांतील नग्निका शब्दावर टीका करतांना अष्टावक्र म्हणतो–नग्नैव नग्निका, अप्राप्तस्त्रीभावाम्। अयौवनरसां श्रेष्ठां लावण्यवतीम्'. असा मतभेद असल्यामुळें 'तुल्यबलविरोधे विकल्पः' हा पूर्वी सांगितलेला न्याय या बाबतींत लावणेंच इष्ट होईल. आपल्या मुलीला अगदीं मनाजोगें स्थळ मिळाल्यास चवथ्या वर्षीहि लग्न करावें. पण तसें न मिळेल तर 'काम-

मामरणात्तिष्ठेत्कन्या ऋतुमती सती । न चैवैनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित् '। या मनुवचनाप्रमाणेंहि ( ९,८९ ) वागण्यास हरकत नाहीं. गुणवानालाच कन्या द्यावी हा उत्तम पक्ष असें कालिदासानेंहि म्हटलें आहे ( गुणवते कन्यका प्रदेया इति तावत्प्रथमः कल्पः । शाकुन्तल ).

सामान्यतः पहातां पंधराव्या किंवा सोळाव्या वर्षी मुलींचीं लग्नें पूर्वी होत असत असें दिसतें. या विषयीं मोठें प्रमाण म्हणजे बहुतेक प्रत्येक गृह्यसूत्रांत सांगितलेलें चतुर्थीकर्म होय. विवाहविधीनंतर किती दिवस ब्रह्मचर्य पाळावें हें सांगताना वर्षाचा अवधि दिला आहे व शेवटीं तीन दिवस तरी पाळावें असें पारस्कर गृह्यसूत्रांत म्हटलें आहे. आश्वलायन गृह्यसूत्र, शांखायन, गोभिल यांतहि तसेंच सांगितलें आहे. 'त्रिरात्रमुभयोरधःशय्या ब्रह्मचर्यं क्षारलवणवर्जनं च ' असें आपस्तंब गृह्यसूत्रांतहि आहे. कन्या ऋतुमती झाल्यावरही लग्न होई. बोधायनधर्मसूत्रांत ( १,१० ) ' यदि कन्योपसाद्यमाना वाह्यमाना वा रजस्वला स्यात्तामनुमंत्रयते ' असें जें म्हटलें आहे त्यावरून ही गोष्ट उघड होते. आश्वलायनगृह्यसूत्रातील ' यत्तुसमानं तद्वक्ष्यामः ' ' जे सर्वत्र लागू आहेत तेच धर्म सांगतों, ' या वचनावरील टीकेत १२ व्या शतकांत होऊन गेलेला हरदत्त ह्मणतो, कांहीं देशात विवाहानंतर लगेच समावेशन ह्मणजे संभोग होतो असें आढळतें, पण ही गोष्ट " तीन रात्रीं किंवा बारा रात्रीं ब्रह्मचर्य पाळावें " असें जें या सूत्रांत पुढें सांगण्यांत येणार आहे त्याशीं विरुद्ध आहे '. या सर्व गोष्टींवरून मुलींच्या लग्नाच्या वयाची कल्पना येईल. ' ऋतुप्राप्तीनंतर तीन वर्षें कन्येनें वाट पहावी व तेव्हांहि पित्यानें लग्न न केल्यास तिनें स्वतः आपला पति निवडावा, त्यांत पाप नाहीं ' असें मनूनें ह्मटलें आहे ( ९,९२ ) त्यावरून काय बोध होतो ?

पण ही वयोमर्यादा संकुचित होत आठ वर्षांवर आली, आणि भलत्याच कल्पना समाजांत प्रसृत होऊं लागून स्नेहलतेसारख्या बालिकावर स्वतःस जाळून घेण्याचे प्रसंग आले ! ' अष्टवर्षा भवेद् गौरी नववर्षा तु रोहिणी । दशवर्षा भवेत्कन्या तत ऊर्ध्वं रजस्वला ' अशा व्याख्या प्रचारात येऊन अविवाहित रजस्वला कन्येला रजोदर्शन घडल्यास माता पिता व वडील बंधु यांना नरकप्राप्ति होते असें प्रतिपादन होऊं लागलें [ पराशर स्मृति ] आणि आठवें वर्ष हें मुलीचे वय विवाहास उत्तम असें ठरविण्यात आलें ! वैखानसस्मार्तप्रश्नांत दहा ते बारा वर्षांच्या मुलीला गौरी म्हटलें आहे तर पराशर, यम व संवर्त यांनी आठ वर्षांच्या मुलीला गौरी म्हटलें आहे. स्मृतींत विरोध असल्यामुळें वयाचे बाबतीत विकल्प आहे व दोषासंबन्धानें जीं वाक्यें आहेत तीं निन्दात्मक असल्यामुळें अर्थवाद आहेत असेंच मानिलें पाहिजे. ' विवाहो ह्यष्टवर्षायाः कन्यायास्तु प्रशस्यते ' असा जो दंडक घालण्यांत आला याचीं कारणें काय असा प्रश्न आहे. हूण, मुसलमान, बौद्ध

इत्यादि विधर्मीय लोकांच्या जाचामुळें व स्त्रियांना भिक्षुणी बनविण्याच्या पद्धतीमुळें मुलींचीं लग्नें एकदांची लवकर उरकून त्यांना कोणाच्या तरी हातीं लावून द्यावें अशी आवश्यकता उत्पन्न झाल्यामुळें हा प्रकार झाला असावा असें मला वाटतें. प्राचीन स्मृतींत कन्या ऋतुमती झाल्यावर तिनें विवाह केला तर तिच्या पतीला दोष नाहीं असें म्हटलें आहे [ मनु ९ ९२ ). पण पुढील स्मृतींत पतीला दोष आहे असें म्हटलें आहे. पुरुषांना विवाहवयाची मर्यादा स्पष्ट सांगितलेली नाहीं. पण आठव्या वर्षी उपनयन व पुढें बारा वर्षें ब्रह्मचर्य व वेदाध्ययन हीं जमेस धरलीं म्हणजे पुरुषाचें विवाहाचें वय विसापासून पुढें होतें असें सहजच ठरतें. मनूनेंही तीस वर्षांच्या पुरुषानें बारा-वर्षांच्या मुलीशीं व चोवीस वर्षांच्या पुरुषानें आठ वर्षांच्या मुलीशीं लग्न करावें असें म्हटलें आहे.

मागील व्याख्यानांत संस्कार म्हणजे काय, त्यांचा उद्देश कोणता, संस्कार किती होते, त्यांची संख्या कमी होत सध्या ग्रंथांत सोळा संस्कार उरले आहेत, ते कोणते हें सांगून त्या संस्कारांची थोडक्यांत माहिती दिली व त्यांतील उपनयन आणि विवाह यांचें विशेष विवेचन केलें पाहिजे असें सांगून उपनयनाचें वर्णन केलें आणि विवाह संस्थेचा इतिहास, व विवाहाचा उद्देश व मुलीच्या लग्नाच्या मर्यादा ‘ प्राग्वाससः प्रतिपत्तेः ’ म्हणजे वस्त्राची आवश्यकता वाटण्यापूर्वीपासून तों ऋतुप्राप्ती-पर्यंतच काय पण मरणापर्यंतहि कशा सांगितल्या आहेत याविषयीं ऊहापोह केला. आतां आजच्या व्याख्यानांत विवाहाविषयींच्या इतर गोष्टींचा विचार करावयाचा आहे.

## शारदा कायद्याचा थोडा विचार

हिंदुधर्मशास्त्राच्या इतिहासांत वर्णव्यवस्था हा जसा एक मूलभूत प्रश्न आहे, तसाच विवाह देखील आहे. म्हणून त्याचा विचार अधिक केला पाहिजे. विवाहाचें विवेचन करतांना अनेक विषय पुढें येतात. त्यांतील विवाहाच्या कालमर्यादेसंबंधानें चार वर्षांपूर्वी अमलांत आलेला जो शारदा कायदा ( Child Marriage Restraint Act 19 of 1929 ) त्याचा प्रथम थोडा उल्लेख करणें अवश्य आहे. उत्तर हिंदुस्थानांत हरविलास सारडा म्हणून एक प्रसिद्ध गृहस्थ आहेत, त्यांनीं हा कायदा असेंब्लीपुढें माडून पास करून घेतला म्हणून तो त्यांच्या नांवावर प्रसिद्ध झाला आहे. अशाप्रकारचा कायदा, आज ज्या तऱ्हेनें असेंब्लीची रचना झाली आहे तिचा विचार करतां, तिच्यामध्यें होऊं नये असें माझें मत आहे. पण आहे ही स्थिति जमेस धरतां तो कायदा आहे तोंपर्यंत तो मानणें भाग आहे. कोट्यावधि लोकांच्या मताची पर्वा न करतां केवळ ६० लक्ष मतदारांनीं निवडून दिलेल्या प्रतिनिधींच्या आजच्यासारख्या मिश्र असेंब्लींत असा कायदा पसार होऊन तो

सर्वांना बंधनकारक होणें अनिष्ट आहे. पण आतां तो होऊन गेलेला आहे व तो रद्द करणें असेल तर असेंब्लीच्या द्वाराच तो होणें शक्य आहे.

मुलींच्या लग्नाची वयोमर्यादा ४ वर्षांपासून सांगितली, पण पुरुषांची तशी स्पष्ट सांगितलेली नाहीं. तथापि आठव्या वर्षी ब्राह्मणाचें उपनयन व पुढें बारा वर्षे ब्रह्मचर्य असें चालल्यास विसाच्या आंत त्याचें लग्न सामान्यतः व्हावयाचें नाहीं असें होतें. पण पुढें आश्रमव्यवस्था संपुष्टांत येऊन मुलींच्या वयानुसार मुलांच्या वयाचीहि मर्यादा खालीं आली व बाहुली बाहुल्यासारखीं मुलामुलींचीं लग्नें होऊं लागलीं. आठ आठ नऊ नऊ वर्षांच्या मुलांची लग्नें झालेलीं मला प्रत्यक्ष माहिती आहेत. पण गेल्या चाळीस वर्षांत या स्थितींत अंतर पडत जाऊन मुलांच्या वयाची मर्यादा आतां बरीच वाढली आहे व त्याबरोबर मुलींच्याहि वयाची मर्यादा वाढत गेली. तथापि अद्यापि पुढारलेल्या जातींखेरीज करून अत्यल्प वयांत मुलामुलींची लग्नं करण्याची चाल मोठ्या प्रमाणावर चालू आहे व त्यामुळें शारदा कायद्याची आवश्यकता कित्येकाना साहजिकच वाटली. या बाबतींत कित्येक आकडे मोठे उद्बोधक आहेत यात शंका नाहीं. उदाहरणार्थ, सन १९२१ च्या खानेसुमारीचा विचार करता, त्यावेळीं एक वर्ष वयाच्या आंतील ६१२ मुली विवाहबद्ध होऊन विधवा झालेल्या होत्या. पाच वर्षांच्या आंतील विधवा मुली २०२४ होत्या, दहा वर्षांच्या आंतील ९७१५७ होत्या आणि पंधरा वर्षांपर्यंतच्या विधवा मुलींची संख्या ३, ३२,०२४ होती. आणि ही स्थिति पुष्कळशा विधवांना पुनर्विवाह करता येत नाहीं अशा परिस्थितींत आहे हें पाहिलें म्हणजे ती किती दुःखद आहे हें लक्षांत येईल. परदुःख शीतल आहे असें म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. मुलींच्या बाजूनें पहाता पहिली पत्नी मृत झाल्यापासून चवदाव्या दिवशींच दुसरें लग्न पुरुषानीं केल्याचीं उदाहरणें मला माहीत आहेत. या लग्नाचा वाङ्निश्चय सुतकातच झालेला होता. तेव्हां एकंदरींत हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे यात संशय नाहीं.

अल्पवयी मुलामुलींची लग्नें बंद करण्याची आवश्यकता या कारणास्तव जशी शारदा कायद्याच्या पुरस्कर्त्यांना वाटली, तशी अल्पवयांत लग्नें केल्यानें त्यांचा जो शारीरिक मानसिक ऱ्हास होतो तोहि कमी करण्यासाठीं ती भासली. ही कारणकार्यपरंपरा येथपर्यंत ठीक आहे. पण शारदा कायद्यांत मुलाचें वय कमीत कमी १८ व मुलीचें १४ असें जें ठरविण्यांत आलें आहे त्यांत मात्र बरेंच वैषम्य दिसतें. पूर्वी ही मर्यादा निश्चित करणारा कायदा मुळींच नसतां एकदम १८ व १४ अशीं वर्षे किमान म्हणून ठरविण्यात आलीं हें योग्य झालें नाहीं. प्रथम ही मर्यादा जरा खालची ठेऊन मग क्रमाक्रमानें ती वाढवीत गेल्यास तें येथील परिस्थितीला अधिक जुळतें झालें असतें.

इंग्लंडांत विवाहाची वयोमर्यादा व्यवहारांत पुष्कळ वाढलेली आहे खरी, पण येथें त्याविषयीं जो कायदा आज अस्तित्वांत आहे तो सन १८२३ या वर्षी झालेला

असून त्यांत मुलींना १२ वर्षे व मुलांना १४ वर्षे अशीच किमान वयोमर्यादा घातलेली आहे. या वयाच्या पुढें लग्नें झालीं तर तीं आजहि तेथें कायदेशीर मानलीं जातील. त्या काळानंतर इंग्लंडांत याविषयी कायदा झालेला नाहीं. पण आमचा कायदा त्याच्याहि पुढें गेला. आहे या परिस्थितींत त्यानें पिशाच्याच्या हातात कोलीत दिल्यासारखें झालें आहे. हरविलास सारडा यांनी प्रथम या कायद्याची जी भूमिका ( बिल ) ठरविली होती, तींत तर ठराविक वयाच्या आंत होणारीं लग्नें बेकायदेशीर ठरविलीं होतीं. त्याप्रमाणें कायदा झाला असता तर समाजांत केवढा घोटाळा झाला असता पहा. अल्पवयी मुलीचें लग्न झालें, पण तें बेकायदेशीर ठरलें. म्हणजे ती मुलगी समाजाच्या दृष्टीनें विवाहित व कायद्याच्या दृष्टीनें अविवाहित असें झालें असतें. ही आपत्ति लक्षांत घेऊन अनेक सभानीं व वकिलांच्या संस्थानीं या कायद्याच्या मसुद्यावर मत देतांना या प्रश्नाला जोराची हरकत घेऊन तो नियम काढून टाकण्याचा सल्ला दिला. आतां पसार झालेल्या कायद्याप्रमाणें लग्न बेकायदेशीर ठरत नाहीं, पण तें लावणारा भटजी व मुलांमुलींचे आईबाप याना एका महिन्याची साधी कैद किंवा १००० रुपयेपर्यंत दंड किंवा दोन्हीं अशा शिक्षा देतां येतात. अशा लग्नांचे खटले सामान्य मॅजिस्ट्रेटला चालवितां येत नसून डिस्ट्रिक्ट किंवा प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट यान्या पुढेंच चालविले पाहिजेत व त्या बाबतची तक्रार लग्न झाल्यापासून एका वर्षाच्या आंतच आणलेली असली पाहिजे अशा अटी घातलेल्या आहेत; म्हणून काहीं तरी ठीक, नाहीं तर केव्हांचें तरी खरकटें केव्हातरी काढण्याची बुद्धि कित्येकांना होऊन समाजात अस्वस्थता फारच उत्पन्न झाली असती. तरी एकंदरींत हा कायदा करतांना फार घाईचें धोरण स्विकारण्यांत आलें व मुलीचें लग्नाचें किमान वय १४ ठरविण्यात फार उंच उडी मारण्यांत आली आहे. काहीं जातांत त्यांच्या धार्मिक समजुतीप्रमाणें बारा वर्षांनी एकदाच विवाहाचे मुहूर्त असून त्या वर्षांतच फक्त लग्नें होऊं शकतात. अशा लोकांवर हा कायदा म्हणजे मोठी आपत्ति आहे. म्हणूनच कायदा असला तरी हजारों विवाह त्याच्या विरुद्ध आज चार वर्षांत झाले आहेत. कायदा झाला तरी तो असा असावा कीं तो बहुजन समाजाला मोडण्याची बुद्धि सहजासहजी होऊं नये. या विषयीं ' केवलं शास्त्रमाश्रित्य न कर्तव्यो विनिर्णयः ' इत्यादि बृहस्पतीचें वचन लक्षांत ठेवणें अवश्य आहे. त्यातल्या त्यांत या कायद्यासंबंधानें एक गोष्ट बरी आहे कीं तो हिंदु व मुसलमान या दोन्ही समाजांना सारखाच लागू आहे. तसें नसतें तर मात्र आणखी आपत्ति ओढवली असती. असो. मुलींच्या विवाहकालाची मर्यादा प्राचीन कालीं सामान्यतः ऋतुप्राप्तीपूर्वीची ठरली असली तरी पूर्वींच्या लोकांना १४ च्या वरील वयांत विवाह करणाराला हरकत नाहीं ही कल्पना होती हें पूर्वी दाखविलें आहेच.

# विवाहांगभूत कर्मे

विवाह हा कांही एकाच विधीनें पुरा होत नाहीं. त्यांत पुष्कळ विधी येतात. तेव्हां त्या संबंधानें शास्त्र काय सांगतें व त्यांतील अवश्य भाग कोणते व गौण कोणतें यांचा विचार केला पाहिजे. उपनयन, पाणिग्रहण, परिणयन, विवाह, उद्वाह इत्यादि लग्नवाचक विविध शब्द असले, तरी त्याचा अर्थ एकच आहे, पण त्यांत कर्म एकच नसून अनेक कृत्यें करावयाचीं असतात. या विविध कर्मासंबंधानें आपस्तंबासारखे सूत्रकार असें सांगतात कीं स्त्रिया आणि इतर सर्ववर्णांची माणसें जे जे विधि सांगतील ते सर्व करण्यास हरकत नाहीं. या अनुमतीला अनुसरूनच सुपारी लपविणें, विडया तोडणें इत्यादि प्रकार लग्नविधींत आले आहेत, शास्त्रांनीं कांहीं त्यांचा विधि सांगितला नाहीं. शास्त्रानें विवाहांगभूत असें चार पांच विधिच अवश्य म्हणून सांगितले आहेत. १ ला वाङ्निश्चय, याच्या पूर्वी सीमान्तपूजन अथवा लौकिक भाषेंत शेवती नांवाचा विधि करीत असतात. पण तो अवश्य असा नाहीं. कारण कोणीहि मनुष्य असला तरी त्याची गांवाच्या सीमेवर पूजा करतां येते. पण वाङ्निश्चय हें विवाहाचें अंग आहे. सामान्यतः हा विवाहाच्या जरा आधीं करण्याची वहिवाट आहे. पण कांहीं जातींत हा आठ दहा वर्षेहि अगोदर करतात. पण सर्व प्रकारच्या विवाहाचें तो अंग नसल्यामुळें तोहि तितका अवश्य नाहीं. मधुपर्काचा तोच प्रकार आहे. विधि अवश्य कोणते व अनवश्यक कोणते हें ठरविण्याचा एक नियम शास्त्रकारांनीं सांगितला आहे. तो असा कीं जे दृष्टफल आहेत, म्हणजे ज्यांचा परिणाम प्रत्यक्ष दिसून येतो ते अवश्य नाहींत, पण जे अदृष्टफल म्हणून आहेत, म्हणजे ज्यांचें फल येथें केव्हांहि दिसण्यासारखे नाहीं ते विधिमात्र अवश्य केले पाहिजेत. या नियमाप्रमाणें सीमान्तपूजन, वाङ्निश्चय, मधुपर्क हे दृष्टफल असल्यामुळें अवश्य पैकीं नव्हत. ते न केल्यास लग्नविधींत कांहीं उणें राहिलें असें होणार नाहीं. म्हणजे ते गाळून लग्नविधि झाल्यास स्त्रीला भार्यात्व येण्यांत कांहीं अडचण येणार नाहीं. याचें दुसरें उदाहरण, याज्ञवल्क्यानें कोणती मुलगी पसंत करावी हें सांगतांना 'अरोगिणीं भ्रातृमतीमसमानार्षगोत्रजाम्। पञ्चमात्सप्तमादूर्ध्वं मातृतः पितृतस्तथा।' ( १,५३ ) असें म्हटलें आहे. त्यात कन्या अरोगिणी, व भाऊ असलेली असावी असें जें म्हटलें आहे तें दृष्टफल असल्यामुळें अवश्यांत येत नाहीं. म्हणजे रोगी स्त्री भार्या केल्यास आपल्यालाच त्रास होईल म्हणून ती करूं नये. पण रोगी मुलीबरोबर दहावीस हजार रुपये येणार असल्यामुळें कोणी तिला स्वीकारील तर त्यामुळें ती भार्या होण्यांत अडचण येत नाहीं. तसेंच भ्रातृमती मुलगी नसेल तर तिच्या बापाची संपत्ति मिळेल म्हणून बरेंच झालें असें म्हणून कोणी ती करील तर त्यालाहि अडचण नाहीं. पण सगोत्र व सप्रवर कन्या पसंत केल्यास होणारा विवाहच नाहीं, कारण या गोष्टींचें फल अदृष्ट आहे, म्हणजे सगोत्र किंवा सप्रवर विवाह झाल्यास दृष्ट असें कांहीं फळ होतें असें नाहीं.

मधुपर्कानंतर कन्यादानाचा विधि येतो. पण हाहि अवश्य नाहीं. कारण ब्राह्मविवाहासारख्या प्रकारात मात्र तो येतो. पण गांधर्व, राक्षस व पैशाच्च या विवाह-प्रकारांत तो येऊं शकत नाहीं. या कन्यादान प्रकरणांतहि दोन पक्ष आढळून येतात. स्त्रीपुत्रावर आपली मालकी आहे कीं काय असा प्रश्न असून त्यांचीं दोन पक्ष दोन उत्तरें देतात. पुत्रादिकांचा विक्रय किंवा दान करण्याचा अधिकार माता-पित्यांना आहे असें दत्तक प्रकरणांत वसिष्ठधर्मसूत्र म्हणते ' तस्य प्रदानविक्रयपरित्यागेषु मातापितरौ प्रभवतः ' [ १५.२ ] व शुनःशेपाच्या पूर्वी सांगितलेल्या कथेंत तें स्पष्ट दाखविलेंहि आहे. पुत्रादिकांच्या जगण्यामरण्यावरहि [Life and Death] बापाचा ताबा त्या कथेंत मान्य केलेला आहे. रोमन कायद्यांतहि पूर्वी असाच प्रकार होता. जस्टिनियननें पुर्वीचें कायदे जमवून नवीन स्मृति (Institutes) बनविली, तेव्हांपर्यंत स्त्रीपुरुषांवरील बापाची सर्व प्रकारची सत्ता–मरणाचीसुद्धा–मान्य केलेली होती. पण याच्या उलट न देण्यासारख्या वस्तु कोणत्या हें सांगतांना याज्ञवल्क्यानें ' दारसुतादृते ' म्हणजे स्त्री व मुलें वगळून इतर वस्तु देय होत असेंच सांगितलें आहे यावर मिताक्षराकार म्हणतो कीं, स्त्रीपुत्रांवर पुरुषाची मालकी ( स्वत्व ) आहे, पण या याज्ञवल्क्यवचनामुळें त्यांचें दान करूं नये. दान व क्रय ही अपत्याचे ठिकाणीं नाहींत असें आपस्तम्ब म्हणतो. कौटिलीय अर्थशास्त्रांतहि चाणक्यानें असाच निर्णय दिला आहे. तो म्हणतो कीं म्लेंच्छ लोकांत मुलें विकण्याची चाल आहे म्हणून त्यांनीं तसें केल्यास तें दंडार्ह नाहीं.

स्वकुटुंबाविरोधेन देयं दारसुतादृते । नान्वये सति सर्वस्वं यच्चान्यस्मै प्रतिश्रुतम् ॥
या. स्मृ. [ २,१७५ ]

दानं क्रयधर्मश्चापत्यस्य न विद्यते । आपस्तंब २.६.१३.९

आर्यांमध्यें ती चाल नसल्यामुळें त्यांनीं पुत्राचा क्रय केल्यास राजानें त्याना दंड करावा. कात्यायनानें आणि नीलकंठानेंहि याचाच अनुवाद केला आहे. कन्यादान या शब्दांतील दानाचा अर्थ कन्येवरील रक्षणादिकांच्या पित्याच्या अधिकाराचें संक्रमण एवढाच खरोखर आहे. 'अष्टवर्षा भवेत् कन्या पुत्रवत् पालिता मया ' इत्यादि मंत्रातहि हाच मतलब आहे. आसुर विवाहांत कन्येच्या पित्याला द्रव्य देऊन कन्या घ्यावयाची असते. तेव्हा हा क्रय झाला, पण तो इतर वस्तूंच्या क्रयासारखा नव्हे; तो केवळ धर्मासाठीं होय असें मीमांसाकारांनीं ठरविलें ( क्रयस्य धर्ममात्रत्वात् । जै. ६,१,१५ ). एरवीं पैसे देऊन विकत घेतलेली स्त्री ही पत्नीच होत नाहीं, तर ती केवळ दासी होय असें बोधायनधर्मसूत्रांत कश्यपाचें वचन दिलें आहे. ' क्रीता द्रव्येण या नारी सा न पत्नी विधीयते । सा न दैवे न सा पित्र्ये दासीं तां कश्यपोऽब्रवीत् ॥ १,११,२० ). तात्पर्य विवाहप्रकरणांत क्रयशब्द लाक्षणिक आहे असें ठरविलें असल्यामुळें स्त्रियांना आपल्याला देण्याघेण्याच्या वस्तूपैकीं वस्तू मानीत होते असें

समजून विचकण्याचें कारण नाहीं. गांधर्वविवाहांत केवळ वधूवरांचा परस्पर करारच असल्यामुळें ( गांधर्वः समयान्मिथः ) त्यांत कन्यादानाचा प्रश्नच उत्पन्न होत नाहीं.

कन्यादानानंतर होम, पाणिग्रहण, अग्निपरिणयन आणि सप्तपदी असे विधी येतात. पाणिग्रहण म्हणजे वधूचा कर वरानें प्रत्यक्ष हातांत घेणें. यांत पुष्कळ प्रकार सांगितले आहेत. उदाहरणार्थ,पुत्र पाहिजे असेल तर अंगठा धरावा, कन्या पाहिजे असेल तर अंगुली धरावी आणि दोन्ही प्रकार पाहिजे असतील तर सारी मूठ धरावी. 'गृभ्णामिते० इति अंगुष्ठमेव गृह्णीयात् । अंगुलीरेव स्त्रीकामः ।' आश्व. गृ. सू. १,७,३.' या विधींचा हाच क्रम सर्वांनीं सांगितलेला नाहीं, त्यांत भिन्नता आढळते. या विधीनंतर शेवटीं गृहप्रवेशनीय व चतुर्थीकर्म अथवा सांप्रतचें गर्भाधान हीं झालीं म्हणजे विवाहसंस्कार पूर्ण झाला. या विधींपैकीं कन्यादान, होम, अग्निपरिणयन ( अग्नीभोंवतीं वधूला घेऊन प्रदक्षिणा करणें ) आणि सप्तपदी हे आवश्यक होत.

## विवाहाची उदात्त कल्पना

विवाह विधीची कल्पना आपल्याकडे अत्यंत उदात्त आहे व ती विवाह संस्कार म्हणावयाच्या मंत्रांत चांगली दिसून येते. पण वधू व वर यांनी परस्परास उद्देशून मंत्ररूपानें म्हणावयाच्या साऱ्या गोष्टी सांप्रत उपाध्यायच म्हणतो, वधूवरांना प्रत्यक्ष त्यांचा गंधहि नसतो ! ' धर्मे चार्थे च कामे च इयं नातिचरितव्या ' असा वराला उपदेश केल्यावर ' नातिचरामि ' असें त्यानें म्हणावयाचें असतें. या साऱ्या गोष्टी उपाध्यायच सांप्रत म्हणत असला तरी त्यांवरून विवाहाचें उदात्त स्वरूप दिसून येतें. मनुष्याचे जे चार पुरुषार्थ म्हणजे मानवी जीवनांचीं ध्येयें ( Goals of human life ) आर्यांच्या तत्वज्ञानांत मानिलीं आहेत, त्यांतील शेवटचा जो मोक्ष त्यांत पतीला पत्नीची किंवा पत्नीला पतीची आवश्यकता नाहीं, तो प्रत्येकाला स्वतंत्रपणें मिळवितां येतो. पण धर्म, अर्थ आणि काम या तिघांच्या म्हणजे त्रिवर्गाच्या प्राप्तीला एकमेकांची आवश्यकता आहे. याच हेतूनें ' भार्या मूलं त्रिवर्गस्य भार्या मूलं तरिष्यतः ' असें महाभारतांत [ आदिपर्व ७४-४१ ] म्हटलें आहे. धर्माचरण नीटपणें व्हावयास स्त्री अवश्य पाहिजे. समाजांत रहाणाऱ्या पुरुषाला जें नियंत्रण हवें असतें तें स्त्रीपुत्रांमुळें मिळूं शकतें. एकटा फटिंग रहाणारा मनुष्य कोणाची पर्वा करणार ? पण स्त्री आल्याबरोबर त्याच्या वर्तनाला आळा पडतो.वधूला घेऊन अग्नीभोंवती प्रदक्षिणा करितांना'अमोहमस्मि सा त्वं सा त्वमस्यमोहं द्यौरहं पृथिवी त्वं ...तावेव विवहावहै प्रजां प्रजनयावहै सं प्रियौ रोचिष्णू सुमनस्यमानौ जीवेम शरदः शतम् ' ( आश्व. गृ. सूत्र १, ७, ३-२२ ) असें वर म्हणतो. ' आपण विवाहबद्ध होऊन प्रजा उत्पन्न करूं या, एकमेकांचें

प्रिय करून एकमेकांना आवडतीं होऊं या, एकमेकांविषयीं शुद्ध मन ठेवून शंभर वर्षें राहूं या.' अशी थोर कल्पना त्यांत दृष्टीस पडते. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळ'तील ८५ व्या सूक्तांतील बऱ्याच ऋचा विवाह मंत्रांत आलेल्या असून त्यांतील 'गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं' इत्यादि पाणिग्रहणाच्या मंत्राचा पूर्वी एकदां उल्लेख केला आहेच. या मंत्रांत विवाहाचें हेंच ध्येय उत्तम रीतीनें दर्शविलें आहे. विवाह गार्हपत्याय ह्मणजे गृहस्थधर्मासाठीं होय, चैनीसाठीं नव्हे. वधूला अशीर्वाद देणारा जो मंत्र या सूक्तांत आहे, तोहि सांप्रत सर्वांनीं व विशेषतः सासू होऊन सुनेवर अधिकार गाजवूं इच्छिणाऱ्या स्त्रियांनीं नित्य लक्षांत ठेवण्यासारखा आहे. तो मंत्र असा:—

सम्राज्ञी श्वशुरे भव सम्राज्ञी श्वश्र्वां भव ।
ननान्दरि सम्राज्ञी भव सम्राज्ञी अधि देवृषु ॥ ऋ. १०,८५, ४६

'हे मुली, तूं सासरा, सासू, नणन्द व दीर यांवर सत्ता चालविणारी हो' असें हा मंत्रच नवपरिणीत वधूला सांगत आहे. तेव्हां सून घरांत येऊन ती सत्तेनें घरांतील व्यवहार पाहूं लागली तर सासूबाईना त्यांत रागवावयाचें कांहीं कारण नाहीं. जें कराव ह्मणून देवब्राह्मणांसमक्ष तिला सांगण्यांत आलें तेंच ती करीत असतां रागावणें बरें नव्हे ! ! थोडक्यांत सांगावयाचें तर अशा प्रसंगीं मतभेदाचा प्रश्न आला असतां सासूबाईनीं 'मौनं सर्वार्थसाधनम्' या म्हणीचा अवलंब करावा हें उत्तम. असो.

## विवाहाचे प्रकार

ब्राह्म, आसुर, आर्ष, दैव, गांधर्व, राक्षस, पैशाच आणि प्राजापत्य असे विवाहाचे आठ प्रकार सामान्यतः पूर्वीच्या ग्रंथांत आढळतात. कोणी कोणी त्यांतील सहाच प्रकार सांगतात व प्राजापत्य आणि पैशाच हे गाळतात ( वसिष्ठधर्मसूत्र १, २९; आप. ध. सू. २, ४, ११–१२ ). हुंडा देऊन कन्येचें दान करणें हा जो सांप्रतचा प्रकार तो ब्राह्म होय. सालंकृत कन्यादानाचा त्यांतच अन्तर्भाव होतो. आश्वलायन गृह्यसूत्रात ( 'अलंकृत्य कन्यामुदकपूर्वं दद्यादेष ब्राह्मः') कन्येला अलंकृत करून देणें हा ब्राह्म विवाह असें ह्मटलें आहे. हायकोर्टें हाच विवाहप्रकार सर्व जातींत होतो असें म्हणतात. कन्येच्या पित्यानें वराला द्रव्य देऊन कन्या देणें हा जो ब्राह्म, त्याच्या उलट कन्येच्या पित्याला द्रव्य देऊन ती नेणें हा आसुर प्रकार होय. म्हातारा गृहस्थ हजार पांचशें रुपये मुलीच्या बापाला देऊन लग्न करतो, तेव्हां तो आसुर विवाहच होय. या दोन विरुद्ध प्रकारांमुळें स्त्री अप्रज म्हणजे मुलें नाहींत अशा स्थितींत मरण पावल्यास तिच्या स्त्रीधनावर निरनिराळा परिणाम होतो. मुलीच्या बापानें द्रव्य देऊन कन्यादान केलें असेल तर तिचें स्त्रीधन तिच्या मरणानंतर तिच्या

पतीला मिळतें. पण आसुर विवाहानें केलेल्या पत्नीच्या अप्रज स्थितींतील मरणानंतर तिचें धन तिच्या पित्याला मिळतें. गांधर्व विवाह म्हणजे आईबापांना न विचारतां वधूवरांनीं स्वतःच्याच संमतीनें केलेला विवाह. हे तिन्ही म्हणजे ब्राह्म, आसुर व गांधर्व हे विवाहप्रकार हायकोर्टांना मान्य आहेत, निदान नापसंत नाहींत.

दैव विवाह म्हणजे ऋत्विज आपलीं यज्ञकर्मे करित असतां त्याला कन्यादान करणें. हा ब्राह्मणांनाच लागू असून प्रस्तुत कोठेंच चालू नाहीं. या नंतरचा आर्ष विवाह म्हणजे वरापासून एक किंवा दोन गोमिथुनें घेऊन त्याला कन्या देणें हा होय ( एकं गोमिथुनं द्वे वा वरादाय धर्मतः। कन्याप्रदानं विधिवदार्षो धर्मः स उच्यते ॥ मनु ३, २९ ). हाहि प्रस्तुत कोठें चालू नाहीं.

पुढचा विवाहप्रकार प्राजापत्य किंवा काय हा होय. क ह्मणजे प्रजापति. 'कस्मै देवाय हविषा विधेम' असा चरण ऋग्वेदांत येतो व तेथे कचा अर्थ प्रजापति असा ब्राह्मणांत केलेला आहे. 'सहोभौ चरतां धर्ममिति वाचानुभाष्य च। कन्याप्रदानमभ्यर्च्य प्राजापत्यो विधिः स्मृतः' असें मनूनें याचें वर्णन केलें आहे ( ३, ३० ). 'दोघांनीं एकत्र धर्म आचरावा असें तोंडानें ह्मणून व वराची पूजा करून त्याला कन्या देणें हा प्राजापत्य विधि होय.' यावर टीका करितांना हरदत्त **सह** शब्दावर जोर देऊन ह्मणतो 'अन्य विवाहांतहि सहधर्मचरण असतेंच, तथापि या प्राजापत्यांत तें यावज्जीव असून मध्येंच दुसरा आश्रमहि स्वीकारतां येत नाहीं हा याचा विशेष होय; फार काय पण त्या स्त्रीसहच केवळ सहधर्मचरण केलें पाहिजे, दुसऱ्या स्त्रीशीं विवाह करून करता कामा नये.' आपल्याकडे केवळ एकपत्नीक विवाह ( Monogamous marriage ) नव्हता अशी कित्येकाची कल्पना आहे. पण हा प्राजापत्य विवाह ह्मणजे दुसरें काय ? एकदां एका स्त्रीशीं विवाह केल्यावर दुसरी स्त्री करणार नाहीं, फार काय पण ती मरण पावल्यावरहि दुसरी करणार नाहीं, असा निर्बंध यांत पुरुषाना घालून दिलेला असे. या गोष्टीचा स्त्रियांनीं अवश्य विचार करावा व असला प्रकार रूढ करून घेण्याचा प्रयत्न करावा म्हणजे पुष्कळ प्रश्न आपोआप मिटतील.

लॉर्ड पेन्झान्स यानें विवाहाची व्याख्या पाश्चात्य कल्पनेप्रमाणें अशी केली आहे कीं, 'Marriage is the voluntary union for life of one man with one woman to the exclusion of all others.' एकाच पुरुषानें केवळ एका स्त्रीशी आजन्म एकत्र रहाण्याचा आपखुषीनें केलेला करार ह्मणजे विवाह; ही व्याख्या प्राजापत्य विवाहाशीं बरीच जुळती आहे. पण विवाह संबंधाच्या कल्पना दोन्ही ठिकाणीं मूलतःच भिन्न आहेत. तिकडे विवाह हा स्त्रीपुरुषामधील परस्पर करार होय असें मानतात. वधूवरें अज्ञान असतांना तो त्यांच्या आईबापांनीं केल्यास चालतें, पण तीं सज्ञान झाल्यावर त्यांना तो पसंत नसेल तर

मोडतां येतो. आमच्याकडे विवाह हा संस्कार Status म्हणून मानला असून तो केव्हांहि मोडतां येत नाहीं. 'सकृदंशो निपतति सकृत्कन्या प्रदीयते। सकृदाह ददानीति त्रीण्येतानि सकृत् सकृत् ॥' वाडिलार्जित मिळकतीची वांटणी एकदांच होते; कोणतीहि वस्तू देण्याचें वचन एकदांच देतां येतें; एकाला एकदां देतों म्हटल्यावर दुसऱ्याला तीच देतों असें म्हणतां येत नाहीं. विवाहासंबंधानें असाच निर्बंध पुरुषांवरही असावा असें आज बऱ्याच सुशिक्षित स्त्रियांना पाहिजे आहे.

असेंब्लीपुढें जो घटस्फोटाच्या कायद्याचा मसुदा यावयाचा आहे त्या संबंधानें कित्येक सुशिक्षित स्त्रिया या बाबतींत शास्त्र काय आहे हें विचारण्यासाठीं एकदां माझ्याकडे आल्या. त्यावेळीं मी किंचित् थट्टा करण्याच्या बुद्धीनें आपल्या समाजांतील सुशिक्षितांचें प्रमाण, त्यांतही सुशिक्षित स्त्रियांचें प्रमाण, दाखविणारे आंकडे पुढें मांडून तुम्ही कोणाच्या प्रतिनिधी आहां असा त्यांना प्रश्न विचारिला व सांगितलें कीं, आपल्या हिंदु समाजांतील शेंकडा ७५ लोकांत शास्त्रानें नसला तरी वहिवाटीनें [ Custom ) घटस्फोट चालू आहेच; तेव्हां तुमचें प्रतिनिधित्व उरलेल्या शेकडा पंचवीसांतील काहीं अल्पशा भागाचें मात्र आहे. तेव्हां या घटस्फोटाचा काय उपयोग होईल? घटस्फोट केलेल्या स्त्रियांशीं लग्न कोण करील? आज सामान्यतः विधवांचेहि पुनर्विवाह फारसे होत नाहींत अशा स्थितींतहि मुलींचे विवाह होण्याची मोठी अडचण पडू लागली आहे. घटस्फोटानें तर ही अडचण अधिकच वाढेल व अविवाहित मुलींशी अधिक स्पर्धा होऊं लागेल ! ! इंग्लंडादि देशांत ज्या प्रमाणें वृद्ध कुमारिकांचा ( Old maidens ) भरणा वाढत आहे तसें इकडेहि मग होईल. आजहि येथे पार्शी लोकाविषयीं जे आंकडे प्रसिद्ध झाले आहेत, त्यांवरून त्यांच्यातील पंधरा ते पंचवीस वर्षांच्या निदान शेकडा ५० मुलींचीं लग्नें होऊं शकत नाहींत असें आढळून आलें आहे. आमच्याकडे पुष्कळशा इतर गोष्टींप्रमाणें विवाहाची कल्पना देखील पुनर्जन्म, कर्म इत्यादि तत्वांवर उभारलेली असल्यामुळें त्या दृष्टीनें असल्या प्रश्नाचा विचार पूर्वी करण्यांत आला व या कल्पनांचें प्राबल्य जोंपर्यंत आहे तोंपर्यंत केला जाईल. माझें म्हणणें अर्थात् त्या स्त्रियांना पटलें नाहीं. घटस्फोटाचा कायदा मुळींच नसावा असें माझें मत नाहीं. या प्रश्नाबद्दल पुन्हां थोडा विचार पुढें करीन.

माझ्या मतें स्त्रियांनीं अशी चळवळ करावी कीं पुरुषांनीं केवळ एकच स्त्री केली पाहिजे. आज पुरुषांना एकाच वेळीं दोन किंवा अधिकहि स्त्रियां करतां येतात. मदुरेच्या नाईकाच्या ३०० बायका होत्या व तो मरण पावला तेव्हां त्या सर्वांना सती जावयास लावलें असा उल्लेख सांपडतो. असली आपत्ति टाळण्यासाठीं एका पुरुषानें एकाच स्त्रीशीं विवाह करावा अशी योजना करण्याची खटपट झाली पाहिजे. आज रजिस्ट्रेशन पद्धतीनें होणारे विवाह असेच असतात. असो.

उरलेले दोन विवाहप्रकार म्हणजे राक्षस व पैशाच हे होत. राक्षस विवाहांत कन्येच्या नातेवाईकांना चोप देऊन तिला न्यावयाची व तिच्याशीं लग्न लावावयाचें असते. हा प्रकार अर्थात् क्षत्रियातच आढळावयाचा. श्रीकृष्ण–रुक्मिणीचा किंवा पृथ्वीराज–संयोगेताचा विवाह राक्षस पद्धतीचाच होय. आश्वलायनगृह्यसूत्र या संबंधानें ह्मणतें ‘ हत्वा भित्त्वा च शीर्षाणि रुदतीं रुदद्भयो हरेत् ’ नातेवाईकांना ठार करून त्यांचीं डोकीं फोडून ते रडत असतां रडणाऱ्या वधूला पळवून नेतात. अशा दांडगाईचें कन्याहरण यांत असल्यामुळें याला राक्षस विवाह ह्मणतात [ प्रसह्य हरणात् राक्षसः ]. वसिष्ठधर्मसूत्रांत याला क्षात्र विवाह ह्मटलें आहे. शके ७९३ मधील संजानच्या एका ताम्रलेखांत इंद्र राजानें चालुक्य राजाच्या कन्येशीं ‘ राक्षसेन विवाहेन’ लग्न केल्याचें सांगितलें आहे (एपिग्राफिआ इन्डिका व्हॉल्यूम १८ पान २४३). पैशाच विवाह ह्मणजे सुप्त, प्रमत्त, अशा कन्येशीं एकांतात गमन करणें हा होय. (सुप्तां मत्तां प्रमत्तां वा रहो यत्रोपगच्छति । स पापिष्ठो विवाहाना पैशाचश्चाष्टमोधमः ॥ मनु ३,३४ ). कन्येचें जन्माचें नुकसान होऊं नये व तिच्या संततीला बेकायदेशीर मानण्यांत येऊं नये ह्मणून केवळ हा प्रकार विवाह ह्मणून मान्य केलेला आहे. दांडगाईनें किंवा फसवणुकीनें संकटांत पडलेल्या कन्येला त्या पुरुषाच्या गळ्यांत बांधून ही तुझी बायको झाली अशी तिच्या हितासाठीं मान्यता देण्याचा प्रकार ह्मणजे हा पैशाच विवाह होय. राक्षस व पैशाच हे दोन्ही विवाह कनिष्ठ होत. पण ज्याच्यावर बलात्कार झाला किंवा ज्यांची फसवणूक झाली त्या मुलींचें काय करावयाचें असा प्रश्न उत्पन्न करून दयाळू शास्त्रकारांनीं ही वाट काढिली. वास्तविक असे विवाह करा किंवा ते धर्म्य आहेत असें कोणीही सांगितलें नाहीं किंवा अशा प्रकारचे विवाह पूर्वी केव्हां होते व कालांतरानें परिणत होत होत ब्राह्मविवाहाची पायरी प्राप्त झाली असे कांहीं पाश्चात्य पण्डित ह्मणतात तेंही बरोबर नाहीं. कारण ऋग्वेदातच ब्राह्म विवाह आहे व इतर वेदात आसुराचें व गान्धर्वाचें वर्णन आहे. या विवाहाच्या प्रकारापैकीं गांधर्व, राक्षस व पैशाच यात कन्यादान नाहीं. ब्राह्म, दैव, आर्ष व प्राजापत्य हे प्रकार ब्राह्मणांना प्रशस्त मानिले असून, गांधर्व व राक्षस हें क्षत्रियाना आणि आसुर हा प्रकार वैश्य व शूद्र याना प्रशस्त ह्मणून सांगितला आहे. पण त्या सर्वांत ब्राह्मच श्रेष्ठ असून त्याचे योगानें पूर्वीच्या दहा व पुढच्या दहा धरून एकंदर एकवीस पिढ्या उद्धरतात अशी त्याची स्तुति केलेली आहे. दैव विवाह १४ पिढ्या उद्धरतो व आर्ष ७ उद्धरतो, ह्मणून ते ब्राह्माच्या खालोखाल येतात. ही स्तुति अक्षरशः घ्यावयाची नसून विवाह प्रकारांची प्रत लावण्यापलीकडे तिचा उद्देश नाही. ‘ स्तुतिमात्रमेतत् ’ म्हणजे हें अक्षरशः खरें नाहीं असें विश्वरूपाचार्यानें या विषयीं ह्मटलें आहे.

# वधूवर परीक्षेचे नियम

विवाहाला योग्य वय व त्याचा विधि यांचा आतांपर्यंत विचार झाला. आतां वधूची परीक्षा करतांना काय पाहिलें पाहिजे हें पाहूं. याविषयीं प्रथम कुळाची चवकशी करावी ( कुलमग्रे परीक्षेत ये मातृतः पितृतश्चेति । ) असें आश्वलायनगृह्यसूत्रांत ह्मटलें आहे ( १, ५, १ ). मुलीच्या, आईच्या, व बापाच्या दहा दहा पिढ्या पहाव्या व त्यांत विद्या, तपश्चर्या, पुण्यकर्में हीं कितपत होतीं तें लक्षांत घ्यावें. याज्ञवल्क्यानें याच सूत्रवचनांचा अनुवाद केला आहे ( १, ५४ ). वधू परीक्षेसंबंधाची ही सूचना आनुवंशिक गुण व निसर्ग विकास या तत्वांना धरून केलेली आहे ( Heredity and nature ). शिक्षण व जोपासना ( Education and nurture ) हीं तत्वें सांप्रत पुढें येत आहेत. पण या दोन टोकांच्या मधला मार्ग स्वीकारणें माझ्या मतें इष्ट आहे. आनुवंशिक गुण व शिक्षण या दोहोंचाहि विचार करावा. बुद्धि व विद्वत्ता याना विशेष महत्त्व आहे. केवळ आनुवंशिक गुणावर भार टाकणें इष्ट नाहीं. लहान वय असतांना मुलाविषयीं खरोखर काहीं सांगतां येत नाहीं. पूर्वी विसाच्या आंत सामान्यतः पुरुषाचें लग्न होत नसे, त्यामुळें लग्नाच्या वेळीं त्याची स्थिति चांगलेपणी कळून येण्याचा मार्ग होता. पण ती वयोमर्यादा खालीं आल्यावर तो बंद झाला. बारा वर्षांचा मुलगा बुद्धिमान् दिसला तरी पुढें तो विद्वान् होईलच असें काहीं सांगतां येत नाहीं. या साठीं आनुवांशिक गुणाबरोबर प्रत्यक्ष शिक्षण किती हेंहि पहाणें अवश्य आहे व तोच अभिप्राय शास्त्रकारांनींहि सांगितला आहे. 'बुद्धिमते कन्यां प्रयच्छेत ' असें आश्वलायनानें सांगितलें असून ( १, ५, २ ), ' बन्धुशीललक्षणसंपन्नश्रुतवानरोग इति वरसंपत् । ' असें आपस्तंब (गृह्य १–३–२०) सांगतो. बोधायनानें 'दद्याद् गुणवते कन्याम्' असें ह्मटलें आहे व कालिदासानेंहि " गुणवते ' कन्यका प्रदेया " असा त्याचा अनुवाद केला आहे.

वधूची परीक्षा करतांना बुद्धि, रूप, शील, लक्षण व आरोग्य या गोष्टी पहाव्या असें आश्वलायन सांगतो ( १, ५, ३–६ ). मानवगृह्यसूत्रांत वित्त, रूप, विद्या, प्रज्ञा व बांधव अशीं पांच विवाहकारणें दिलीं आहेत ( १, ७, ६ ). स्त्रीशिक्षणाची पद्धति मध्यंतरीं काहीं काळ नष्ट झाली असली, तरी पूर्वी ती होती, हे या कारणांत विद्येचा समावेश केला आहे त्यावरून उघड दिसतें. पण पुढें ' पंडिता कन्या ' याचा अर्थ केवळ गृहकृत्यांत दक्ष अशी मुलगी एवढाच होऊं लागला. या वधूगुणापैकी प्रत्येक वधूंत सारे सांपडणें शक्य नाहीं, ह्मणून त्याचा तारतम्यानें विचार करून भारद्वाजगृह्यसूत्रांत असें ह्मटलें आहे कीं वित्त, रूप, प्रज्ञा व बांधव यांपैकीं सोडावयाचेंच झालें तर प्रथम वित्त सोडावें. पण पुढें रूप आहे आणि प्रज्ञा नाहीं किंवा कुळ चांगलें नाहीं, तर काय करावें असा

प्रश्न उत्पन्न झाला असतां, ' यस्यां मनोऽनुरमते चक्षुश्च प्रतिपद्यते । तां विद्यात्पुण्यलक्ष्मीकां किं ज्ञानेन करिष्यति ' असा श्लोक उद्धृत केला आहे. जीवर मन रमतें व नेत्राला सुख होतें, तीच पसंत करावी. नुसत्या ज्ञानाचा काय उपयोग? वरपरीक्षेंत कोण काय पसंत करतात हें एका सुभाषितांत सांगितलें आहे. ' कन्या वरयते रूपं माता वित्तं पिता श्रुतम् । बान्धवाः कुलमिच्छन्ति मिष्टान्नमितरे जनाः । ' मुलीला स्वतःला देखणा पति पाहिजे असतो, मातेला श्रीमंत जांवई हवा असतो, तर बापाला तो विद्वान् असावा असें वाटतें, सोयरेधायरे कुळ कसें आहे ते बघतात आणि इतर लोक जिलबी मिळेल कीं लाडू हेंच पहातात. वधू परीक्षेसंबंधानें आपस्तंब म्हणतो, ' यस्यां मनश्चक्षुषोर्निबंधस्तस्यामृद्धिर्नेतरदाद्रियेत ' (१।३।२१). जिच्या ठिकाणीं मन व डोळे खिळून रहातील तीच चांगली, इतर गोष्टींचा विचार करूं नये, पण आपण आज काय करितों? आम्हीं सध्यां कुंडल्या जुळवीत बसतों, वर्णवश्य वगैरे ठरवीत बसतों, मंगळ आहे कीं काय पहातों, पण असल्या गोष्टींचा उल्लेख कोणत्याहि गृह्यसूत्रांत कोठेंहि नाहीं. सूत्रांत राशींचाच संबंध नाहीं, मग मंगळाला तेव्हां कोण विचारणार? त्यावेळीं सर्व काम नक्षत्रांवर चाले व त्याचाहि उपयोग केवळ शुभाशुभ काळ पहाण्यापुरताच होई. वराहमिहिरापर्यंत ज्योतिषाचें तर्कशास्त्र व त्यांतील नाडी, गण, वर्ण इत्यादि प्रकार इकडे फारसे नव्हते. वराहमिहिरानें गर्गाचा म्हणून एक श्लोक दिला आहे तो असाः—

म्लेच्छा हि यवनास्तेषु सम्यक् शास्त्रमिदं स्थितम् ।
ऋषिवत्तेऽपि पूज्यन्ते किं पुनर्दैवविद्द्विजः ॥

यवनांमध्यें फलज्योतिषशास्त्र चांगलें आहे असें म्हणून त्याची स्तुति यांत केली आहे. दैवज्ञ म्हणजे ज्योतिषी ब्राह्मणाला पूज्य म्हटलें आहे. या पूर्वी मुहूर्त, उदगयन, शुक्लपक्ष इत्यादि विवाहाला योग्य काळाचे उल्लेख आढळतात. शांखायन गृह्यसूत्रांत ' उदगयने आपूर्यमाणपक्षे पुण्याहे कुमार्यै पाणिं गृह्णीयात् ' असें सांगितलें असून (१,५) पारस्कर गृह्यसूत्रांत त्यांत नक्षत्राची भर घातली आहे. 'सर्वे मासा विवाहस्य । शुचितपस्तपस्यवर्जमित्येके ।' बौ. गृ. सू. १, १, १८; सर्व ऋतवो विवाहस्य शैशिरौ मासौ परिहाप्योत्तमं च नैदाघम् । आप.गृ. सू. १, २, १२. असे महिने व ऋतु विवाहाला युक्त म्हणून सांगितलेले आहेत. पण यावनी ज्योतिषाच्या संसर्गानें त्यांत पुष्कळ नवीन गोष्टी शिरून मोठें बिकट काम झालें आहे. त्यामुळें, वर्ण, गण, नाडी इत्यादि पहातांना इतर महत्त्वाच्या गोष्टी सोडून देण्याचा प्रसंग येतो. यास्तव विवाहप्रकरणांत या सर्व फालतू गोष्टींना फाटा देऊन काढून टाकलें पाहिजे.

विवाहविधींत काहीं लाक्षणिक गोष्टीहि (Symbolism) आल्या आहेत. उदाहरण, ध्रुवारुंधतीदर्शन. ध्रुवाप्रमाणें अढळ आणि अरुंधतीप्रमाणें पतिनिष्ठ असें वधूनें व्हावें असें दर्शविण्याचा या विधीचा हेतु आहे. या विधीं-

पैकीं खरोखर अवश्य कोणते हें सांगतांना मनु ह्मणतो, ' पाणिग्रहणिका मंत्रा नियतं दारलक्षणम् । तेषां निष्ठा तु विज्ञेया विद्वाद्भिः सप्तमे पदे ॥ ' ( ८, २२७ ). पाणिग्रहणाचे मंत्र हेंच विवाहाचें मुख्य अंग होत, त्यांनींच भार्यात्वाची सिद्धि होते. ह्मणजे सप्तपदी झाली की लग्न मोडतां येत नाहीं. सप्तपदींत प्रत्येक पावलाचें कार्य सांगून शेवटीं ' सखा सप्तपदी भव ' ' सात पावलें चाललेली अशी तूं मित्र हो ' असें ह्मटलें असतें. सप्तपदी होण्यापूर्वी कांहीं गडबड होऊन लग्न मोडल्यास ' न च मंत्रोपनीता स्यात् कुमारी पितुरेव सा ' ह्मणजे तें लग्न झालेंच नाहीं व मुलगी अजून बापाची समजावी असें वसिष्ठ ह्मणतो ( १७, ७२ ). त्याच प्रमाणें बलात्कारानें कोणी मुलीला पळविलें पण तिच्यावर मंत्रसंस्कार झाला नाही तर ती पुनः विधियुक्त दुसऱ्याला द्यावी, कारण ती कन्याच असते असें बोधायन सांगतो ( ४, १ १७ ). या प्रमाणें शास्त्रकारांनीं दयाळुपणा व सारासारविचार यांना धरूनच कसा धर्म सांगितला आहे हें चांगलें दिसून येतें.

## गोत्र व प्रवर

विवाहाला वधूवरांची एक जात, पण भिन्न गोत्र व भिन्न प्रवर असलीं पाहिजेत असें सांगितलें आहे. 'भार्यामुपयच्छेत. . .असगोत्राम्' (हिरण्यकेशिगृह्यसूत्र १, १९, २), ' असमानप्रवरैर्विवाहः ' ( गौ. सू. ४, २–३ ) इत्यादि वचनें त्याविषयीं आढळतात. वधूवरें सपिंडहि नसावींत. हें सापिण्ड्य कोठपर्यंत न्यावयाचें हेंहि सांगितलें आहे, पण त्यांत फार खोल जावयाला प्रस्तुत वेळ नाहीं. सध्या गोत्र व प्रवर यांचा थोडा विचार करून आटोपतें घेऊं.

विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ, कश्यप आणि अगस्त्य हे आठ ऋषी मूळ गोत्रकार म्हणून सांगितले आहेत. महाभारताच्या शांतिपर्वांत तर चारच दिले आहेत. बोधायनानें ४९ प्रवरें सांगितलीं असून गोत्रें अनंत आहेत असें ह्मटलें आहे. गोत्रें म्हणजे ऋषींचीं अपत्यें असें समजतात.. गोत्रांतील ज्या पुरुषांनीं अग्नीचें विशेषें करून आवाहन केलें त्यांतील पाहिले तीन, पांच किंवा दोन किंवा एक पुरुष म्हणजे प्रवर होत. प्रवरमंजरींत ' प्रकर्षेण वरणानि प्रार्थनानि प्रवराः ' अशी प्रवराची व्याख्या दिली असून गोत्रें तीन कोटी आहेत असें सांगितलें आहे. तात्पर्य गोत्र प्रवराचा प्रश्न हा अत्यंत घोटाळ्याचा आहे. सर्व श्रौतसूत्रात प्रवराध्याय ह्मणून एक भाग असतो. एकप्रवरी, द्विप्रवरी, त्रिप्रवरी व पंचप्रवरी अशीच गोत्रें आहेत, चतुःप्रवरी कोणी नाहीत. बोधायनानें शौनक व वसिष्ठ हीं गोत्रें एकप्रवरी ह्मणून सांगितलीं आहेत. वत्सगोत्र पंचप्रवरी आहे. प्रवराचा अर्थ लक्षांत घेतल्यास पंचप्रवरी असणें ह्मणजे कांहीं दोष आहे अशी जी कल्पना कित्येकांची आहे ती कशी निर्मूल व वेडेपणाची आहे हें समजून येईल. श्रावणीच्या वेळीं पंचप्रवरी असतील

त्यांनीं उठावें असें उपाध्याय ह्मणतो तेव्हा हा प्रकार दृष्टीस पडतो पण तो अज्ञानाचा परिणाम होय.

विवाहाच्या संबंधांत ज्या गोष्टी आल्या आहेत, त्यांतील ज्या अनवश्यक आहेत त्याचा निर्देश पूर्वी केलाच आहे. गोत्र, प्रवर आणि सापिंड्य या बाबतींतहि पुष्कळ गोष्टी आतां अनवश्यक झाल्या आहेत. पण त्यांत फरक होण्याला फार काळ जावा लागेल. सापिंड्याचा संबंध पिढ्यांशीं आहे व पाचसात पिढ्यांपलीकडे शास्त्रहि आडकाठी करीत नाहीं. पण सगोत्र व सप्रवर यांत पिढ्याना अंतच नसल्यामुळें तो प्रश्न फार बिकट झाला आहे व तो सुटावयाला फार वेळ लागेल असें वाटतें. आज विवाह संबंधींच्या बऱ्याच अनवश्यक गोष्टींना फांटा देणें हें पहिलें काम आहे. गोत्र व प्रवर याचे निर्बन्ध ताबडतोब जावेत असें कांहींचें ह्मणणें आहे. आधी गोत्र व प्रवर याची अडचण फक्त ब्राह्मण व कांहीं पांढरपेशा जातानाच आहे. शिवाय यांत भावने ( Sentiment ) चा प्रश्न असल्यामुळें आज तरी सगोत्र व सप्रवर विवाह करा असा उपदेश करणें अशक्य आहे. ज्याना गोत्र व प्रवर मानावयाचे नाहीत त्यांना विवाह रजिस्टर करण्याची सोय कायद्यानें करून दिलेली आहेच. विवाहासंबंधीं प्राचीन काळी घातलेल्या निर्बन्धांपैकीं गोत्रप्रवराविषयीं जो निर्बन्ध तो जर नाहींसा व्हावयाचा असेल तर सर्वांचे शेवटीं होईल असें मला वाटतें.

आठव्या व्याख्यानांत विवाहासंबंधींच्या वय, विवाहप्रकार, गोत्र, प्रवर इत्यादि गोष्टींचा विचार झाला. विवाहविषयक इतर कित्येक गोष्टींचा म्हणजे असवर्ण किंवा मिश्र विवाह, सतीची चाल, घटस्फोट इत्यादि विषय घेऊं. विधवा वपनाचा विषयहि यांत येतो; पण सध्या त्याच संबंधीच्या एका खटल्यांत मी काम करीत असल्यामुळें त्या विषयीं आज येथें कांहीं बोलत नाहीं.

## असवर्ण अथवा मिश्रविवाह

आतां प्रथम मिश्र विवाह घेऊं. यांतहि अनेक बाबती मोडतात. त्या संबंधाचे हायकोर्टाचे ठराव, प्राचीन स्मृतींत सांगितलेले त्याविषयींचें नियम, व सध्या त्यासंबंधांत चालू असलेले कायदे या गोष्टींचा विचार यांत येतो. सवर्ण विवाहासंबंधानें प्रश्नच नाहीं. पण असवर्ण विवाहांत अनुलोम आणि प्रतिलोम असे दोन प्रकार असतात. अनुलोम व प्रतिलोम हे शब्द फार प्राचीन काळापासून चालत आले असून नैसर्गिक किंवा स्वाभाविक क्रमाला धरून असलेला तो अनुलोम व अस्वाभाविक, अपरिचित तो प्रतिलोम असे याचे अर्थ आहेत. लोम ह्मणजे केश. केशावरून खालीं हात आणल्यास हाताला जो भास होतो तो अनुलोम व खालून वर नेल्यास खरखरीत लागतें, त्याला प्रतिलोम म्हणतात. थोडक्यांत सांगायचें तर

ठरीव पद्धतीला किंवा क्रमाला धरून असेल तें अनुलोम व त्याच्या विरुद्ध प्रतिलोम होय. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, व शूद्र असा वर्णांचा वरून खालीं क्रम होतो. त्यामुळें विद्येच्या बाबतींतहि अनुलोम प्रतिलोमाचा विचार होई. म्हणजे ब्राह्मणापासून क्षत्रियादि वर्ण विद्याग्रहण करतील तर ती अनुलोम, उलट क्षत्रिय गुरूपासून ब्राह्मण ती शिकेल तर ती प्रतिलोम समजत. असवर्ण विवाहाच्या या दोन प्रकारांपैकीं अनुलोम प्रकार मुंबईच्या हायकोर्टानें मान्य केला आहे. बाई गुलाब विरुद्ध जीवनलाल ( ४६ मुंबई पान ८२१ ) या खटल्यांत वैश्य पुरुष व वैश्यापासून शूद्र स्त्रीला बिनलग्नानें झालेली मुलगी यांच्या विवाहाचा प्रश्न आला असून तो हायकोर्टानें मान्य केला. तसाच नाथा विरुद्ध छोटालाल मेहता [ ५५ मुंबई पान १ ] या खटल्यांतील ब्राह्मणाच्या शूद्र स्त्रीशीं झालेल्या विवाहाला त्यानें मान्यता दिली. पण त्यांच्या मुलाला संपत्तीचा दहावा हिस्सा मिळावा असें ठरविलें. पण मुंबई हायकोर्ट प्रतिलोम विवाह मान्य करीत नाहीं. उदाहरणार्थ राजपुत्र पुरुष व ब्राह्मण कन्या यांचा विवाह बाई लक्ष्मी विरुद्ध कल्याणसिंग [ २ बॉम्बे लॉ रिपोर्टर पान १२८ ] या खटल्यांत हायकोर्टानें बेकायदा ठरविला. अलाहाबाद हायकोर्टाला मात्र कोणताच असवर्ण विवाहाचा प्रकार म्हणजे अनुलोमहि मान्य नाहीं [ २८ अलाहाबाद पान ४८ ]. अर्थात स्पेशल मॅरेज ॲक्ट ( Special Marriage Act ) प्रमाणें रजिस्ट्रारपुढें होणाऱ्या लग्नाचा प्रश्न यांत येत नाहीं. तो कायदा स्वतंत्र आहे. तात्पर्य पूर्व-पद्धती प्रमाणें होणारा प्रतिलोम विवाह कोणतेंच हायकोर्ट मान्य करीत नाहीं.

## विशिष्ट विवाहाचा कायदा

१८७२ सालीं सरकारनें लग्नाविषयीं एक विशिष्ट कायदा केला ( Special Marriage Act III of 1872 ) व त्याअन्वयें भिन्न वर्णांच्याच काय पण भिन्न धर्मांच्याहि स्त्रीपुरुषांचे विवाह कायदेशीर मानण्यांत येऊं लागले. पण या कायद्यान्वयें होणाऱ्या लग्नांत पुष्कळ अडचणी होत्या. उदाहरणार्थ लग्न नोंदण्यासाठीं नोंदणी अधिकाऱ्यापुढें वधूवरें गेलीं असतां हिंदुस्थानांतील प्रचलित आठ धर्मांपैकीं कोणत्याहि धर्मांचीं आपण नाहीं असें त्यांना प्रतिज्ञेवर सांगावें लागे. पण आपण आचरीत असलेल्या धर्मासंबंधानें अशी नाकबूली देणें पुष्कळ जणांस जड वाटे. पण १९२३ सालीं त्या कायद्यांत थोडा बहुत फरक करून ही अडचण अंशतः दूर करण्यांत आली. या नव्या कायद्याप्रमाणें हिंदु धर्मांतूनच उद्भवलेल्या धर्मांतील स्त्रीपुरुषांना ह्मणजे हिंदु, बौद्ध, जैन व शीख पंथी यांच्यात आपसांत विवाह होत असतां आपण कोणत्याच धर्माचीं नाहीं असें प्रतिज्ञापूर्वक सांगण्याची गरज राहिलेली नाहीं. या कायद्याला कोणत्याहि जातीची आडकाठी नाहीं; अर्थात अनुलोम प्रतिलोम हा प्रश्नच त्यांत उद्भवत नाहीं. कोणत्याही दोन जातींच्या स्त्रीपुरुषांचा विवाह या प्रमाणें कायदे-

शीर होतो. मात्र अशा विवाहाला कांहीं निर्बंध ठेविलेले आहेत. वधूवरांपैकीं कोणाचें पूर्वीं लग्न झालेलें असतां कामा नये ह्मणजे पूर्वीच्या लग्नाचा संबंध कायम राहिलेला असतां कामा नये. दुसरा निर्बंध वयाचा. अठरा वर्षांच्या आंतील पुरुष व चवदाच्या आंतील स्त्री यांचा विवाह होऊं शकत नाहीं व वधूवरें एकवीस वर्षांच्या आंतील वयाचीं असतील तर त्यांच्या त्यांच्या पालकांची त्या विवाहाला संमति पाहिजे. तिसरा निर्बंध सापिंड्याचा. वधूवरांचा कोणताहि पणजोबा किंवा पणजी एकच पुरुष किंवा स्त्री असतां कामा नये. एका मनुष्याला दोन आजोबा व तदनुसार चार पणजोबा असतात, व त्यांपैकीं कोणताहि पणजोबा दोघांचा एकच नसावा. याच्या पलीकडचें सापिंड्य मात्र हा कायदा पहात नाहीं. आपल्या धर्मशास्त्राप्रमाणेंहि पांच किंवा सात पिढ्यांपलीकडे सापिंड्य जात नाहीं, तेव्हां केवळ सांपिड्याचा थोडा संकोच केला एवढ्यावरून कांहीं या कायद्याविरुद्ध तक्रार करावी असें नाहीं. या विषयीं तक्रारीचें कारण ह्मणजे या कायद्यानें आपल्या धार्मिक बाबतीत कोर्टाचा हात शिरकविला हें होय. अशा रीतीनें आज साठ वर्षें हा कायद्याचा हात आपल्या धर्मांत शिरला आहे. ब्रिटिश राज्य येथें झाल्यापासून आतांपर्यंत येथें लोकशाही ( Democracy ) नव्हती, तेव्हां असल्या गोष्टी होऊन गेल्या, त्याला आपला नाइलाज होता, असें आपण म्हणूं. पण आतां सरकार कांहीं अंशीं तरी लोकसत्ताक होणार व तेव्हां तर असले कायदे वारंवार घडणार व ते सारे बहुमताच्या जोरावर अमलांत येणार. कोणी एखादा हिटलर उत्पन्न झाला तर गोष्ट निराळी, नाहीं तर बहुमतानेंच सर्व गोष्टी ठरत जाणार, या गोष्टींचा लोकशाही स्वराज्य मिळवूं पहाणाऱ्या आपणा सर्वांनीं विचार केला पाहिजे. लोकशाही स्वराज्य पाहिजे, तर बहुमताला मान देणें अवश्य होईल कारण बहुमत हें तर लोकशाहीचें आद्यतत्त्व आहे. एकादी गोष्ट हवी आणि नको असें म्हणता येणार नाहीं ( You cannot have your cake and eat it too ). लोकशाही तर पाहिजे आणि बहुमताला मान द्यावयाचा नाही असें चालणार नाहीं. बहुमत हें पुष्कळ वेळां चुकीचें असतें हें खरें, पण त्याला उपाय नाहीं. कांहीं काळ तरी त्याचा जाच सहन करावा लागतोच. केव्हांहि अल्पमतवाल्यांना प्रथम हालच काढावे लागतात, व मागाहून त्यांचें म्हणणें खरें ठरतें. भौतिक शास्त्रांत जे नवीन शोध लागले ते लावणाऱ्यांना प्रथम असत्यवादीहि म्हणवून घ्यावें लागलें. लोकशाही बहुधा मूर्खपणानें चालत असते व थोड्या शहाण्या लोकांचें म्हणणें प्रथम फेंटाळूनच लावण्यांत येतें. आज आपल्या देशांत ६० लक्ष मतदार आपले प्रतिनिधी निवडून देत आहेत, तर उद्यां कदाचित ती संख्या ४ कोटी होईल. हा युगधर्म आहे, व त्याच्या पुढें मान वाकविलीच पाहिजे. असो. विवाहाच्या विशिष्ट कायद्याप्रमाणें लग्नाची सूचना ( Notice ) चवदा दिवस द्यावी लागते. त्या अवधींत जर कोणाला वधूवरांचें वय, सापिंड्य, पूर्वलग्न इत्यादि बाबतींत हरकत आणावयाची

असेल तर ती आणून दावा लावता येतो व त्याचा निकाल लागेपर्यंत लग्न होऊं शकत नाहीं. या शिवाय इतरहि कांहीं गोष्टी आहेत, पण त्यांचा विचार करण्याची फारशी गरज नाहीं. पण या प्रकारें होणाऱ्या लग्नांचे आजच्या स्थितींत परिणाम काय होऊं शकतील हें पहाणें मात्र अवश्य आहे.

## नोंदणीच्या लग्नाचे परिणाम

समजा अ आणि ब असे दोन भाऊ असून अ जुन्या मताचा व ब नव्या मताचा आहे व बनें लग्ननोंदणीच्या कायद्याप्रमाणें मुसलमान स्त्रीशीं लग्न केलें आहे. अशा स्थितींत अ जर निपुत्रिक मरण पावला तर बच्या मुसलमान स्त्रीच्या मुलाकडे अची मालमत्ता वारस म्हणून जाईल. हा प्रकार टाळावयाचा तर अनें आपलें मृत्युपत्र करून संपत्तीची व्यवस्था करून ठेविली पाहिजे. आतां दुसरें उदाहरण घेऊं. अ हा बाप आणि ब हा त्याचा मुलगा आहे. बनें नोंदणीच्या कायद्याप्रमाणें लग्न केलें तर तो तेवढयानेंच एकत्र कुटुंबांतून वेगळा झाला असें होतें व त्याच्या मालमत्तेच्या वारसाच्या बाबतींत इंडियन सक्सेशन ॲक्ट लागू होतो. हिंदु धर्मशास्त्र किंवा मुसलमानी किंवा पारशीधर्मशास्त्र त्याला लागत नाहीं. उदाहरणार्थ मुसलमानी वहिवाटीप्रमाणें मिळकतीची वांटणी करतांना दोन मुलीं बरोबर एक मुलगा किंवा पारशी कायद्याप्रमाणें ४ मुली म्हणजे एक मुलगा अशीं समीकरणें लागतात व अशा रीतीनें वाटण्या होतां होतां थोड्याच काळांत मोठी मिळकतहि नाहींशी होते; किंवा हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें विभक्त कुटुंबांत धनी निपुत्रिक मरण पावल्यास त्याची मिळकत प्रथम त्याच्या बायकोला, नंतर मुलींना व मुलींच्या मुलांना अशी मिळत जाते; तसें न होतां इंडियन सक्सेशन ॲक्टाप्रमाणें बच्या मिळकतीची व्यवस्था होते. तसेंच ब हा अचा एकटा मुलगा असेल तर त्याचें या कायद्याप्रमाणें लग्न झाल्यास अला दत्तक पुत्र घेण्याची मोकळीक होते, तशी जुन्या पद्धतीप्रमाणें रहात नाहीं. दत्तकासंबंधींची ही सारी व्यवस्था जुन्या पुराणमताभिमानी लोकानीं गडबड करूं नये म्हणून केलेली आहे हें उघड आहे. नोंदणीच्या लग्नाला आणखी घटस्फोटाचा कायदा (Indian Divorce Act) लागतो. हिंदुधर्मशास्त्रानुसार झालेलें लग्न मोडता येत नाहीं. पण या नोंदणीच्या विवाहाच्या कायद्यान्वयें विवाह म्हणजे केवळ करार ठरविण्यांत आला आहे व म्हणून योग्य कारणास्तव तो मोडतांहि येतो.

## मिश्रविवाहाचा प्राचीन इतिहास

असवर्ण किंवा मिश्रविवाहाचीं उदाहरणें श्रुतींत फारशीं मिळत नाहींत. पण कांहीं आढळतात. शतपथ ब्राह्मणांत मानव शर्यात राजाची कन्या सुकन्या आणि भार्गव गोत्री किंवा आंगिरस गोत्री च्यवन ब्राह्मण यांचा विवाह झाल्याचें वर्णन

आहे ( ४, १, ५ ). अशा मिश्र विवाहाचें गमकहि शतपथ ब्राह्मणांत ' तस्माद्वैश्यी-पुत्रं नाभिषिञ्चति ' ( १३, २, ९, ८ ) या वचनांत आढळतें. राजाच्या वैश्य स्त्रीपासून झालेल्या पुत्राला राज्याभिषेक करीत नाहींत असें यांत सांगितलें आहे. म्हणजे क्षत्रियाला क्षत्रियस्त्रीपासून झालेल्या मुलालाच अभिषेक करावा असा त्याचा अर्थ आहे. पुढें सूत्रकालांत मात्र असवर्ण विवाहाची पद्धत स्पष्टपणें दिसून येते. त्यावेळीं ब्राह्मणाला चारी वर्णांच्या भार्या चालत. ' तेषां वर्णानुपूर्व्येण चतस्रो भार्या ब्राह्मणस्य । ' असें बोधायन धर्मसूत्रांत म्हटलें असून ( १, ८, २ ), विष्णुधर्मसूत्रांत ' अथ ब्राह्मणस्य वर्णानुक्रमेण चतस्रो भार्या भवन्ति । ' (२४, १ ) असें सांगितलें आहे. पण इतर स्त्रियांना धर्मकार्यांत घेऊं नये असें विष्णुसूत्र म्हणतें ( २६, ४ ). सामान्यतः सवर्ण स्त्रियाच प्रशस्त होत असें मात्र सर्वांनीं सांगितलें आहेच. ' हीन-जातिस्त्रियं मोहादुद्वहन्तो द्विजातयः । कुलान्येव नयन्त्याशु ससंतानानि शूद्रताम् । ' म्हणजे द्विजानें शूद्रस्त्रीशीं लग्न केल्यास मुलांबाळांसह सर्व कुळ शूद्र होतें असें मनूनें ( ३, १५ ) म्हटलें आहे. मनूनें एकदां ' सवर्णाऽग्रे द्विजातीनां प्रशस्ता दारकर्मणि । कामतस्तु प्रवृत्तानामिमाः स्युः क्रमशोवराः । ' ( ३, १२ ) असें म्हणून पुढें असवर्ण विवाहाची सपाटून निन्दाहि केली आहे. ' न ब्राह्मण-क्षत्रिययोरापद्यपि तिष्ठतोः । कस्मिंश्चिदपि वृत्तान्ते शूद्रा भार्योपदिश्यते । ( ३, १४ ) अशा शूद्रस्त्री करण्यासंबंधानें त्यानें स्पष्ट निषेधहि केला असून पुढें तर अशा विवाहा-संबंधानें अति कडक उद्गार काढिले आहेत ( ३, १६–१९ ). मास भक्षणासंबंधानें-हि मनुस्मृतींत असाच द्विधा प्रकार आढळतो. यावरून प्रस्तुतची मनुस्मृती दोन-वेळां लिहिलेली असली पाहिजे असें उघड होतें. याज्ञवल्क्यानें असवर्ण विवाहाची प्राचीन पद्धत सांगून स्वतःचें मन त्याविरुद्ध दिलें आहे. ' यदुच्यते द्विजातीनां शूद्राद्दारोपसंग्रहः । नैतन्मम मतं यस्मात्तत्रायं जायते स्वयम् ' ( १, ५५ ) असें तो म्हणतो. या वरून स्मृतिकार स्वतः समन्वयपद्धति कितपत मानीत हें दिसून येतें. अशा रीतीनें भिन्न मतांचा प्रसंग उद्भवला असतां समन्वय शक्य नाहीं. पारस्करानें अनुलोम विवाह सांगून ' शूद्रामप्येके मंत्रवर्जम् ' ( १, ४ ) म्हणजे शूद्र स्त्रीशीं विवाह केल्यास मंत्राशिवाय करावा असें एक मत म्हणून दिलें आहे. वासिष्ठानेंहि पार-स्कराप्रमाणेंच प्रथम सांगून शेवटीं ' तथा न कुर्यात् । अतो हि ध्रुवः कुलापकर्षः प्रेत्य चास्वर्गः । ' म्हणजे असें करूं नये, कारण तेणें करून निश्चयानें कुळाची हानि होते व अंतीं स्वर्गप्राप्ति होत नाहीं, असें म्हटलें आहे.

## मिश्रविवाहाचीं ऐतिहासिक उदाहरणें

मिश्रविवाहाचीं ऐतिहासिक उदाहरणें पुष्कळ आहेत; त्यांतील थोडीशीं आतां सांगतों. आपला प्राचीन इतिहास फार उज्वल आहे. इ. स. चौथ्या शतकापासून

सहाव्या—सातव्या शतकापर्यंत उत्तरेकडे गुप्त साम्राज्य होऊन गेलें. त्यांच्या वेळचे अनेक ताम्रलेख व इतर लेख सांपडले असून त्यांवरून त्या वेळचा इतिहास बराच उपलब्ध झाला आहे. त्या गुप्तांपैकीं समुद्रगुप्त नामक सम्राटानें दिग्विजय करून दक्षिणेकडे सिंहल द्वीपापर्यंत आपले हातपाय पसरले. त्याच्या वेळचा एक स्तंभ अलाहाबादजवळ सापडला असून त्यावरील लेखांत " दैवपुत्र-शाहिशाहानुशाहि-शकमुरुण्डैः सैंहलकादिभिश्च आत्मनिवेदनकन्योपायनदान " इत्यादि वर्णन आहे. त्याचें तात्पर्य असें कीं दैवपुत्र म्हणजे परशियाचा राजा, शाही, तसेंच राजाचे राजे म्हणविणारे शाहानुशाहि, शक, मुरुंड, सिंहलद्वीपचा इत्यादि राजे यांना समुद्रगुप्तानें जिंकिलें असतां ते त्याला शरण आले ( आत्मनिवेदन करते झाले ) आणि त्यांनीं आपल्या कन्या त्याला दिल्या व त्यांशीं समुद्रगुप्तानें विवाह लाविले. हे राजे कांहीं हिंदुधर्मी नसून परधर्मीहि होते. दुसरें उदाहरण, दक्षिणेंत शिरसीजवळ वनवासी म्हणून राज्य होतें व तेथें कदंब नामक राजघराणें राज्य करीत होतें. त्याचा मूळ पुरुष मयूरशर्मा हा ब्राह्मण होता. त्यानें पल्लवराजाशीं युद्ध केलें व पल्लवांचा पराभव झाला. त्या नंतर कदंबराजे शर्मा पदवी टाकून वर्मा अशी पदवी आपल्या नांवापुढें क्षत्रियत्वाची खूण म्हणून लावूं लागले मयूरशर्मा याजपासून चवथा पुरुष ककुत्स्थवर्मा नांवाचा झाला. त्यानें आपल्या मुली गुप्तादि क्षत्रिय घराण्यांतील राजांना दिल्या. या घराण्याचा काळ इ. स. ६ व्या शतकाच्या सुमाराचा आहे. तिसरें उदाहरण उत्तरेकडील कनोजच्या प्रतिहार घराण्याचें. त्यांतील बाउक नामक राजाचा पूर्वज हरिश्चंद्र हा ब्राह्मण होता. त्यानें ब्राह्मण व क्षत्रिय अशा दोन स्त्रिया केल्या असून ब्राह्मणीपासून प्रतीहार ब्राह्मण व क्षत्रिय स्त्रीपासून प्रतीहार राजे झाल्याचें वर्णन आहे ( पहा एपिग्राफिआ इन्डिका व्हॉल्यूम १८ पान ८७ ). या गोष्टीचा काळ विक्रम संवत् ८९४ च्या सुमाराचा होय. लोकनाथ नांवाचा आणखी एक राजा भारद्वाज गोत्री होता. त्याचा आईकडील आजोबा केशव नांवाचा होता, तो पारशव जातीचा होता. पारशव ही जात अगदीं कनिष्ठ मानिली होती ( ब्राह्मणात्......निषादः शूद्रकन्यायां यः पारशव उच्यते ॥ मनु १०, ८ ). त्या पारशव केशवाचा बाप वीर हा ब्राह्मण होता. गुहिल घराण्याचा मूळ पुरुष गुहदत्त हा आनंदपूरचा ब्राह्मण होता, त्याच्या वंशांतील भर्तृपट्ट हा खोमाणाचा मुलगा असून त्यानें राष्ट्रकूट कन्येशीं विवाह केला व भर्तृपट्टाच्या मुलानें हरियदेवी नांवाच्या हूण कन्येशीं लग्न केलें ( इन्डिअन ॲटिक्वेरी व्हॉ. ३९ पान १९१ ). दक्षिणेंत तेराव्या शतकांत विजयानगरचें शेवटचें मोठें हिंदुसाम्राज्य होऊन गेलें. १५६५ वर्षी तालिकोट येथें ब्राह्मणी राज्याच्या पांची शाखांनीं एकत्र होऊन त्या घराण्याचा मोड केला व तेव्हा तें साम्राज्य लयाला गेलें. त्याची स्थापना १२३६ या वर्षी बुक्क नामक पुरुषानें केली. त्या बुक्काची मुलगी विरूपादेवी ही ब्रह्म किंवा बोमण्ण वोडेय या

ब्राह्मणाला दिली होती. या दांपत्याचे वंशज पुढें विजयानगरच्या साम्राज्याचे मांड-लिक झाले.

## मिश्रविवाहाचीं वाङ्मयांतील उदाहरणें

कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नाटकाचा नायक जो अग्निमित्र राजा त्याचा बाप पुष्यमित्र हा जातीनें ब्राह्मण असून बृहद्रथ मौर्याचा सेनापति होता मौर्य राजा दुबळा आहे असें पाहून पुष्यमित्रानें त्याला ठार करून त्याचें सिंहासन बळकाविलें. राजा झाल्यावरहि सेनापति हीच पदवी तो स्वतःला लावी. त्याचा पुत्र अग्निमित्र यानें मालविका या क्षत्रियकन्येशीं लग्न केल्याचें कालिदासानें वर्णिलें आहे. दुसरें उदाहरण सुप्रसिद्ध कवि बाणभट्ट याच्या पित्याचें. बाण हा जगन्नाथ पंडिताप्रमाणें रंगेल असून आणखी श्रीमंतहि होता. तो प्रवासास निघाला तेव्हां बरोबर तैनातीला जी मंडळी होती तींत त्याचे पाय चेपणारे, गोष्टी सांगणारे असे अनेक समवयस्क मित्र होते. त्यातील त्याचे दोन पारशव भाऊ होते असें स्वतः त्यानेंच हर्षचरितात सांगितलें आहे ( भ्रातरौ पारशवौ ). पारशव म्हणजे पूर्वी सांगितल्याप्रमाणें ब्राह्मण पुरुषाला विवाह केलेल्या शूद्रस्त्रीपासून झालेला पुत्र होय, केवळ दासीपुत्र ( Illegitimate Son ) नव्हे. बाणाचा बाप चित्रभानु हा बडा विद्वान् होता. व त्याच्या विवाहित स्त्रियांत एक शूद्र स्त्री होती. दहाव्या शतकाच्या प्रारंभीं कनोज येथील महेंद्रपाल नांवाच्या राजाचा गुरु राजशेखर हा मोठा कवि व साहित्यशास्त्रकार होता. हा मूळचा महाराष्ट्रीय असून पुढें उत्तरेकडे गेला. त्यानें चव्हाण वंशांतील अवन्तिसुंदरी नांवाच्या स्त्रीशीं विवाह केला होता. अवन्तिसुंदरी विदुषी स्त्री होती व राजशेखरानें कित्येक ग्रंथकारांविरुद्ध असलेलीं तिचीं मतें आपल्या ग्रंथांत नमूद केली असून आपलें मत तिच्या प्रमाणेंच असल्याचें सांगितलें आहे.

अशा प्रकारचे मिश्रविवाह म्हणजे सरसहा होत असत असें मात्र नाहीं. थोडेच तसे होत, पण होत असत एवढें खरें व ते आठव्या नवव्या शतकापर्यंत चालू होते. पुढें ते कमी होत होत अकराव्या शतकानंतर पुराणांतील कलिवर्ज्य प्रकरणामुळें बहुत-करून बंद झाले. कलिवर्ज्य गोष्टींत ‘ द्विजानामसवर्णासु कन्यासूपयमस्तथा ’ म्हणजे ब्राह्मणांनीं असवर्ण कन्यांशीं लग्न करणें ही गोष्ट बृहन्नारदीय पुराणांत सांगितली असून आदित्यपुराणांतहि ती आहे असें म्हणतात ( कन्यानामसवर्णानां विवाहश्च द्विजा-तिभिः ). हे निषेध स्मृतिचंद्रिका, हेमाद्रि, पराशरमाधव यांनींहि सांगितले आहेत; त्यावरून त्यांच्या वेळेपासून म्हणजे बाराव्या शतकापासून हे विवाह बंद पडले असें म्हणावयास हरकत नाहीं. आठव्या नवव्या शतकानंतर नवीन स्मृति होण्याचें बंद पडलें. पुराणांना प्रस्तुतचीं स्वरूपें येण्यास चवथ्या शतकापासून आरंभ झाला व दहाव्या शतकापर्यंत त्यांना प्रामाण्य आलें. या प्रामाण्यामुळें मिश्रविवाह पुढें बंद झाले.

# विवाहाचें गांभीर्य

मनुष्याच्या आयुष्यक्रमांत विवाह ही कांही तरी चावटपणाची गोष्ट नाहीं. तिला अत्यंत गंभीर स्वरूप आहे विवाह म्हणजे एक प्रकारची सोडत (Lottery) आहे ही गोष्ट खरी, पण इतर सोडतीहून ती थोडी निराळी आहे. अमेरिकेंत कांहीं संस्थानांत प्रत्येक पाच विवाहांपैकीं एकाचा तरी शेवट घटस्फोटांत होतो असें प्रसिद्ध आहे (Every fifth marriage ends in a divorce). विवाह प्रेमोत्तर असणेंच इष्ट असेल तर एक पंचमांश विवाहांत त्या प्रेमाचें रूपान्तर द्वेषांत कां व्हावें ? तेव्हां हा सिद्धांत मोठासा सयुक्तिक आहे असें वाटत नाहीं. आमच्याकडे पूर्वी (व अद्यापीहि बऱ्याच अंशीं) वधूची निवड आईबाप करीत, आतां मुलगे ती स्वतः करूं लागले आहेत. पण तेवढयानें लग्नाला असलेलें सोडतीचें स्वरूप कांहीं जात नाहीं. कारण मुलगा वधू पसंत करतो ती त्याच्या परिचित किंवा अपरिचित दहापांच मुलींतूनच करतो. ही परीक्षा चालू असतांना उभयपक्षी लपवालपवीचच प्रकार पुष्कळ वेळां चालतो. मुलगी आपल्या उणीवा झांकून भावी पति खुष होईल अशा गोष्टी त्या काळांत करणार व बोलणार आणि उलट बाजूनें भावी पत्नी खुष व्हावी असाच प्रयत्न होणार. या खटपटींत एकमेकांचे खरे स्वभाव लग्न झाल्यावर मनावरील दडपण नाहींसें होऊन उघडकीस आले, म्हणजे पतिपत्नींचे पटेनासें होतें. तेव्हां मग आपण खोटया जगांत वावरत होतों असें त्यांना समजून येतें. तात्पर्य लग्नाची कोणतीहि तऱ्हा पाहिली तरी ती एक प्रकारची सोडत आहे, प्रयोग आहे असेंच ठरतें. पण इतर सोडतींत प्रत्येक मनुष्यानें पडलेंच पाहिजे असें नाहीं. विवाहाच्या सोडतींत मात्र शेंकडा ९९ माणसांना तरी पडावेंच लागतें तसेंच इतर सोडतींत हजारों माणसांपैकीं फार थोडयांनांच बक्षीस मिळतें व इतर प्रचंड संख्येला चुरमुरे खावे लागतात. पण विवाहाच्या सोडतींत प्रत्येकाला कांहीं तरी मिळतेंच. तेव्हां प्रेमोत्तर विवाह घ्या कीं विवाहोत्तर प्रेम घ्या प्रत्येक प्रकारांत सोडत ही आहेच; प्रयोग करावयाचा व तो कसा काय वठतो हें पहावयाचें एवढेंच त्यांत असतें. आजहि झालें तरी सर्व ठिकाणीं कांहीं प्रेमोत्तर विवाह रूढ नाहींत. इंग्लंडांत सुशिक्षित मध्यम स्थितींतील लोकांत ते आहेत व अमेरिकेंत त्याचें प्रस्थ फारच झालें आहे. पण त्या प्रमाणांत जर्मनी, फ्रान्स या देशांत ते नाहींत. तेथें वडिलांच्या संमतीनेंच बरींच लग्नें ठरतात. पण अमेरिकेसारख्या ठिकाणीं प्रेमोत्तरच विवाह होत असूनहि केवळ स्वभावभेद (Incompatibility of temper) हें कारणहि घटस्फोटाला पुरें होतें. अशा रीतीनें विवाह हा क्षणिक सौद्याचा प्रश्न करावा कीं काय या गोष्टीचा गंभीरपणें विचार करणें अवश्य आहे. पूर्वी मिश्रविवाह होते म्हणून आताहि वाटेल त्यानें वाटेल त्या स्त्रीशीं प्रेमाखातर किंवा एरव्हींही लग्न करावें असें प्रतिपादन करणें समाजांतील आजच्या अनेक

बाबतींतील विषमतेकडे लक्ष देतां इष्ट नाहीं. दोन्हीं बाजूंची परंपरा व संस्कृति विवाहाच्या बाबतींत पहाणें अवश्य असतें. 'ययोरेव समं वित्तं ययोरेव समं श्रुतम्। तयोर्मैत्री विवाहश्च न तु पुष्टविपुष्टयोः ॥' असें जें महाभारतांत म्हटलें आहे त्यांत पुष्कळ तथ्य आहे.

## सुधारणेची पहिली पायरी

या बाबतींत मोठी सुधारणा घडवून आणण्यापूर्वी एकेका मोठ्या जातींत शेंकडों पोटजाती होऊन त्यामुळें सवर्ण विवाहांत देखील जी मोठी घोंड येऊन पडली आहे ती प्रथम काढून टाकिली पाहिजे. एका गुजराथ प्रांतांत पाहिलें तर तेथील ब्राह्मण वर्णांत ८४ पोट जाती असून त्यांत परस्पर विवाह संबंध होऊं शकत नाहींत. या सर्व जाती एकत्र लीन कां होऊं नयेत? धर्माची अडचण वस्तुतः या कामीं काय आहे? पण थोड्या वर्षांपूर्वी भरलेल्या काशीच्या ब्राह्मण परिषदेंत ब्राह्मणांतील विविध श्रेणींनीं परस्पर लग्नें करूं नयेत असाच ठराव करण्यांत आला! आपल्या सर्व देशांत ब्राह्मणांची संख्या सुमारें एक कोटी असावी व त्यांत २०० तरी जाती असतील; त्यांतहि भिक्षुक व गृहस्थ असे भेद करतात व त्यांत लग्नसंबंध होईनासे झाले आहेत. कांहीं पोट जातींत विवाह मुळींच होत नाहींत असें नाहीं व झाले तर त्यांना कसली आडकाठीहि नाहीं. परंतु या बाबतींत समाज अद्यापि मुग्ध आहे. वास्तव सुधारणेच्या दृष्टीनें समाजानें उघड घोषणा केली पाहिजे. ब्राह्मणांप्रमाणें तेली तांबोळी इत्यादि जातींतहि अनेक पोटजाती झाल्या असून त्यांच्यांत परस्पर लग्नें होत नाहींत. मिश्रविवाह प्रेमाच्या पायावर सरसहा रूढ करूं पहाण्यापूर्वी पोट जातींत ते सुरू करण्याचा प्रयत्न करणें इष्ट असून तें काम बरेच दिवस पुरण्याइतकें आहे.

'चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः' या गीतेंतील वचनाचा आधार घेऊन जातिसंस्था उत्पत्तिसिद्ध आहे असें सिद्ध करण्याचा प्रयत्न कित्येक पंडितांनीं केला आहे. त्यांतील सृष्टं ह्मणजे उत्पन्न केलें या शब्दावर जोर देऊन जाति या अगदीं सृष्टीच्या आरंभापासून आहेत, असें ते प्रतिपादन करतात. सारासार विचाराला तर हें पटणार नाहींच. पण मीमांसाशास्त्र देखील असा अर्थ मान्य करणार नाहीं. कारण या वचनांत दोन वाक्यें करावीं लागतील व वाक्यभेद होईल; चातुवर्ण्य हें गुणकर्मविभागामुळें होतें व तें सृष्टीच्या आरंभापासून उत्पन्न केलें आहे या दोन गोष्टी एकाच वाक्यात ग्रथित केल्या आहेत. चातुवर्ण्यच काय पण सृष्टींतील सगळ्याच गोष्टी परमेश्वरानें उत्पन्न केलेल्या आहेत. पण त्यावरून त्या जशाच्या तशा आरंभापासून उत्पन्न झाल्या असें ह्मणतां येईल काय? जातिसंस्थेला हीच गोष्ट लागू आहे. वास्तव पोट जातींचे एकीकरण

करून एकंदर जातिसंख्या प्रथम कमी केली पाहिजे. तसें न करतां एकदम मोठ्या गड्डयाला हात घातल्यास एकी ब्रेकीसारखीं प्रकरणें फारच तीव्रतेनें उत्पन्न होऊन अनवस्था मात्र माजेल. ज्याक्रमानें जातिसंख्या वाढत गेली, त्याच्या उलट क्रमानें ती कमी करीत गेलें पाहिजे. लग्न हें स्वास्थ्य व एकतानता यांसाठीं आहे. तो हेतू जेणें करून साधेल तें केलें पाहिजे. ‘ न विशेषोऽस्ति वर्णानां सर्वं ब्राह्ममिदं जगत् ’ ( महाभारत शान्तिपर्व १८८. १० ) असल्या व्यापक तत्वांचा सरसहा एकदम उपयोग आजच्या स्थितींत होणार नाहीं. आज ३००० जाती झालेल्या आहेत, त्याच्या आधीं चार करूं आणि मग चारांची एक करितां आल्यास करूं. तात्पर्य असवर्ण विवाह अयोग्य नसले तरी त्यांत आज अशा अनेक अडचणी आहेत हें विसरतां कामां नये.

कांहीं जणांनीं मला विचारिलें कीं, येथें पुरीच्या शंकराचार्यांची व्याख्यानें होतात, त्यांना हजर राहून त्यांना उत्तर देण्याचें काम तुम्ही कां करीत नाहीं ? पण यावर माझें उत्तर एवढेंच आहे कीं, ग्रंथांमध्यें मला काय आढळलें तें आपल्या पुढें मांडावयाचें असून कोण काय म्हणतो हें ऐकून त्याला उत्तरें देत बसावयाचें नाहीं. शिवाय शंकराचार्यांसारख्यांच्या स्थानाचा विचार करतां तसें करणें प्रशस्तहि नाहीं. असो.

जातींच्या एकीकरणाच्या प्रश्नांतील इतर अडचणींबरोबर खाण्यापिण्यांतील भेद ही एक मोठी अडचण आहे. मांसाहारी आणि शाकाहारी लोकांचें विवाहाच्या बाबतींत ऐक्य होणें दुष्कर आहे. पण असल्या अडचणी आणखीं शंभर वर्षांनीं नाहींशा होतील. रसायन शास्त्राच्या वाढीबरोबर अन्नाचा प्रश्न हळुहळू सुटेल. हवेंतून नैट्रोजन काढून त्यापासून पोषक अन्नें बनविण्यांत येतील व तीं सर्वांनाच घ्यावीं लागतील व भक्ष्य प्राण्यांची संख्याहि इतकी कमी होईल कीं मांसाहार करणें तेव्हां कठीण होऊन बसेल. पण अशी स्थिति येईपर्यंत काय करावयाचें ? आपली आजची परिस्थिति डोळे उघडून पहावयाची व तींत जे प्रश्न निकडीचे ( Burning questions ) म्हणून असतील तेवढेच शक्य तितक्या तडजोडीनें कसे सोडवितां येतील याचा विचार करावयाचा.

## सती.

आतां विवाहविषयक उरलेल्या प्रश्नांपैकीं सतीचा प्रश्न घेऊं. लॉर्ड बेंटिकनें केलेल्या सतीच्या कायद्यानें हिंदु धर्मावर पहिला हल्ला चढविला. या कायद्यानें सती जाण्याचा प्रयत्न करणाऱ्या स्त्रीस आत्महत्येच्या प्रयत्नाबद्दल शिक्षा सांगितली असून तिला सती जाण्यासाठीं फूस देणारांस कडक शिक्षा ठरविण्यांत आली आहे. पण आतां हा प्रश्न चर्चेच्या कक्षेबाहेर मान्यता पावला असून ऐतिहासिक झाला आहे.

सतीची चाल एका हिंदुस्थानांतच होती असें नसून ती इंडो जर्मानिक म्हणजे हिंदी आर्य व जर्मन आर्य यांचे पूर्वज एकत्र होते तेव्हांहि त्यांच्यांत होती असें ' इतिहास-पूर्वकालीन प्राचीन वृत्त ' ( Prehistoric Antiquities पान ३९ ) या ग्रंथांत श्रेडरनें ( Schrader ) दाखविलें आहे. त्या लोकांच्या सर्व वंशजांच्या भाषांत जिचा पति मृत झाला आहे अशा स्त्रीला एकच शब्द आढळतो; संस्कृत विधवा, इंग्लिश वुइडे (Widow) व लॅटिन विडुआ (Vidua). लोकांच्या कोणत्याहि आचाराच्या मागें कांहीं एक तत्वज्ञान असतें. तसें सतीच्या बाबतींतहि होतें. मनुष्याला ज्या गोष्टी या लोकीं लागतात, त्या त्याला परलोकींहि पाहिजेत, ही कल्पना सतीच्या मुळाशीं होती. आपल्या तत्वज्ञानांत स्थूल शरीराशिवाय आत्म्याचें आणखी शरीर सांगितलें आहे. तें लिंग शरीर किंवा सूक्ष्म शरीर हें आहे. वेदातसूत्रांत ' तदन्तरप्रतिपत्तौ रंहति संपरिष्वक्तः प्रश्ननिरूपणाभ्याम् ' । ( ३, १, १ ) या सूत्रांत जीव लिंगशरीरानें युक्त होत्साता दुसऱ्या देहांत जातो, असें सांगितलें आहे. मनुष्य मृत झाल्यावर स्वर्गांत जातो तो या लिंगशरीरानें जातो व तेथें त्याला सर्व गोष्टी पाहिजे असतातच. इहलोकीं त्याला स्त्री पाहिजे, तशी तेथेंहि पाहिजे या कल्पनेनें त्याच्यावर येथें प्रेम करणारी स्त्री परलोकींहि त्याच्या बरोबर असण्याची इच्छा करी. प्रेम करणाऱ्या स्त्रियाच तेवढ्या या कल्पनेनें आत्मदान करीत किंवा करितात असें नाहीं. जपानचा माजी मिकाडो मरण पावला, तेव्हां रूसो–जपानी युद्धांत प्रसिद्धी पावलेला जपानी सेनापती जनरल नोगी यानें दुःखावेगानें स्वतःची तरवारीनें हत्या करून घेतल्याचें प्रसिद्धच आहे. बादशहावर त्याचें तसेंच प्रेम होतें, तेव्हां असला विश्वासू सेनापति त्याला स्वर्गांतहि पाहिजे अशा कल्पनेनें त्यानें ही आत्महत्या केली व असे अन्यहि प्रकार पुष्कळ घडतात.

सतीची चाल ऋग्वेदापूर्वी होती, पण पुढें ऋग्वेदाच्या व अथर्ववेदाच्या काळीं ती बंद होऊन नंतर कांहीं काळानें पुनः चालू झाली. तिचा विशेष प्रचार मात्र बंगालमध्यें तेथील विशिष्ट परिस्थितीमुळें झाला. ऋग्वेदांत ( १०,१८,७ ) ' इमा नारीरविधवाः सुपत्नीराञ्जनेन सर्पिषा संविशन्तु । अनश्रवोऽनमीवाः सुरत्ना आरोहन्तु जनयो योनिमग्रे ॥ ' या ऋचेंत मृतपतीबरोबर स्मशानांत गेलेल्या स्त्रियाना ( जनयः ) अश्रु न गाळतां व डोकें फोडून न घेतां ( अनश्रवः अनमीवाः ) तसेंच अंगावरील रत्नें काढून न ठेवतां घरीं परत यावयास सांगितलें आहे. त्या वेळीं स्त्रियाहि मृताबरोबर स्मशानांत जात. मृताला चितेवर ठेविल्यावर त्याच्या स्त्रीला उत्तर बाजूला बसवीत ( उत्तरतः पत्नीं संवेशयन्ति । धनुश्च क्षत्रियस्य । तामुत्थापयद् देवरः पतिस्थानीयो ऽन्तेवासी जरद्दासो वा ' उदीर्ष्व नार्यभि जीवलोकम् ' ( ऋ. १०, १८, ८)*

* उदीर्ष्व नार्यभि जीवलोकं गतासुमेतमुप शेष एहि । हस्तग्राभस्य दिधिषो स्तवेदं पत्युर्जनित्वमभिसंबभूथ ।

इति ]. नंतर तिचा दीर किंवा दुसरा कोणी ‘ हे स्त्रिये, या मृताजवळ तूं शयन केलें आहेस, तरी ऊठ आणि या जीवलोकाकडे ( घराकडे ) चल ’ इत्यादि मन्त्र ह्मणून तिला परत आणी, असा विधि आश्वलायनगृह्यसूत्रांत सांगितला आहे ( ४, २, १६–१९ ). त्यावरून त्यापूर्वी स्त्रिया मृत पतीबरोबर सती जात व पुढें ती चाल बंद झाली असें दिसून येतें. अथर्ववेदांत ( १८, ३, १ ) ‘ हे मृत पुरुषा, ही स्त्री पतिलोकाची इच्छा करणारी तुझ्या मृतशरीराजवळ पुराण धर्माला अनुसरून पडली आहे ’ ( इयं नारी पतिलोकं वृणाना निपद्यते उप त्वा मर्त्य प्रेतम् । धर्मं पुराणमनुपालयन्ती तस्यै प्रजां द्रविणं चेह धेहि ॥ ) असा मंत्र आला आहे त्यावरूनहि सतीची चाल पूर्वी असून ती त्या वेळीं बंद झाली होती असा बोध होतो. पण वेदपूर्वकालीं चालू असलेला हा प्राचीन धर्म जुन्या धर्मसूत्रांत नाहीं. विष्णुधर्मसूत्रांत मात्र त्याचा उल्लेख आहे. मनूला स्त्रियांचा विरोधी असा कित्येकजण मानतात ( वस्तुतः तसा तो नाहीं ) पण त्यानेंहि त्यांना सहगमन न सांगतां ब्रह्मचर्यच सांगितलें आहे. तो ह्मणतो ‘ मृते भर्तरि साध्वी स्त्री ब्रह्मचर्ये व्यवस्थिता । स्वर्गं गच्छन्त्यपुत्राऽपि यथा ते ब्रह्मचारिणः ॥ ’ (५,१६०). विष्णुधर्मसूत्रांत ‘ भर्तरि मृते ब्रह्मचर्यमन्वारोहणं वा ’ असा विकल्पच दिला आहे. ब्राह्मण स्त्री पति मृत झाला असतां दूर असेल, तर तिला सहगमन करतां येत नसे; पण क्षत्रिय लढाईत मेल्यास त्याच्या स्त्रीला त्याच्या पादुका घेऊन अनुगमन करतां येई, परन्तु गर्भिणी स्त्री, जिचें अपत्य लहान आहे, अशा स्त्रियांना सतीची बंदी होती. अशी ही सतीची चाल इ. सनाच्या आरंभापासून झाली असें दिसतें.

कालिदासानें सतीच्या चालीचा उल्लेख कुमारसंभवांत रतीच्या कथेंत व रघुवंशांत कुशाच्या कथेंत केला आहे. शंकरानें मदनाला भस्म करून टाकल्यावर त्याचा मित्र वसंत रतीच्या समाचारासाठीं आला असतां ती त्याला आपण सती जाणार असें ह्मणून चिता रचावयास सांगते ( कु. ४, ३४ ), पण मदन पुनः जीवंत होईल अशी आकाशवाणी झाल्यामुळें ती सती मात्र गेली नाहीं. कुश हा दैत्याशीं झालेल्या युद्धांत मारला गेला असतां त्याची स्त्री कुमुद्वती सती गेली ( रघु. १७, ६ ). महाभारतांतहि सतीचा उल्लेख आहे. पांडूची पत्नी माद्री त्याच्या बरोबर सती गेली (आदिपर्व १२५. २९ ). शांतिपर्वांत ( अध्याय १४८ ) पातिव्रतेचा महिमा सांगतांना कपोती आख्यानांत कपोत मृत झाला असतां कपोतीनें आपल्याला जाळून घेतलें व तेणेंकरून पतीसह तिला दिव्यरूप प्राप्त झालें अशी कथा आहे. महाभारतांत मौसल पर्वांत ( अध्याय ७. ७३–७४ ) श्रीकृष्णाच्या भार्यांपैकीं रुक्मिणी, गांधारी, शैब्या, हैमवती व जांबवती यांनीं अग्नि–प्रवेश केला असें वर्णन आहे. सहाव्या शतकाच्या सुमारास होऊन गेलेला ज्योतिषी वराहमिहिर हा स्त्रियांचा मोठा कैवारी होता. स्त्रियांची निंदा करणारांना त्यानें फार उत्कृष्ट टोमणे मारिले आहेत. “ प्रत्येक पुरुषाचा

आई किंवा पत्नी अशा या नाहीं त्या रीतीनें स्त्रीशीं संबंध येतोच तेव्हां त्यांची निंदा करणारे कृतघ्न होत, स्वतः चोरी करून ' अरे चोराला पकडा ' असें ओरडणाऱ्या चोरासारखेच ते होत, अशा दुष्ट निंदकांना सुख प्राप्त कसें होणार ?" असा त्याचा प्रश्न आहे. तो ह्मणतो,

जाया वा स्याज्जनित्री वा संभवः स्त्रीकृतो नृणाम् ।
हे कृतघ्नास्तयोर्निन्दां कुर्वतां वः कुतः सुखम् ॥
अहो धाष्ट्र्यमसाधूनां निन्दतामनघाः स्त्रियः ।
मुष्णतामिव चौराणां तिष्ठ चौरेति जल्पताम् ॥

पुरुष एकान्तांत स्त्रीपाशीं गोड गोड बोलतो, पण ती मेल्यास पुढें कांहीं नाहीं, स्त्रिया मात्र पतीशीं नित्य कृतज्ञ राहून शेवटीं ते मृत झाले असतांहि त्यांच्या शरीराला कवटाळून अग्नींत प्रवेश करतात असें त्यानें ह्मटलें आहे ( बृहत्संहिता ७४, १६ पुरुषश्चटुलानि कामिनीनां कुरुते यानि रहो न तानि पश्चात्। सुकृतज्ञतयांऽगना गतासूनवगूह्य प्रविशन्ति सप्तजिह्वम् । ). बाणभट्टानें हर्षचरितांत सतीचा निर्देश केला आहे. हर्षचरिताचा नायक जो हर्ष त्याची आई यशोमती सती गेली तेव्हांचें अत्यंत हृदयद्रावक वर्णन बाणानें केलें आहे. कादंबरींतहि त्यानें त्या चालीचा उल्लेख करून तिचा मोठ्या वक्तृत्वपूर्ण भाषेंत निषेध केला आहे. तो ह्मणतो, यदेतदनुमरणं नाम तदतिनिष्फलं, अविद्वज्जनाचरित एष मार्गः । इ०

सतीच्या चालीची ऐतिहासिक उदाहरणेंहि मीं बरींच जमविलीं आहेत पण त्यांतील एकदोनच येथें सांगतों. इ. स. ५१० या वर्षाच्या एरण येथील गोपराजाच्या शिलास्तंभावरील लेखांत त्याची राणी सती गेल्याचें सांगितलें आहे. म्हैसूरमधील बेलतुरु येथील शके ९७९ या वर्षाच्या शिलालेखांत एक शूद्र स्त्री सती गेली व तिच्या बापानें तिच्या स्मरणार्थ तेथें वीरगल उभारला असें वर्णन आहे ( एपिग्राफिआ इंदिका व्हॉ. ६ पान २१३ ). थोरले माधवराव पेशवे यांची स्त्री रमाबाई थेऊर येथें सती गेली हें इतिहासांत प्रसिद्धच आहे. तेथें तिच्या समाधीला लोक नवसहि करतात. कमलाकरभट्टानें आपल्या ग्रंथात उमानामक आईला वंदन करतांना तिनें दक्षकन्या सतीप्रमाणें अग्निप्रवेश करून तिच्याशीं स्पर्धा केली असें ह्मटलें आहे ( स्पर्धामग्निनिवेशादुमया प्राप्तामुमासमाख्यातः । द्युनदीं निर्मलचित्तां मातरमेकां सतीं सदा वन्दे ।)

पण कोणत्याहि संस्थेच्या नाशाचें बीज तिच्या अतिरेकांत असतें. बंगाल्यांत इतर प्रांतांच्या मानानें स्त्रियांना अविभक्त कुटुंबांतही हक्क अधिक आहेत. त्यामुळें कुटुंबाच्या मिळकती त्यांचेकडे जाऊं लागल्या हें त्यांच्या दीरांना वगैरे पहावेना. त्यामुळें स्त्रियांना सती घालवून त्यांचा काटा काढून टाकण्याचे प्रयत्न तिकडे वाढूं लागले व वर्षास ८०० पर्यंत स्त्रिया सती जाऊं लागल्या ! हा भयंकर प्रकार लॉर्ड

बेंटिंकच्या हाती आला तेव्हां त्यानें सतीचा कायदा करून ती चाल १८२९ सालीं बंद केली. झालें हें ठीक झालें. पण सतीच्या चालींत मूळ जबरदस्ती नव्हती. स्त्रीनें पतिमरणानंतर सती गेलेंच पाहिजे असें कोणी ह्मटलेलें नाहीं. युद्धप्रसंगीं जसें वीरापुढें मरेन किंवा मारीन असें ध्येय असतें, तसेंच स्त्रियांपुढें पतिव्रताधर्मानुसार हें ध्येय होतें. देशासाठीं मरावें असें म्हणतात, तेव्हां प्रत्येक जणावर मरण्याची सक्ति करण्याचा हेतु नसतो. आमचीं शास्त्रें पुरुषांनीं लिहिलीं ह्मणून स्त्रियांच्या पुढें असें ध्येय त्यांनीं ठेवलें. बायका शास्त्रकार असत्या तर त्यांनीं उलट पत्नीमरणानंतर पुरुषानें सहगमन करणें उत्तम असें कदाचित लिहिलें असतें; नाहीं कोणी म्हणावें ! !

हल्लींच्या तरुण पिढींतील बऱ्याच जणांचा प्राचीन धर्मसमजुती व चाली यांवरील विश्वास तर उडाला आहेच, पण ईश्वराबद्दलहि ही मंडळी साशंक असून भौतिक शास्त्रांच्या कर्तबगारीविषयीं मात्र तिला फाजील आदर व विश्वास वाटूं लागला आहे. पूर्वीची धार्मिक कल्पना गेली व तिच्या जागीं तशी दुसरी उपयुक्त अशी जोराची कल्पना आली नाहीं. त्यामुळें स्त्रीपुरुषांच्या जीवनाचें नियंत्रण जन्मापासून लैंगिक भावनांनींच होत असतें असे विचार प्रकट होऊं लागले. पण भौतिक शास्त्रांवर फाजील भर देण्यांत अर्थ नाहीं. पूर्वीच्या भौतिक शास्त्रीय कल्पना आज बदलल्या आहेत, तशा आजच्या शास्त्रीय कल्पनाहि उद्यां बदलतील. तेव्हां त्यांवरच सारा भर न ठेवितां प्रत्येकानें आपलें म्हणून कांहीं तत्त्वज्ञान ठरवून त्याशीं सुसंगत असें वर्तन ठेविलें पाहिजे. पूर्वीच्या धार्मिक व तात्त्विक कल्पनांप्रमाणें विवाहाला अत्यंत पावित्र्य होतें. त्या कल्पना जाऊन धार्मिक श्रद्धा डळमळली व त्यामुळें विवाहाचें पावित्र्य कमी होत चाललें. सामान्यतः मनुष्य प्राणी नैतिक ( Moral ) बंधनांनीं चालूं इच्छितो. शेंकडा ९० माणसें किंवा अधिकहि चांगलीं, निर्बन्ध पाळण्याला तयार अशीं असतात. पण पूर्वपरंपरा सुटली म्हणजे कांहीं काळ असा अविचाराचा येतो. त्यावेळीं जपलें पाहिजे.

आतां पुढील व्याख्यानांत पुनर्विवाह, घटस्फोट, पुत्रप्रतिनिधि व संकरजाति इत्यादि विवाहासंबंधीं उरलेल्या गोष्टींचा विचार करूं.

---

नवव्या व्याख्यानांत मिश्रविवाह, तत्संबंधीं प्रचलित कायदे व हायकोर्टाचे ठराव, सती इत्यादिकांचा विचार झाला. प्रस्तुत व्याख्यानांत विवाहविषयक उरलेल्या गोष्टी ह्मणजे विधवाविवाह, घटस्फोट, विविध पुत्र इत्यादींचा विचार करून विवाहाचा विषय पुरा करूं व त्यानंतर मिश्रजातींचा प्रश्न पुढील व्याख्यानांत घेऊं.

## विधवा-पुनर्विवाह.

विधवा-पुनर्विवाहाच्या प्रश्नावर पूर्वी पुण्यास शास्त्रीय दृष्टीनें मोठा वाद झाला. त्यावेळीं पंचांपैकीं पांच प्रतिकूल आणि पांच अनुकूल अशीं मतें पडल्यामुळें शेवटीं सरपंचांनीं विरुद्ध मत दिलें व अशा रीतीनें विधवा-पुनर्विवाह अशास्त्र आहे असा ठराव झाला. पण सरकारानें १८५६ सालीं विधवा विवाह कायदेशीर ठरविण्याचा कायदा केला. सतीच्या नंतर हा धार्मिक बाबतींतील आणखी एक हल्ला होय. त्याच-प्रमाणें लग्न मोडण्याचा कायदाहि ( Indian Divorce Act ) करण्यांत आला. मात्र तो खिस्ती लोकांनाच लागू आहे, हिंदु मुसलमानांना नाहीं. असो. विधवा-विवाहासंबंधान श्रुतींत व स्मृतींत काय आढळतें तें आतां पाहूं. मी आपल्यापुढें दोन्ही बाजू मांडणार आहे व निर्णयाचें काम आपल्यावरच सोंपविणार आहें.

## स्त्री पुनर्विवाहाला अनुकूल वचनें

विधवा-विवाहाविषयींचीं वचनें ऋग्वेदांत थोडींच आहेत. ' को वां शयुत्रा विधवेव देवरम् ' या वचनांत [ ऋ. १०, ४०, २ ] विधवेचा दिराशीं संबंध दर्शविला आहे. ऋग्वेदांत विधवा हा शब्द अनेकदां येतो. प्रस्तुत वचनांत नियोगाचा निर्देश असला पाहिजे. पण नियोग ह्मणजे पुनर्विवाह नव्हे. नियोगांत पुत्र प्राप्तीपुरताच संबंध असतो आणि तो पुत्रहि त्या स्त्रीच्या मूळ पतीचाच समजत. तेव्हां विधवाविवाहाचें निश्चित अनुमान करतां येईल असें वचन ऋग्वेदांत नाहीं ह्मटलें तरी चालेल. पण अथर्ववेदांतील दोन मंत्रावरून तसें अनुमान करावेंसें वाटतें. त्यांतील एक मंत्र असा आहेः-' या पूर्वं पतिं वित्त्वाऽथान्यं विन्दतेऽपरम् । पञ्चौदनं च तावजं ददातो न वि योषतः । ' ( ९, ५, २७ ) जी स्त्री पहिला पति मिळाला असतां ( त्याच्या नंतर ) दुसरा पति मिळविते तिनें बोकडाचें मांस व भाताचे पांच हवि द्यावे म्हणजे त्या पतिपत्नीचा वियोग होत नाहीं. मांस व भात यांचे दान प्रायश्चित्त ह्मणून होतें. अर्थात प्रथम विवाहाच्या मानानें स्त्रियांचा द्वितीय विवाह गौण मानीत हें उघड आहे. या मंत्राच्या पुढचा मंत्र ' समानलोको भवति पुनर्भुवाऽपरः पतिः । योजं पञ्चौदनं दक्षिणाज्योतिषं ददाति ' असा असून त्यांत विधवेचा दुसरा पति त्या दानाच्या योगानें तिचा समानलोक होतो असें ह्मटलें आहे. अथर्ववेदांत आणखी असा मंत्र आहेः-' उत यत् पतयो दश स्त्रियाः पूर्वे अब्राह्मणाः । ब्रह्मा चेद् हस्तमग्रहीत् स एव पतिरेकधा । '(५,१७,८) याचा अर्थ मात्र नीट लागत नाहीं. 'स्त्रीला पूर्वीचे दहा पति जरी अब्राह्मण असले, तरी जर ब्राह्मण तिचें पाणिग्रहण करील, तर तोच तिचा श्रेष्ठ ( एकच एक ) पति होय,' असा या मंत्राचा सरळ अर्थ होतो. पण यांत पाहिले दहा पति ह्मणजे कोण ? ऋग्वेदांत स्त्रीचे प्रथम तीन देव पति असतात असें वर्णन आहेः-' सोमः प्रथमो विविदे

गन्धर्वो विविद उत्तरः । तृतीयो अग्निष्टे पतिस्तुरीयस्ते मनुष्यजः । ' ( १०,८५, ४० ) पहिला पति सोम, दुसरा गंधर्व व तिसरा अग्नि. त्यांच्या नंतर चवथा पति मनुष्य होय. अशा रीतीचा दहा पतींचा अर्थ घेतला तर त्यांत पुनः अब्राह्मण शब्द नडतो. त्यावरहि देव हे अब्राह्मणच होत अशी कोटी कोणी लढवील तर त्याला पुढील मंत्र आड येतो. तो मंत्र ' ब्राह्मण एव पतिर्न राजन्यो न वैश्यः । तत्सूर्यः प्रब्रुवन्नेति पञ्चभ्यो मानवेभ्यः । ( अ. वे. ५, १७, ९ ) असा आहे व त्यांत अनुलोम विवाहाचा उल्लेख आहे असें दिसतें. ब्राह्मण स्त्रीला ब्राह्मणच पति असला पाहिजे, क्षत्रिय किंवा वैश्य नाहीं असें पांची मनुष्यवर्गांना सांगत सूर्य फिरत असतो. या ह्मणण्याचा विचार केल्यास ब्राह्मण पति हाच इतर पतींहून श्रेष्ठ होय असाच त्या मंत्राचा अर्थ संभवतो. त्यांत दहा शब्द अक्षरशः घ्यावयाचा नसून लक्षणेनें घ्यावयाचा असावा. अशा प्रकारच्या अर्थाला प्रौढिवाद ह्मणतात. पूर्वीचे दहा पति असले तरी त्यांची काय कथा, ब्राह्मणानें तिचें पाणिग्रह केल्यास तोच खरा पति, असा एकंदरींत त्या मन्त्राचा अर्थ दिसतो. 'न पथिव्यां अग्निश्चेतव्यः नान्तारिक्षे न दिवि' ( पृथ्वीवर ह्मणजे जमिनीवर अग्नि पेटवूं नये ) ह्मणजे जसा नुसत्या जमिनीवर तो पेटवूं नये [ तर खालीं सुवर्ण ठेऊन त्यावर पेटवावा ] असा अर्थ घ्यावयाचा तसाच हाहि प्रकार होय. स्त्रीपुनर्विवाहासंबंधी आणखी एक गमक तैत्तिरीय ब्राह्मणांत [ ३,४,४,१ ] दिधिषूपति या शब्दात सांपडतें. दिधिषूपति म्हणजे पुन्हां लग्न केलेल्या स्त्रीचा पति ( पुनर्भूर्दिधिषूरूढा द्विस्तस्यां दिधिषूः पतिः ). स्त्रीपुनर्विवाह विषयक अधिक उल्लेख श्रुतींत मला आढळले नाहींत. या बाबतींत लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट अशी आहे कीं एकंदरींत मिश्रविवाहाचे उल्लेख व उदाहरणें प्राचीन वाङ्मयांत हजारों सांपडतात, पण विधवाविवाहाचीं फारच थोडीं आढळतात. एक पत्नी मृत झाल्यास पुरुषानें दुसरा विवाह अवश्य करावा असें धर्मशास्त्रांत मुद्दाम सांगितलें आहे. पण उलट स्त्रीसंबंधानें असा विधि कोठें दिलेला नाहीं. मनूनें ' भार्यायै पूर्वमारिण्यै दत्वाग्नीनन्त्यकर्मणि । पुनर्दारक्रियां कुर्यात् पुनराधानमेव च । [ ५, १६८ ] पूर्वी मृत झालेल्या भार्येला अन्त्य संस्कार दिल्यावर पुरुषानें पुन्हां दुसरी पत्नी करावी व अग्न्याधानहि करावें असें सांगितलें आहे. यांतील पहिली गोष्ट पुष्कळ जण करतात, पण दुसरीचा मात्र आतां लोप झाला आहे. असा भेद प्रथम नसावा. पण पुरुष शास्त्रकार आणि अग्निहोत्र व पुत्र यांची पारलौकिक सुखासाठीं वाटणारी आवश्यकता यामुळें पुरुषांच्या द्वितीय विवाहाची आवश्यकता प्रतिपादण्यांत आली. प्रथम स्त्रियांची पदवी पुष्कळ बाबतींत पुरुषांच्या बरोबरीची होती. पण ' स्त्रीशूद्राश्च सधर्माणः ' अशी कल्पना झाली व भगवद्गीतेंतहि तिचाच अनुवाद होऊन स्त्री वर्गाला वैश्यशूद्रांच्या पंक्तीस बसविण्यांत आलें. ' स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् । ' असें गीतेंत म्हटलें आहे, त्यांत हाच ध्वनि आहे. पण पूर्वी

पंडित पुरुषांप्रमाणें पंडिता स्त्रियाहि होत्या. तथापि ' पंडिता कन्या ' म्हणजे गृहकर्मांत दक्ष अशी कन्या असा अर्थ आद्य शंकराचार्यांसारखे करूं लागले. पंडित पुरुषाच्या बाबतींत मात्र पंडित म्हणजे गृहकर्मदक्ष असा अर्थ करीत नसत ! ' यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात् ', ' नापुत्रस्य लोकोऽस्ति ' अशा कल्पनांमुळें अग्निहोत्रासाठीं व पुत्रप्राप्तीसाठीं एका स्त्रीनंतर दुसरी करणें अवश्य वाटूं लागलें. पण ' नाग्निं मुखेन उपधमेत् ' म्हणजे अग्नी । तोंडानें फुंकूं नये, हें विसरून विड्या ओढण्याचा प्रकार मात्र हल्लीं जारी चालू झाला. स्त्रिया पंडित असल्याबद्दल मंडनमिश्राची पत्नी शारदा साक्ष देईल. शंकराचार्य व मंडनमिश्र यांमध्यें वाद झाला तेव्हां मंडनमिश्र हरला असतां शारदा पुढें येऊन म्हणाली, पतीला जिंकलें तरी मला जिंकल्याशिवाय वाद पुरा झाला असें होत नाहीं. अर्थात् या कथा काल्पनिक होत. कारण मंडनमिश्र व शंकराचार्य यांमध्यें शंभर वर्षांचें तरी अंतर आहे. तात्पर्य पुनर्विवाहाचीं उदाहरणें फार कमी असण्याचें कारण स्त्रियांविषयींच्या कल्पनेंत दिसून येतें. आता पूर्वींच्या संततीविषयींच्या कल्पना गेल्या आहेत. ' बहुप्रजा निर्ऋतिमाविवेश ' ( बहुप्रज असा दैत्य नरकांत गेला ) असें जें ऋग्वेदांत म्हटलें आहे, तें थोड्या निराळ्या अर्थानें म्हणजे ' पुष्कळ संतति असणारा नरकात ( संकटांत ) जातो ' अशा अर्थानें लावण्याची वेळ आली आहे. म्हणून आतां पुरुषाच्या दुसऱ्या लग्नावरहि नियंत्रण घातलें पाहिजे. नाटककार देवलांनीं ' पन्नाशीची झुळुक लागली बाइल दुसरी करूं नको ' या वचनाचा पुरस्कार आपल्या नाटकांत केला, पण याहूनहि खालीं आलें पाहिजे. ' अनाश्रमी न तिष्ठेत क्षणमेकमपि द्विजः ' हें दक्षस्मृतींतील वचन लागू करूं नये.

## विधवांचे दोन मार्ग

शास्त्रकारांतहि कांहीं विचारी व दयाळू होते. त्यांनीं विधवांचें दोन वर्ग, बालविधवा व प्रौढ विधवा, असे केले व बालविधवांच्या दृष्टीनें पुनर्विवाहाची व्यवस्था सांगितली. वसिष्ठधर्मसूत्रांत ' पाणिग्राहे मृते बाला केवलं मंत्रसंस्कृता । सा चेदक्षतयोनिः स्यात्पुनः संस्कारमर्हति ।' ( १७, ७४ ) असें सांगितलें आहे. मंत्रसंस्कार पूर्ण झाल्यावरहि जर पति मृत्यु पावला तर अक्षतयोनि विधवा असल्यास तिचा पुनः विवाह संस्कार करावा. पण विधवाविवाहाविषयी हल्लींचे शास्त्री म्हणणार कीं, वसिष्ठाचें वचन हल्लींच्या काळीं लागू नाहीं. कायद्यांत जशा कांहीं कल्पना ( Fictions ) अर्थ करण्याच्या कामीं योजतात तशा धर्मशास्त्रनिर्णयांतहि कांहीं कल्पना लावतात. अमुक एक वचन आज लागू नाहीं, किंवा अमुक गोष्टी कलिवर्ज्य प्रकरणांत येतात, ही अशीच एक कल्पना आहे. बोधायन धर्मसूत्र व ब्रह्मपुराण यांतहि बालविधवेचा पुनर्विवाह सांगितला आहे. वसिष्ठानें पुनर्भूचा अर्थ ' या च क्लीबं पतिमुन्मत्तं वा

भर्तारमुत्सृज्यान्यं पतिं विन्दते मृते वा सा पुनर्भूर्भवति '। म्हणजे जी नपुंसक किंवा उन्मत्त पतीचा त्याग करून दुसरा पति वरिते किंवा पहिला पति मृत झाला असतां तसें करिते ती पुनर्भू होय, असा केला आहे. बोधायन ह्मणतो ' यदि सा बालविधवा बाला त्यक्ताऽथवा क्वचित् । तदा भूयस्तु संस्कार्या गृहीता येन केन चित् ।' ( ४, १ १८ ). ब्रह्मपुराणहि तसेंच ह्मणतें. म्हणजे सप्तपदी झाली तरी देखील पुनः संस्कार करावा असें त्याचें म्हणणें दिसतें. पण नारदानें प्रौढ विधवानाहि विशिष्ट परिस्थितींत पुनर्विवाह सांगितला आहे. ' नष्टे मृते प्रव्रजिते क्लीबे च पतिते पतौ । पंचस्वापत्सु नारीणां पतिरन्यो विधीयते ॥ ' हें नारद वचन पराशरस्मृतींत आलें असून अग्निपुराणांत तें घेतलेलें आहे. पति नाहींसा झाला, मृत झाला, त्यानें संन्यास घेतला, तो नपुंसक असला किंवा एखादें महापातक करून पतित झाला तर अशा आपत्तींत स्त्रियांना दुसरा पति करतां येतो. पूर्वीचीं महापातकें मनूनें ' ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वंगनागमः । महान्ति पातकान्याहुः संसर्गश्चापि तैः सह ।' अशीं दिलीं आहेत; पण त्यांतील सुरापान हें आतां शिष्टाचारांत येऊं लागल्यासारखें दिसतें आहे. या मनुवचनातील शब्दांवर कोटी करून रामाच्या राज्यांतहि पंचमहापातकें होतीं अशी गमतीची गोष्ट चंपूकारानें दिली आहे. ' जरा द्विजघ्नी मधुपो मिलिंदः स्वर्णापहारी ललनांगवर्णः । पटस्तथासीद् गुरुतल्पगामी । ' म्हातारपण द्विजांचा म्हणजे दातांचा नाश करी, भुंगे मधु ( दारु ) पान करीत, स्त्रियांची अंगकांति सोन्याच्या रंगाची चोरी करी व पट म्हणजे शयनावरील वस्त्र ( चादर ) गुरुच्या शयनावर जाई अशा प्रकारें मात्र हीं महापातकें घडत, इतरप्रकारें नसत, असें ह्मणून कवीनें रामराज्याची महती गाइली आहे. असो.

नारदाच्या वचनाचा अनुवाद पराशरानें केला असून, ' कलौ पाराशराः स्मृतः ' म्हणजे कलियुगांत पराशरस्मृति प्रमाण मानावी असें सांगितलें आहे. तेव्हां या वचनाची व्यवस्था काय करावी असा विचार पडला असतां मेधातिथीनें ' पतिरन्यो विधीयते ' यांतील पति म्हणजे पालनकर्ता असा अर्थ करून टाकला. पण ' पतिते पतौ ' यांत मात्र पति म्हणजे नवरा असें तो म्हणतो ! याज्ञवल्क्यानें ( १, ६७ ) 'अक्षता च क्षता चैव पुनर्भूः संस्कृता पुनः'। अशा सर्व स्त्रिया विवाहाला अयोग्य ह्मटल्या आहेत, व अशा स्त्रीपासून पुत्र झाला तर त्याला पौनर्भव ह्मणावें एवढेंच सांगितलें आहे. या वरून पुनर्विवाहित स्त्रीस पुनर्भू ह्मणण्यांत मोठी निन्दा नाही. विधवेचा विवाह करावा असा उपदेश यांत केलेला नाहीं एवढेंच. गौतमधर्मसूत्रांत श्राद्धाला कोणाला बोलावूं नये हें सांगतांना ( १५, १८ ) त्या नामावलींत पौनर्भव व दिधिषूपति असे घातले आहेत, त्यावरून विधवाविवाहाला गौण किंवा कमी समजत एवढेंच निष्पन्न होतें. मनु [ ३, १५५

पौनर्भवैश्च काणश्च इ० ], याज्ञवल्क्य ( १, २२२ काणः पौनर्भवस्तथा ) यांनीहि श्राद्धांत वर्ज्य केलेल्यांच्या नामावलींत पौनर्भव घातला आहे.

नारदानें ' अष्टौ वर्षाण्युदीक्षेत ब्राह्मणी प्रोषितं पतिम्। अप्रसूता तु चत्वारि परतोऽन्यं समाश्रयेत्। ' [ स्त्रीपुंसयोग ९८ ] असें ब्राह्मण स्त्रीनें दुसरा पति केव्हां करावा या विषयीं सांगितलें आहे. पुत्र झालेला असतां पति दूर गेला तर तिनें आठ वर्षें वाट पहावी व तेव्हांहि तो परत न आल्यास दुसरा पति करावा; पण पुत्र नसला तर चारच वर्षें वाट पाहून दुसरा पति करावा. या पुढें प्रोषित पति जिवंत आहे असें समजलें तर तिनें सोळा वर्षें वाट पहावीं असेंहि नारद ह्मणतो ( जीवति श्रूयमाणे तु स्यादेष द्विगुणो विधिः ). स्त्रीपुनर्विवाहाविषयींच्या या वचनावर विश्वरूपानें ' कामतः प्रवृत्तौ विशेषविधानं न कर्तव्यतयोपदेशः। ' ह्मणजे ' हा कांहीं पुनर्विवाह करण्याविषयीं उपदेश नव्हे तर कामप्रेरित झालेल्या स्त्रीकरितां तसें करण्यासंबंधानें विशिष्ट योजना बसविली आहे ' अशी टीका केली आहे. पण ' अन्यं समाश्रयेत् ' याचा अर्थ दुसऱ्याचें साह्य घ्यावें व पति शोधून काढावा असा कित्येकांनीं केला आहे.

कौटिलीय अर्थशास्त्रानें नारदाच्यांहि पुढें जाऊन स्त्रियांविषयींचे हे नियम आणखी सैल केले आहेत. कौटिल्य हा केवळ ध्येयवादी स्मृतिकार नव्हता. अमुक अमुक व्यवस्था असावी असें मनाशीं ठरवून तसे नियम सांगावे एवढेंच त्याच्या पुढें कार्य नव्हतें. तो प्रत्यक्ष राज्यकारभारांत भाग घेऊन समाजाचें नियंत्रण करणारा होता. तेव्हां त्याचें अर्थशास्त्र व्यवहाराला अधिक धरून आहे, धर्मशास्त्राप्रमाणें ध्येय सांगणारें नाहीं. तो ह्मणतो ' दीर्घप्रवासिनः प्रव्रजितस्य प्रेतस्य वा भार्या सप्त तीर्थान्याकांक्षेत। संवत्सरं प्रजाता। ततः पतिसोदर्यं गच्छेत्। बहुषु प्रत्यासन्नं धार्मिकं भर्मसमर्थं वा कनिष्ठमभार्यं वा। तदभावेप्यथ सोदर्यं सपिण्डं तुल्यं वा। ' दीर्घ काळ प्रवास करणाऱ्या, संन्यास घेतलेल्या किंवा मरण पावलेल्याच्या स्त्रीनें सामान्यतः सात महिने वाट पहावी. तिला जर पुत्र झालेला असेल तर तिनें वर्षभर थांबावें. नंतर पतीच्या भावाशीं लग्न करावें. त्याचे पुष्कळ भाऊ असतील तर त्यांत जो धर्मिष्ठ असेल त्याकडे जावें किंवा जो भरणसमर्थ असेल किंवा विवाह न झालेला कनिष्ठ असेल तर त्याकडे जावें. दीर मुळीं नसेलच तर दुसरा कोणी दिरासारखा सपिण्ड असेल तर त्याचा आश्रय करावा. कौटिल्यानें पुनर्विवाहाची येथपर्यंत मर्यादा नेली आहे इतकेंच नव्हे तर कांही प्रसंगीं स्त्रीनें पतीचा त्याग करूनहि पुनर्विवाह करण्यास हरकत नाहीं असें म्हटलें आहे. ' नीचत्वं वा परदेशं वा प्रस्थितो राजकिल्बिषी। प्राणाभिहन्ता पतितस्त्याज्यः। ' ( ३, २ ) असेंहि तो म्हणतो. पति नीच झाला, परदेशीं रहावयाला गेला, राजाचा अपराधी झाला, खून करणारा झाला, किंवा त्यानें कांहीं महापातक केलें, तर स्त्रीनें त्याचा त्याग करावा. अशा रीतीनें स्त्रीपुनर्विवाहासंबंधानें थोडींशींच अनुकूल वचनें सांपडतात. माघानें शिशुपालवधांत अक्षतयोनि विधवेच्या

विवाहाचा उल्लेख केला असून मल्लिनाथानें ‘ सा चेदक्षतयोनिः स्यात्पुनः संस्कारमर्हति ’ या स्मृत्याधारें त्याला मान्यता दिली आहे. ‘ तेनोह्यते सांप्रतमक्षतैव क्षतारिणा सम्यगसौ पुनर्भूः ’ ( शिशु. १६, ८१ ). यांतील अक्षता पुनर्भू हे शब्द श्लिष्ट आहेत. स्कंदपुराणान्तर्गत ब्रह्मोत्तर खंडांत सीमंतिनी नामक स्त्री कांहीं काळ विधवा म्हणून राहिल्यावर तिच्या पित्यानें तिचा पति सांपडला असतां, ‘ पुनर्विवाहविधिना तस्मै कन्यां न्यवेदयत् । ’ ( ८, ८ ) असें म्हटलें आहे. पण याच्या उलट स्त्रीपुनर्विवाहाचा निषेध करणारीं मात्र शेंकडों वचनें आहेत.

## विधवाविवाह-निषेधक वचनें

विधवाविवाहनिषेधाच्या बाबतींत मनु फार कडक आहे. त्यानें प्रथम पूर्वग्रंथांत सांगितल्याप्रमाणें नियोगाचा निर्देश करून पुढें त्याचा सर्वथैव निषेध केला आहे व पुढील स्मृतिकारांचेंहि सामान्यतः हेंच धोरण आहे. मनु म्हणतो ‘ न विवाहविधावुक्तं विधवावेदनं पुनः । ’ ( ९, ६५ ) विवाहाचें विधान करतांना विधवेचा पुनर्विवाह कोठेंहि सांगितलेला नाहीं. तसेंच आ०स्मी ‘ न द्वितीयश्च साध्वीनां क्वचिद् भर्तोपदिश्यते ’ म्हणजे ‘ साध्वी स्त्रियांना दुसरा पति कोठेंहि सांगितलेला नाहीं ’ असें त्यानें ठांसून म्हटलें आहे. आपस्तंबधर्मसूत्रांत ‘ पूर्ववत्यामसंस्कृतायां वर्णान्तरे च मैथुने दोषः । तत्रापि दोषवान् पुत्र एव । ’ ( २, ६, १३, ३-४ ) पूर्ववती म्हणजे एकदां लग्न झालेल्या स्त्रीला इतरापासून पुत्र झाला असतां तो पुत्र दोषवान् होय असें सांगितलें आहे. अशा प्रकारच्या पुरुषसंततीला दोषी म्हटलें असलें तरी तशा मुलीला दोष नाहीं, कारण ‘ सा हि परगामिनी भवति ’ म्हणजे ती दुसऱ्याकडे जावयाची असते, असें वसिष्ठानें सांगितलें आहे. आमचे शास्त्रकार मोठें युक्तिवान् व व्यवहारज्ञ होते. स्त्रीपुनर्विवाहाविरुद्ध त्यांचा जोराचा कटाक्ष असला तरी तशा विवाहापासून झालेल्या स्त्रीसंततीला त्यांनीं त्याज्य मानिलें नाहीं, तर ‘ स्त्रीरत्नं दुष्कुलादपि ’ असें सांगून टाकिलें. स्त्री रत्नासारखी असेल तर वाईट कुलांतली असली तरी चालेल असें त्यांचें म्हणणें आहे.

‘अर्धं भार्या मनुष्यस्य’ या महाभारतवचनाप्रमाणें किंवा बृहस्पतीच्या ‘आम्नाये स्मृतितन्त्रे च लोकाचारे च सूरिभिः । शरीरार्धं स्मृता जाया पुण्यापुण्यफले समा ॥ ’ या म्हणण्याप्रमाणें स्त्री पुरुषाची अर्धांगी व त्याच्या चांगल्यावाईट कर्मांच्या फलाची अर्धी भागीदारीण होय असा पक्ष स्वीकारिल्यास स्त्रियांचा पुनर्विवाह संभवत नाहीं, असें त्यांचें म्हणणें आहे. ‘ यस्य नोपरता भार्या देहार्धं तस्य जीवति । जीवत्यथ शरीरेऽर्धे कथमन्यः समाप्नुयात् । ’ स्त्री जीवंत आहे तोंपर्यंत पतीचें अर्धशरीर जीवंत आहेच. मग अर्धे शरीर जीवंत असतांना मृताचें धन दुसरा कोणी कसा घेऊं शकेल? असा त्यांचा प्रश्न आहे.

# विधव पुनर्विवाहाची ऐतिहासिक उदाहरणें

मिश्रविवाहाचीं उदाहरणें इतिहासांत अनेक सांपडतात, पण विधवापुनर्विहाचें उदाहरण शिलालेख व ताम्रशासनांत एकच सापडलें आहे. इ. स. च्या चवथ्या-पांचव्या शतकांत गुप्तसाम्राज्याचें वैभव हिंदुस्थानांत दुमदुमत होतें. त्यांत समुद्रगुप्त हा सम्राट् मोठा नामांकित झाला. वायव्य सरहद्दीपासून खालीं दक्षिणेंत लंकेपर्यंतचा सारा देश त्यानें आपल्या कक्षेंत आणिला होता. त्याचा मुलगा रामगुप्त राज्य करीत असतां त्याच्यावर शकांनीं स्वारी केली व त्याला हैराण केलें. रामगुप्ताची स्त्री ध्रुवदेवी अत्यंत सुंदर होती. ध्रुवदेवी आमच्या स्वाधीन करशील तर तुझ्या प्रजेला उपसर्ग होणार नाहीं, असें शक राजानें त्याला सांगितलें असतां तो तसें करण्यास तयार झाला. त्यावेळीं चितोडच्या पद्मिनीच्या गोष्टीप्रमाणें ध्रुवदेवीचा वेष घेऊन रामगुप्ताचा भाऊ चंद्रगुप्त सैनिकांना दासीचा वेष देऊन त्यांच्यासह शक राजाकडे गेला व तेथें त्या सैनिकांनीं बेसावध असलेल्या शकांचा फडशा पाडिला ध्रुवदेवीला आपल्या पतीचा हा प्रकार आवडला नाहीं; पुढें रामगुप्ताच्या मृत्यूनंतर चंद्रगुप्तानें ध्रुवदेवेशीं विवाह केला. गुप्तसम्राट् कुमारगुप्त हा या दांपत्याचा पुत्र होय. बाणानें हर्षचरितांत या गोष्टीचा उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणें देवीचंद्रगुप्त या नाटकांतील उतारे नाट्यदर्पण या ग्रंथांत आहेत. त्यावरून [ पहा जर्नल एशिआटीक, पारीस सन १९२३ पानें २०३–२०८ ) व संजाण ताम्रपटावरून ( एपिग्राफिआ इंदिका व्हॉ. १८ पान २५५ ) हें सर्व समजतें.

# विधवाविवाहाचा कायदा

इंग्रजी अमदानी येथें चालू झाल्यावर त्या वेळच्या सुधारकांच्या विनंतीवरून सरकारानें १८५६ या वर्षी विधवाविवाह कायदेशीर ठरविण्यासाठीं एक कायदा केला. या कायद्याप्रमाणें विधवेला नवऱ्याकडून किंवा त्याच्या संततीकडून त्याच्या मिळकतींत वारसा, अन्नवस्त्र इत्यादि जे हक्क मिळाले असतील ते पुनर्विवाहानंतर नष्ट होतात. त्याचप्रमाणें मृत्युपत्रान्वयें जी मालमत्ता तिला न विकतां येण्यासारखी मिळाली असेल तर तीवरील तिचा हक्क नाहींसा होतो. पण याहि बाबतींत मुंबई हायकोर्ट व इतर हायकोर्टे यांच्यांत विरोध आहे. अलाहाबाद हायकोर्टाच्या ठरावाप्रमाणें ज्या जातींत रूढीनें पुनर्विवाह मान्य आहे त्या जातींत विधवा स्त्रीचा पूर्वीच्या नवऱ्याकडून मिळालेल्या मालमत्तेवरील हक्क पुनर्विवाहानंतरहि जात नाहीं (५५ अलाहाबाद पान५४). हा कायदा वस्तुतः हिंदूंमधील उच्च वर्णीयांनाच खरें ह्मटलें तर लागू असावा. कां ? तर इतर जातींत वहिवाटीप्रमाणें विधवांचा पुनर्विवाह होतोच. परंतु सांप्रत तो मुंबई हायकोर्टाच्या ठरावानें ( २२ मुंबई ३२१ ) सर्वांनाच लागू करण्यांत येतो. या कायद्याप्रमाणें जुन्या पद्धतीच्या विधीप्रमाणें पुनर्विवाह करतां येतो. हा कायदा आतां

झालेला असल्यामुळें तो प्रस्तुत स्थितींत फिरेल असें दिसत नाहीं. व त्याचे परिणाम सर्वांना तो फिरेपर्यंत सहन केलेच पाहिजेत. या साठीं आहे या स्थितींत या बाबतींत व्यवहारज्ञानी लोकांनीं विचारपूर्वक वागलें पाहिजे. विधवाविवाहाविरुद्ध अगदीं कडवेपणा ठेऊन या पुढें चालणार नाहीं. पण एकदम मोठी उडी मारणाचा प्रयत्न केला तरीहि फार गोंधळ माजेल म्हणून या बाबतींत क्रमाक्रमानें पाऊल टाकणेंच श्रेयस्कर होणार आहे. प्रथम हे विवाह व्हावयाचेच तर विधुरांचे व्हावे व तेहि सवर्णांतच व्हावे म्हणजे पुष्कळशा भानगडी टळतील. पण त्यांतच मिश्रविवाहाचा व आणखी प्रतिलोम विवाहाचा प्रश्न ढकल्यास नसत्या भानगडी उत्पन्न होण्याचा व सर्व समाजाचा अत्यंत विरोध होण्याचा बराच संभव आहे. सर्व क्रम समंजसपणें चालवावा व पुढील दहापंधरा वर्षांत काय पचेल एवढेंच सध्यां प्रतिपादन करावें असें मला वाटतें. माझ्या मतें या अवधींत विधुरांनीं पुनर्विवाह जरूर तर करावा व आणि जुन्या पद्धतीनें म्हणजे गोत्रप्रवरादि निर्बंध संभाळून करावा; एवढ्याच गोष्टी पुढील दहा पंधरावर्षांत मान्य होऊं शकतील. पुनर्विवाह हा स्त्रियांचाच काय पण पुरुषांचाहि गौणच मानिला जातो. ज्या जातींत विधवाचा पुनर्विवाह होतो त्यांतहि पहिल्या विवाहाची योग्यता त्याला देण्यांत येत नाहीं. अशा स्थितींत भारी उंच उडी मारणें हितकर होणार नाहीं.

## घटस्फोट

नारदानें ' नष्टे मृते प्रव्रजिते ' इत्यादि श्लोकांत सांगितल्याप्रमाणें जेव्हां वहिवाट चालू असेल तेव्हां पूर्वीचें लग्न त्या त्या स्थितींत रद्द ठरविण्याचा कांहीं प्रकार चालू असला पाहिजे असें सहजच अनुमान होतें. पण त्या प्रकाराचें स्वरूप काय होतें तें ठाऊक नाहीं. कोणत्याही स्मृतींत लग्न रद्द ठरविण्याचा विधि ( Divorce ) सांगितलेला नाहीं; पण तत्वतः तो असला मात्र पाहिजे. एरवी पति जीवंत असतांनाही कांही परिस्थितींत त्याचा त्याग करून दुसऱ्याशीं विवाह करावा असें सागणाऱ्या वचनांची उपपत्ती लागणार नाही. कौटिल्यानें विवाह रद्द करण्याच्या प्रकाराला मोक्ष असें ह्मटलें आहे. या मोक्षासंबंधानें ( Judicial separation or divorce ) अर्थशास्त्रांत तो म्हणतो ' अमोक्ष्या भर्तुरकामस्य द्विषती भार्या । भार्यायाश्च भर्ता । परस्परं द्वेषान्मोक्षः ॥' पत्नीच केवळ पतीचा द्वेष करील तर त्याच्या इच्छेविरुद्ध तिला पतीपासून सोड चिठी मिळूं नये; तसेंच स्त्रीच्या इच्छेविरुद्ध पतीलाहि ती मिळूं नये पण एकमेक एकमेकांचा द्वेष करतील तर मात्र त्यांना मोकळीं करावीं. याच्यापुढें कौटिल्य ह्मणतो, स्त्रीपासून भय प्राप्त होईल ह्मणून जर पति सोडचिठी मागेल तर त्याच्यापासून स्त्रीला जें कांहीं स्त्रीधन मिळालें असेल तें तिला मिळावें. उलट पुरुषापासून संकट येईल या भीतीनें

स्त्री त्याला सोडूं पाहील तर मात्र तिला मिळालेलें स्त्रीधन तिला ठेऊं देऊं नये. पण धर्मविवाहाच्या बाबतींत मात्र मोक्ष म्हणजे सोडचिठी नाहीं [ स्त्रीविप्रकाराद्वा पुरुषश्चेद्मोक्षमिच्छेद् यथा गृहीतमस्यै दद्यात् । पुरुषविप्रकाराद्वा स्त्री चेन्मोक्षमिच्छेन्नास्यै यथागृहीतं दद्यात् । अमोक्षो धर्मविवाहानामिति । ३. ३ ]

कौटिल्याच्या या विधानांत धर्मविवाह व इतर असा भेद केलेला असून सोडचिठीची व्यवस्था केवळ इतर विवाहांनांच लागू केलेली होती असें दिसतें, धर्मविवाहांना नव्हती. हे धर्मविवाह माझ्या मतें पूर्वी सांगितलेल्या आठ प्रकारांपैकीं ब्राह्म, प्राजापत्य, दैव व आर्ष हे असावे. इतर म्हणजे गांधर्व, आसुरादि हे संस्कार नसून कांहीं केवळ करार तर दुसरे दंडेलीचे प्रकार होते, ते खरे विवाह नव्हते. मुलगी मारामारी करून पळवून तिच्याशीं लावलेलें लग्न सोईसाठीं मान्यता पावलें एवढेंच. गांधर्वांत प्रत्यक्ष एकमेकांचा करारच असल्यामुळें तो मोडणेंहि शक्य असतें.

आपल्या धर्मशास्त्रांत पुत्राच्या विशिष्ट धार्मिक महत्त्वामुळें क्लीबानेंहि विवाह करावा व क्षेत्रज पुत्राची प्राप्ति करून घ्यावी अशी अनुज्ञा दिलेली आढळते. मनु म्हणतो, ' यद्यर्थिता तु दारैः स्यात्क्लीबादीनां कथंचन । तेषामुत्पन्नतंतूनामपत्यं दायमर्हति ' ( ९, २०३ ). क्लीबादिकांना विवाहाची इच्छा होऊन त्यांनीं तसें केल्यास त्या स्त्रियांच्या ठिकाणीं होणाऱ्या संततीला दायभाग मिळावा. याज्ञवल्क्यहि तसेंच ह्मणतो, ' क्लीबोऽथ पतितस्तज्जः पङ्गुरुन्मत्तको जडः । अन्धोऽचिकित्स्यरोगाद्या भर्तव्याः स्युर्निरंशकाः ॥ औरसाः क्षेत्रजास्त्वेषां निर्दोषा भागहारिणः ।' ( २, १४०–१४१ ). क्लीब, अंध, पंगु, रोगी इत्यादिकांचे क्षेत्रज किंवा औरस पुत्र तसे दोषी नसतील तर दायभागी होतात. अशा विवाहांनाहि मोक्ष धर्मशास्त्रानें सांगितला नाहीं.

घटस्फोट हा शब्द लग्न रद्द करण्याच्या विधीला शास्त्रांत लाविलेला नसून पतित, राजद्रोही वगैरे माणसांशीं संबंध तोडण्याच्या विधीला लाविलेला असतो ( मनु ११. १८२–८३ व गौतमधर्मसूत्र २०. १–४ पहा ) व लक्षणेनें तो लग्नमोक्षाला आतां लावतात. या विषयींच्या सरकारी कायद्यांत सांप्रत क्रिश्चन व नोंदणीच्या कायद्यान्वयें लग्न लावणारे मात्र येतात. हिंदु व मुसलमान यांच्या लग्नाला तो लागू नाहीं. या कायद्याप्रमाणें नवऱ्याला स्त्रीच्या व्यभिचाराच्या कारणास्तव घटस्फोट मागतां येतो, व स्त्रीला पति ख्रिस्ती धर्म सोडील, किंवा दुसरें लग्न करील, तर किंवा दुसऱ्या अशाच कारणास्तव तो मागतां येतो. पण अमेरिकेंत तो स्वभाव जुळत नाहीं ( Incompatibility of temper ) ह्मणून हि मागतां येऊं लागला आहे. मला वाटतें Indian divorce कायद्याच्या पलीकडे आपणहि जाऊं नये. असे कायदे हैसूर व बडोदें या संस्थानांत झालेले असून, ब्रिटिश हिंदुस्थानासाठीं असेम्ब्लीपुढेंहि तो प्रश्न आलेला आहेच. निरनिराळ्या संस्थांकडे व वकिलांकडेही त्याचा मसुदा अभिप्रायार्थ आलेला होता. वकिल मंडळींनीं त्यावर आपलें योग्य तें मत दिलें आहे.

# विविध पुत्र

प्राचीन काळीं पुत्राचें परलोकदृष्ट्या महत्व असल्यामुळें औरस पुत्राच्या अभावीं आणखी कित्येक प्रकारचे पुत्र मानण्यांत येत. वसिष्ठ-धर्मसूत्र, मनु, याज्ञवल्क्य यांनीं बारा पुत्र सांगितले आहेत. मनु ह्मणतो 'त्यांतील सहा दायभागी व बंधु असतात व दुसरे सहा बंधु असले तरी दायाद नसतात, (९, १५८). औरस, क्षेत्रज, दत्तक, कृत्रिम, गूढोत्पन्न व अपविद्ध हे पुत्र पहिल्या प्रकारचे व कानीन, सहोढ, क्रीत, पौनर्भव, स्वयंदत्त आणि शौद्र हे दुसऱ्या प्रकारचे होत. यांपैकीं सांप्रत औरस आणि दत्तक यांखेरीज दुसरे कोणीहि मानीत नाहींत. 'पुष्कळ पुत्राची इच्छा करावी म्हणजे त्यांतील एक तरी गयेस जाऊन आपल्याला मुक्ति देईल' असें महाभारतांत ह्मटलें आहे ('एष्टव्या बहवः पुत्रा यद्येकोऽपि गयां व्रजेत्।') कारण त्या वेळीं गयेचें महात्म्य तसें मानीत. गयेस जाऊन तेथें पितरांना पिंड दिल्यास ते मुक्त होतात अशी कल्पना होती. तिचें थोडें स्वरूप प्रस्तुतच्या श्राद्धविधींत गयागदाधरास करावयाच्या नमस्कारांच्या रूपानें राहिलेलें दृष्टीस पडतें. आपल्या जीवंतपणीं आपली आज्ञा पाळील, आपल्या मृत्यूनंतर श्राद्धप्रसंगीं पुष्कळांना भोजन घालील, गयेला जाऊन पिंडदान करील, तर या तीन गोष्टींनीं पुत्राला पुत्रत्व येतें ( जीवतो वाक्यकरणात् मृतस्य भूरिभोजनात्। गयायां पिंडदानाच्च त्रिभिः पुत्रस्य पुत्रता ॥ ) असें मानीत असत. पुत्र झाला कीं पितरांचें ऋण फिटतें असें तै. संहितेंत ह्मटलें आहे. 'जायमानो ह वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो यज्ञेन देवेभ्यः प्रजया पितृभ्यः। (६,३.१०.१५). ऐतरेय ब्राह्मणांतही 'ऋणमस्मिन्संनयति अमृतत्वं च गच्छति। पिता पुत्रस्य जातस्य पश्येच्चेज्जीवतो मुखम्।' पुत्रमुख दृष्टीस पडलें म्हणजे पिता स्वतः ऋणमुक्त होतो (पितरांचें ऋण त्याच्यावर ढकलतो) व मोक्षाला जातो, असें म्हटलें आहे. मनूहि ('पुत्रेण लोकाञ्जयति पौत्रेणानन्त्यमश्नुते') पुत्राच्या योगानें उत्तम लोक प्राप्त करून घेतो व नातवाच्या योगानें मोक्ष मिळवितो (९, १३७) असें सांगतो. अशा रीतीनें औरस पुत्राचें महत्त्व वर्णिलेलें आढळतें.

औरस पुत्र नाहीं तर मुलीलाच मुलगा समजावें ही पुढची पायरी होय. अशा भ्रातृहीन कन्येला पत्नी करूं नये म्हणून सांगितलें आहे; कारण तिला होणारा पुत्र आजोबाला (मातामहालाच) पिंड देणारा होतो. याविषयीं पूर्वीं विवेचन आलेंच आहे. अशा पुत्राला पुत्रिकापुत्र म्हणतात. 'अभ्रातृकां प्रदास्यामि तुभ्यं कन्यामलंकृताम्। अस्यां यो जायते पुत्रः स मे पुत्रो भवेदिति।' असा संकल्प भ्रातृहीन कन्येच्या दानप्रसंगींचा म्हणून दिला आहे. पुत्रिकापुत्र म्हणजे पुत्रिका किंवा कन्या हाच पुत्र, अथवा पुत्रिकेचा पुत्र असा अर्थ घ्यावयाचा.

क्षेत्रज पुत्र म्हणजे नियोगानें मिळालेला पुत्र होय. आपस्तंबाखेरीज सर्व सूत्रकारांनीं हा सांगितला आहे. याज्ञवल्क्य म्हणतो, 'क्षेत्रजः क्षेत्रजातस्तु सगोत्रेणेतरेण वा' (२, १२८). 'गृहे प्रच्छन्न उत्पन्नः' (या. २, १२९) म्हणजे घरांत कोणाला न कळतां झालेला तो गूढज पुत्र होय. ऋग्वेदांतील याचा उल्लेख पूर्वी दिला आहेच. कानीन पुत्र म्हणजे विवाहापूर्वी कन्येला झालेला. पौनर्भव म्हणजे विधवेला झालेला (अक्षतायां क्षतायां वा जातः। याज्ञ. २, १३०). दत्तक म्हणजे दुसऱ्यानें दिलेला. क्रीत म्हणजे मातापित्यांनीं द्रव्य घेऊन विकत दिलेला. ऐतरेय ब्राह्मणांतील शुनःशेपाचें उदाहरण याविषयीं प्रसिद्ध आहे. कृत्रिम म्हणजे आईबाप नाहींत असा पोरका मुलगा आपला म्हणून बाळगलेला (स्वयं पुत्रीकृतः मातृपितृविहीनः). कृत्रिम पुत्र मिथिलेंतच हल्लीं मानतात, इतरत्र नाहीं. स्वयंदत्त, अपविद्ध हे पुत्र दत्तकासारखेच आहेत. दत्तकाची आवश्यकता पिंड व उदक द्यावें व कुळाचें नांव चालवावें (पिंडोदकक्रियाहेतोर्नामसंकीर्तनाय च) म्हणून असते. अशा रीतीनें बारा प्रकारचे पुत्र आपल्या मिळकतीच्या वारसासाठीं व पिंडदानासाठीं मानिलेले होते. पुत्रांच्या परिस्थितीप्रमाणें पालक (Patria Potestas) कोण हें ठरविण्यासाठीं केलेल्या योजनेचीं हीं उदाहरणें होत. हे सर्व पुत्र सजातीय मात्र पाहिजेत असें याज्ञवल्क्यानें स्पष्ट सांगितलें आहे (सजातीयेष्वयं प्रोक्तस्तनयेषु मया विधिः). पण मेधातिथि विधवाविवाहाच्या अगदीं विरुद्ध असतां त्याला असवर्ण दत्तक पुत्र मात्र चालतो. म्हणजे ब्राह्मणाला क्षत्रियपुत्र दत्तक घेतां येतो, पण पुढील शास्त्रकारांनीं त्याचा निषेध केलेला आहे. सहोढज म्हणजे लग्न होतांना गरोदर असलेल्या स्त्रीला झालेला पुत्र होय. आज बेलजम, इंग्लंड या देशांत अशा पुत्रांना मान्यता आहे. पुत्राचें महत्व फार मानीत असल्यामुळें येन केन प्रकारेण आपल्याला पुत्र असावा असें पूर्वी वाटत असे. पण आतां पुत्रांविषयींचा हव्यास पुष्कळ कमी झाला आहे. 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा स्त्रियांना आशीर्वाद देण्याऐवजीं 'मितपुत्रा किंवा एकपुत्रा' हा असेंच म्हणण्याची वेळ आली आहे. अशा वेळीं धनवान् पण अपुत्र पुरुषानें दत्तक पुत्राच्या नादीं न लागतां आपलें धन उपयुक्त सार्वजनिक संस्था व कार्यें यांना द्यावें हें उत्तम.

पुढील व्याख्यानांत मिश्र जातींचा विचार करूं.

. . . .

## मिश्र—जातिविचार

एका गृहस्थांनीं असा प्रश्न टाकला आहे कीं, सगोत्र विवाहाचा निषेध शास्त्रानें केला, त्याचें समर्थन एका रक्ताच्या उपपत्तीवर लावतां येतें, पण

कित्येक भिन्न गोत्रांतहि विवाहाचा निषेध आहे त्याचें कारण काय ? तसेंच त्यांचे आणखी असेंहि म्हणणें आहे कीं, शास्त्रांत सिद्धान्त सांगितले असतात, पण त्यांची शास्त्रीय उपपत्ति मात्र दिलेली नसते, ती कां ? या प्रश्नांचीं उत्तरें सविस्तर देणें, तर तो चार पांच व्याख्यानांचा विषय होईल. तेव्हां अगदीं थोडक्यांत त्यांचा परामर्ष घेऊन आपल्या विषयाला आरंभ करूं. भिन्न गोत्रांत जो विवाहाचा निषेध आहे, तो त्यांतील प्रवरांच्या साम्यामुळें. त्रिप्रवरी गोत्रांत जर कोणताहि एक प्रवर समान असेल किंवा पंचप्रवरी गोत्रांत तीन प्रवर समान असतील, तर त्यांत विवाह होऊं नये असें सांगितलेलें आहे. पण गोत्रप्रवरांचा हा प्रश्न इतका भानगडीचा आहे कीं, त्यासंबंधानें थोडक्यांत विवेचन करणें कठीण आहे. 'गोत्रप्रवरमंजरी' नांवाचा या विषयावर जो ग्रंथ आहे, त्यांत गोत्र-संख्या तीन कोटी आहे असें म्हटलें आहे. ग्रंथांतील पाठ व त्यांचे अर्थ यांत परंपराविच्छेदामुळें पुष्कळ भेद पडत जातो व त्यामुळें त्यांतलें काय घ्यावें व काय टाकावें याविषयीं मोठमोठ्यांनाहि मोह उत्पन्न होतो. आश्वलायन व बौधायन या सूत्रांत प्रवराध्याय म्हणून जो भाग आहे तो वाचावा, म्हणजे हा प्रश्न किती घोंटाळ्याचा करून टाकलेला आहे हें लक्षांत येईल. कांहीं गोत्रें एकप्रवरी, कांहीं त्रिप्रवरी व कांहीं पंचप्रवरी आहेत, इतकेंच नव्हे तर लोकाक्षिकश्यपगोत्री दिवसास वासिष्ठगोत्री व रात्रीं काश्यपगोत्री असें बौधायनश्रौत-सूत्रांत सांगितलेलें आहे. प्रवरमञ्जरी वगैरे ग्रंथांतून ज्यांचीं नांवें दिलेलीं आहेत अशीं हीं गोत्रें सुमारें पांच हजार आहेत. असा या प्रश्नासंबंधानें घोंटाळा दिसून येतो.

शास्त्रांत नुसते सिद्धान्त सांगून त्यांची उपपत्ति देत नाहींत, याचें कारण तत्का-लीन परिस्थिति होय. त्या वेळीं आजच्या सारखे छापखाने नव्हते. तेव्हां सर्व विचार संक्षिप्त रूपानेंच लिहिण्याचा परिपाठ असे. त्या सूत्रबद्ध भाषेंत लिहिलेल्या सिद्धान्तांची उपपत्ति गुरूपासून तोंडी प्रवचनाच्या द्वारा समजून घ्यावयाची असे. शिवाय सिद्धान्ताची उपपत्ति सर्वसामान्य लोकांना समज-ण्यासारखी नसते. यास्तव ती सारी लिहून काढण्यांत मतलब नसे. सूत्रबद्धलेखन कठीण झालें आहे, व वार्तिक, भाष्य, टीका इत्यादिकांच्या साह्याशिवाय तें कळणें शक्य नाहीं याचेंहि कारण हेंच होय. वेदान्तसूत्रांचें काठिन्य या बाबतींत विशेषच * दिसतें.

---

* उदाहरण—'तदनन्यत्वमारम्भणशब्दादिभ्यः' (२, १, १४) किंवा 'भावे चोपलब्धेः' (२, १, १५) या सूत्रांचा, कार्य जें जगत् व कारण असें जें ब्रह्म यांचें अनन्यत्व होय. कारण 'वाचारंभणं विकारो नामधेयं' अशी श्रुति आहे; आणि कारण असेल तरच कार्याची उपलब्धि होते, असा अर्थ भाष्याशिवाय सहज कळणें कठीण आहे.

# मिश्र-जाति

प्रस्तुत व्याख्यानांत मिश्र–जातींचा विचार करावयाचा आहे. जाति आणि व्यवसाय किंवा धंदे, हे विषय एकमेकांशीं अगदीं संलग्न आहेत; पण सोयीसाठीं आपण त्यांचा पृथक् विचार करूं. ह्मणजे या व्याख्यानांत जातींचा विचार करूं व व्यवसाय पुढील व्याख्यानात घेऊन त्यानंतर अस्पृश्यतेचें विवेचन करून जातिविषयक प्रश्न पुरे करूं.

वर्णांचा विचार करतांना वेदकाळीं चार वर्ण झाले होते व आजच्या प्रमाणें कित्येक मिश्र जातीहि झालेल्या होत्या. उदाहरणार्थ–तैत्तिरीय संहितेंत ( ४, ५, ४, २ ) 'नमः क्षतृभ्यः' ह्मणजे क्षतृंना नमस्कार असो, असा आरंभ करून संग्रहीतृ, तक्षं, रथकार, कुलाल, कर्मार, पुञ्जिष्ठ, निषाद, इषुकृत्, धन्वकृत्, मृगयु, श्वानि अशा जातींना नमस्कार केलेला आहे. क्षत्तृ ह्मणजे क्षत्रिय स्त्रीला शूद्रापासून झालेली संतति ( शूद्रात् क्षत्रियायां क्षत्ता ) असें ह्मटलें आहे. संग्रहीतृ म्हणजे कर गोळा करणारे ( Tax Collectors ), तक्षा म्हणजे सुतार, कुलाल म्हणजे कुंभार, कर्मार ह्मणजे लोहार, पुंजिष्ठ म्हणजे फांसेपारधी [ पक्षिपुञ्जानां घातकाः ], निषाद ह्मणजे कोळी [ मासे मारणारे ], इषुकृत् म्हणजे बाण मारणारे, धन्वकृत् म्हणजे धनुष्य करणारे बुरुड, मृगयु म्हणजे पारधी, श्वानि म्हणजे कुत्रे बाळगणारे. अथर्ववेदात रथकार, कर्मार व सूत हे सांगितले असून ( ३, ५, ६. ७ ), तक्षपासून पुञ्जिष्ठापर्यंतच्या जातींचा निर्देश वाजसनेयि संहितेंत ( १६, २७ ) केलेला आढळतो. संग्रहीतृ, क्षत्तृ व सूत हे काठक संहितेंत व उग्र, सूत, क्षत्तृ, संग्रहीतृ हे तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३, ८, ५, १–३ ) उल्लेखिलेले आहेत. यांतील रथकार व निषाद हे त्रैवर्णिक मानिले जात नसत, तरी त्यांचें स्थान शूद्रांहून श्रेष्ठ होतें. रथकारांना श्रौताग्नीचें आधान करण्याचा अधिकार होता. 'वचनात् रथकारस्य' या पूर्वमीमांसासूत्रांत तसें सांगितलें आहे. पूर्वमीमांसाकारांचा मुख्य भर वचनावर असून 'वचनात्प्रवृत्ति-र्वचनान्निवृत्तिः' म्हणजे अमुक करावें असें वचन आहे, तर तसें करावयाचें अमुक करूं नये असें वचन असेल, तर तें करावयाचें नाहीं, असें त्यांचें तत्त्व आहे. त्यामुळें श्रुतींत रथकाराला अग्न्याधानाचा अधिकार आहे, असें आढळतांच त्यांनीं तसें ठासून सांगितलें. पण पुढील ग्रंथकारांनीं श्रुतींतील रथकार म्हणजे कोणी कनिष्ठ जात नसून त्रैवर्णिकांतील जे कोणी रथ करणारे असतील ते असें ठरविलें. निषादाला मनूनें पारशव म्हणजे चालता बोलता शव ( पारयन् एव शवः ) असा प्रतिशब्द दिला असून ब्राह्मणाला शूद्रा–भार्येपासून झालेल्या संततीला तें नांव दिलें आहे [ १०,८ ]. पण वेदांत 'एतया निषादस्थपतिं याजयेत्' म्हणजे निषादस्थपतीकडून रुद्र इष्टि करवावी असें सांगितलें आहे. निषादस्थपति म्हणजे निषादांमधील

एक पुरुष जो राजा आहे तो असा कर्मधारय समास न घेतां, पुढील ग्रंथकारांनीं 'निषादानां स्थपतिः' ह्मणजे निषादांवर राज्य करणारा, असा तत्पुरुष घेतला. पण उभय शब्दांना प्राधान्य ज्यांत आहे असा कर्मधारय समास घेणेंच युक्त, असें मीमांसकांचे मत आहे. या जातींपैकीं उग्रः ह्मणजे राजानें दिलेली शिक्षा अमलांत आणणारा. 'क्षत्रियात् शूद्रायां उग्र' ह्मणजे क्षत्रिय पुरुषाला शूद्र-स्त्रीपासून झालेली संतति उग्र होय, असें पुढें ठरविण्यांत आलें. सूत ह्मणजे पुराण सांगणारे प्रसिद्धच आहेत. 'ब्राह्मण्यां क्षत्रियात् सूतः' अशी त्याची पुढें व्याख्या करण्यांत आली. आयोगव व मागध अशा आणखी जाति तैत्तिरीय ब्राह्मणांत सांगितल्या आहेत (३, ४, १). त्यांतील आयोगवाला आयोगू असें कांहीं ब्राह्मणें ह्मणतात. वैश्याला क्षत्रिय स्त्रीपासून आयोगव होतो (वैश्यात् क्षत्रियायां आयोगवः) आणि 'शूद्राद् वैश्यायां मागधः' शूद्राला वैश्य स्त्रीपासून झालेला तो मागध. शतपथ ब्राह्मणांत (१३, ५, ४, ६) आविक्षित मरुत्ताला आयोगव ह्मटलें आहे. याशिवाय तैत्तिरीय ब्राह्मणात सूत, शैलूष, रेभ, कितव, विदलकार (आजचे बुरूड), कण्टककार, याहि जातींचा उल्लेख आढळतो. तांड्य ब्राह्मणांत किरात (भिल्ल) आला असून शतपथांत म्लेच्छ आलेला आहे. म्लेछ ह्मणजे अपशब्द होय. अपशब्द ह्मणजे अशुद्ध शब्द. देव व असुर यांच्या युद्धांत असुरांनीं 'हे अरयः हे अरयः' असें न ह्मणतां 'हेलवो हेलवः' असें अशुद्ध म्हटलें म्हणून त्यांचा पराभव झाला, असें त्या ब्राह्मणांत म्हटलें असून त्यावरून असे उच्चार करूं नयेत, असा निष्कर्ष काढिला आहे. (तस्मात् न म्लेच्छेत्). 'म्लेच्छ अव्यक्तायां वाचि' असा पाणिनीय धातुपाठात अर्थ दिला आहे.' बृहदारण्यक (४, ३, ३२) व छांदोग्य (५, १०, ७) या उपनिषदांत पौल्कस व चांडाल यांचा निर्देश असून तैत्तिरीय ब्राह्मणांताहि (३, ४, १४, १) तो आहे. छांदोग्यांत चण्डालाचा निर्देश श्व (कुत्रा) व सूकर (डुकर) यांच्या समवेत केलेला आहे; व जे 'कपूयचरणाः' म्हणजे निन्द्य आचरणाचे असतील, ते पुढील जन्मीं श्वसूकरचण्डाल होतात, असें म्हटलें आहे. चांगल्या आचरणाचे लोक ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या चांगल्या योनींत जातात व अशुभ आचरण करणारे ते वाईट योनींत म्हणजे कुत्र्याच्या, डुकराच्या किंवा चंडालाच्या योनींत जातात. (य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत्ते कपूयां योनिमापद्येरन् श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चंडालयोनिं वा). इतर वैदिक ग्रंथांताहि हे लोक सांगितले आहेत. (अत्र......चांडालोऽचांडालः पौल्कसोऽपौल्कसः......तीर्णो हि तदा सर्वान् शोकान् हृदयस्य भवति। बृ. उ. ४, ३, ३२). याप्रमाणें वैदिक वाङ्मयकाल संपण्याच्या सुमारास, म्हणजे सुमारें इ. स. पूर्वी १००० वर्षांच्या सुमारास इतक्या जाति झाल्या होत्या असें दिसून येतें. प्राचीन उपनिषद् वाङ्मय इ. स. पूर्वी ८०० च्या सुमारास

बंद झालें. त्यानंतर कित्येक उपनिषदें झालीं आहेत. पण त्यांचें स्वरूप निराळें दिसतें. ईश, केन, कठ, प्रश्न, मुंडक, मांडूक्य, छांदोग्य, तैत्तिरीय, ऐतरेय व बृहदारण्यक हीं मुख्य दहा उपनिषदें होत. यांच्यावरच शंकाचार्यांचीं भाष्यें आहेत. ईश हें वाजसनेयी संहितेचा शेवटचा भाग असून त्यांत लोकमान्य टिळकांचा ज्ञानकर्मसमुच्चयवाद आहे. केनोपनिषद् सामवेदाचें असून त्यांत आरंभीं 'केनेषितं पतति प्रेषितं मनः' इत्यादि शब्द असल्यामुळें त्याला 'केन' असें नांव पडलें. कठोपनिषद् काठक शाखेचें असून त्यांत नचिकेत्यानें यमापासून आत्मज्ञान प्राप्त करून घेतल्याची कथा आहे. वेदान्ताचें स्वरूप थोडक्यांत व सोप्या भाषेंत सांगणारें हें उपनिषद् लहानसें असून सर्वांनीं एकवार वाचण्यासारखें आहे. प्रश्नोपनिषदांत अनेक प्रश्न विचारून त्यांचीं उत्तरें दिलेलीं असल्यामुळें त्याला प्रश्न असें म्हणतात. मुंडक हें लहानसें सोप्या भाषेंतील उपनिषदहि वाचनीय आहे. मांडूक्य हें अगदीं लहान असून त्यांत अवघीं बारा वाक्यें आहेत व त्यांवर गौडपादाचार्यांच्या कारिका प्रसिद्ध आहेत. ऐतरेय हें ऋग्वेदाचें उपनिषद् होय. छांदोग्य व बृहदारण्यक हीं उपनिषदें मोठीं असून बृहदारण्यक तर आपल्या नांवांप्रमाणें फारच मोठें व मनोहर आहे. बाकीच्या उपनिषदांपैकीं श्वेताश्वतर आणि कौषीतकि हीं महत्वाचीं आहेत. इतर उपनिषदें नंतरचीं असून अल्लोपनिषदासारखें मोंगल अमदानींत झालेलें उपनिषदहि आढळतें. पण त्याचा विचार आपल्याला कर्तव्य नाहीं. वैदिक काळाची प्राचीन मर्यादा युरोपियन पंडित इ. स. पूर्वी २५०० वर्षांहून पलीकडे नेत नाहींत. पण त्यांतील याकोबी नामक जर्मन पंडितानें तो काळ इ. स. पूर्वी ४००० वर्षांइतका मागें लोटला असून लोकमान्य टिळकांनीं तो इ. स. पूर्वी १०००० वर्षें असावा असें दाखविलें आहे. पण त्या प्रश्नांत आपल्याला अधिक खोल जाण्याचें कारण नाहीं.

## वर्ण व जाति

वर्ण व जाति या गोष्टी अगदीं निराळ्या आहेत, हें वेळोवेळीं दाखविण्यांत आलें आहेच. तथापि कित्येक ठिकाणीं हे दोन्हीं शब्द एका अर्थानें वापरण्यांत आलेले आहेत. वर्णांचा विचार करतांना मुळांत काय होतें हें सांगितलें. त्या वेळीं जाति नव्हत्या. जाति शब्द आजच्या अर्थी वेद-संहितांत नाहीं; उपनिषदांतहि तो कोठें आढळलेला नाहीं. पण सूत्रकालापासून तो वापरण्यांत असलेला दिसून येतो. तो मूळ केव्हां उत्पन्न झाला हें सांगणें कठीण आहे. पण उपनिषत्काल बंद झाल्यावर म्हणजे इ. स. पूर्वी ५००।६०० वर्षांपासून तो प्रचारांत आहे एवढें खरें. गौतम धर्मसूत्रांत (११, २०) 'देशजातिकुलधर्माश्चाम्नायैरविरुद्धाः प्रमाणम्' या वचनांत जातिधर्म वेदाशीं अविरुद्ध असतील, तर प्रमाण होत

असें सांगितलें आहे. मनूनें 'देशधर्मान् जातिधर्मान् कुलधर्मांश्च शाश्वतान्।' [१.११८] असा जातिधर्माचा निर्देश करून पुनः 'जातिजानपदान्धर्मान् श्रेणीधर्मांश्च धर्मवित्। समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मं प्रतिपादयेत्।' असा स्वधर्माचा निर्णय करण्याचा मार्ग सांगितला असून त्यांत जातिधर्मांचा व श्रेणीधर्मांचा विचार करावयास सांगितलें आहे. श्रेणी म्हणजे संघ ( Guild किंवा Corporation ). प्राचीन ताम्रशासनांत 'तिलपिषक श्रेणी' म्हणजे तेल्यांच्या संघाचा उल्लेख केला असून त्यांच्याकडे कायमच्या ठेवी ( नीवि ) ठेवाव्या व त्यांतून त्यांनीं प्रतिवर्षी अमुक दान अमक्याला करावें, असें सांगितलेलें आढळतें. मनूनें इतर धर्मांबरोबर जैनबौद्धादिकांचे धर्म ह्मणजे पाखंड धर्महि विचारांत घ्यावे, असें ठरविलें आहे. वर्ण व जाति हीं भिन्न असलीं तरी मनूनें कांहीं ठिकाणीं वर्ण शब्द जाति या अर्थींहि योजिलेला आहे. 'वर्णान्पंचदशैव तु' असा तो पंधरा वर्णांचा निर्देश करीत असून ( १०. ३१ ) त्यांत प्रतिलोम विवाहामुळें वर्णबाह्य संतति उत्पन्न होऊन ती पंधरा प्रकारची होते, असें तो ह्मणतो. अर्थात् वर्ण म्हणजे त्या ठिकाणीं संकर जाति असाच अर्थ आहे. पाणिनीनें जाति शब्द आजच्या अर्थानें सांगितलेला नाहीं. पण 'कुलालादिभ्यो वुञ्' या सूत्रांत [ ४, ३, ११८ ] कुलाल आदिकरून जातींचा मात्र उल्लेख केला आहे. पाणिनीच्या अष्टाध्यायीबरोबर गणपाठ, धातुपाठ असे जे संदर्भ ग्रंथ आहेत, त्यांत कुलालादिकांच्या गणांत बुरुड, चण्डाल, निषाद, कर्मार, कुम्भकार, श्वपाक या शब्दांचा अंतर्भाव केला असून त्यांच्यापासून 'वुञ्' प्रत्यय लागून कौलालक, वारुडक असे शब्द होतात, असें त्या सूत्राचें तात्पर्य आहे. वार्तिककार कात्यायनानें 'राज्ञोपत्ये जातिग्रहणम्' या वार्तिकांत जाति शब्द योजलेला आहे. 'राजश्वशुराद्यत्' या पाणिनिसूत्रावरील तें वार्तिक असून राजशब्दावरून राजन्य शब्द कसा साधतो हें त्यांत सांगितलें आहे व महाभाष्यकार पतंजलीनें त्यावर 'राजन्यो नाम जातिः' ह्मणजे राजन्य ही एक जाति आहे असें ह्मटलें आहे. याशिवाय वार्तिककारानें 'शूद्राच्चामहत्पूर्वा। जातिः' अशीं दोन वार्तिकें 'अजाद्यतष्टाप्' ( ४-१-४ ) या सूत्रावर दिलीं आहेत. या वार्तिकांचें व्याख्यान करितांना काशिका टीकेंत महाशूद्र हा शब्द 'आभीर' ( हल्लींचे अहीर ) यांना लावतात, असें म्हटलें आहे. महाभारत मौसलपर्वांत [अध्याय ७. ४७ व ६३] आभीरांना दस्यु व म्लेच्छ म्हटलें आहे.

गीतेंत 'उत्साद्यंते जातिधर्माः' असा जातिधर्माचा निर्देश केलेला असून याज्ञवल्क्यानें साक्षीदार कोण असावे, हें सांगतांना 'यथाजाति यथावर्णं सर्वे सर्वेषु वा स्मृताः' [ २, ६९ ] म्हणजे ब्राह्मणाला ब्राह्मण, क्षत्रियाला क्षत्रिय असे ज्या त्या जातीला किंवा वर्णाला त्या त्या जातीचे साक्षीदार शक्य तर असावे, नाहीं तर सर्व सर्वांना चालतील, असेंही म्हटलें आहे. तसेंच सजातीय प्रजा उत्पन्न होण्यासाठीं सवर्ण विवाहच पाहिजेत [ सवर्णेभ्यः सवर्णासु जायन्ते हि सजातयः ]

( ३, ८९ ) इत्यादि आणखीहि प्रसंगीं जातिशब्द योजिलेला आहे. जन्मानें जात ठरते हा विचार यांत ठरून गेलेला दिसून येतो. मनूनेंहि याविषयीं असेंच म्हटलें आहे. 'सर्ववर्णेषु तुल्यासु पत्नीष्वक्षतयोनिषु। आनुलोम्येन संभूता जात्या ज्ञेयास्त एव ते' ( १०, ५ ). म्हणजे ब्राह्मण पतिपत्नींची संतति ब्राह्मण, क्षत्रिय पतिपत्नींची क्षत्रिय अशी जन्मानें जाति सिद्ध होई. जाति ही याप्रमाणें केवळ जन्मावर ठरूं लागल्यामुळें पुढें कसे परिणाम झाले, हें आतां पाहूं. भट्टनारायणाच्या वेणीसंहार नाटकांत अश्वत्थामा हा ब्राह्मण व कर्ण हा सूत यामधील भांडण प्रसिद्धच आहे. त्या भांडणांत अश्वत्थामा कर्णाला लागेल असा शब्द बोलला असतां कर्ण त्याला म्हणतो 'जात्या काममवध्योऽसि' तूं जातीनें ब्राह्मण आहेस, म्हणून मी तुला ठार करणें उचित नाहीं, पण तूं माझ्यावर उगारलेला हा पाय मात्र माझ्या या तरवारीनें तोडून टाकितों पहा. त्यावर अश्वत्थामाहि म्हणतो, माझ्या जातीकडे पाहूनच जर तुला भीति वाटत असेल, तर 'इयं सा जातिस्त्यक्ता' (ही पहा टाकून दिली ती जात') असें म्हणून त्यानें आपलें जानवें तोडून टाकून दिलें. यावरून जात ही केवळ जानव्यावर येऊन बसण्यापर्यंत त्या वेळीं मजल आली होती असें दिसतें. तसेंच क्षत्रिय हे जानवें घालीत नसत असेंहि म्हणावें लागतें. दिव्य करण्याच्या प्रसंगींहि जन्मानें प्राप्त झालेल्या जातीला महत्त्व देण्यात येई. नारद म्हणतो ( ४, २८८ ) अग्निदिव्य करावयाचें असेल, तर त्या कामांत कुशल अशा जातीचा लोहारच सळई योग्य प्रकारें तापली आहे कीं नाहीं हें पहाण्यासाठीं हजर पाहिजे. 'जात्यैव लोहकारो यः कुशलश्चाग्निकर्मणि' असे त्याचे शब्द आहेत. तसेंच तुलादिव्याच्या प्रसंगीं तागडीचीं पारडीं बरोबर आहेत कीं नाहींत, हें पहाण्यासाठीं कासारच ( कांस्यकार ) पाहिजे, असें विष्णुधर्मसूत्रांत म्हटलें आहे ( १०, ४ ). आरोपी मनुष्य ज्या पारड्यांत बसेल, तें वर गेलें तर तो निरपराधी व तें खालीं गेलें तर पापाच्या भारानें तसें झालें म्हणून तो पापी, असा निर्णय करावयाचा असे. अशा रीतीनें जन्मसिद्ध जातींना महत्त्व प्राप्त झालें.

## मिश्रजाति झाल्या कशा ?

आतां मिश्र–जाति बनतात कशा याविषयीं कोणत्या कल्पना ( theories ) होत्या, तें पाहूं. ब्राह्मणानें क्षत्रिय स्त्रीशीं लग्न केलें, तर त्या मुलांची जात कोणती ? या प्रश्नाचीं निरनिराळीं उत्तरें आहेत. विधवाविवाहाला कांहीं परिस्थितींत अनुमोदन देणारा सुधारक नारद म्हणतो, कीं असवर्ण पण अनुलोम विवाहाची संतति संकर नव्हे. पण दुसऱ्यांच्या मतें तो संकर होय. राजांचीं कर्तव्यें सांगतांना त्यांत 'असंकरः' म्हणजे संकर किंवा भेसळ होऊं न देणें, हें एक गौतमानें ( ८, ३ ) 'प्रसूतिरक्षणं संकरो धर्मः।' सांगितलेलें आहे. इतर कर्तव्यें प्रसूति ( प्रजेची अभिवृद्धि ) व रक्षण

(कायदा व शांतता Law and order) हीं होत. हा वर्णसंकर मनूच्या मतें, 'ज्या स्त्रीशीं धर्मानुसार विवाह करतां येत नाहीं, तिच्याशीं तो केल्यानें उत्पन्न होत असतो.' तो ह्मणतो 'व्यभिचारेण वर्णानामवेद्यावेदनेन च। स्वकर्मणां च त्यागेन जायन्ते वर्णसंकराः' (१०, २४). असवर्ण विवाह, सगोत्र सप्रवरादि विवाह आणि उपनयनादिकर्मांचा त्याग यांनीं वर्णसंकर उत्पन्न होतो. महाभारताच्या अनुशासनपर्वांत (४८, १) 'अर्थाल्लोभाद्वा कामाद्वा वर्णानां चाप्यनिश्चयात्। अज्ञानादपि वर्णानां जायते वर्णसंकरः' असें वर्णसंकराचें कारण दिलें आहे. वर्णसंकरासंबंधानें प्राचीनांच्या तीन कल्पना किंवा उपपत्त्या आहेत. त्या अशा— पितृसावर्ण्य, मिश्रवर्णत्व आणि मातृसावर्ण्य. अनुलोम विवाह असतील तर पितृसावर्ण्याच्या कल्पनेप्रमाणें ब्राह्मण-क्षत्रियांची संतति ब्राह्मण, क्षत्रिय-वैश्यांची क्षत्रिय, इत्यादि ठरे. * या पद्धतीप्रमाणें ब्राह्मणक्षत्रिय, ब्राह्मणवैश्य, ब्राह्मणशूद्र, क्षत्रियवैश्य, क्षत्रियशूद्र, आणि वैश्यशूद्र अशा सहाच जोडया होऊं शकतात. पितृसावर्ण्याची कल्पना पुढें बदलली व असें ठरविण्यांत आलें कीं अनुलोम मिश्रविवाहांची संतति बापाहून कमी, पण आईहून वरची अशी समजावी. ह्मणजे ब्राह्मणाला क्षत्रिय पत्नीपासून झालेली संतति ब्राह्मणाहून खालच्या प्रतीची, पण क्षत्रियाहून वरच्या प्रतीची समजूं लागले. स्त्रीष्वनन्तरजातासु द्विजैरुत्पादितान्सुतान्। सदृशानेव तानाहुर्मातृदोषविगर्हितान्। असें याविषयीं मनूनें ह्मटलें आहे (१०, ६). पण कालान्तरानें ही दुसरी मिश्र कल्पना जाऊन मातृसावर्ण्याची तिसरी कल्पना पुढें आली. 'अनुलोमासु मातृसवर्णाः' ह्मणजे अनुलोम विवाहांत संतति आईच्या वर्णाची होते, असें विष्णुधर्मसूत्र सांगतें (१६, २). विचित्रवीर्याच्या तीन स्त्रियांना व्यासापासून जे धृतराष्ट्र, पाडु व विदुर हे तीन पुत्र झाले, ते याच कल्पनेप्रमाणें दोघे क्षत्रिय व विदुर हा शूद्र असे झाले. अनुलोम विवाहांत शूद्रस्त्रीची संतति शूद्राहूनहि कमी मानण्याचीही कल्पना पुढें उत्पन्न झाली व तिला द्विजाधिकार नाहींत, असें ठरविण्यांत आलें. अनुलोम मिश्रसंततीसंबंधाच्या अशा या कल्पना आढळून येतात.

आतां प्रतिलोम विवाह घेऊं. अनुलोमाच्या सहा प्रकारांप्रमाणेंच प्रतिलोमाचेहि सहाच प्रकार होतात. शूद्र—वैश्या, शूद्रक्षत्रिया, शूद्र—ब्राह्मणी, वैश्यक्षत्रिया, वैश्यब्राह्मणी व क्षत्रियब्राह्मणी. या विवाहांच्या संततीला संकर जाति ह्मणूं लागले. या संकर जातींत आणखी परस्पर मिश्रण झाल्यास

* भार्याश्चतस्रो विप्रस्य द्वयोरात्मा प्रजायते। अनुशासन. ४८. ४; तासु पुत्राः सवर्णानन्तरासु सवर्णाः। बौ. ध. सू. १, ८, ६; सवर्णो ब्राह्मणीपुत्रः क्षत्रियायामनन्तरः॥ नारद स्त्रीपुंसयोग १०६. ब्राह्मणाला ब्राह्मणीपासून व क्षत्रियेपासून ब्राह्मण पुत्र होतो, असें या सर्वांनीं म्हटलें आहे.

त्या संततीला संकरसंकर जाति म्हणावें. असे संकर अनंत होतील 'संकरसंकराश्चासंख्येयाः ।' (विष्णु. ध. सू. १६, ७.) तेव्हां ते मोजावे कोणीं या भीतीनें त्यांच्या गणतीचा कंटाळा येऊनच कीं काय, ती थांबविण्यांत आली. सगळ्या स्मृतिकारांनीं सांगितलेल्या जाति एकत्र केल्या, तरी त्यांची संख्या शंभराहून अधिक भरणार नाहीं; पण आज हिंदुस्थानांत सुमारें २५०० जाति अस्तित्वांत आहेत. स्मृतिकारांच्या बाबतींत असें ह्मणतां येतें कीं जितका स्मृतिकार प्राचीन, तितकी त्यानें सांगितलेली जातिसंख्या कमी. मानव व औशनस स्मृतींत सांगितलेल्या जातींच्या वृत्ति पहा, असें मिताक्षराकार (११ वें शतक) सांगतो. त्यांपैकीं औशनस स्मृतींत ४१ जाति सांगितल्या असून मनुहि बहुतेक तितक्याच सांगतो. पण गौतमसूत्रांत अनुलोम प्रतिलोम मिळून सोळाच जाति सांगितल्या आहेत. पुढें वासिष्ठानें रथकार, कुक्कुट व श्वपाक अशा तीन अधिक सांगितल्या, आणि मिताक्षराकारानें 'संकीर्णसंकरजातीनामानन्त्यात् वक्तुमशक्यत्वात्' असा शेरा 'असत्सन्तस्तु विज्ञेया प्रतिलोमानुलोमजाः' (याज्ञ १, ९५) या याज्ञवल्क्यवचनावर टीका करतांना लिहिला. संकर जाति अनंत असल्यामुळें त्या सांगणें अशक्य आहे. पण त्यांतलें तात्पर्य एवढेंच, कीं अनुलोम संकर सत् आणि प्रतिलोम हे असत् होत.

सांप्रत अनुलोम विवाह मुंबई हायकोर्टानें मान्य केलेला आहे. शूद्र जातींत होणारे सर्व विवाह सजातीयच होत असें हायकोर्ट मानतें. त्यांत आणखी पोटजातींचा विचार तें करीत नाहीं. पण प्रतिलोमांत मात्र भानगडी आहेत. जितका जितका धर्मशास्त्रग्रंथकार अर्वाचीन, तितका तितका तो अधिक कडवा दिसून येतो. १२ व्या शतकांत झालेला कुल्लूकभट्ट नांवाचा मनुस्मृतीचा टीकाकार प्रतिलोम विवाह हा विवाहच मुळीं नव्हे असें म्हणतो. विवाह व चौर्य यांत भेद आहे हें उघड आहे. तेव्हां जेथें विवाह संभवतच नाहीं, तेथें तें चौर्यच समजावें, असा त्याचा कोटिक्रम आहे. प्राचीन धर्मशास्त्रकार पुष्कळ मवाळ होते. पण उत्तरोत्तर होत गेलेले ग्रंथकार कट्टर झाले व त्यांनीं प्रतिलोम संततीला अधर्म्य ह्मणजे बेकायदेशीर (illegitimate) ठरविलें. पण पूर्वीं औशनस स्मृतींत प्रतिलोम विवाह मान्य केलेले होते. सूताची व्याख्या औशनस स्मृतींत 'नृपात् ब्राह्मणकन्यायां विवाहेषु समन्वयात् जातः सूतः' अशी केली आहे. कांहीं स्मृतिकारांनीं प्रतिलोम संबंध विवाहानें झाल्यास होणाऱ्या संततीची एक जात, तर तसा संबंध चौर्यानें झाल्यास होणाऱ्या संततीची जात दुसरी सांगितली आहे. उशनस् ह्मणतो— 'ब्राह्मण स्त्रीला चौर्यानें क्षत्रियापासून होणारी संतति रथकार होय' (ब्राह्मण्यां क्षत्रियात् चौर्याद्रथकारः प्रकीर्तितः ।). अनुलोम संततीला हाच नियम लावून उशनस् म्हणतो कीं, 'ब्राह्मणाला क्षत्रिय स्त्रीपासून विवाहानें झालेला तो सुवर्ण होय', पण क्षत्रिय

स्त्रीला ब्राह्मणापासून चौर्यानें होणारी संतति भिषक् समजावी ( विधिना ब्राह्मणः प्राप्य नृपायां तु समन्त्रकम्। जातः सुवर्ण इत्युक्तः । नृपायां विप्रतश्चौर्यात्संजातो यो भिषक् स्मृतः। २३–२६ ). पण औशनस स्मृति पुढील ग्रंथकार मानीतनासे झाले व मनुस्मृतीवरील एक टीकाकार कुल्लूक भट्ट यानें ' क्षत्रियात् विप्रकन्यायां सूतो भवति जातितः ' [ १०, ११ ] इत्यादि मनुवचनावर टीका करतांना 'कन्या' शब्दानें केवळ स्त्री जाति समजावी, कारण क्षत्रिय व ब्राह्मणी यांचा विवाहच होऊं शकत नाहीं ( अत्र विवाहासंभवात्कन्याग्रहणंस्त्रीमात्रप्रदर्शनार्थम् ) असें म्हटलें आहे ! देवयानी व ययाति यांची संतति क्षत्रिय कशी झाली ?

या मिश्र–जातींपैकीं अनुलोमज जातींना ( पारशव वगळून ) उपनयनाचा अधिकार आहे. पण प्रतिलोमांत तो कोणालाच नाहीं.

मिश्र विवाहानें उत्पन्न होणाऱ्या जातींसंबंधानें अशा कल्पना आढळून येतात, पण या उपपत्ति सयुक्तिक दिसत नाहींत. सूत व रथकार या जाति वेदांतहि आहेत. स्मृतिकारांनीं अनेक जाती पाहून त्यांची उपपत्ति लावण्याचा प्रयत्न केला, एवढाच अर्थ दिसतो. ती उपपत्ति वास्तविक आहे असें म्हणतां यावयाचें नाहीं. उपपत्ति कोणतीहि धरली, तरी प्रत्यक्ष व्यवहारांत उत्तर तेंच येऊं शकतें. उदाहरण, पृथ्वी ही विश्वाचा मध्य असून सूर्य, चंद्र, तारे, ग्रह, इत्यादि तिच्या भोंवतीं फिरतात अशी पूर्वीची कल्पना होती, व तीप्रमाणें केलेल्या गणितानेंहि ग्रहणें वर्तवितां येत. आणि आतां पृथ्वी आपल्या भोंवतीं व सूर्याभोंवतीं फिरत असून सर्व ग्रहमालेसह सूर्य दुसऱ्या एका प्रचंड ताऱ्याकडे जातो आहे, व व्याधासारखा ( Serius ) पहिल्या प्रतीचा तारा, आपल्या या सूर्यापेक्षां हजारापट मोठा आहे, अशी उपपत्ति असतांहि तसेंच ग्रहण वर्तवितां येतें. पण त्यावरून पूर्वीची उपपत्ति बरोबर होती असें कांहीं ठरत नाहीं. विविध जातींच्या उत्पत्तीविषयींच्या या उपपत्ति सयुक्तिक नाहींत हें दाखविणें कठीण नाहीं. निरनिराळे ग्रंथकार एकाच जातीची उपपत्ति वेगवेगळ्या रीतीनें देतात. उदाहरणार्थ, मनु निषाद व पारशव हे समानार्थक शब्द मानतो व ब्राह्मणाला शूद्र स्त्रीपासून झालेल्या संततीला तीं नांवें देतो ( ९,१७८ ) पण नारद या दोहोंना निराळ्या जाति समजून ' शूद्रायां क्षत्रियात् निषादः ' व ' ब्राह्मणः शूद्रायां पारशवं सूते ' ( स्त्रीपुंसंयोग १०८ ) अशा त्यांच्या व्याख्या देतो. मिताक्षराकार तर निषाद ही एक स्वतंत्र जात मानतो [ निषादो नाम कश्चिन्मत्स्यघातजीवी प्रतिलोमजः स मा भूदिति पारशवो निषादः ]. असाच प्रकार करण, रथकार इत्यादिकांचा आहे. ' वैश्यात् शूद्रायां करणः । ' वैश्याला शूद्र स्त्रीपासून करण होतो, असें गौतम सांगतो [ ४, १७ ] व याज्ञवल्क्यहि तसेंच म्हणतो ( वैश्यात्तु करणः शूद्रायाम्। याज्ञ १, ९२ ). पण बोधायन म्हणतो ' वैश्याला शूद्र स्त्रीपासून रथकार होतो ' ( वैश्यात् शूद्रायां रथकारः १–

९५ ). याप्रमाणें एकाच जातीला दोन नांवें किंवा एकाच नांवाची भिन्न उपपत्ति आढळून येते. गौतम [ ४, १७ ] ज्याला भृज्जकंठ ह्मणतो, त्याला इतर अंबष्ठ ह्मणतात: 'वैश्यायां ब्राह्मणात् जातः भृज्जकंठः' असें गौतम ह्मणतो, तर मनु ह्मणतो 'ब्राह्मणाद्वैश्यकन्यायामम्बष्ठः'। ( १०,९ ). पुल्कस व चाण्डाल यांविषयीं असाच प्रकार आढळतो. 'वैश्येन राजकन्यायां पुल्कसः' असें वसिष्ठ ( १८,५ ) ह्मणतो, तर 'निषादात् शूद्रायां पुल्कसः' असें बोधायन ह्मणतो [ बो. ध. सू. १,९, १३ ] आणि 'नृपायां शूद्रसंसर्गात्' असें औशनस स्मृति म्हणते [ १७ ]. अशा रीतीनें कोणाचा कोणाशीं मेळ नसल्यामुळें या उपपत्ति खऱ्या नव्हत असेंच उघड होतें.

या जातींपैकीं मागध, वैदेहक, अवन्त्य इत्यादिकांचीं नावें देशवाचक आहेत. तरी त्यांचीहि उपपत्ति संकराच्या कल्पनेवर लाविलेली आढळते. 'वैश्यात् ब्राह्मण्यां वैदेहकः' असें बोधायन म्हणतो [ १, ९, ७, ]. अशा रीतीनें विविध जातींची उपपत्ति देतां देतां शेवटीं आमच्या स्मृतिकारांनीं हात टेकले आणि अखेर शेरा मारला, कीं 'कोण काय करतो, हें पाहून त्याची जात ठरवावी.' मनु म्हणतो, 'प्रच्छन्ना वा प्रकाशा वा वेदितव्या स्वकर्मभिः' ( १०, ४० ). पण या 'स्वकर्मभिः' नें मोठा घोंटाळा होईल. कारण हा नियम नीट लाविल्यास एकाच मनुष्याला एकाच जन्मांत, त्यानें धंदा पालटल्यास, दहा जातींत घालण्याचाहि प्रसंग येईल.

विविध आर्य जातींमध्यें अनार्यांना समाविष्ट करून घेण्यांत आलें कीं नाहीं, हें आतां पाहूं. यासंबंधानें मनूचें एक वचन मोठें सूचक आहे. अनार्य अशा ज्या अनेक जातींनीं आर्यांवर स्वाऱ्या करून त्यांना हैराण करण्याचा यत्न केला, त्याविषयीं मनु ह्मणतो 'शनकैस्तु क्रियालोपादिमाः क्षत्रियजातयः। वृषलत्वं गता लोके ब्राह्मणादर्शनेन च ॥ पौण्ड्रकाश्चौड्रद्रविडाः काम्बोजा यवनाः शकाः। पारदाः पल्हवाश्चीनाः किराता दरदाः खशाः॥' (१०, ४३–४४). मनूच्या मतें या पौंड्रादि सर्व जाति मूळ क्षत्रिय असून उपनयनादिक्रियालोपामुळें व ब्राह्मणांशीं संपर्क सुटल्यामुळें शूद्रावस्थेला गेल्या. पण या जाति खरोखरच अनार्य होत. त्यांतील द्रविड ह्मणजे द्रविडब्राह्मण नव्हत. मोहेंजदरो येथें ज्यांची संस्कृति उत्खननांत नुकतीच सांपडली ते द्रविड होत. काम्बोज ह्मणजे अफगाणिस्थानांतील लोक. यवन ह्मणजे ग्रीक; अयोनिया या त्यांच्या देशनामावरून त्यांना यवन म्हणत. कनिष्कादि परकी राजे शकवंशीय होते. आपण जो धार्मिक म्हणून शालिवाहन शक मानतों, तो या कनिष्कानेंच चालू केला असें म्हणतात. या शकांचा शालिवाहनानें पराभव करून त्याच्या स्मरणार्थ हा शक चालू करण्यांत आला असें कांहींचें म्हणणें आहे. पारद म्हणजे पर्शियांतील लोक. पल्हव हे जुने पारशी होत; त्यांची भाषा पेहलवी. त्यांच्यावरून पेहेलवान म्हणजे मल्ल हा शब्द आला आहे. चीनी प्रसिद्धच आहेत. किरात म्हणजे भिल्ल. दरद दार्दियन आणि खश म्हणजे आसामाकडील लोक. या सर्वांना मनु क्षत्रिय

समजत होता. यावरून क्रियाशुद्धि व ब्राह्मणांचा सहवास यांच्या योगानें ते शुद्ध क्षत्रिय होतील किंवा त्यांना तसें ठरवावें असेंच त्यानें सुचविलें आहे, असें दिसतें.

आतां अनार्यांना आर्यांत प्रविष्ट करून घेतल्याचीं प्रत्यक्ष उदाहरणें पाहूं. इ. स. १५० च्या सुमारास रुद्रदामन् हा मोठा क्षत्रप किंवा सत्रप ह्मणजे राजा होऊन गेला. त्याचा जुनागड येथें शिलेवर कोरलेला लेख आहे. चंद्रगुप्त मौर्य, अशोक, यांच्या सारखाच हाहि प्रसिद्ध राजा झाला. त्याचा आजा चष्टन हा पराशियन होता. सत्रप (क्षत्रप) हा शब्दहि मूळ पराशियन आहे. सुभेदार सुविशाख हा आनर्त (द्वारकेजवळ) व सौराष्ट्र (काठेवाड) येथें काम करीत होता. तो जातीचा पल्लव असून कुलैपाचा पुत्र होता. 'कृत्स्नानामानर्तसौराष्ट्राणां पालनार्थं नियुक्तेन पल्लवेन कुलैपपुत्रेणामात्येन सुविशाखेन' (जुनागड येथील रुद्रदामन्चा लेख). त्यानें तेथील एका तळयाला बांध घालून तें दुरुस्त केलें. यांनीं आर्यांत येऊन आपलीं पूर्वींचीं नांवें बदललीं. नाशिकच्या कोरीव लेण्यांतील लेखांत अग्निवर्म नामक शकाची मुलगी व गणप रेभिलाची पत्नी हिनें विष्णुदत्तनाम उपासकाला तें लेणें बांधून दिल्याचें सांगितलें आहे (शकाग्निवर्मणः दुहित्रा गणपरेभिलस्य भार्यया उपासिकाय विष्णुदत्ताय इ.). नहपान क्षत्रपाचा जांवई ऋषभदत्त (प्राकृत उसव-दात) हा मोठा दाता होता, त्यानें एक लक्ष नारळीचीं झाडें ब्राह्मणांला दान दिलीं. हा अनार्यच होता. पण त्याच्यापासून ब्राह्मण प्रतिग्रह घेत. प्रतिग्रह योग्य माणसा-पासूनच घेतला पाहिजे, भलत्यापासून घेतल्यानें पाप लागतें. तेव्हां ऋषभदत्त हा दान देण्यास पात्र होता, हें उघड झालें. कनिष्क, हुविष्क, हेहि शक असून त्यांनीं आर्यां-मध्यें प्रवेश करून घेतला. या गोष्टी कशा घडून आल्या याचा विचार करतां असें दिसून येतें कीं, बौद्ध धर्मामुळें त्या घडून आल्या. बुद्धाचें निर्वाण प्राप्त होण्याला जातीची कांहीं आडकाठी नसे, त्यामुळें पुष्कळ लोक बौद्ध झाले. पण पुढें जेव्हां बौद्ध धर्माचें उच्चाटन झालें, तेव्हां ते किंवा त्याचे वंशज हिंदु झाले असा हा प्रकार दिसतो.

इ. स. पूर्वी १४० च्या सुमारास व्याकरणमहाभाष्यकार पतंजलि होऊन गेला, त्यानें 'अरुणद्यवनः साकेतम्' 'अरुणद्यवनो मध्यमिकाम्' यवनानें साकेताला वेढा घातला, मध्यमिका नगरीवर स्वारी केली, हीं उदाहरणें प्रथम भूतकाळाचीं म्हणून दिलीं आहेत. प्रथम भूतकाळ हा नुकत्याच होऊन गेलेल्या गोष्टीसंबंधानें पण प्रयोग करणारानें न पाहिलेल्या हकिकतीविषयीं योजितात, अशा नियम असल्यामुळें यवनांच्या या स्वाऱ्या नुकत्याच होऊन गेल्या होत्या, असें समजून व त्या स्वाऱ्यांचा संबंध ग्रीक राजा जो मिनांदर, त्यानें इ. स. पूर्वी १५० च्या सुमारास केलेल्या स्वाऱ्यांशीं लावून पतंजलीचा काळ ठरविलेला आहे. हा जो मिनांदर यवन तो पुढें नागसेनाच्या उपदेशावरून बौद्ध झाला व बौद्ध धार्मिक वाङ्मयांत जो मिलिंदप्रश्न नांवाचा

प्रसिद्ध ग्रंथ आहे तो त्याच्याच नांवावरून आला. बेसनगरच्या गरुडस्तंभावरील लेखांत तो अंतलिखित नांवाच्या ग्रीक राजाचा दूत जो परमभागवत हेलिओडोरस (Heliodorus) त्यानें वासुदेवासाठीं बांधिल्याचें वर्णन आहे. (ज. रॉ. ए. सो. १९०९ पान १०८) म्हणजे हा मूळचा ग्रीक असून वैष्णव झाला होता. प्राचीन शासनांत पुष्कळ ठिकाणीं मग किंवा शाकद्वीपीय ब्राह्मणांचा उल्लेख येतो. उदाहरणार्थ, जोधपुरजवळील घाटियाल शासन (संवत् ९१८, एपिग्राफिया इन्दिका व्हॉ. ९ पान २७९); त्याचप्रमाणें भविष्यपुराण ब्राह्मपर्व यांत मगब्राह्मणांची कथा आहे. हे ब्राह्मण परदेशांतील म्हणजे शाकद्वीपांतील होते व ते मग (म्हणजे Magians) होत. वराहमिहिरानेंहि विष्णूचे पुजारी भागवत, सूर्याचे मग असें वर्णन बृहत्संहितेंत केलें आहे.

## जात्युत्कर्षाची कल्पना

असवर्ण विवाहाच्या निरनिराळ्या प्रकारांवरून जशी भिन्न भिन्न जातीच्या उत्पत्तीची कल्पना निघाली, तशी खालच्या जातीचा उत्कर्ष होत होत ती वरच्या जातींत जाण्याची व उलट उच्च जातीचा अपकर्ष होत होत ती खालीं येण्याची कल्पनाहि धर्मशास्त्रवाङ्मयांत आढळते. याहि बाबतींत तीन उपपत्त्या दिसून येतात. जो या जन्मीं जातिधर्मानें नेमून दिलेलीं कामें योग्य रीतीनें करीत रहातो, तो पुढील जन्मीं वरच्या जातींत जातो व उलट जो तसें न करतां वाईट कर्में करीत रहातो तो खालच्या जातींत जन्मतो, असें आपस्तंबधर्मसूत्र सांगतें. (२, ५, ११, १०-११); 'धर्मचर्यया जघन्यो वर्णः पूर्वंपूर्वं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ । अधर्मचर्यया पूर्वो वर्णो जघन्यं वर्णमापद्यते जातिपरिवृत्तौ ।'. महाभारताच्या अनुशासनपर्वांत (१४३, ९) हाच अर्थ 'यस्तु विप्रत्वमुत्सृज्य क्षात्रं धर्मं निषेवते । ब्राह्मण्यात्स परिभ्रष्टः क्षत्रयोनौ प्रजायते ।' या शब्दांनीं सांगितला आहे. 'स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकंपितुमर्हसि' म्हणजे क्षत्रिय या नात्यानें आपल्या कर्तव्याचा विचार करतांहि युद्धापासून चळणें तुला योग्य नाहीं, (२, ३१) किंवा 'स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः' या गीतावचनांतहि हाच तात्पर्यार्थ आढळून येतो. जात्युत्कर्ष किंवा जात्यपकर्ष यांविषयीं ही एक कल्पना झाली.

या विषयीं दुसरी कल्पना अशी होती कीं, वरच्या वर्णाशीं अनुलोम विवाह करीत गेल्यास सातव्या किंवा पांचव्या पिढींत वरचा वर्ण प्राप्त होतो. उदाहरण, एका ब्राह्मणानें क्षत्रिय स्त्रीशीं विवाह केला, व त्यांना मुलगी झाली; या मुलीनें पुनः ब्राह्मणाशीं विवाह केला, व त्यांच्या मुलीनेंहि पुनः ब्राह्मणाशींच विवाह केला; असें चालल्यास सातव्या पिढींतील संतति ब्राह्मण होते. उलट पहिल्या विवाहाच्या संततीनें क्षत्रियाशीं विवाह केल्यास व पुढें क्रम तसाच चाल-

त्यास सातव्या पिढीची संतति क्षत्रिय होते. गौतम म्हणतो, ' वर्णान्तरगमनं उत्कर्षापकर्षाभ्यां सप्तमे पंचमे वाचार्याः '। ( ४, १८.) याज्ञवल्क्यहि तसेंच म्हणतो— ' जात्युत्कर्षो युगे ज्ञेयः पंचमे सप्तमेऽपि वा ' [ १, ९६ ]. युग म्हणजे पिढी. हा जात्युत्कर्ष अनुलोम विवाहानींच होऊं शकतो, कारण त्यांतच भार्यात्व उत्पन्न होऊं शकतें. प्रतिलोमांत भार्यात्वच नसतें असें अपरार्कानें या विषयीं सांगितलें आहे. मनूनेंहि या विषयावर ' शूद्रायां ब्राह्मणाज्जातः श्रेयसा चेत्प्रजायते। अश्रेयान् श्रेयसीं जातिं गच्छत्यासप्तमाद्युगात्। ' असेंच म्हटलें आहे (१०, ६४). पण जात्युत्कर्ष किंवा अपकर्ष यांविषयींची ही कल्पना व्यवहारांत पटण्यासारखी नाही. कारण अशा विवाहाची जंत्री पिढयान् पिढया ठेवणार कोण? तेव्हां ही केवळ काल्पनिकच योजना आहे असें मानणें बरोबर दिसतें.

जातीच्या उत्कर्षापकर्षासंबंधांची तिसरी कल्पना म्हणजे व्यवसायानें उत्कर्ष किंवा अपकर्ष होतो ही होय. क्षत्रियानें ब्राह्मणाचा व्यवसाय चालू केला व तो सात पिढया तसाच चालू राहिला तर क्षत्रियाची सातवी पिढी ब्राह्मण होईल. उलट ब्राह्मणानें क्षत्रिय व्यवसाय केल्यास सातव्या पिढींत तो क्षत्रिय होईल. या विषयीं याज्ञवल्क्य म्हणतो ' व्यत्यये कर्मणां साम्यं पूर्ववच्चाधरोत्तरम् ' [ १, ९६ ]. अशा प्रकारचें उदाहरण दक्षिणेकडील कदंब घराण्यांत आढळून येतें. कदंब घराणें मूळ ब्राह्मण असून त्यांतील पुरुष तदनुरूप शर्मन् हें उपपद प्रथम आपल्या नांवाला लावीत. पण पुढें त्या घराण्यांत वर्मन् हें क्षत्रियोचित उपपद लावण्यांत येऊं लागलें. याविषयीं पूर्वी एकदां विचार आला आहेच. जातींचा व व्यवसायांचा संबंध हा विषय आता पुढील व्याख्यानांत घेऊं.

---

## वर्ण व जाति आणि त्यांचे व्यवसाय

मागील व्याख्यानांत मिश्रजातींविषयींच्या कल्पना धर्मशास्त्रग्रंथांत कोणत्या आढळून येतात हें सांगितलें. आतां या व्याख्यानांत वर्णांच्या व पोटजातींच्या व्यवसायांचा विचार करावयाचा आहे. तो झाल्यावर पुढील व्याख्यानांत या पोटजातींपैकीं अस्पृश्य म्हणून मानिलेल्या जातींच्या अस्पृश्यतेविषयीं विवेचन करूं.

पूर्वी एका व्याख्यानांत वर्णविचार करीत असतां सर्व वर्णांत ब्राह्मणाला श्रेष्ठत्व दिलेलें असून त्याच्या सांगण्याप्रमाणें सर्वांनीं वागावें असें धर्मशास्त्राचें मत दिसून येतें हें सांगितलेंच आहे. ब्राह्मण म्हणजे चालती बोलती देवता होय, म्हणून तो जन्मतःच श्रेष्ठ, सर्व वर्णांचा गुरु व प्रभु होय, त्याच्या आज्ञेंत सर्वांनीं वागावें

व तो सांगेल त्या वृत्तीचा म्हणजे धंद्याचा अवलंब करावा असें तें प्रतिपादन आहे. तैत्तिरीय आरण्यकांत 'यावतीर्वै देवतास्ताः सर्वा वेदविदि ब्राह्मणे वसन्ति' जेवढया म्हणून देवता आहेत त्या साऱ्या वेदवेत्त्या ब्राह्मणाच्या ठायीं वास करतात ( २, १५ ) असें म्हटलें असून ' ब्राह्मणो वै प्रजानामुपद्रष्टा ' ब्राम्हण हा सर्व लोकांवर देखरेख करणारा ( Superintendent ) होय असें काठकसंहिता सांगते ( ९, १६ ). ब्राह्मणांच्या श्रेष्ठपणाचें असें वर्णन अगदीं प्राचीन काळापासून आढळतें. शतपथ ब्राह्मणांत " श्रोत्रिय व राजा हे या लोकांना ' धृतव्रत ' ( नियमानुसार वागणूक करवून घेणारे असे)" आहेत असें सांगितलें आहे व गौतमधर्मसूत्रांत " द्वौ लोके धृतव्रतौ राजा ब्राह्मणश्च बहुश्रुतः " असा त्याचा अनुवाद केला आहे ( ८, १ ). प्रत्येक विषयाचें तंत्र म्हणून कांहीं असतें (बाह्य स्वरूपासंबधीं नियम Technique) तसें संसाराचें तंत्र असून तें ब्राह्मण व राजा यांच्यामुळें चालतें असा समज होता. त्यांतहि ब्राह्मण श्रेष्ठ होता. ' तेषां पूर्वः पूर्वो जन्मतः श्रेयान्, ' चार वर्णांत अलिकडचा पलीकडच्याहून श्रेष्ठ असें आपस्तंबधर्मसूत्र म्हणतें [ १, १, १, ५ ]. ऐतरेय ब्राह्मणांतील हरिश्चंद्राच्या कथेंत आलेलें 'भूयान्वै ब्राह्मणो राजन्यात् क्षत्रियापेक्षां ब्राह्मण अधिक चांगला, हें वचन पूर्वी सांगितलेंच आहे. मनू ह्मणतो ' वैशेष्यात् प्रकृतिश्रेष्ठयात् नियमस्य च धारणात् । संस्कारस्य विशेषाच्च वर्णानां ब्राह्मणः प्रभुः ' ( १०, ३ ) ब्राह्मण हा परमेश्वराच्या मुखापासून झाला हें त्याचे वैशिष्टयच आहे. क्षमा शांति इत्यादि गुण त्यांच्या ठायीं स्वाभाविक असतात, वेद व्रताचें तो धारण करतो, शिवाय त्याला विशेष संस्कारहि होतात, इतर वर्णांना तितके नसतात, म्हणून ब्राह्मण हा सर्व वर्णांचा प्रभु होय. हाच अर्थ मनुनें आणखी ' उत्तमाङ्गोद्भवाज्ज्यैष्ठयात् ब्रह्मणश्चैव धारणात् । सर्वस्यैवास्य सर्गस्य धर्मतो ब्राह्मणः प्रभुः' यांत अधिक स्पष्ट केला आहे ( १, ९३ ). ' तिन्ही वर्णांनीं ब्राह्मण सांगेल तसें वागावें, ब्राह्मणानें सर्वांचा धर्म सांगावा व राजानें त्याची अंमलबजावणी करावी ' असें वासिष्ठधर्मसूत्र म्हणतें [ त्रयो वर्णा ब्राह्मणस्य निर्देशेन वर्तेरन् । ब्राह्मणो धर्मान् प्रब्रूयात् । राजा चानुशिष्यात् । १, ३९ –४१ ].

तिन्हीं वर्णांनीं म्हणजे ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य यांनीं वेदांचें अध्ययन करावें, पण वेदाचें प्रवचन मात्र इतरांनीं करूं नये, तें ब्राह्मणानेंच करावें सर्वांची वृत्ति म्हणजे उदरनिर्वाहाचीं साधनें ब्राह्मणानें सांगावीं व स्वतः त्याप्रमाणें वागावें, असें मनु म्हणतो. ' अधीयीरंस्त्रयो वर्णाः स्वकर्मस्था द्विजातयः । प्रब्रूयाद् ब्राह्मणस्त्वेषां नेतराविति निश्चयः ॥ सर्वेषां ब्राह्मणो विद्याद् वृत्त्युपायान् यथाविधि । प्रब्रूयादितरेभ्यश्च स्वयं चैव तथा भवेत् ॥ [ मनु. १०, १–२ ]. शिष्ट ब्राह्मण जो ज्याचा धर्म म्हणून सांगतील तोच त्याचा निःसंशय धर्म होय [ यं शिष्टा ब्राह्मणा ब्रूयुः स धर्मः

स्यादशंकितः ॥ मनु. १२, १०९ ]. सर्व वर्णांचा धर्म व वृत्ति हीं ब्राह्मणांनीं सांगावीं, असें म्हणून तसा अधिकार ब्राह्मणांच्या हातीं दिला.

धर्म आणि वृत्ति यांमध्यें भेद आहे. कित्येक ठिकाणीं हे दोन्ही शब्द एकाच अर्थानें योजलेले आढळतात. तथापि मूलतः ते भिन्न आहेत. धर्म हा अवश्य कर्तव्य असतो व वृत्ति म्हणजे निर्वाहाचें साधन, ही अवश्य नाहीं. उदाहरण, अध्ययन, यजन व दान हे तिन्ही वर्णांचें धर्म होत, म्हणजे सर्वांनीं ते आचरिले पाहिजेत. परंतु ब्राह्मणाला जीं षट्कर्मे सांगितलीं आहेत, त्यांतील अध्ययनादि तीनच अवश्य कर्तव्य असून अध्यापनादि इतर तीन निर्वाहासाठीं त्यानें पाहिजेत तर करावीं, वाटल्यास करूं नयेत मनु म्हणतो ' अध्यापनमध्ययनं यजनं याजनं तथा । दानं प्रतिग्रहश्चैव षट् कर्माण्यग्रजन्मनः ॥ ' [ १०. ७५ ], पण ' षण्णां तु कर्मणामस्य त्रीणि कर्माणि जीविका । याजनाध्यापने चैव विशुद्धाच्च प्रतिग्रहः ' [ १०, ७६ ]. जीविका म्हणजे वृत्ति किंवा उदरनिर्वाह. गौतमधर्मसूत्रांतहि तसेंच म्हटलें आहे [१०,१–३] 'द्विजातीनामध्ययनमिज्या दानम् । ब्राह्मणस्य अधिका प्रवचनयाजनप्रतिग्रहाः । पूर्वेषु नियमस्तु । ' पूर्व म्हणजे अध्ययनादि तीन. हीं नियमानें केलींच पाहिजेत. वसिष्ठ व आपस्तंब या धर्मसूत्रांतहि तेच सांगितलें आहे [ व. २, १३–१५, आ. २, ५, १०, ५–८ ]. चार वेद, सहा वेदांगें, पुराण, न्याय, मीमांसा व धर्मशास्त्र हीं जीं चवदा विद्यास्थानें, यांचा आश्रय ब्राह्मण करतो आणि इतरांना वृत्ति दाखवून देतो असें शंखलिखितहि म्हणतात [ एतानि विद्यास्थानानि ब्राह्मणोधिकुरुते स च वृत्तिं दर्शयतीतरेषाम् ).

या ज्या ब्राह्मणाच्या वृत्ति सांगितल्या, त्यांतहि गौतमानें ( ७, ४–५ ) तारतम्याचा श्लेष काढिला असून याजन, अध्यापन व प्रतिग्रह असा त्यांचा उतरता क्रम लाविला आहे ( याजनाध्यापनप्रतिग्रहाः सर्वेषाम् । पूर्वः पूर्वो गुरुः । ) व मनुहि तसेंच करतो. तो म्हणतो ( १०, १०९ ) ' प्रतिग्रहाद्याजनाद्वा तथैवाध्यापनादपि । प्रतिग्रहः प्रत्यवरः प्रेत्य विप्रस्य गर्हितः । '. याप्रमाणें उदरनिर्वाहाच्या साधनांतहि प्रतिग्रह शेवटीं येतो. ब्राह्मणाची वृत्ति राहिली पाहिजे या बुद्धीनें इतर वर्ण जो त्याला मनोभावानें व मानपूर्वक देतील तो खरा प्रतिग्रह. मी ब्राह्मण आहें ह्मणून मला द्या असें म्हणून मागितलेला तो अर्थातच कनिष्ठ होय. असा हा धर्म व वृत्ति यांमधील भेद आहे.

ब्राह्मणाप्रमाणें क्षत्रियालाहि अध्ययनादि तीन कर्मे अवश्य असून वृत्ति म्हणून लूट किंवा सैनिक वेतन, अपराधाबद्दल प्रजेपासून घेतलेला दंड आणि त्यांचें रक्षण करण्याबद्दल त्यांच्याकडून घ्यावयाचा करभार अशीं साधनें सांगितलीं आहेत. अपराधाबद्दल घ्यावयाचा दंड न्याय्य रीतीनेंच घेतला पाहिजे. तो अन्यायानें घेण्यांत आला असें आढळलें तर तो ज्याचा त्याला परत तरी केला पाहिजे नाहींतर वरुणाला

अर्पण करून समुद्रांत टाकावा असें मनु व महाभारतकार म्हणतात. गौतम म्हणतो (१०, ७–१०) 'राज्ञो ऽधिकं रक्षणं सर्व भूतानाम्। न्याय्यदण्डत्वम्।'. अध्ययनादिकांखेरीज क्षत्रियाला प्रजारक्षण व अपराध्यांना दंड करणें हीं कर्मं सांगितलीं आहेत. आपस्तंब म्हणतो 'एतान्येव (अध्ययनादीनि) क्षत्रियस्य दण्डयुद्धाधिकानि।' (२, ५, १०, ७). वसिष्ठ सांगतो 'शस्त्रेण च प्रजापालनं स्वधर्मस्तेन जीवेत्' (१, १७) शस्त्राच्या साह्यानें प्रजारक्षण करून क्षत्रियांनीं उपजीविका चालवावी. नारद तसेंच म्हणतो 'त्रिविधं क्षत्रियस्यापि शुद्धं वैशेषिकं धनम्। करायुद्धोपलब्धं च दंडाच्च व्यवहारतः' (४, ५३).

वैश्याला त्रैवर्णिकांच्या सामान्य धर्मांशिवाय 'कृषिगोरक्ष्यवाणिज्यं' हे कर्म जीविकेसाठीं सांगितलें आहे. गौतमधर्मसूत्र, वसिष्ठधर्मसूत्र, मनु हे त्या तिहींबरोबर आणखीं कुसीद म्हणजे व्याजबट्टा हें चवथें सांगतात. आपस्तंब म्हणतो 'क्षत्रियवद्वैश्यस्य दण्डयुद्धवर्जं कृषिगोरक्ष्यवाणिज्याधिकम्।' (२, ५, १०, ८). गौतम म्हणतो, 'वैश्यस्याधिकं कृषिवणिक्पाशुपाल्यं कुसीदम्।' (१०, ५०). मनु म्हणतो 'पशूनां रक्षणं दानमिज्याध्ययनमेव च। वणिक्पथं कुसीदं च वैश्यस्य कृषिरेव च।' (१, ९०).

आतां, शूद्राला काय सांगितलें आहे तें पाहूं. त्याला इतर वर्णांची परिचर्या हें एकच धर्म व वृत्ति या विषयींचें कर्म सांगितलें आहे. गौतमधर्मसूत्र याविषयीं म्हणतें 'परिचर्या चोत्तरेषाम्। तेभ्यो वृत्तिं लिप्सेत' (१०, ५८–५९) शूद्रानें वरच्या वर्णांची सेवा करून त्यांच्याकडून पोटाला मिळवावें. त्यानें त्याचें उच्छिष्ट खावें किंवा शिल्पवृत्ति करावी असेंहि पुढें त्यांत म्हटलें आहे. वासिष्ठानें असेंच सांगितलें आहे. तो म्हणतो 'तेषां परिचर्या शूद्रस्य नियता च वृत्तिः।' (१, २०). शूद्राविषयीं प्रथम मनूनें सांगितलें कीं 'एकमेव तु शूद्रस्य प्रभुः कर्म समादिशत्। एतेषामेव वर्णानां शुश्रूषामनसूयया'। त्रैवर्णिकांची मनःपूर्वक सेवा हें एकच कर्म परमेश्वरानें शूद्राला लावून दिलें (१, ९१). पण त्यालाहि तें बरेसें वाटलें नाहीं; म्हणून पुढें त्यानें शूद्राला अनेक निरनिराळे धंदे सांगितले. तो दहाव्या अध्यायांत म्हणतो, 'अशक्नुवंस्तु शुश्रूषां शूद्रः कर्तुं द्विजन्मनाम्। पुत्रदारात्ययं प्राप्तो जीवेत्कारुककर्मभिः'। (९९). द्विज शुश्रूषा करतां न येईल व कुटुंबावर प्रसंग येईल तर त्यानें दुसरेहि शिल्पी लोकांचे धंदे करावे. याज्ञवल्क्यानें (१, १२०) पुढें याचाच अनुवाद करून 'शूद्रस्य द्विजशुश्रूषा तयाऽजीवन्वाणिक भवेत्। शिल्पैर्वा विविधैर्जीवेद् द्विजातिहितमाचरन्।' 'शुश्रूषा करून, वाण्याचें कर्म करून किंवा द्विजांच्या उपयोगी असे अनेक धंदे आहेत ते करून शूद्रानें उपजीविका करावी,' असें सांगितलें. देवलानें शूद्रासाठीं द्विजशुश्रूषेबरोबर 'कर्षण–पशुपालन–भारोद्वहन पण्य-

व्यवहार–चित्रकर्म-नृत्यगीत–वेणुवीणामुरजमृदंगवादनादीनि ' विविध शिल्पकर्मे सांगितलीं आहेत.

अशा रीतीनें शूद्राला वैश्यकर्म करण्याची अनुज्ञा मिळून तो वरचीं वरचीं कामें करीत गेला व ब्राह्मणालाहि आपद्धर्म म्हणून खालचीं कामें करण्याची अनुज्ञा मिळाल्या- मुळें तो खालीं खालीं आला आणि दोघेहि एका पातळीवर आले. केवळ द्विजशुश्रूषे- वरून विविध शिल्प व त्यावरून वाणिज्य अशा रीतीनें शूद्र वणिग्वृत्ति झाला. त्या नंतर क्षात्रवृत्ति स्वीकारून तो राजाहि झाला. शूद्रांनीं राज्यें मिळविलीं व म्लेच्छहि राजे झाले, तेव्हां ' न म्लेच्छदेशे वसेत्, ' ' न शूद्रराज्ये निवसेत् ' असें सांगण्याची पाळी आली. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. अशा रीतीनें या गोष्टी हळुहळु वाढत जाऊन शूद्र वर चढत गेले; आता ब्राह्मण खालीं कसा आला तो पहा. याजन, अध्यापन व प्रतिग्रह हीं त्यांच्या उपजीविकेचीं साधनें. पण त्यांनीं ब्राह्मणांचें पोट भरत नाहीसें झालें. केव्हांहि झालें तरी यज्ञ करणें ही खुषीची गोष्ट होती. ते यज्ञ अर्थात् केव्हां केव्हां होणार. तेव्हा याजनकर्मावर कितीसे ब्राह्मण जगणार ? यज्ञ चांगला झाला तरी त्याला तरी त्याला सतरा ब्राह्मणांहून अधिक लागत नाहींत. अशा रीतीनें याजनाचें साधन हळुहळु संपुष्टांत आलें. अध्यापनाकडे वळावें, तों त्यावर कितीतरी निर्बंध. अध्यापनानें द्रव्य मिळण्याचा प्रथम निषेध केलेला. मोफत विद्या- र्थ्यांना शिकवावें इतकेंच नव्हे तर त्यांना आपल्या घरीं जेवावयालाहि घालावें अशी शिफारस घालून दिलेली. त्यांतून दक्षिणा घ्यावयाचीच तर ती विद्या पुरी होऊन विद्यार्थी घरीं जावयास निघेल तेव्हां ती घ्यावयाची. याविषयीं प्राचीन ग्रंथांत अनेक उदाहरणें आहेत. बृहदारण्यकोपनिषदात जनक व याज्ञवल्क्य याचा संवाद आहे, त्यांत जनक याज्ञवल्क्याला आरंभींच एक सहस्र गाई देऊं लागला असतां याज्ञवल्क्य म्हणतो, ' माझ्या पित्यानें मला सांगितलें आहे कीं शिष्याला पूर्ण विद्या सांगितल्याशिवाय कांहीं घेऊं नये ' ( पिता मेऽमन्यत नाननुशिष्य हरेदिति । बृ. उ. ४, १, १ ). याज्ञवल्क्य स्मृतींत 'गुरवे तु वरं दत्वा स्नायीत तदनुज्ञया' म्हणजे विद्या पूर्ण झाल्या- वर गुरूला दक्षिणा देऊन त्याच्या आज्ञेनें समावर्तन करावें ( १, ५१ ) असें म्हटलें असून गौतमानें ' विद्यान्ते गुरुरर्थेन निमन्त्र्यः ' विद्या झाल्यावर गुरूला द्रव्य देऊन त्याची आज्ञा घेऊन जावें (गौ. ध. सू. २, ५४) असेंच सांगितलें आहे. त्या वेळीं राजपुत्रांखेरीज इतर विद्यार्थी गरीबच असत. श्रीमंताचीं मुलें फार शिकण्याच्या भानगडींत पडत नसत. तेव्हा हे विद्यार्थी देणार तरी काय ? एखादी गाय. राजा गांव देई, पण तो एखाद्या ब्राह्मणाला मिळावयाचा. वैश्य अश्व देत असत. ' गौ- र्ब्राह्मणस्य वरो ग्रामो राजन्यस्याश्वो वैश्यस्य ' असें पारस्करगृह्यसूत्रांत याविषयीं ह्मटलें आहे. याशिवाय वेतन घेऊन शिकविण्याचा निषेध आहे तो निराळाच. सौर- पुराण ह्मणतें ( १०,४२ ) ' गृहीत्वा वेतनं वेदं योऽध्यापयति मूढधीः । अधीते

यो हि वा दत्त्वा तावुभौ पापिनौ स्मृतौ ' वेतन घेऊन वेद शिकविणारा व तें देऊन शिकणारा दोघेहि पापी ! त्यांनीं सर्व वेद मुखोद्गत केले तरी मद्याच्या भांड्यांत ठेवलेल्या पाण्याप्रमाणें ते दोषीच होत. ' तयोर्मुखगता वेदा निन्दिताः सर्वकर्मसु । सुराभाण्डगतं तोयं यथा भवति निन्दितम् '. म्हणून द्रव्य घेऊन वेदविद्या शिकवूं नये. कालिदासानें मालविकाग्निमित्रांत ' ज्यानें केवळ पोटासाठींच विद्याध्ययन केलें, त्याला ज्ञान विकणारा वाणी म्हणावें ' ( यस्यागमः केवलजीविकायै तं ज्ञानपण्यं वणिजं वदंति ।' १.१७ ) असें म्हटलें असून रघुवंशांत कौत्स आणि वरतन्तु या शिष्य गुरूच्या कथेंतहि तोच भावार्थ दाखविला आहे ( सर्ग ५ ). विद्या पूर्ण होऊन कौत्स घरीं जावयास निघाला तेव्हां गुरुदक्षिणा काय देऊं असें त्यानें वरतन्तूला विचारिलें. गुरू म्हणाला, तुझ्या आचरणानें मीं संतुष्ट झालों आहे, मला दुसरी दक्षिणा कांहीं नको. पण शिष्य ऐकेना. तेव्हां गुरु जरा रागानें म्हणाला ' बरें तर, ज्याअर्थी तूं माझ्यापासून चवदा विद्या शिकलास त्याअर्थी चौदा कोट रुपये मला दे '. ठीक आहे म्हणून कौत्स हें द्रव्य मिळविण्यासाठीं चक्रवर्ती रघुराजाकडे आला. पण आदल्या दिवशींच रघूचा विश्वजित् यज्ञ संपून त्यानें सर्वस्व देऊन टाकलें होतें. मातीचीं भांडीं मात्र उरलीं होतीं; हें पाहून कौत्स दुसऱ्या कोणाकडे तरी जावें म्हणून निघाला. ' योगक्षेमासाठीं धनिकाकडे राजाकडे ब्राह्मणानें जावें. ( स ईश्वरमभिगच्छेद्योगक्षेमार्थम् ) असा धाराच होता. पण रघूनें त्याला दोनतीन दिवस आपल्या घरीं रहावयास सांगितलें व म्हणाला, मी तितक्या अवधींत तुला द्रव्य मिळवून देण्याची व्यवस्था करतों. कुबेरावर स्वारी करून त्याच्याकडून द्रव्य आणावें असा विचार रघूनें केला व त्याची वार्ता लगेच कुबेराला कळली. तेव्हां त्यानें स्वारी होण्याची वाट न पहातां आपण होऊनच रघूच्या कोशागारांत रत्नसुवर्णांचा वर्षाव करून ते भरून टाकिलें व रघूनें तें सारें द्रव्य कौत्साला देऊं केलें. असल्या गोष्टींत अतिशयोक्ति असली, तरी त्यांतील तात्पर्यार्थच आपल्याला ग्राह्य आहे. द्रव्य किती होतें, ही कविकल्पना असेल. कविसृष्टींत कशालाच तोटा नसतो. कालिदासानें मेघदूतात वर्णिलेल्या यक्षाच्या घरीं विहिरींत उतरण्याच्या पायऱ्याहि पाचूच्या दगडांनीं बांधिलेल्या होत्या ( मरकतशिलाबद्धसोपानमार्गा वापी ). असो. महाभारतांतहि अशा कथा आहेत. उत्तङ्क नांवाचा धौम्यमहर्षींचा एक शिष्य होता. त्याची विद्या पुरी होऊन तो घरीं जावयास निघाला तेव्हां काय गुरुदक्षिणा देऊं असें त्यानें विचारल्यावरून ' राजाच्या राणीच्या कानांतील कुंडलें आणून दे ' असें धौम्यानें सांगितलें. ही गोष्ट मोठी कठीण होती. पण उत्तङ्क राजाकडे गेला व राजानें सांगितल्यावरून राणीनेंहि तीं कुंडलें खुषीनें त्याला दिलीं व तीं त्यानें गुरुपत्नीला अर्पण केलीं अशी कथा आहे.

याच्या उलट प्रथमपासून योग्य वेतन देऊन गुरूंची योजना केल्याचींहि उदाहरणें आहेत. महाभारतांत कौरवपांडवांना शस्त्रास्त्रविद्या शिकविण्यासाठीं द्रोणाचार्यांना भरपूर वेतन देऊन नेमिल्याचें सांगितलें आहे. द्रोण व द्रुपद राजा हे सहाध्यायी असल्यामुळें मोठेपणीं दारिद्र्यानें गांजलेला द्रोण मुलाला एक गाय दे म्हणून द्रुपदाला सांगूं लागला. पण ' ययोरेव समं वित्तं ययोरेव समं श्रुतम् । तयोर्मैत्री विवाहश्च न तु पुष्टविपुष्टयोः ॥ ' असें सांगून कांहींएक न देतां द्रुपदानें त्याला वाटेला लाविलें होतें. त्याचा सूड उगविण्यासाठीं द्रोण कौरवपांडवांना शिकवावयास राहिला. तात्पर्य सांगावयाचें एवढेंच कीं, अध्यापनापासून सर्वांना मिळण्यासारखें कांहीं नव्हतें, आणि आला दिवस तर साजरा केला पाहिजे. तेव्हां त्यासाठीं कांहीं युक्त्या काढण्यांत आल्या. कांहीं विशिष्ट कार्यांत ब्राह्मणच पाहिजेत असें ठरविण्यांत आलें. सत्रांत सर्व ब्राह्मण पाहिजेत अशा अर्थाचें एक मीमांसासूत्र आहे (ब्राह्मणानां वेतरयोरार्त्विज्याभावात् जै. सू. ६.६,१८). ब्राह्मणाशिवाय ऋत्विक्पणा कोणाला करतां येऊं नये, याविषयीं रामायणांतील त्रिशंकूची कथा प्रसिद्ध आहे. त्रिशंकु हा चांडाल अवस्थेंत गेला असतां त्याला यज्ञ करण्याची बुद्धि झाली. पण वसिष्ठानें ऋत्विज् होण्याचें नाकारलें, तेव्हां ब्राह्मण होऊं पहाणारा क्षत्रिय विश्वामित्र ऋत्विज् होण्याला सिद्ध झाला असता 'क्षत्रियो याजको यस्य चांडालस्य विशेषतः ! कथं सदसि भोक्तारो हविस्तस्य सुरर्षयः' । ( रा. बाल. ५९, १३ ) म्हणजे ' चांडाल यज्ञ करणारा आणि क्षत्रिय तो चालविणारा असें असल्यावर त्या सभेंत देव आणि ऋषि हे हविर्भाग कसा स्वीकरणार ?' असा प्रश्न उपस्थित झाला.

अशा रीतीनें ब्राह्मणांची कांहीं सोय कांहीं प्रमाणांत कांहीं काळ झाली, तरी पुढें यज्ञयागच मुळीं कमी कमी होऊं लागले. कर्मविद्या व ज्ञानविद्या असे विद्येचे अपरा आणि परा नांवाचे दोन प्रकार झाले आणि औपनिषद विचाराच्या प्रसारामुळें यज्ञावरील श्रद्धा उडत चालली व त्यांना ओहोटी लागली. ' प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपाः ' ह्मणजे यज्ञ या फुटक्या होड्या होत अशी मुंडकोपनिषदांतच यज्ञनिन्दा होऊन बौद्धाच्या शिकवणीनें तर कहरच केला. तेव्हांपासून ह्मणजे इ. स. पूर्वी सहाव्या शतकापासून तर यज्ञयागांचा बहुतेक लोपच झाला. गौतम बुद्धाचा काळ आतां निश्चित झाला आहे. अशोक हा इ. स. पूर्वी २६७ त सिंहासनारूढ झाला असें समकालीन ग्रीक इतिहासावरून संशयातीतपणें दिसून आलें असून त्याच्या पूर्वी २१८ वर्षे बुद्धाला निर्वाणप्राप्ति झाली. ही गोष्ट इ. स. पूर्वी ४८५ तील होय. त्याच्या पूर्वी ऐशीं वर्षांच्या सुमारास तो जन्मला ह्मणजे त्याचा जन्मकाळ इ. स. पूर्वी ५६५ असा येतो. बुद्धाची पुढें विष्णूच्या अवतारांत गणना होऊं लागली तरी त्यांचें स्वरूप वेदनिंदक म्हणूनच

राहिलें व जयदेवानें गीतगोविन्दांत दशावतारांच्या वर्णनांत केशवाला म्हणजे विष्णूला 'धृतबुद्धशरीर' असें म्हटलें असलें तरी 'निन्दसि यज्ञविधेरहह श्रुतिजातम्' म्हणजे 'तूं बुद्ध होऊन सर्व श्रुतींची निंदा आपण करितोस' असेंच त्याचें वर्णन केलें आहे. गौतमबुद्धानें तीन गोष्टी केल्या. ब्राह्मणांचें जन्मजात श्रेष्ठत्व अमान्य केलें, यज्ञयाग फोल ठरविले आणि वेदप्रामाण्य झुगारून दिलें. पूर्वीच्या इतर गोष्टी म्हणजे कर्मसिद्धान्त, पुनर्जन्म इत्यादि तो मानीत असे; पण यज्ञकर्माला त्याच्या मतांत मुळींच जागा नव्हती. म्हणजे बौद्ध धर्माच्या प्रसारामुळें यज्ञपद्धतीचें बहुतेक समूळ उच्चाटन झालें.

अध्यापन व यज्ञातील आर्त्विज्य यांची अशा रीतीनें वाट लागल्यावर दान तेवढें उरलें त्यामुळें दानाची महती ब्राह्मणांनीं वाढविली व अनेक व्रतवैकल्याचा पुरस्कार केला. याप्रमाणें ब्राह्मणाला शास्त्रानें सांगितलेल्या वृत्ती मागें पडल्यामुळें ब्राह्मण साहजिकरणेंच पोटासाठीं दुसऱ्या गोष्टी करूं लागले. पण हें स्थित्यंतर बौद्धकालीं किंवा त्यानंतर झालें असें मात्र नाहीं. त्याला आरंभ वेदकालींच झाला होता. त्यावेळीं ब्राह्मणाच्या वृत्तीनें न रहाणारे ब्राह्मण असून त्यांना अब्राह्मण असें म्हणत. राजसेवादिकारी, ग्रामोपाध्याय इत्यादिकांची गणना या वर्गांत होई. असा ब्राह्मण यज्ञ करील तर सहस्र ऋचां ऐवजीं आठशेंच म्हणाव्या असें ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलें आहे (७. ७.). अशी अडचण येऊं लागल्यामुळें पूर्वीचे वृत्तिविषयक नियम ढिले करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली. मनु म्हणतो, 'अजीवंस्तु यथोक्तेन ब्राह्मणः स्वेन कर्मणा । जीवेत्क्षत्रियधर्मेण स ह्यस्य प्रत्यनन्तरः ॥ उभाभ्यामप्यजीवंस्तु कथं स्यादिति चेद्भवेत् । कृषिगोरक्षमास्थाय जीवेद्वैश्यस्य जीविकाम् ॥' (१०, ८१, ८२); ब्राह्मणाला ब्राह्मणाच्या ठरीव वृत्तीनें रहातां न आलें तर त्यानें लगेच खालच्या वर्णाचें म्हणजे क्षत्रियाचें काम करून पोट भरावें. पण त्यानेंहि तें भरत नाहींसें झालें तर कृषिगोरक्षादि वैश्य वृत्तीनेंहि रहावयास हरकत नाहीं. 'आपत्स्वनन्तरा वृत्तिः' म्हणजे आपत्कालीं कोणत्याहि वर्णानें आपल्या लगेच खालच्या वर्णाची वृत्ति स्वीकारली तरी चालेल असें विष्णुधर्मसूत्रहि सांगतें (२, १५).

ब्राह्मणानें क्षत्रियाचें काम केव्हां करावें या संबधानें मनु म्हणतो, 'शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते । द्विजातीनां च वर्णानां विप्लवे कालकारिते ॥ आत्मनश्च परित्राणे दक्षिणाना च संगरे । स्त्रीविप्राभ्युपपत्तौ च घ्नन्धर्मेण न दुष्यति ॥' (८, ३४८–३४९). धर्माचें रक्षण करण्यासाठीं, द्विजांवर संकट आलें असतां स्वतःचें रक्षण करण्यासाठीं, किंवा स्त्रिया व ब्राह्मण यांना संकटमुक्त करण्यासाठीं शस्त्रधारण करण्यानें दोष लागत नाहीं. पाणिनीच्या कालीं

शस्त्र धारण करणारे ब्राह्मण होते व ' ब्राह्मणकोष्णिके संज्ञायाम् ' या सूत्रांत [ पा. ५, २, ७ ) त्यांचा उल्लेख आहे. ज्या ठिकाणीं ब्राह्मण आयुधजीवि आहेत तो देश ' ब्राह्मणक देश ' या संज्ञेला पात्र होई. ब्राह्मणाना शस्त्रधारणाची अनुज्ञा मिळा-ल्याचा परिणाम असा झाला कीं, पुढें कित्येक ब्राह्मण घराण्यांनीं राज्ये मिळविलीं. इतिहासप्रसिद्ध शुंग, काण्व, वाकाटक, कदम्ब इत्यादि राजघराणीं ब्राह्मणजातीचीं होतीं. वरच्या वर्णानें खालच्या वर्णाची वृत्ति आपत्कालीं करावी, पण उलट मात्र करूं नये म्हणजे क्षत्रियानें ब्राह्मणाची वृत्ति धरूं नये असा निर्बंध घालण्यांत आला होता. ' न त्वेव ज्यायसीं वृत्तिमभिमन्येत कर्हिचित् ' असें मनूनें या विषयीं सांगून ' जो कोणी खालच्या जातीचा माणूस वरच्या जातीचें काम लोभानें करील, त्याला राजानें निर्धन करून तावडतोब घालवून द्यावें ' ( यो लोभादधमो जात्या जीवेदुत्कृष्ट-कर्मभिः । तं राजा निर्धनं कृत्वा क्षिप्रमेव प्रवासयेत् ॥ ); कारण ' वरं स्वधर्मो विगुणो न पारक्यः स्वनुष्ठितः । परधर्मेण जीवन्हि सद्यः पतति जातितः । ( मनु १०, ९५–९७ ) असें बजाविलें आहे. ' श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः । ' या गीतावचनाचा तोच अभिप्राय आहे. अशा रीतीनें संकटकालीन वृत्ति सागतांनाहि स्मृतिकारानीं भानगडी करून ठेविल्या आहेत.

अशा प्रकारच्या आपत्कालीन सवलतीमुळें आतां बहुतेक ब्राह्मण आपण शूद्र झालों आहों ही गोष्ट ओळखून काहीं स्मृतिकारांनीं असें सांगितलें आहे कीं ब्राह्म-णानें वैश्य व्हावें, पण प्रत्यक्ष तागडी मात्र हातीं धरू नये, तें काम नोकराकडून करावावें. या सवलतींचा उपयोग इतर वर्णांनीं करून घेतला, पण क्षत्रियांनीं मात्र दुसऱ्या वर्णाच्या वृत्ति फारशा घेतल्या नाहींत. तथापि इ. स. पांचव्या किंवा साहव्या शतकांत इंद्रपुर म्हणजे सांप्रतचें इंदूर येथें जातीने क्षत्रिय असलेले दोन गृहस्थ वाणी झाले होते असा उल्लेख ( गुप्तशासनें पान ७० येथें ) आढळतो. ब्राह्मणांना स्मृति-कारांनीं सवलती दिल्या, पण त्या देतांना त्यांच्या पोटांत फार खळबळत होतें. म्हणून त्यांनीं या सवलतींवर फार निर्बंध घातलेले आढळतात, उदाहरणार्थ, ब्राह्मणांनीं व क्षत्रियांनीं वाढी दिढीचा म्हणजे व्याजबट्याचा धंदा करूं नये. वाशिष्ठ म्हणतो ' ब्राह्मणराजन्यौ वार्धुषी न दद्याताम् ' ( २, ४० ). मनु म्हणतो ' ब्राह्मणः क्षत्रियो वाऽपि वृद्धिं नैव प्रयोजयेत् । ' ( १०, ११७ ). या विषयीं वाशिष्ठ व बोधायन यांनीं एक कथाहि सांगितली आहे. ब्रह्महत्या व व्याजबट्टा हीं दोन्ही पापेंच, पण एकदां त्यांना तराजूच्या पारड्यांत घातलें असतां ब्रह्महत्येचें पारडें अगदीं वर टोंका-पर्यंत चढलें व व्याजबट्याचें पारडें खालीं तळाशी मिळालें ! ( वसिष्ठ २, ४२; बौ. १. ५, ७९ ' ब्रह्महत्यां च वृद्धिं च तुलया समतोलयत् । अतिष्ठद्भ्रूणहा कोट्यां वार्धुषिः समकम्पत । ). ब्राह्मण वैश्य झाला तरी त्यानें निदान कृषि म्हणजे शेती करूं

नये असें मनु म्हणतो ( १०, ८३–८४ ); कारण शेतींत हिंसा होत असते, नांगराच्या योगानें पृथ्वी फाटते व पुष्कळ भूमिगत जीवजन्तु मरतात. बौधायन म्हणतो ' कृषि केलीच तर त्यासाठीं बैलाचीं नाकें तरी टोंचू नयेत व सकाळच्या जेवणापर्यंत होईल तेवढीच ती करावी ! ( प्राक् प्रातराशात्कर्षी स्यात्। अस्यूतनासिकाभ्या समुष्काभ्यामतुदन्नारया मुहुमुहुरभ्युच्छन्दयन्। बौ. ध सू. २. २. ७३–७४ ). बैलाचीं नाकें टोंचू नयेत, त्यांना पराणीनें टोंचू नये, तर केवळ त्यांच्या तंत्रानें दादा बाबा करून नांगर चालवावा.

वैश्यवृत्तीच्या ब्राह्मणानेंहि कित्येक जिन्नस विकूं नयेत किंवा त्यांचा विनिमय किंवा अदलाबदल हि करूं नये असें मनूनें सांगितलें असून त्या वस्तूंची नामावली मनुस्मृतीच्या दहाव्या अध्यायांत ( श्लोक ८६–९४ ) पहावयास मिळते. ती पाहिली म्हणजे मग काय विकावें हेंच समजत नाहीं. कोणताहि रस, शिजविलेलें अन्न, तिळ, जवाहीर, मीठ, गाई बैल इत्यादि पाळीव पशु, अशा अनेक वस्तु त्यांत गोविल्या आहेत. अशा वस्तु ब्राह्मण विकील तर त्याला निरनिराळीं पापें सांगितलीं आहेत. तो म्हणतो 'सद्यः पतति मांसेन लाक्षया लवणेन वा ' मांस, लाख किंवा मीठ विकल्यानें ब्राह्मण तावडतोब पतित होतो, आणि दूध विकल्यानें तीन दिवसांत तो शूद्र बनतो ( त्र्यहेण शूद्रो भवति ब्राह्मणः क्षीरविक्रयात् ) पण यावर वसिष्ठानें सांगितलें आहे कीं ' आपल्या शेतांत तीळ उत्पन्न करून विकले तर चालतील. पण शेत नांगरताना बैलांचीं नाकें टोंचूं नयेत व त्यांना खच्चीहि करूं नये आणि दिवसभर शेतीचें काम न करतां सकाळी तेवढें करावें ' ( २, ३१–३२ ). वसिष्ठानें या आपल्या म्हणण्याला आधार म्हणून वाजसनेयि संहितेंतील ' लाङ्गलं पवीरवत् सुशेवं सोमपित्सरु । उदित्कृपाति गामविं प्रफर्व्यं च पीवरीम् । हा मंत्र उध्दृत केला आहे. या मंत्राचा अर्थ नीट लागत नाहीं पण त्यांत सुंदर, चांगल्या मुठीच्या नांगरानें जमीन नांगरण्याचा संबंध आलेला आहे एवढें खरें. तात्पर्य ब्राह्मणाला इतर धंदे करण्याच्या ज्या सवलती देण्यांत आल्या त्यांत एकेक निर्बंध घालून अनेक अडचणी उत्पन्न करण्यांत आल्या. तेव्हां पोटासाठीं ब्राह्मणांनीं निरनिराळे मार्ग काढले. वैदिक होऊन काम भागेना ह्मणून कोणी शास्त्री झाले तर कोणी पुराणिक झाले. अत्रिस्मृतींत या विषयीं मोठें गमतीचें सांगितलें आहे ( श्लोक ३८४ ) ' वेदैर्विहीनाश्च पठन्ति शास्त्रं शास्त्रेण हीनाश्च पुराणपाठाः । पुराणहीनाः कृषिणो भवन्ति भ्रष्टास्ततो भागवता भवन्ति ॥' ज्यांना वेद येत नाहींत ते शास्त्रें पढतात, तेंहि ज्यांना जमत नाहीं ते पुराणिक होतात; पुराणेंहि झेपत नाहींत ते शेतकरी होतात आणि तेंहि काम होत नाहीं तरी शेवटीं बुवा बनतात ! तेव्हां बुवाबाजीचा प्रकार आजकालचा नसून प्राचीन काळापासून चालत आलेला आहे व अत्रीनें तो बाहेर काढण्याचा प्रयत्न केला होता.

तात्पर्य ब्राह्मणांना चरितार्थाची अडचण पडूं लागली. यज्ञयागांचा लोप झाला, अध्यापनाचें कामहि थोडें बहुत क्षत्रियांकडे गेलें. बृहदारण्यकोपनिषदांत अशी कथा आली आहे कीं, बालाकि गार्ग्य इतर विद्यांत निष्णात झाला तरी त्याला ब्रह्मविद्या येत नव्हती; तीसाठीं तो राजा अजातशत्रूकडे गेला. तेव्हां राजा अजातशत्रु त्याला म्हणाला' प्रतिलोमं चैतद्यद् ब्राह्मणः क्षत्रियमुपेयात् ' ब्राह्मणानें विद्येसाठीं क्षत्रियाकडे यावें हें वळचणीचें पाणी आढयाला जाण्यासारखें आहे. पण एवढें म्हणून त्यानें गार्ग्याला ब्रह्मविद्या सांगितलीच. ब्रह्मविद्येचें भांडार क्षत्रियांमध्यें विशेषतः होतें असें गीतेवरूनहि दिसतें. श्रीकृष्णानें त्या विद्येची परंपरा सांगतांना राजर्षींना ती माहीत होती असें म्हणून परमेश्वर, विवस्वान्, मनु, इक्ष्वाकु अशा परंपरेनें ती क्षत्रियांकडे होती असें सांगितलें आहे. सर्व धर्मसूत्रात ब्राह्मणानें विद्या कोणाकडूनही शिकावी, मात्र गुरुशुश्रूषा म्हणजे गुरुच्या मागून जाणें एवढेंच समजावें असें सांगितलें आहे. 'आपदि ब्राह्मणेन राजन्ये वैश्ये वाऽध्ययनम् । अनुगमनं च पश्चात् ।' [आप. ध. सू. २, २, ४, २५–२७ ];' आपत्कल्पो ब्राह्मणास्याब्राह्मणाद्विद्योपयोगः' [गौतम ७,१]. मनुहि म्हणतो कीं 'अब्राह्मणादध्ययनमापत्काले विधीयते' । ( २.२४१ ) आपत्कालीं ब्राह्मणेतरापासूनहि अध्ययन करावें.

निरनिराळ्या वर्णांना व जातींना अशीं कामें सांगून दिलीं खरीं; पण तीं त्यांनीं न केलीं तर काय करावयाचें ? याचें उत्तर असें कीं हीं कामें त्या त्या वर्णांकडून करून घेणें हें राजाचें कर्तव्य म्हणून सांगितलेलें आहे. नारद म्हणतो कीं जें ज्यानें करावयाचें नाहीं तें त्यानें केलें तर राजानें त्याला चांगला दंड करून मार्गावर आणावें, 'अविक्रेयाणि विक्रीणन् ब्राह्मणः प्रच्युतः पथः । मार्गे पुनरवस्थाप्यो राज्ञा दंडेन भूयसा ।' [ ४,६७ ]; मनुहि म्हणतो 'वैश्यशूद्रौ प्रयत्नेन स्वानि कर्माणि कारयेत् । तौ हि च्युतौ स्वकर्मभ्यः क्षोभयेतामिदं जगत् ।' (मनु. ८. ४१८ ). रामायणांतील शंबूकाची कथा याविषयीं प्रसिद्ध असून उत्तररामचरितांत भवभूतीनेंहि ती सांगितली आहे. शंबूक हा शूद्र असून तपश्चर्या करून स्वर्ग मिळविण्याच्या खटपटीला लागला; पण हें पाप झालें व त्यामुळें एका ब्राह्मणाचा पुत्र अकालीं मरण पावला. तेव्हां तो ब्राह्मण त्याचें प्रेत घेऊन रामाच्या दाराशीं येऊन बसला. प्रजेंत कांहीं पाप झाल्याशिवाय अशी विपरीत गोष्ट घडावयाची नाहीं हें जाणून रामानें शोध केला व शंबूकाचें वर्तमान त्याला समजल्यावर त्यानें त्याचा वध केला.* त्याबरोबर ब्राह्मणपुत्र जीवंत झाला. पण पुढाही शूद्र कृषि, शिल्पें इत्यादि वरच्या वर्णांचे व्यवसाय करूं लागले व ब्राह्मणाहि ते व्यवसाय

* शंबूको नाम वृषलः पृथिव्यां तप्यते तपः । शीर्षच्छेद्यः स ते राम तं हत्वा जीवय द्विजम् । उत्तररामचरित २.

खालच्या वर्णांचे असतांहि करूं लागले व आतां त्यासंबंधानें कसलाहि निर्बंध राहिलेला नाहीं. अशा स्थितींत ब्राह्मणांनें पूज्यत्व केवळ जन्मावरून राहणें शक्य नाहीं. ब्राह्मण हा कसाहि असो, विद्वान् असो कीं अविद्वान् असो, तो परम दैवत होय असें मनूनें म्हटलें असून ( ९. ३१७, ३१९ ) तुकारामानें जरी तो ब्राह्मण कर्मभ्रष्ट झाला तरी तिहीं लोकीं तो श्रेष्ठ असा त्याचा अनुवाद केलेला आहे. पण आतां त्याला अर्थवादापलीकडे कांहीं किंमत राहिलेली नाहीं. ब्राह्मण अग्निकार्य, संध्योपासना, वेदाध्ययन या गोष्टी सोडतील तर ते सर्व वृषल म्हणजे शूद्र समजावे ( अग्निकार्यात्परिभ्रष्टाः सन्ध्योपासनवर्जिताः । वेदं चैवानधीयानाः सर्वे ते वृषलाः स्मृताः ॥ अध्याय १२ ) असें पराशरानें सांगितलें असून त्याप्रमाणें आतां बहुतेक ब्राह्मण शूद्र झाले आहेत. यापुढें ब्राह्मण शिक्षकांकडून शिक्षण होणें दुरापास्त आहे; बरेचसे शूद्रच शिक्षक म्हणून येणार आणि अब्राह्मणाकडूनच सर्वांच्या मुलांना प्राथमिक शिक्षण मिळणार हें ठरल्यासारखेंच आहे. पूर्वीहि ब्राह्मण सर्व प्रकारचे धंदे करीत होते ही गोष्ट गौतमादि धर्मसूत्रकारानीं श्राद्धाला कोणते ब्राह्मण बोलावूं नयेत, त्यांची नामावली दिली आहे, तीवरून दिसून येते. गौतमानें ही नामावली दिली आहे ती अशीः—

न भोजयेत् स्तेन–क्लीब–पतित–नास्तिक–तद्वृत्ति–वीरहा ( अग्निहोत्र न ठेवणारा )–अग्रेदिधिषू–पति–स्त्रीग्रामयाजक ( स्त्रियाकडून व्रतें करविणारा व ग्रामोपाध्याय )–अजापाल–उत्सृष्टाग्नि–मद्यप–कुचर–कूटसाक्षि ( खोटी साक्ष देणारा )–प्रातिहारिकान् ( द्वारपाळाचें काम करणारे ) ......कुण्डाशि–सोमविक्रयी–अगारदाही–गरद–अवकीर्णि–गणप्रेष्य–अगम्यागामि–हिंस्र–परिवित्ति–परिवेत्तृ–पर्याहित... पौनर्भव–कितव–अजप–राजप्रेष्य–प्रतिरूपिक ( खोट्या वस्तु विकणारा )–शूद्रापति ......कुसीदिवणिक्–शिल्पोपजीवि–ज्या–वादित्रतालनृत्यगीतशीलान् '। यांतील शील शब्दावरून नित्य व्यवसायाचा बोध होतो, प्रसंगोपात्त केलेल्या कामांचा होत नाहीं. याज्ञवल्क्यस्मृतींतहि अशीच नामावलि दिली आहे ( १, २२२–२२४ ).

तेव्हां आतां पुढें आपण काय करावयाचें असा प्रश्न आहे. चार वर्ण मूळ सांगितले, पण आतां निदान २३०० जाति झाल्या आहेत. त्यांचा संकोच करावा असें म्हणतात. पण चार वर्ण आतां ओळखावयाचे तरी कसे? वर्णाश्रमाची घडी पुनः नीट बसेल असें सनातनी म्हणविणारांना तरी खरोखर वाटतें काय? आम्हांला तर तें बहुतेक असंभाव्य वाटतें. पूर्वीहि सर्व लोक बहुतेक सर्व व्यवसाय करूं शकत होते हें आपण पाहिलेंच आहे. त्यावेळीं राजेहि आपले होते व आजच्यासारखी शहरी राहणी आलेली नव्हती. तेव्हाहि जर असा प्रकार होता, तर आज राजा चातुर्वर्णिकातील नाहीं, व त्याला पूर्वीच्या कल्पना अमलांत आणण्याची इच्छा देखील होणार नाहीं, अशा बजबजपुरीच्या काळांत कोणाचेंहि

जन्मजात श्रेष्ठय राहिलेलें नाहीं. ब्राह्मणाला आजहि संध्या करणें शक्य आहे. पांच चार मिनिटांपेक्षा तिला अधिक वेळ लागत नाहीं. तींतील इतर घुसडून दिलेल्या गोष्टी सोडल्या तर गायत्रीजप, अर्घ्यप्रदान व उपस्थान एवढयाच रहातात. त्यांतहि अर्घ्यप्रदान व उपस्थान हीं गाळलीं तरी एकवेळ चालतील. मग राहिला गायत्री-जप, त्याला किती वेळ लागणार ! पण तोहि आतां फारसा कोणी करीत नाहीं. अशा स्थितींत हा प्रश्न कसा सोडवावयाचा याचा उलगडा मला कांहीं झालेला नाहीं. सनातनी ह्मणतात पूर्वी प्रमाणें रामकृष्णासारखा देवाचा अवतार होऊन तो सारी व्यवस्था नीट करील. पण तो अवतार पांचपन्नास वर्षांत येणार असेल तर उपयोग. दहा हजार वर्षांनीं होणार असला तर तेथपर्यंत काय करावयाचें ? आजच्या परिस्थितीचा विचार करतां हिंदुस्तानांत कांहीं कालानें तरी समाजसत्तावाद ( Socialism ) कोणत्यातरी स्वरूपांत येणार. तेव्हां आजच्या सनातनी म्हणविणारांनीं व परिवर्तनवादी म्हणविणारांनीं कसें वर्तन ठेवावें ह्याचा खोल विचार झाला पाहिजे.

पूर्वी सांगितलेंच आहे कीं ब्राह्मणाच्या जन्मजात श्रेष्ठपणाची जी स्तुति केलेली आहे, ती केवळ स्तुतिच होय. तिचा आज कांहीं उपयोग नाहीं. शंकराचार्यांनीं गीता भाष्याच्या आरंभीं ' ब्राह्मणत्वस्य हि रक्षणेन रक्षितः स्याद्वैदिको धर्मः ' असें ह्मणून ब्राह्मणत्वावर भर दिला आहे, नुसत्या ब्राह्मणांवर नाहीं. श्रेष्ठपणा कशावरून ओळखावा हें सांगताना वित्त, बंधु, कर्म, जाति, विद्या, श्रुत अशा ( वित्तबंधुकर्मजातिविद्यावयांसि मान्यानि परबलीयांसि श्रुतं तु सर्वेभ्यो गरीयः । गौतम ६, १८-१९ ) उत्तरोत्तर चढत्या पायऱ्या सांगितल्या असून वित्त ही त्यांतील अगदीं खालची पायरी असून तींतून भांडवलशाही ( Capitalism ) उत्पन्न झाली. तीवरून मोठेपणा ठरवावयाला आतां नको आहे. परंतु ' सर्वे गुणाः काञ्चनमाश्रयन्ते ' असा प्रकार आज झाला आहे. ही भांडवलशाही नको आहे. ' विप्राणां ज्ञानतो ज्यैष्ठ्यं क्षत्रियाणां तु वीर्यतः ' असें मनूनें सांगितलें असून ( २.१५५ ) ब्राह्मणांनीं ज्ञानानेंच श्रेष्ठ राहिलें पाहिजे. ताण्ड्यमहाब्राह्मणांत ( १३, ३, २४ ) या विषयीं एक गोष्ट आहे. आंगिरस नांवाचा एक तरुण होता. तो मोठा विद्वान् झाला. तेव्हां त्याचे वडील नातेवाईक त्याला म्हणाले, आम्हाला विद्या सांग. तो त्यांना सांगू लागला असतां ' हे पुत्रहो ' अशी हाक मारून सांगू लागला ( पुत्रका इति होवाच ) त्याच्या त्या नातेवाईकांना अर्थात् राग आला व त्यांनीं त्यासंबंधानें देवांकडे तक्रार केली. तेव्हां देवांनीं त्यांना म्हटलें कीं, आंगिरस म्हणाला तें योग्यच आहे. कारण जे अज्ञ आहेत, त्यांना बालच ह्मटलें पाहिजे. ही कथा मनूनेंहि ( २ .१५२) सांगितली असून पुढें ' न हायनैर्न पलितैर्न वित्तेन न बंधुभिः । ऋषयश्चक्रिरे धर्मं यो ऽ नूचानः स नो महान् । ' ( २, १५४ ) असा निष्कर्ष काढिला आहे. ऋषींनीं धर्म सांगितला तो कांहीं वयावर किंवा पिकलेल्या केसांवर किंवा द्रव्यादिकावर सांगि-

तला नाहीं. जो प्रवचन करूं शकतो तोच मोठा होय. मस्तक पिकून पांढरें झालें म्हणजेच वृद्ध झाला असें नाहीं, जो तरुण असतांहि अध्ययन करतो त्यालाच देव वृद्ध समजतात ( न तेन वृद्धो भवति येनास्य पलितं शिरः। यो वै युवाप्यधीयानस्तं देवाः स्थविरं विदुः ॥ मनु २, १५६ ). महाभारताच्या वनपर्वांतहि नहुष अजगर संवाद व यक्षप्रश्न या प्रकरणांत ब्राह्मण कोण या प्रश्नाचें उत्तर देतांना शीलावरच विशेष भर दिलेला आहे. 'सत्यं दानं क्षमा शीलमानृशंस्यं तपो घृणा। दृश्यन्ते यत्र नागेन्द्र स ब्राह्मण इति स्मृतः।' ( व. प. १८०, २१ ) सत्य दान क्षमा शील इत्यादि गुण जेथें असतील तो ब्राह्मण होय असें नहुषानें उत्तर दिलें असून युधिष्ठिरानें ( 'शृणु यक्ष कुलं तात न स्वाध्यायो न च श्रुतम्। कारणं हि द्विजत्वे च वृत्तमेव न संशयः।' व. प. ३१३, १०८ ) ब्राह्मणत्वाला शीलच कारण होय असें यक्षाला सांगितलें. सांगावयाचें तात्पर्य एवढेंच कीं, आपण सध्यां पूर्वींच्या ध्येयापासून खालीं आलों आहों व त्यामुळें आम्हीं जन्मानें श्रेष्ठ आहों ही घोषणा आता चालणार नाहीं. सर्वजण जन्मतः सारख्याच योग्यतेचे आहेत असें आजच्या युगांत समजलें जात आहे. शील, दान, ज्ञान इत्यादि गुणानाच वास्तविक योग्यता आहे, अशी घोषणा समाजानें यापुढें केली पाहिजे.

आतां पूर्वी ब्राह्मणांना केवळ ब्राह्मण म्हणून कोणते विशेष अधिकार दिलेले होते व शूद्रांवर ते केवळ शूद्र म्हणून किती निर्बंध घातलेले होते हें सांगून हा विषय आटोपता घेऊं. ( १ ) सत्र करण्याचा अधिकार केवळ ब्राह्मणांनाच होता. ( २ ) इतर तिन्हीं वर्णांनीं ब्राह्मणांच्या आज्ञेंत राहिलें पाहिजे. ( ३ ) राजाचा अंमल इतरांवर चालावा, ब्राह्मणांवर चालूं नये ( राजा सर्वस्येष्टे ब्राह्मणवर्जम्। गौ. ११.१ ). ( ४ ) श्रोत्रियांपासून राजानें कर घेऊं नये. सोम हाच ब्राह्मणांचा राजा ( ब्राह्मणेभ्यः करादानं न कुर्यात्। अकरः श्रोत्रियः ॥ विष्णुध. सू. ३, २६ ). या अधिकाराचा उल्लेख 'तपःषड्भागमक्षय्यं ददत्यारण्यका हि नः।' ह्या शाकुन्तल वचनांत केलेला आहे. ब्राह्मणांच्या तपाचा सहावा भाग राजाला मिळे, हाच त्यांचा करभार. ( ५ ) निध्यधिगमो राजधनमन्यत्र ब्राह्मणात्। ठेवणें सापडलें तर तें सामान्यतः राजाकडे दिलें पाहिजे. पण हा नियम ब्राह्मणांना लागू नव्हता. ( ६ ) ब्राह्मणाला कोणत्याहि अपराधाबद्दल शारीरदंड किंवा वधाची शिक्षा नव्हती. पण त्याची मानहानि करण्यासाठीं धिंड काढीत किंवा मुण्डन करीत किंवा राष्ट्रांतून हांकलून देत ( मनु ८, ३३९; ९, २३७, गौ. १२, ४४ ). ( ७ ) अध्यापन याजन व प्रतिग्रह हीं ब्राह्मणांशिवाय कोणी करूं नये. ( ८ ) कांहीं अपराधांत ब्राह्मणाला इतरांहून कमी दंड सांगितला होता. ( ९ ) ब्राह्मणाला अब्राह्मणानें साक्षी म्हणून बोलावूं नये. ( १० ) ब्राह्मण तीन दिवस उपाशीं राहिल्यास त्यानें कोणाकडूनहि त्याला न विचारतां पोटासाठीं घेऊन खावें, ती चोरी नव्हे. ( ११ ) इतर कोणी निपुत्रिक मरण पावल्यास

त्याचा वारस राजा असे. पण निपुत्रिक ब्राह्मणाचें धन ब्राह्मणाकडेच जाई. (१२) ब्राह्मणतरुणाला वृद्ध क्षत्रियांदिकांहूनही अधिक मान असे. (१३) वाटेनें जातांना ब्राह्मणाला प्रथम अवसर दिला पाहिजे, मग इतरांना. (१४) ब्राह्मणांना इतरांपेक्षां अशौचाचा अवधि थोडा असे. ब्राह्मणांना या सवलती देण्यांत आल्या त्याचें कारण ब्राह्मणांपुढें ध्येय ठेविलेलें होतें ते असें कीं त्यांचें जीवित हे वेदांचें पालन, धर्माचें संरक्षण व पितृ आणि देव यांचा संतोष यासाठीं आहे. अल्प काम किंवा निवळ पोट भरण्यासाठीं नाहीं (याज्ञ. १. १९६ तपस्तप्त्वासृजद्ब्रह्मा ब्राह्मणान् वेदगुप्तेय। तृप्त्यर्थं पितृदेवानां धर्मसंरक्षणाय च ॥; 'ब्राह्मणस्य हि देहोयमल्पकामाय नेष्यते।' भागवत).

याच्या उलट (१) शूद्राला वेदाध्ययनाचा अधिकार नव्हताच. पण त्याच्या सन्निध द्विजानेंहि वेदपठन करूं नये. (२) शूद्र म्हणजे चालतें बोलतें केवळ स्मशान म्हणून त्याच्याकडे इतरांनीं जेऊं नये. मात्र दास, गोपाल, नापित यांचेकडचें अन्न ब्राह्मणांना चाले. (३) शूद्रापासून ब्राह्मणांनीं दक्षिणा घेऊं नये. (४) न्यायाधीश होण्याचा अधिकार शूद्राला नव्हता. (५) ब्राह्मणाच्याहि शूद्रापुत्राला इतर पुत्रांच्या मानानें फारच अल्प धन मिळे. (६) शूद्रांचे संस्कार अमंत्रक व्हावे. (७) शूद्रांना धर्मोपदेश किंवा व्रतोपदेश करूं नये.

पुढील व्याख्यानांत अस्पृश्यतेचा विचार करूं.



# अस्पृश्यता-विचार



आजच्या व्याख्यानांत अस्पृश्यतेचा विचार करावयाचा आहे. हा विषय फार मोठा असून त्याचें सांगोपांग विवेचन थोडक्यांत करणें कठीण आहे. पण या विषयीं माझें काम थोडें सोपें झालें आहे. कारण या विषयाचा सविस्तर विचार करणारे तीन चांगले ग्रंथ अलीकडे झालेले आहेत. त्यांतील पहिला कलकत्त्याचे अनंतशास्त्री यांनीं व दुसरा पुण्याचे महामहोपाध्याय अभ्यंकर शास्त्री यांनीं लिहिलेला आहे. 'सनातनधर्मदीपिका' हा अनंतशास्त्री यांचा व 'धर्मतत्त्वनिर्णय' हा अभ्यंकर शास्त्री यांचा. हे दोन्ही ग्रंथ रूढिवादिपक्षाचे असून तिसरा 'अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ' हा आपल्या परिचयाचे महामहोपाध्याय श्री. पाठक शास्त्री यांचा ग्रंथ तत्त्ववादी पक्षाचा आहे. या ग्रंथाची किंमत एक रुपया असून त्याच्या महत्त्वाच्या मानानें ती अगदींच बेताची आहे. त्यांत अस्पृश्यतेच्या प्रश्नाचा साधक बाधक विचार सविस्तर केला असून त्यांतील सर्वच विवेचन मला अक्षरशः मान्य आहे असें नाहीं, तथापि बहुतांशीं तें मला ग्राह्य वाटतें. त्यांच्या सारख्या जुन्या पद्धतीनें अध्ययन केलेल्या व इंग्रजी विद्येचा दृढ संस्कार न झालेल्या पंडितानें असा ग्रंथ लिहावा ही गोष्ट निःसंशय कौतुकास्पद होय. त्यात केवळ अस्पृश्यतेचा विषय नसून मीं आरंभीं सांगितलेल्या गोष्टी म्हणजे धर्मविषयीं प्रमाणग्रंथ कोणते, धर्म म्हणजे काय इत्यादि कांहीं विषयांचाही साधार विचार केलेला आहे व त्यामुळें तो वाचनीय झाला आहे. अर्थात् त्यांतील मुख्य विषय अस्पृश्यता हाच आहे. त्यांत दोन्ही प्रकारचीं मतें दिलीं असून मीहि त्याच पद्धतीला अनुसरून दोन्ही बाजूंचीं वचनें मांडणार आहे. मीं या बाबतींत एका विशिष्ट मताचा मनुष्य असल्यामुळें माझा निष्कर्ष त्या मतानुसार आहे हें सांगावयास नकोच; त्याचा खरेखोटेपणा ठरविणें आपल्याकडे आहे.

## अस्पृश्यता म्हणजे काय ?

अस्पृश्यतेच्या विषयांत सांप्रत चारपांच विशिष्ट गोष्टींचा अंतर्भाव होतो. हिंदुस्थानांतील लोकसंख्येंत अस्पृश्य हे सहा कोटी आहेत असें कॉंग्रेस पक्ष प्रतिपादन करतो, तर दुसरे आंकडेशास्त्री ती संख्या चार कोटी आहे असें म्हणतात. मला चार कोटि हाच आंकडा बरोबर दिसतो. ह्या इतक्या अस्पृश्य मानलेल्या लोकांबद्दल चारपांच गोष्टी सांगण्यांत येतात. १ ली गोष्ट म्हणजे हे लोक ज्या जातींत जन्मले, त्या जातीच

अस्पृश्य होत. २ री या लोकांनीं कांहीं विशिष्ट धंदेच केले पाहिजेत. ३ री त्यांनीं ते धंदे सोडले तरी ते अस्पृश्यच रहाणार. ४ थी. या लोकांची इतरांनीं सावली सुद्धां अंगावर पडूं देऊं नये. ५ वी या लोकांनीं गांवाच्या बाहेर राहिलें पाहिजे. या चारपांच गोष्टी अस्पृश्यतेंत प्रमुख आहेत. या गोष्टींना शास्त्राचा आधार आहे कीं काय हें आतां पहावयाचें.

## श्रुति 'अस्पृश्यता

प्रथम श्रुति घेतल्या तर त्यांत अस्पृश्य हा शब्द नाहीं. क्वचित् अन्त किंवा अंत्य हा शब्द आढळतो अस्पृश्य हा शब्द नवीन आहे असें नाहीं. स्मृतींत तर तो पुष्कळ वेळां येतो. पण या बाबतींत प्रश्न आहे तो असा कीं श्रुति या अस्पृश्यांसंबंधानें काय म्हणते. या दृष्टीनें येथें स्पष्ट सांगणें अवश्य आहे कीं, अमुक एक जात अस्पृश्य आहे किंवा अमुक विशिष्ट धंदा करणारे लोक हे अस्पृश्य आहेत असा उल्लेख श्रुतींत कोठेंहि नाहीं. आज ज्यांना अंत्यज किंवा अस्पृश्य म्हणतात, त्यांच्या अस्पृश्यतेशीं ज्यांचा संबंध येतो अशीं कांहीं जातींचीं नावें अत्रिस्मृतींत दिलीं आहेत, तीं अशीं:—' रजकश्चर्मकारश्च नटो बुरुड एव च । कैवर्तमेदभिल्लाश्च सप्तैता अन्त्ययोनयः ॥.' यांतील रजक म्हणजे धोबी, चर्मकार चांभार, नट म्हणजे कोल्हाटी, बुरुड, कैवर्त म्हणजे मासेमारी कोळी, म्लेच्छ व भिल्ल, या सर्वांची बहुतेकांची अस्पृश्यता आज गेलेली आहे. ज्यांच्या पाशींच आज धर्म राहिला आहे असें म्हणतात, त्या स्त्रिया देखील चांभाराच्या दुकानीं जाऊन चपला विकत घेतात. या वचनांत ' म्लेच्छ ' च्या ऐवजीं ' मेद ' म्हणजे चांडाल असाहि पाठभेद आढळतो. या वचनाप्रमाणेंच अंगिरसाचें म्हणून हरदत्तानें व प्रायश्चित्तेन्दुशेखरांत एक वचन उद्धृत केलें आहे, तें असें ' चांडालः श्वपचः क्षत्ता सूतो वैदेहकस्तथा । मागधायोगवाश्चेति स्मृता अत्यंजजातयः ' । यांतहि सातच जाति सांगितल्या आहेत. कोणी यांत आणखी भर घालून ही संख्या सोळांपर्यंत वाढविलेली आहे. पण आपण विवेचनासाठीं या मुख्य म्हणून घेऊं. या सातांपैकीं श्रुतींत बरींच नावें येतात. तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३, ४, १४, १; ३, ४, १७. १ ) ' वायवे चांडालम् ' असें वचन येतें, पण आजच्या अर्थाचा चांडाल तो नव्हे. क्षत्ता शब्द तैत्तिरीय संहितेंत येतो (४.५, २) 'नमः क्षतृभ्यः; ' यांत त्याचा नमस्कार केलेला आहे. 'शतेन क्षत्तृसंग्रहीतृभिः सहोद्गाता' असा तैत्तिरीय ब्राह्मणांतहि तो आला आहे ( ३. ८, ५, १–३) क्षत्ता म्हणजे स्मृतींच्या भाषेंत शूद्राला क्षत्रिय स्त्रीपासून झालेली संतति. पण श्रुतींतील क्षत्ता अस्पृश्य नाहीं. निषाद हा सांप्रत अस्पृश्य असून श्रुतींत त्याला रुद्रेष्टि वेदमंत्रानीं करण्याचा अधिकार होता हें निषादस्थपतीला तसा अधिकार होता असें सांगणाऱ्या मीमांसासूत्रावरू

पूर्वी दाखविलेंच आहे (पान ११६-११७ ). अर्थात् तो निषाद आजच्याहून निराळा होता. सूत म्हणजे पौराणिक हाहि तेव्हां अस्पृश्य नव्हता. महाभारतांतील कर्ण हा सूत म्हटला असून तो क्षत्रियांच्या बरोबर मांडीला मांडी लावून बसत असे. अर्थात् तो अस्पृश्य नव्हता. सूताचें काम राजाची स्तुति गाण्यासंबंधाचें होतें असें 'गीताय सूतम्' या तैत्तिरीय ब्राह्मणवचनावरून समजतें. वैदेहक व आयोगव यांचाहि असाच प्रकार आहे. आयोगवाकडे यज्ञांतील वस्तु विकत घेण्याचें काम असे 'आक्रयायायोगूम्' असें तैत्तिरीय ब्राह्मणांत ह्मटलें आहे. आक्रय ह्मणजे सर्व क्रयाभिमानी देव. ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलेला मरुत्त आविक्षित, ज्याच्या सभेंत सर्व देव सभासद ह्मणून बसत तो आयोगव होता. मागध म्हणजे बंदी, भाट किंवा चारण. यांचें काम राजाची स्तुति गाण्याचें होतें. श्रुतींत ( तै. ब्रा. ३, ४, १, १ ) 'अतिक्रुष्टाय मागधम्' असा त्याचा उल्लेख आढळतो. अतिक्रुष्टाय म्हणजे अतिनिन्दितदेवाय. मागधहि अर्थात् अस्पृश्य नव्हता तात्पर्य हे शद्ब स्मृतींत श्रुतीहून निराळ्या अर्थानें आले आहेत हें उघड आहे. विदलकार म्हणजे बुरुड व किरात म्हणजे भिल्ल यांचेहि उल्लेख तैत्तिरीय ब्राह्मणांत 'पिशाचेभ्यो विदलकारम्' ( ३, ४, ५ ) व 'गुहाभ्यः किरातम्' ( ३, ४, १२ ) असा आढळतो. किरात ताड्य ब्राह्मणातहि आला आहे ( १३, १२, ५ ). बुरुड व भिल्ल हे श्रुतींत अस्पृश्य नव्हते व आजही नाहींत. ज्यांना पुढें अस्पृश्य मानूं लागले त्या जाती एवढ्याच वैदिक वाङ्मयांत आढळतात. पण त्या अस्पृश्य होत्या असें मागचा पुढचा संबंध पहातां मुळींच दिसून येत नाहीं. त्या जातींची नावें वेदांत असलीं, तरी ते लोक अस्पृश्य होते असें श्रुति कंठरवानें कोठेंहि सांगत नाहीं.

## चाण्डाल विचार

आतां ज्यावर सनातन्यांचा विशेष भर आहे, तो चांडाल घेऊं. स्मृतींत चांडाल तीन प्रकारें सांगितले आहेत. १, ब्राह्मणस्त्री व शूद्र पुरुष यांची प्रजा. २, सगोत्र विवाहानें झालेली संतति. ३, आणि विवाहापूर्वी कन्येला झालेली संतति. चांडालाचा आणखीहि एक प्रकार होता. एखादा गृहस्थ संन्यास घेतल्यानंतर पुनः गृहस्थ होईल तर तो व नंतरची संतति चांडाल समजावी असें लघु शातातपानें सांगितलें आहे. जन्मतः चांडल असे हे एवढेच. या शिवाय कर्मचाण्डाल म्हणून असत. दुष्कृत्यें करणाराला लौकिक भाषेंत चांडाल म्हणत. उत्तररामचरितांत रामानें स्वतःला 'अपूर्वकर्मचांडाल' म्हटलें आहे ( अपूर्वकर्मचांडालमयि मुग्धे विमुञ्च माम् ), कारण सीतेचा त्याग करण्यांत आपण मोठें दुष्कृत्य केलें याची त्याला जाणीव होती. पण असल्या चाण्डालत्वाचा विचार आपल्याला कर्तव्य नाहीं. जन्मानें जे चांडाल म्हणून म्हटलेले आहेत त्याचाच विचार करावयाचा आहे.

चाण्डाल शब्द वैदिक वाङ्मयांत अनेक वेळां आलेला आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे. उदाहरणार्थ 'वायवे चाण्डालम्' (तै. ब्रा.). पण संदर्भावरून त्या चाडालाचें स्वरूप कळून येत नाहीं. तेव्हा तो अस्पृश्य होता असें म्हणावयास आधार नाहीं. चाण्डाल शब्द कर्मकाण्डानंतर उपनिषदांतहि आला आहे. त्याचा विचार करतां चांडाल म्हणजे एक अ यंत कनिष्ठ पदवीचा मनुष्य असा अर्थ दिसतो. पण सनातनीपक्षाचा अस्पृश्यतेच्या वैदिक आधारात तोच मुख्य आधार आहे. यास्तव तो शब्द उपनिषदांत ज्या स्थलीं आला आहे त्यांचा जरा अधिक विचार केला पाहिजे.

बृहदारण्यकोपनिषदांत 'अत्र पिता अपिता भवति माता ऽ माता लोका अलोका देवा अदेवा वेदा अवेदाः। अत्र स्तेनो ऽ स्तेनो भवति भ्रूणहा ऽ भ्रूणहा चांडालो ऽ चांडालः पौल्कसो ऽ पौल्कसः श्रमणो ऽ श्रमणस्तापसो ऽ तापसो ऽ नन्वागतं पुण्येनानन्वागतं पापेन तीर्णो हि तदा सर्वाञ्छोकान् हृदयस्य भवति।' (४, ३, २२) असें सुषुप्तस्थानांतील जीवाचें वर्णन केलें आहे. सुषुप्तींत जीवात्मा परमात्मस्वरूपांत लीन होऊन जातो. अर्थात् त्यावेळीं त्याचे सर्व व्यावहारिक संबंध सुटतात व तो सर्व शोकादि विकाराच्या तसाच पापपुण्यांच्या पलीकडे जातो, मग त्याच्या ठिकाणी पितृत्व, मातृत्व, तसेंच चाडालत्व, श्रमणत्व, तापसत्व असें कांहीं उरत नाहीं. या प्रकरणांत चांडाल शब्द आला असून त्यात त्याच्या स्पृश्यत्वाचा किंवा अस्पृश्यत्वाचा कांहींच बोध होत नाहीं. फार तर चांडाल म्हणजे हीन जातीचा माणूस इतकेंच म्हणतां येणें शक्य आहे. पण चांडालाचा उल्लेख करणारें दुसरें वाक्य छांदोग्योपनिषदांत (५, १०, ७) आलें असून तें अधिक महत्वाचें आहे. तें वाक्य असें, 'तद्य इह रमणीयचरणा अभ्याशो ह यत् ते रमणीयां योनिमापद्येरन् ब्राह्मणयोनिं वा क्षत्रिययोनिं वा वैश्ययोनिं वा ऽ थ य इह कपूयचरणा अभ्याशो ह यत् ते कपूयां योनिमापद्येरन् श्वयोनिं वा सूकरयोनिं वा चंडालयोनिं वा।' जे चांगल्या आचरणाचे असतात ते तत्काल ब्राह्मणादि योनींत जन्मास येतात आणि जे कपूय म्हणजे निन्द्य आचरणाचे असतात ते निन्द्य म्हणजे कुत्र्याच्या, डुकराच्या किंवा चंडालाच्या योनींत जन्मतात. या संदर्भात चंडालाची कुत्रा व डुकर यांशीं सांगड घालून ब्राह्मणक्षत्रियादिकांशीं विरोध दाखविला आहे हें उघड आहे. पण त्यावरून चांडालाच्या अस्पृश्यत्वाचाच बोध होतो असें ह्मणतां येणार नाहीं. हें छांदोग्यवाक्य आरुणिपुत्र श्वेतकेतूला प्रवाहण जैवलीनें पंचाग्निविद्या सांगितली त्या प्रकरणात आलें आहे. श्वेतकेतु हा आपण मोठे पंडित झालों असें समजून पंचालांच्या सभेंत गेला. तेथें त्याचा अभिमान पाहून त्याला प्रवाहण जैवलि राजानें कांही प्रश्न विचारले असतां त्यांचीं उत्तरें त्याला देतां आलीं नाहींत व त्यामुळें तो खजील झाला आणि बापाकडे जाऊन ती विद्या शिकवा असें ह्मणूं लागला. पण त्याला ती ठाऊक नव्हती.

ह्मणून श्वेतकेतु पुनः जैवलीकडे गेला व त्याच्यापासूनच ती विद्या शिकला. तींत देवयान व इष्टापूर्त यांचें फल सांगितल्यावर हें वाक्य आलें आहे व शेवटीं संसाराचा त्याग करावा असें सांगितलें आहे. चांगल्या आचरणाचे द्विज होतात व नीच आचरणाचे श्वादि योनींत जातात असें सांगून चंडाळाची बरोबरी कुत्रा व डुकर यांशीं केली आहे. या वचनावर श्रुतींत अस्पृश्यता सांगितली आहे असें प्रतिपादणाऱ्या सनातनीयांचा फारच जोर आहे. पण एकतर सर्व उपनिषदेंच वेदांतील विधिभागाचा अर्थवाद होत असा पूर्वमीमांसेचा सिद्धान्त आहे. ' विधिना त्वेकवाक्यत्वात्स्तुत्यर्थेन विधीनां स्युः ' ( मीमांसासूत्र १, २, ७ ) व त्या अर्थवादांतहि अमुक करणारा अमक्या योनींत जातो असें सांगणारीं वाक्यें अर्थवादाच्या अर्थवादावरून चांडालाच्या अस्पृश्यत्वाचा विधि होणें शक्य नाहीं. श्वसूकरचण्डाल असा त्यांतील क्रम घेतला तरी चंडाल कुत्र्याहून व डुकराहून कनिष्ठ होय एवढेंच ठरेल. पण त्याच्या अस्पृश्यतेचा बोध कसा होणार ? सूकर अस्पृश्य नाहीं, कारण श्राद्धाला सूकराचें मांस विहित होतें. वराहाच्या मांसानें पितरांचीं दहा महिने तृप्ति होते असें मनु ह्मणतो ( ३, २७ ' दश मासांस्तु तृप्यन्ति वराह महिषामिषैः' ). या प्रकरणांत वैश्यानंतर शूद्र न सांगतां चांडालच एकदम सांगितला. ह्मणजे शूद्रालाच चंडाल हा शब्द उपलक्षण म्हणून लाविलेला दिसतो. व्याकरणकार पाणिनीनेंहि शूद्रांतच चंडालांचा अन्तर्भाव केला आहे. तात्पर्य या प्रकरणात चांडाल हा अत्यंत हीन असला तरी अस्पृश्य होता हें सांगण्याचा श्रुतीचा उद्देश नाहीं, तें अर्थवादवाक्य आहे. तेव्हां चांडाल हा श्रुतींत सांगितला आहे व आज चांडाल जन्मतः अस्पृश्य आहे ह्मणून श्रुति हि चांडालाला जन्मतः अस्पृश्य मानिते असा अर्थ कोणाला करायाचा असेल तर करावा. दोन्ही बाजू आपल्यापुढें ठेविल्या आहेत.

छांदोग्योपनिषदांत ' तस्माद्रु हैवं विद्यद्यपि चंडालायोच्छिष्टं प्रयच्छेदात्मनि हैवास्य तद् वैश्वानरे हुतं स्यादिति ' असें एक वाक्य आहे (५, २४, ४ ). ज्ञानी अग्निहोत्र्यानें उच्छिष्ट ह्मणजे शेष राहिलेलें अन्न चंडालाला दिलें तर तें वैश्वानरांत ह्मणजे चंडाल शरीरातील अग्नींतच हवन केल्यासारखें होतें, त्यापासून अधर्म होत नाहीं. पण चंडालाला उच्छिष्ट देऊं नये असा सिद्धांत मधल्या काळात निघाला. मनु म्हणतो ( ४,८० ) ' न शूद्राय मतिं दद्यान्नोच्छिष्टं न हविष्कृतम् '। शूद्राला वेद शिकवूं नये व उरलेलें हविषान्नहि देऊं नये. पण पुढें दहाव्या अध्यायांत आश्रित शूद्राला उच्छिष्ट द्यावें असेंहि तो म्हणतो ' उच्छिष्टमन्नं दातव्यं जीर्णानि वसनानिच ' ( १०, १२६ ). याचा समन्वय करावयाचा तर जो आपल्याजवळ चाकरी करावयास रहातो त्याला मात्र तसें अन्न देण्यास हरकत नाहीं, इतरांना देऊं नये असें म्हटलें पाहिजे. यावरून शूद्राला अवशिष्ट अन्न देणें हें कमी

प्रतीचें होतें, व चंडाल योनि कनिष्ठ होती एवढेंच निष्पन्न होईल. पण ते अस्पृश्य होते असें या वाक्यावरून म्हणतां येत नाहीं. ज्ञात्यानें कांहीं केलें तरी चालतें असा न्याय असून 'धर्मव्यतिक्रमो दृष्ट ईश्वराणा च साहसम्। तेजीयसां न दोषाय वह्नेः सर्वभुजो यथा ॥' या भागवतातील ( १०, ३३, ३० ) वाक्याचा तात्पर्यार्थ तोच आहे हें पूर्वी सांगितलें आहे. वसिष्ठानें चाण्डालीशीं लग्न केलें; तीच चांडाली अरुन्धती होय. या गोष्टींतील तात्पर्य घेतलें पाहिजे. 'शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः' [ गीता ] यांत श्वपाकाला म्हणजे चांडालाला कुत्र्याच्या बरोबरीचा तरी मानिलें आहे. कुत्रा तर सर्वांना स्पृश्य झाला आहे. मग चांडालच तसा कां होऊं नये? कुत्रा चावला तर औषधोपचार करावा किंवा न करावा, पण प्रथम प्रायश्चित्त घेतलें पाहिजे असें सांगितलें आहे. अशा स्थितींतला कुत्राहि आज स्पृश्याची मान्यता पावला आहे. पण चांडालाला मात्र तो मार्ग अद्यापि सापडला नाहीं!

सनातनीयांच्या जन्मजात अस्पृश्यतेचा आधार असलेलें आणखी एक वाक्य बृहदारण्यकोपनिषदात आहे. ( १, ३, १० ), तें असें:—'सा वा एषा देवतैतासां देवतानां पाप्मानं मृत्युमपहत्य यत्रासा दिशामंतस्तद्गमयांचकार तदासां पाप्मनो विन्यदधात्तस्मान्न जनमियान्नान्तमियान्नेत्पाप्मानं मृत्युमन्ववायानीति।' या वाक्यात वाणी व प्राण याचा संबंध असून प्राण ही ती मुख्य देवता व वाणी आदिकरून इतर देवता होत. प्राणानें इतर देवतांच्या पापाला म्हणजे मृत्यूला हरण करून दिशांच्या अंताला नेऊन टाकिलें. म्हणून त्या पुनः जन्म [ जन ] आणि मृत्यु [ अंत ] यांजकडे जाणार नाहींत. दिशाचा अंत म्हणजे फार लांब गांवाबाहेर. या वाक्यांतील 'न जनमियात्' 'न अंतमियात्' या शब्दाचे निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळे अर्थ केले आहेत. अंत म्हणजे अंत्य आणि अंत्य म्हणजे अंत्यज अथवा अस्पृश्य असा अर्थ कित्येक जण करतात व त्यावरून अस्पृश्यतेची स्थापना करतात. दिशामंतः म्हणजे अरण्य असा अर्थ करून शांकरभाष्यांत 'तस्मादन्त्यं जनं नेयात् न गच्छेत् संभाषणदर्शनादिभिर्न संसृजेत्' असें म्हटलें आहे. रामानुजपंथी रंगरामानुज म्हणतात, अन्त्य जन म्हणजे म्लेच्छ, जन म्हणजे जन्म आणि अन्त म्हणजे मृत्यु; ज्या ठिकाणीं वागादि देवतांचें पाप नेऊन टाकलें आहे, त्या देशांत म्हणजे म्लेच्छ देशांत जन्मास येणें किंवा मरण पावणें चांगलें नाहीं ( तत्र देशे उत्पत्तिमरणे अशोभने इति यावत् ). पण कसाहि अर्थ घेतला तरी त्यांत अस्पृश्यता कोठें आहे हा प्रश्न राहतोच! तेव्हां या सर्व वचनांचा विचार करतां श्रुतींत साक्षात् जन्मतः अस्पृश्यता सांगितलेली नाहीं असा आमचा सिद्धांत आहे.

पण पुढें पुढें अस्पृश्यता वाढत जाऊन कांहीं जाती जन्मानेंच अस्पृश्य ठरण्यापर्यंत मजल आली. पाणिनीनें निरवसित व अनिरवसित असे शूद्राचे भेद सांगितले आहेत.

समाहारद्वंद्व प्रकरणांत ' शूद्राणामनिरवसितानाम् । ' ( २, ४, १० ) असें सूत्र आलें असून अनिरवसित शूद्रांच्या नांवाचा समाहार द्वंद्व होतो, 'निरवसिता च' होत नाहीं असें दर्शविलें आहे. आतां अनिरवसित म्हणजे काय ? महाभाष्यकार पतञ्जलि म्हणतो ' यैर्भुक्ते पात्रे संस्कारेण शुद्धयति ते अनिरवसिताः । ' ज्यांनीं भांड्यांतून खाणेंपिणें केलें असतां तें भांडें धुवून घासून शुद्ध होतें व त्रैवर्णिकांना चालतें ते अनिरवसित. पतंजलीनें प्रथम पुष्कळ प्रकारचे पूर्वपक्ष करून मग आपलें हें म्हणणें मांडलें आहे. अनिरवसित म्हणजे बहिष्कृत. बहिष्कृत कशांतून तर ' पात्रादनिरवसित '. कारण ' आर्यावर्तादनिरवासित ' या अर्थानें ' शकयवनम् ' हा समास सिद्ध होत नाहीं. काशिकावृत्तींत निरवसन म्हणजे ' पात्राद् बहिष्करणम् ' असा अर्थ दिला असून तसल्या समाहारद्वंद्वाचीं ' तक्षायस्कारम् ' ( सुतार व लोहार ), ' रजकतन्तुवायम् ' [ धोबी आणि कोष्टी ] अशीं उदाहरणें दिलीं आहेत. पण चांडाल व मृतप हे पात्रबहिष्कृत असल्यामुळें त्या दोन नांवांचा समास चांडालमृतपम् असा न होतां ' चांडालमृतपाः ' असाच साधा द्वंद्व होतो. पतंजलीनेंहि तसेंच म्हटलें आहे. गांव, गौळवाडे, नगरें हीं जीं मनुष्यवसतीचीं ठिकाणें त्यांत चांडाल आणि मृतप हेहि रहात असल्यामुळें त्यांच्या नांवांचा समाहारद्वंद्व होणार नाहीं. ' चांडालमृतपाः ' असाच समास ज्या अर्थी होतो, त्याअर्थी ते लोक या मनुष्यवसतीच्या ठिकाणांतून बहिष्कृत नव्हते असें पतंजलीच्या म्हणण्यावरून उघड होतें. तात्पर्य चांडाल व मृतप यांना पाणिनि शूद्रच समजत होता. त्याला निरवासित शूद्र व अनिरवासित शूद्र एवढाच भेद माहीत होता.

प्राचीन स्मृतिकारांचा विशेष कटाक्ष चंडालादिकांवरच होता, व त्यांनाच जन्मजात अस्पृश्य समजत. पण ते स्मृतिकार दयाळुहि होते. मनूनें अन्त्यावसायी संबंधानें म्हटलें आहे, ' निषादस्त्री तु चांडालात्पुत्रमन्त्यावसायिनम् । श्मशानगोचरं सूते ब्राह्मानामपि गर्हितम् ' । ( १०, ३९ ) अन्त्यावसायी हे श्मशानवासी व बहिष्कृतापेक्षाहि म्हणजे चांडालपेक्षाहि निन्द्य होत. पण कुत्रा किंवा चांडाल यांपासून सर्वांना वैश्वदेवांत भाग द्यावा असें आपस्तंब धर्मसूत्र म्हणतें ( २, ४, ९, ५ ). आतां हे चांडाल कोणत्या प्रकारचे हें पाहूं. आपस्तंब सांगतो ' चाण्डालांचा स्पर्श, त्यांशीं भाषण किंवा त्याचें दर्शन झाल्यास जो दोष घडतो त्याचें प्रायश्चित करावयाचें तर स्पर्श झाला असतां पाण्यांत बुडी मारून स्नान करावें, त्याशीं बोलल्यास ब्राह्मणाशीं बोलावें व त्यांचें दर्शन घडल्यास तार्‍यांचें दर्शन घ्यावें म्हणजे झालें; ' यथा चांडालोपस्पर्शने संभाषायां दर्शने च दोषः तत्र प्रायश्चित्तम् । अवगाहनमपामुपस्पर्शने संभाषायां ब्राह्मणसंभाषा दर्शने ज्योतिषां दर्शनम् । ( २,१, २, ८–९ ). वसिष्ठ म्हणतो ' श्वचंडालपतितोपस्पर्शने सचैलं स्नातः सद्यः पूतो भवति ' ( २३, ३३ ). कुत्रा, चंडाल व पतित म्हणजे महापातकी हे एकाच पायरीवर बसविलेले असून

त्यांच्या स्पर्शाची अशुद्धि वस्त्रासहित स्नान केल्यानें लगेच नष्ट होते. यांतील महा-पातक्यांत सुरापानाची गणना होती. पण आज बऱ्याच लोकांत मद्यपान म्हणजे सभ्यपणाची चाल Fashion झाली आहे. सोनें चोरणारा, व विशेषतः ब्राह्मणाचें हाहि महापातकी होता. 'न विप्रं विषमित्याहुर्ब्रह्मस्वं विषमुच्यते' असें म्हटलें आहे. पण सोनें चोरणाराला शिक्षा मिळाली तरी त्याला कोणी अस्पृश्य समजत नाहींत. विष्णुस्मृतींत अंत्यजापैकीं चंडालांनींच गावाबाहेर रहावें व प्रेतावरील वस्त्रें घेऊन तीं वापरावीं (चण्डालानां बहिर्ग्रामनिवसनं मृतचैलधारणमिति विशेषः। १६, १४). असें आहे प्रतिलोमसंततीपैकीं क्षत्ता व वैदेहक हे स्पृश्य होत असें सांगतांना मनुस्मृतीचे टीकाकार मेधातिथि व कुल्लूक हे म्हणतात कीं, 'अतश्चांडाल एवैकः प्रतिलोमतः स्पर्शादौ निरस्यते।' एकटा चांडालच अस्पृश्य होय (मनु १०, १३ वरील टीका). 'चण्डालश्च नराधमः' (१० २६) 'चण्डालश्चाधमो नृणाम्' (१० १२)असा चण्डालाचा उल्लेख मनु नेहमीं करतो. पण सांप्रतचे चांडाल तो म्हणतो तशा प्रकाराचे नाहींत, हें उघड आहे. कारण मनुची व्याख्याच त्यांना लागू पडत नाहीं. शूद्राला ब्राह्मण स्त्री-पासून झालेला तो मनूचा चंडाल, आजचा तसा नाहीं.

## अस्पृश्यतेच्या कल्पनेचा उगम

अस्पृश्यतेच्या कल्पनेचा उगम कसा झाला असावा याचा विचार आतां करू. अस्पृश्यता ही घाणेरडे धंदे करण्यामुळें उत्पन्न झाली असें कांहीं जण म्हणतात. पण तसें जर असतें, तर घाणेरडे धंदे सर्व जगांत असतांना अस्पृश्यता ही एकट्या हिंदु-स्थानातच कां उत्पन्न व्हावी असा प्रश्न पुढें येतो. म्हणून तिच्या उत्पत्तीचें कारण दुसरीकडे शोधिलें पाहिजे, केवळ घाणेरड्या धंद्यांत तें सापडणार नाहीं. अनुलोम-प्रति-लोम विवाहामुळें मिश्रजाति झाल्या असतील; त्यांनीं कोणते धंदे करावे याविषयीं स्मृतिकारांचें ऐकमत्य नाहीं हें पूर्वी सांगितलेंच आहे. ही संकरप्रजा निन्द्य मानिली गेल्यामुळें जो धंदा दुसरा कोणी करणार नाहीं, तो त्यांच्यावर पडे व पुढें तो वंशप-रंपरागत होई. अशा रीतीनें जन्मानें आलेलें निन्द्यत्व स्थिर होई. जात्युत्कर्षाचा मार्ग सांगितलेला आढळतो. पण पुढें तोहि बंद पडला. अशा स्थितींत आमच्या तात्विक कल्पना (Metaphysical ideas) आणि तदनुसार बनलेले मनाचे धर्म (Psychology) यामुळें अस्पृश्यतेला विशिष्ट वळण लागलें असें दिसतें. चांभार हे सर्व देशांत आहेत. पण ते अस्पृश्य नाहींत. आमचे चांभार अस्पृश्य. याला कारण आमचा कर्मसिद्धान्त. कर्म केलें कीं त्याचा परिणाम भोगलाच पाहिजे, 'नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतेरपि' असा कर्माचा अनुल्लंघनीय नियम (inexorable law) आम्हीं मानतों. संचित, प्रारब्ध आणि क्रियमाण असे कर्मांचे तीन प्रकार होत असून त्यांतून ज्ञानी मात्र सुटतो असें वेदान्तशास्त्र सांगतें. पण असे ज्ञानी

फार थोडे. आजकाल वेदान्त्यांचें पेंव फुटलें असलें, तरी 'कलौ वेदान्तिनो भान्ति फाल्गुने बालका इव' अशीच त्यांची स्थिति आहे. अर्थात् बहुजनसमाज कर्मांच्या पाशांतून मुक्त होत नाहीं. तेव्हां कर्माचें फळ भोगण्यासाठीं माणसांना निरनिराळ्या योनींत जन्म घ्यावा लागतो ही दुसरी कल्पना पुढें आली. अस्पृश्य जातींत जन्मलेला मनुष्य आपल्या कर्मानें जन्मला, आपण त्याला कसें स्पृश्य करणार असें वाटायला लागलें व त्यामुळें उद्धाराचा मार्ग खुंटला व अस्पृश्यता जन्मावर आरूढ होऊन बसली.

मनोधर्माचाहि पगडा अस्पृश्यतेच्या प्रश्नांत बसला आहे. उदाहरण, आपण जें करतों तें न करणारे आपल्याहून कमी असें मानण्याचा मनुष्याचा मनोधर्म असतो. त्याला अनुसरून स्नानसंध्या करणारे न करणाऱ्यांना कमी लेखूं लागले, मांसाहार न करणारे मांसाहार करणाऱ्यांना हीन समजूं लागले व असें करणें हें धार्मिकतेचें लक्षण मानण्यांत येऊं लागलें. कांहीं लोकांना कांहीं कारणास्तव अस्पृश्य मानिल्यावर तसें न मानणारे अधार्मिक होऊं लागले व अशा रीतीनें अस्पृश्यता जन्मावर येऊन ती रूढ झाली. पण ही जर केवळ रूढि आहे, तर ती मोडतां येण्यासारखी आहे. श्रुतींत जन्मजात अस्पृश्यता स्पष्ट सांगितलेली असती तर अस्पृश्यता काढून टाकण्याचा प्रश्न बराच कठीण झाला असता. पण तसें नाहीं हें वर दाखविलेंच आहे.

अस्पृश्यतेची कल्पना रूढ होण्याला आणखीहि एक कारण झालेलें आहे. आमच्या जीविताचें ध्येय जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होणें हें आहे. इतर धर्मांत तसें नाहीं. आमच्या मुक्तीला बहिरंग साधन व अंतरंग साधन अशीं दोन्हीं लागतात. म्हणजे कर्मानेंच शेवटीं मुक्तीची पायरी गांठावयाची असते. ख्रिस्ती धर्मांत ख्रिस्ता वर पूर्ण विश्वास ठेवला म्हणजे तेवढ्यानें सर्व कार्य भागतें. कारण तो सर्वांना पाप मुक्त करणारा आहे (Christ is the redeemer). पण आम्हांला संस्का रादि बहिरंग साधनानें* पावित्र्य मिळवून शिवाय तपश्चर्या, मनाची शिस्त, इत्यादि अंतरंग साधनानें × आपलें ध्येय प्राप्त करून घ्यावयाचें असतें. या आमच्या विशिष्ट ध्येयाच्या कल्पनेमुळें व कर्म आणि पुनर्जन्म यांचें सिद्धान्तामुळें अस्पृश्यता जन्मजात होऊन बद्धमूल झाली.

---

* अस्पृश्यवस्तूचा स्पर्श झाल्यास प्रायश्चित्त करणें हें बहिरंग साधनच होय.

× अहिंसासत्यास्तेयब्रह्मचर्यापरिग्रहायमाः । शौचसन्तोषतपःस्वाध्यायेश्वरप्राणि-धानानि नियमाः । हे नियम अंतरंग साधन होत.

# अस्पृश्यतेचे प्रकार

आपल्यामध्यें अस्पृश्यतेचे पाचसहा प्रकार आढळतात. १ ली गुणांमुळें अस्पृश्यता येते, तिचीं उदाहरणें, बाप व मुलगा जेवतांना एकमेकांना शिवत नाहींत, स्त्री रजस्वला असतां अस्पृश्य असते हीं होत. २ री कर्मास्पृश्यता म्हणजे निन्द्य कर्मानें येणारी अस्पृश्यता. उदाहरण, ब्रह्महत्या, सुरापान इत्यादि महापातकें करणारा अस्पृश्य होतो, पण तो योग्य तें प्रायश्चित्त केल्यानें शुद्ध होतो. ३ री धंद्यामुळें उत्पन्न होणारी अस्पृश्यता. जो ब्राह्मण पैसा घेऊन तीन वर्षें सतत देवपूजा करील तो देवलक होय; तो अस्पृश्य होतो, त्याला हव्यकव्याला घेऊं नये. असें अपरार्क (पान ९२३) म्हणतो. त्याचा स्पर्श झाल्यास सचैल स्नान करावयास सांगितलें आहे:—'स्पृष्ट्वा देवलकं चैव सवासा जलमाविशेत् । देवार्चनपरो विप्रो वित्तार्थी वत्सरत्रयम् । असौ देवलको नाम हव्यकव्येषु गर्हितः ॥'. गायक, नर्तक, बुरूड, चाभार, रंगारी हे धंद्यामुळेंच अस्पृश्य होते. पण अमुक जातीचे म्हणून अस्पृश्य असें शास्त्रांत कोणासंबंधानेंहि सांगितलेलें नाहीं. ४ थी देशभेदानें होणारी अस्पृश्यता. शबर, पुलिंद, म्लेच्छ, यवन, किरात हे देशभिन्नत्वामुळें अस्पृश्य होत. कलिंग (ओरिसा), सौवीर (राजपुताना) इत्यादि देशांत ब्राह्मण गेल्यास त्याला संस्कार करून शुद्ध केलें पाहिजे असें देवल म्हणतो. 'सिंधुसौवीरसौराष्ट्रं तथा प्रत्यन्तवासिनः । कलिंगकोंकगान् वंगान् गत्वा संस्कारमर्हति ।' (दे. स्मृ. १६). या देवल वचनाप्रमाणें कोंकणांत राहणारे आपण सर्व अस्पृश्यच आहोंत. ५ वा अस्पृश्यतेचा प्रकार म्हणजे द्वेषमूलक. बौद्ध, जैन, पाशुपत, कापालिक, वैष्णव, शैव इत्यादि भिन्नभिन्न पंथीय लोक एकमेकांना द्वेषामुळें अस्पृश्य मानितात. वृद्धहारीत म्हणतो, 'अचक्रधारी यो विप्रो बहुवेदश्रुतोऽपि वा । स जीवन्नेव चंडालो मृतो निरयमाप्नुयात्' (१, २७). वेदवेत्ता ब्राह्मण असला तरी त्याच्या अंगावर चक्रादि चिन्हें नसल्यास तो या जन्मीच चांडाल होतो व मेल्यावर नरकांत जातो. या वैष्णवांच्या वचनाला शैवानींहि तसाच उलट अहेर केला आहे. 'नग्नान्पाशुपतान्बौद्धान्कालान् कौलान् दिशश्वरान् । एतान्दृष्ट्वा रविं पश्येत् स्पृष्ट्वा स्नानं समाचरेत् ।' असें एक वचन अपरार्कानें उद्धृत केलें असून त्यांत जैन पाशुपतादि पंथाच्या लोकांना अस्पृश्य म्हटलें आहे. हीं सर्व द्वेषमूलक अस्पृश्यतेची उदाहरणें होत. ६ वा प्रकार जन्मजात अस्पृश्यतेचा. या प्रकाराचें उदाहरण, पारिभाषिक चांडाल म्हणजे शूद्र पुरुषाला ब्राह्मणस्त्रीपासून झालेली संतति हें एकच मुख्यत्वें शास्त्रांत सांगितलें आहे. या सहा प्रकारांपैकीं पहिल्या पांच प्रकारांची अस्पृश्यता आजन्म नसते; सहाव्या प्रकारची मात्र तशी नाहीं. त्यांतील अस्पृश्यता जन्मभर रहाणारी असते.

या अनेक प्रकारच्या अस्पृश्यांपैकीं बऱ्याच जणांची अस्पृश्यता आपण आतांपर्यंत घालविली आहे. अत्रिस्मृतींत (१९९) सांगितलेले रजक, नट बुरुड, इत्यादि

अंत्यंज आज बहुतेक स्पृश्य झालेले आहेत. चर्मकार, भट, भिल्ल, इत्यादि अंत्यजांच्या जवळ भाषण करावें लागल्यास स्नान करावें असें वेदव्यासस्मृतींत सांगितलें आहे. [ चर्मकारो भटो भिल्लो रजकः पुष्करो नटः । वराटो मेदचांडालौ दाशः श्वपचकौलिकाः ॥ एतेऽन्त्यजाः समाख्याता ये चान्यच्च गवाशनाः । एषां संभाषणात्स्नानं दर्शनादर्कवीक्षणम् ॥ १, १२–१३ ]. पण आंगिरसानें यांत सुधारणा करून यांच्या स्पर्शानें दोषी झालेला द्विज ' शुध्येदाचमनात् ' आचमनानें शुद्ध होईल असें ठरविलें ( १७ ). तेव्हां आपण आणखी सुधारणा करून उरलेल्या अंत्यजांची अस्पृश्यता घालविण्यास हरकत नाहीं. सोनार [ स्वर्णकार ] शिंपी [ सौचीक ], सुतार [ तक्षक ], तेली [ तिलयंत्री ] इत्यादि सोळा जघन्यज स्मृत्यर्थसारांत सांगितले असूनहि त्यांना आज अस्पृश्य मानण्याची कोणाला कल्पनाहि येणार नाहीं. ही सारी अस्पृश्यता रूढीनें आली व रूढीनें गेली. मूळ श्रुतींत तिला आधार नाहीं व स्मृतींतहि फारच थोडा आहे.

गीतेंत श्वपाक किंवा मृतप यांना ब्राह्मणाच्या मानानें खालच्या प्रतीचे म्हणून लेखिलें आहे, इतकेंच. मनूनें सर्वच अस्पृश्याना कांहीं गांवाबाहेर रहाण्यास सांगितलेलें नाहीं. त्यानें दहाव्या अध्यायांत ( श्लोक ४९–५२ ) अंत्यजांना त्याचे धंदे व रहाण्याचीं ठिकाणीं सांगितलीं आहेत, त्यांत तो ह्मणतोः–

क्षत्तुग्रपुक्कसानां तु बिलौकोवधबंधनम् ।<br>
धिग्वणानां चर्मकार्यं वेणानां भाण्डवादनम् ॥ ४९<br>
चैत्यद्रुमश्मशानेषु शैलेषूपवनेषु च ।<br>
वसेयुरेते विज्ञाता वर्तयन्तः स्वकर्मभिः ॥ ५०<br>
चंडालश्वपचानां तु बहिर्ग्रामात्प्रतिश्रयः ।<br>
अपपात्राश्च कर्तव्या धनमेषां श्वगर्दभम् ॥ ५१<br>
वासांसि मृतचैलानि भिन्नभाण्डेषु भोजनम् ।<br>
कार्ष्णायसमलंकारः परिव्रज्या च नित्यशः ॥ ५२<br>
रात्रौ न विचरेयुस्ते ग्रामेषु नगरेषु च ॥ ५४

यांत चांडाल व श्वपच यांनींच गांवाबाहेर रहावें असें म्हटलें आहे. त्यांनीं भांडीं वापरूं नयेत, मृतांचीं वस्त्रें पांघरावीं, खापरांत जेवावें, नित्य भटकत असावें, दिवसा गांवाची सेवा करण्यासाठीं गांवांत फिरावें, पण रात्रीं मात्र तिकडे जाऊं नये अशीं बंधनें त्यांच्यावर घातलेलीं होतीं. त्यांना दिवाकीर्ति म्हणत. स्मृतींतील अस्पृश्यता याच्या पलीकडे गेलेली नव्हती. पण पुढें ती धंद्यामुळें वाढत गेली. स्मृतिकारांनीं निरनिराळ्या जातींना धंदे सांगितले, त्यांतहि मतभेद आहेतच. खाटिक, रंगारी इत्यादि धंद्यावरून अस्पृश्य झाले. ही अस्पृश्यता वाढत वाढत सामान्यतः

शूद्रच अस्पृश्य झाला. लघु आश्वलायन म्हणतो 'श्वानं शूद्रं तथोच्छिष्टमनुच्छिष्टो न संस्पृशेत् । मोहाद्विप्रः स्पृशेद्यस्तु स्नानं तस्य विधीयते ' । शूद्राला श्वानाबरोबर आणून त्याच्या स्पर्शदोषाबद्दल स्नान सांगितलें आहे. महाभारतांतहि ( अनुशासन ५९.३३ ) शूद्रानें ब्राह्मणाची सेवा लांबून करावी, कारण ब्राह्मण अग्नीसारखा आहे असें म्हटलें असून याज्ञवल्क्यस्मृति ( १, १४८ ), आपस्तंबधर्मसूत्र (१-३-९-९) यांतहि शूद्राला श्मशान. पतित व अमेध्य यांच्याबरोबर लेखलें आहे. या प्रमाणें अस्पृश्यता चांडालापासून प्रथम चालू होऊन इतर धंदेवाल्या जाति व शूद्र यांच्यापर्यंत येऊन पोंचली. आतां ती उलट्या क्रमानें परत फिरली असून आपण ती त्या क्रमानें घालविली पाहिजे.

## अस्पृश्यतानिवारणाचीं महत्वाचीं स्थळें

सांप्रत अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत तीन स्थानें महत्वाचीं झालीं आहेत. १ सार्वजनिक ठिकाणें, २ पाणवठे व ३ देवळें. घरगुती बाबतींत व रोटीबेटी व्यवहारासंबंधाच्या ज्या अडचणी तिचे विरोधक पुढें आणतात त्या फोल आहेत. घरगुती व्यवहार आजहि ज्यांशीं पटतील त्यांशींच कोणी झाला तरी करतो. पण या तीन ठिकाणांचा प्रश्न महत्त्वाचा आहे. या पैकीं पाणी कधीं विटाळत नाहीं असें शास्त्र सांगतें. कांहीं गोष्टींना कधींच विटाळ होत नाहीं. राजा सदा शुद्ध असतो, त्याला सुतक सोहेरहि नसतें. तोच प्रकार वैद्याचा. वारा, मांजर, मध यांना विटाळ नाहीं. ताकालाहि विटाळ नाहीं, असें सांगितलें आहे. चामड्याच्या बुधल्यांतून आणिलेल्या पाण्याला दोष नाहीं. अत्रि म्हणतो, ' गोदोहने चर्मपुटे च तोय यन्त्राकरे कारुकशिल्पिहस्ते । स्त्रीबालवृद्धाचरितानि यानि अप्रत्यक्षदृष्टानि शुचीनि तान ।। ( अत्रि २३१.) ढोंपरभर पाणी असेल तर तें म्लेच्छादिकाच्या स्पर्शानें अशुद्ध होत नाहीं असें आपस्तंब म्हणतो, ' म्लेच्छादीनां पयः पीत्वा पुष्करिण्यां ह्रदेऽपि वा । जानुदघ्नं शुचिज्ञेय मधस्तादशुचि स्मृतम् । '. या वरून भरपूर पाण्याच्या विहिरी, तळीं इत्यादि ठिकाणची अस्पृश्यता काढून टाकण्यास कांहींच अडचण नाहीं. पण आज असें होत आहे कीं, सार्वजनिक विहिरीवर थोडें पाणी असतांहि मुसलमानादि सनातनधर्मबाह्यांना पाणी काढण्याची मुभा असते व त्यांचे पोहरे पाणी काढीत असतां इतराच्या पोहऱ्यांवर आदळत असतातच. पण त्या ठिकाणीं महार आदि करून आपल्या धर्मांतील पण अस्पृश्य मानिलेल्या लोकांना मात्र मज्जाव असतो. अशीं उदाहरणें आम्हीं प्रत्यक्ष पाहिलीं आहेत. एकदां एका मुसलमानानें महाराची बायको पळवून नेली व तिला मुसलमान केलें. तेव्हां त्या महारानें फिर्याद केली असतां कोर्टांत फिर्याद चालतांना तो मुसलमान व ती बाई खुशाल कोर्टांत खुर्चीवर व बाकावर बसलीं होतीं व बिचारा महार मात्र बाहेर लांब उभा होता ! संकट कालीं

कोठूनहि अन्न घेतलें तरी चालतें असें 'सर्वान्नानुमतिश्च प्राणात्यये तद्दर्शनात्' ( ३, ४, २८ ) या ब्रह्मसूत्रांत दाखविलें आहे.

प्राचीन स्मृतिकार म्लेच्छ, अशुचि व अधार्मिक यांना समान लेखून त्यांच्याशीं संभाषण करूं नये म्हणून सागतात ( गौ. ९, १७; विष्णु ६४, १५ ). पण आपण आज काय करतों ? साहेब हे म्लेच्छच होत. पण त्यांच्याशीं बोलण्यासाठीं अहमहमिका चालू असते. पौंड्रक, द्रविड, यवन, शक, इत्यादिकांना मनूनें क्षत्रिय म्हणून क्रियालोपामुळें ते शूद्रत्व पावले असें म्हटलें असल्याचें पूर्वी सागितलेंच आहे ( मनु १०, ४३-४४ ). ऐतरेय ब्राह्मणांत हे सर्व लोक विश्वामित्राच्या संततीपासून झाले असें सागितलें आहे. विश्वामित्रानें अजीगर्त पुत्र शुनःशेप याला आपला पुत्र करून घेतलें, तेव्हां त्याचे पूर्वीच्या शंभर मुलांपैकीं पन्नास तसें करूं देतना, म्हणून त्यानें त्यांना शाप दिला व त्यामुळें ते दूर देशी जाऊन नीच असे अन्ध्रादि झाले (ताननु व्याजहार अन्तान्वः प्रजा भक्षीष्टेति । त एते ऽन्ध्राः पुण्ड्राः शबराः पुलिन्दाः मूतिबा इत्युदन्त्या बहवो वैश्वामित्रा दस्यूना भूयिष्ठाः । ऐ. ब्रा. ३३, ८ ). या प्रमाणें तुलनात्मक दृष्टीनें पाहिलें तर अंत्यज हे काहीं म्लेच्छ, शक, पुंड्र इत्यादिकांपेक्षा हीन ठरत नाहींत. हे गवाशन म्हणजे गाई खाणारे आहेत व मूर्तिभंजकहि आहेत. पण अंत्यज तसे नसून आमच्या देवादिकाच्या मूर्तींची पूजा करितात. तेव्हां सनातन धर्मदीपिकाकार अनंतशास्त्री याना अशी विनंति आहे कीं, त्यांनीं या गोष्टींचा विचार करावा. ताशेवाले मुसलमान अस्पृश्य ठरत नाहीत, पण अंत्यजांना मात्र देवळांत मज्जाव. तेव्हां हा मोठा विचाराचा प्रश्न आहे. पारशीहि म्लेच्छ अतएव अस्पृश्य होत असें वृद्धयाज्ञवल्क्य स्पष्ट सागतो 'चंडालपुक्कसम्लेच्छभिल्लपारसिकादिकम् । महापातकिनश्चैव स्पृष्ट्वा स्नायात्सचैलकम्' ( याज्ञ. ३, २९-३० वरील अपरार्काच्या टीकेंत घेतलेला उतारा ). पण चंडाल पुक्कसाखेरीज इतर सर्व आज स्पृश्य झाले आहेत. मग चाडालानींच काय केलें आहे ? हे म्लेच्छादि जबरदस्त आहेत, म्हणून स्पृश्य झाले असें याचें उत्तर कोणी देतात. पण त्यांत काहीं पुरुषार्थ नाहीं. चाडालानी स्पृश्य होण्यासाठीं जबरदस्ती करावी असाच या प्रतिपादनाचा अर्थ होईल.

तीन प्रकारच्या सार्वजनिक ठिकाणांपैकीं देवळांचा प्रश्न आज मोठा कठीण वाटतो. पण त्यासंबंधानें श्रुतींत कांहीं असणें शक्यच नाहीं. कारण त्यावेळीं आपल्याकडे देवळेंच नव्हतीं. इंद्र, वरुण, बृहस्पति, मरुत्, अग्नि, हे तेव्हांचे देव असून त्यांच्या मूर्ति नव्हत्या व त्याच्यासाठीं अर्थात् देवळेंहि नव्हतीं. मूर्ति व देवळें बुद्धकालाच्या सुमारास आपल्याकडे उत्पन्न झालीं. तेव्हां अंत्यजांच्या मंदिरप्रवेशाविषयीं श्रुतींत उल्लेख असणें अशक्य होय. पण अंत्यजांनीं देवळांत जावें असें जसें कोठें आढळत

नाहीं, तसें त्यांनीं देवळांत जाऊं नये असेंहि कोणी स्मृतिकार सांगत नाहीं. उलट ' देवयात्राविवाहेषु यज्ञप्रकरणेषु च । उत्सवेषु च सर्वेषु स्पृष्टास्पृष्टिर्न विद्यते ' असें अत्रिस्मृति सांगते [ २४९ ]. यांतील स्पृष्टास्पृष्टि शब्द समास असून स्पृष्टांची अस्पृष्टि असा त्याचा सरळ विग्रह आहे. व त्याचा अर्थ सनातनधर्मदीपिकाकारहि इतक्या प्रसंगीं स्पर्शदोष नाहीं असाच सरळ करतात. पण हा संदर्भ मृताशौचाचा आहे व त्यांत देवाच्या यात्रेचा म्हणजे जत्रेचा संबंध आहे मंदिरप्रवेशाचा नाहीं असें कित्येकांचें म्हणणें आहे. त्याला तोड स्मृत्यर्थसारांतील ( पान ७९ ) वचनांत मिळते. ' संग्रामे हट्टमार्गे च यात्रा देवगृहेषु च । उत्सवक्रतुतीर्थेषु विप्लवे ग्रामदेशयोः ॥ महा जलसमीपेषु महाजनवरेषु च । अग्न्युत्पाते महापत्सु स्पृष्टास्पृष्टिर्न दुष्यति ' ॥ या वचनांत ' देवगृह ' असा स्पष्ट शब्द घातलेला आहे याचा विचार केला असतां पाणवठे, सार्वजानिक जत्रा, उत्सव इत्यादि प्रसंग व देवळें या ठिकाणीं अस्पृश्यता सांगितलेली नाहीं असें दिसून येईल. स्पृष्टास्पृष्टिः या शब्दावर पुष्कळ काथ्याकूट करून कोणी त्याला इतरेतरद्वंद्व तर कोणी समाहारद्वंद्व समजतात. पण तसें केल्यानें त्याचें रूप स्पृष्टास्पृष्टी किंवा स्पृष्टास्पृष्टि असें होईल. पण ' स्पृष्टास्पृष्टिः ' असें तें असल्यामुळें ' स्पृष्टस्य अस्पृष्टिः ' म्हणजे स्पर्श केलेल्याचा अस्पर्श दोष असाच सरळ अर्थ घेतला पाहिजे.

अस्पृश्यतेच्या बाबतींत अस्पृश्यांची सावलीहि आपल्यावर पडूं देऊं नये असें एक अंग आहे. पण खरोखर छायेला दोष आहे काय ? मनु तर म्हणतो कीं, ' मक्षिका विप्रुषश्छाया गौरश्वः सूर्यरश्मयः । रजो भूर्वायुरग्निश्च स्पर्शे मेध्यानि निर्दिशेत् । [ ५, १३३ व या. १. १९२ ]' माशी, तोंडांतून बाहेर पडणारे पाण्याचे कण, सावली, गाय, घोडा, सूर्यकिरण, धूळ, पृथ्वी वारा व अग्नि हीं चांडालाचा स्पर्श करून आलीं तर पवित्रच होत, त्यांना स्पर्शदोष नाहीं. ' मग चांडालाच्या छायेला दोष कसला ? याज्ञवल्क्य ( १, १९७ ) यांत अन्त्य म्हणजे चण्डाल, श्वान व कावळे यांनीं रस्त्यांतील चिखलपाणी यांना स्पर्श केला तरी तो रस्ता वाऱ्यानेंच शुद्ध होतो ( म्हणजे दुसऱ्या शुद्धीची जरूर नाहीं ) असें सांगितलें आहे ( रथ्याकर्दमतोयानि स्पृष्टान्यन्त्यश्ववायसैः । मारुतेनैव शुध्यन्ति पक्वेष्टकचितानिच ॥ ). ह्या श्लोकावर विश्वरूपानें जरी टीका केली नसली तरी तो त्याला माहित होता हें त्यानेंच लिहिलें आहे व मिताक्षराकारानें त्यावर टीका केली आहे म्हणून तो प्रमाणभूत आहे. तेव्हां पाणी पुष्कळ असलें म्हणजे त्याला दोष नाहीं, सार्वजनिक ठिकाणीं स्पर्श दोष नाहीं व देवळांसंबंधानें प्राचीन ग्रंथांत कांहीं निर्बंध असणें शक्य नाहीं, यास्तव या प्रमुख ठिकाणीं अस्पृश्यता मानण्याला कांहीं कारण नाहीं. पण अस्पृश्यांची अस्पृश्यता घालविण्याचे उपायहि पुराणादि ग्रंथांत सांगितलेले आढळतात. पद्मपुराण म्हणतें, " ज्याच्या कपाळावर ऊर्ध्व पुंड्र

लाविला असेल तर तो शुद्धात्मा व पूज्य होय. 'ऊर्ध्वपुंड्रमूर्ध्वरेखं ललाटे यस्य दृश्यते। चांडालोऽपि स शुद्धात्मा पूज्य एव न संशयः। (पद्मपुराण खंड ५ अ. ६७, ७१)." वृद्धहारीतानेंहि (२. ६७) भक्तिमाहात्म्य सांगतांना हेंच वचन थोड्या फरकानें म्हणजे 'ऊर्ध्वरेखम्' बद्दल 'मृदाशुभ्रम्' व 'पूज्य एव न संशयः' याबद्दल 'विष्णुलोके महीयते' असे शब्द घालून दिलें आहे. श्रीमद्भागवतांतहि परमेश्वराचें नांव घेणारा श्वपच शुद्ध होतो (अहो बत श्वपचो गरीयान् यज्जिह्वाग्रे वर्तते नाम तुभ्यम्। ३, ३३) व भगवंताच्या श्रवणानें, कीर्तनानें व ध्यानानें अन्त्यावसायी देखील पवित्र होतो (श्रवणात्कीर्तनाद् ध्यानात्पूयंतेऽन्तेवसायिनाः। १०, ७०) असे अस्पृश्यांच्या शुद्धीकरणाचे उपाय सांगितले आहेत. कित्येक सनातनी वादाच्या भरांत म्हणतात कीं, अस्पृश्यांपेक्षां म्लेच्छादि श्रेष्ठ होत, कारण मनूनें म्हटल्यामुळें त्यांचें पातित्य केवळ कर्मामुळें आहे, जन्मामुळें नाहीं. पण हें म्हणणें चूक आहे. ते सगोत्र विवाह करतात, अनेक घाणेरडे धंदे करतात, व वरती गोमासभक्षणहि करतात, यास्तव चांडालापेक्षां तेहि अधिक योग्यतेचे असणें शक्य नाहीं. देवलानें म्लेच्छस्पर्शाबद्दल सचैल स्नान करून एक दिवस उपास केला पाहिजे (सभायां स्पर्शने चैव म्लेच्छेन सह संविशेत्। कुर्यात्स्नानं सचैलं तु दिनमेकमभोजनम्॥ ५८) असें सांगितलें असून बालंभट्टीकारानें तुरुष्कांपेक्षां चांडाल श्रेष्ठ होत असें आधारासाठीं शास्त्रवचन देऊन ठाम म्हटलें आहे. तेव्हां म्लेच्छ स्पृश्य ठरल्यावर अस्पृश्यता कायम ठेवणें शास्त्राला धरून नाहीं हें उघड आहे. या विषयावर श्री. पाठक शास्त्री यांचें पुस्तक सर्वांनीं अवश्य वाचावें व त्याचा योग्य विचार करावा एवढें पुनः सांगून आजच्या व्याख्यानाचा विषय पुरा करतों.

कायद्यानें अस्पृश्यांना देवळें खुलीं करावीं हें मत मला मान्य नाहीं. हल्लींची कायदेमंडळें हिंदु, मुसलमान, ख्रिस्ती वगैरे अनेकधर्मीय समाजांचीं आहेत. शिवाय अशा प्रकारचा कायदा करून त्याची अंमलबजावणी जोरानें सुरू झाल्यास मारामाऱ्या व रक्तपात होतील. म्हणून मतपरिवर्तनानेंच देवालय प्रवेशासंबंधी अस्पृश्यता घालविली पाहिजे. सार्वजनिक स्थळें व पाणवठे या संबंधीची अस्पृश्यता गेली म्हणजे एका पिढीनें देवालय प्रवेशासंबंधीही जाईल असें मला वाटतें. अस्पृश्यांनीं मंदिरप्रवेश करण्याचें बाबतींत जें बिल आलें होतें तें तर अत्यंत सदोष होतें. परंतु त्याचा ऊहापोह करण्याचें हें स्थल नव्हे.

# आश्रम-विचार.

## प्रास्ताविक

आपल्या धर्मांतील आश्रमव्यवस्थेच्या बुडाशीं कोणत्या कल्पना आहेत यांचा विचार करितां असें दिसतें कीं, मनुष्यस्वभावांत ज्या निरनिराळ्या प्रवृत्ति किंवा इच्छा असतात त्यांना यथोचित मार्ग लावून देण्याचा प्रयत्न करणें व त्याच्या वैयक्तिक उन्नतीचा प्रयत्न करून त्याला श्रेष्ठ पुरुषार्थ जो मोक्ष त्यासाठीं योग्य करणें या आहेत. मनुष्यमात्राला नानावस्तूंचा उपभोग घ्यावा असें वाटतें. तसेंच आपल्याला सत्ता असून ती आपण गाजवावी अशीहि त्याला इच्छा असते व ती लहान मुलांत ह दृष्टीस पडते. त्याबरोबरच आपला उत्कर्ष साधून इतरांचेंहि कल्याण करण्याची इच्छा दिसून येते. या इच्छांना ऐहिक इच्छा असें म्हणतां येईल. पण एवढ्यानें भागत नाहीं परलोक म्हणून हीं आहे, ईश्वर म्हणून कोणी विश्वाचा नियंता आहे व त्या दृष्टीनें आपलें कांहीं कर्तव्य आहे व परमेश्वरस्वरूपाचा साक्षात्कार व्हावा असेंहि मनुष्यांना वाटत असते. ही आध्यात्मिक प्रवृत्ति होय. परलोक किंवा ईश्वर म्हणून कांही खरोखर नाहीं असें म्हणणारे कित्येक जण आज आहेत. पण सामान्यतः विचार करतां अशा लोकांची गणना करण्याचें कारण नाहीं. समाजदृष्ट्या विचार करतांना बहुतेक या गोष्टीवर विश्वास ठेवणारे आहेत असेंच आढळतें. आतां या ज्या प्रवृत्ति किंवा स्वाभाविक इच्छा मनुष्यात दिसतात त्यांना पुरुषांचें ध्येय म्हणजे पुरुषार्थ म्हणतात व ते धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे होत. हे पुरुषार्थ साध्य करणें हें मनुष्याचें ध्येय असून तें न केल्याबद्दल भर्तृहरीनें वैराग्यशतकांत पश्चात्तापाचा एक श्लोकहि घातला आहे. त्यावरून मनुष्यांचीं हीं ऐहिक व पारमार्थिक ध्येयें व तीं साधण्याचा प्रयत्न न केल्यास जीवनाचें होणारें वैयर्थ्य हीं विशद होतात. भर्तृहरि म्हणतो, ज्यानें हे पुरुषार्थ साधिले नाहींत म्हणजे ईश्वराचें ध्यान करून मोक्षाचें साधन केलें नाहीं ( न ध्यातं पदमीश्वरस्य ), धर्माचें आचरण करून परलोकाचें द्वार मोकळें करून ठेविलें नाहीं ( स्वर्गद्वारकपाटपाटनपटुर्धर्मोऽपि नोपार्जितः ) व ऐहिक विषयांचा यथोचित उपभोग घेतला नाहीं तर ( शामापीन...नालिंगितं ) तो मातेचें यौवन नष्ट करण्याला मात्र कारणीभूत झाला म्हणावयाचा ( मातुः केवलमेव यौवनवनच्छेदे कुठारा वयम् ), त्याचा दुसरा कांहींच उपयोग नाहीं ! हे जे चार पुरुषार्थ ते साध्य करण्याचा एक मुख्य उपाय आमच्या धर्मांत आश्रमव्यवस्थेच्या रूपानें सांगितला आहे.

## वर्णधर्म व आश्रमधर्म यांतील भेद

आतांपर्यंतच्या व्याख्यानांत चातुर्वर्ण्य, जाति, संकरजाति, विवाह, संस्कार, स्पृश्या-स्पृश्यविचार इत्यादि जे विषय झाले त्यांत वर्णधर्मांचा विचार झाला. पूर्वी धर्मांचें विवेचन करतांना वर्णधर्म, आश्रमधर्म, इत्यादि सहा धर्मांचे प्रकार सांगितले. त्यांतील आश्रम धर्मांचा विचार करावयाचा आहे. हे आश्रम चार आहेत. वर्णहि चारच सांगितले. आपल्याकडे आंकड्याचे असे गट लाविलेले अनेक प्रकारें दिसतात. वेदहि चारच, समुद्रहि चारच. पूर्वी वेद तीन होते, अग्नि तीन व लोकहि तीन. भारत अठरा पर्वें, त्यांत वर्णिलेल्या युद्धांत अठरा अक्षौहिणी सैन्य, युद्धाचे दिवस अठरा व गीतेचे अध्यायहि अठरा. असो. प्रथम चार वर्ण व चार आश्रम याचा परस्पर काय संबंध आहे हें पाहूं. समाज आणि व्यक्ति किंवा वेदांताच्या परिभाषेंत समष्टि आणि व्यष्टि याचा जो संबंध तोच वर्ण व आश्रम यांचा आहे. एक एक व्यक्ति मिळून समाज होतो. एक एक वृक्ष मिळून वन होतें. या ठिकाणीं एक एक सुटी वस्तु म्हणजे व्यष्टि व सर्वांचा एकत्र समूह म्हणजे समष्टि. व्यक्ति व्यक्ति मिळून समाज झाला असला तरी समाज म्हणून स्वतंत्र विचारासाठीं कांहीं रहातोच. या समाजाचा घटक या नात्याचें, स्वतंत्र व्यक्ति म्हणुन नव्हे, जें मनुष्याचें कर्तव्य तें वर्णधर्म होय. उलट स्वतंत्र व्यक्ति म्हणून मनुष्याला कांहीं भावना व तदनुसार प्रवृत्ति असतात व तद्विषयक त्याचें कर्तव्यहि असतें. हें कर्तव्य म्हणजे आश्रमधर्म होय. थोडक्यांत सांगावयाचें तर वर्णधर्मांत मनुष्याचें एक घटक या नात्यानें समाजांतील स्थान, आणि तदनुसार त्याचीं कर्तव्यें, हक्क व जबाबदाऱ्या याचा विचार येतो आणि आश्रमधर्मांत व्यक्ति या नात्याची मनुष्याच्या आयुष्यांतील निरनिराळ्या भागातील कर्तव्यें कोणतीं व तदनुसार वैयक्तिक व अध्यात्मिक उन्नति आणि शाश्वत कल्याण हीं साधण्यासाठीं त्यानें काय करावें हें सांगितलेलें असतें.

## आश्रमधर्म सांगण्याची आवश्यकता

कोणताहि पुरुषार्थ साधावयाचा तर मनुष्याच्या स्वाभाविक अशा अनिर्बंध प्रवृत्तीला आळा घालून तिला विशिष्ट वळण लावणें अवश्य असतें. याच हेतूनें आमच्या धर्मशास्त्रांत मनुष्याच्या रोजच्या व्यवहारातील बारीक सारीक गोष्टी संबंधानें नियम सांगण्यांत आले. मनुष्याच्या आयुष्यांतील निरनिराळ्या अवस्थांमध्यें त्याचें कर्तव्य कोणतें हें सांगतांना त्याच्या शंभर वर्षांच्या आयुष्याचे चार भाग करण्यात आले. सामान्यतः श्रुतीमध्येंहि मनुष्य जीवनाचा अवधि शंभर वर्षांचा सांगितला आहे (शतायुर्वै पुरुषः). हजारो वर्षें आयुष्याच्या ज्या कथा आहेत त्या केवळ स्तुत्यर्थक होत, खरी आयुमर्यादा श्रुति शंभर वर्षांचीच सांगते व तदनुसार 'शतं जीव शरदो वर्धमानः शतं हेमन्तान् शतम् वसन्तान्' वूं शंभर

वर्षें उत्कर्षानें जग' असें आशीर्वादात्मक वचन वेदांत आलें आहे (ऋग्वेद १०,१६१,४). शंभर वर्षांच्या आयुष्याचे चार भाग केले ह्मणजे प्रत्येकाला सुमारें पंचवीस वर्षें येतात. त्यांत पहिलीं पंचवीस ब्रह्मचर्य, पुढील पंचवीस गृहस्थाश्रम, नंतरचीं पंचवीस वानप्रस्थ आणि शेवटचीं पंचवीस संन्यास अशा चार आश्रमांत वाटून दिलीं आहेत. बालपण संपून बारा वर्षें विद्याभ्यास पूर्ण झाल्यावर गृहस्थाश्रमी व्हावयाचें व त्याचा उपभोग घेऊन पन्नाशीच्या सुमारास अंगावर वळ्या पडूं लागल्या व पौत्रमुख दृष्टीस पडलें ह्मणजे घर सोडून वनांत जावें असा क्रम होता. मनुष्याचें अंतिम ध्येय जें शाश्वत कल्याण किंवा मोक्ष तें साध्य करण्याचें साक्षात्साधन ह्मणजे संन्यासाश्रम व त्या साधनाची सिद्धता करण्यासाठीं करावयाची तयारी ह्मणजे पहिले तीन आश्रम असा या चार आश्रमांचा संबंध आहे. मनुष्याला शंभर वर्षें किंवा जो कांहीं उणा अधिक जीवनावधि आलेला असेल त्यांत त्याच्यावर व्यक्तिशः कोणत्या जबाबदाऱ्या पडतात याचा विचार आश्रमधर्मांत केलेला असतो. आमच्या तत्त्वज्ञानांत अनावृत्ति किंवा मोक्ष अथवा जन्ममरणापासून सुटणें हें मनुष्याचें अंतिम ध्येय मानिलें आहे. अनावृत्ति ह्मणजे आवृत्ति न होणें. आवृत्ति ह्मणजे परत येणें. जेथें गेलें असता परत यावें लागत नाहीं तो मोक्ष असें सांगितलें आहे. पण मोक्ष ही कांहीं स्वतंत्र वस्तु नाहीं. स्वर्ग ह्मणजे कांहीं एक प्रकारचें उच्च स्थान आहे अशी कल्पना सामान्यतः आढळते. पण मीमांसाशास्त्र मात्र तसें ह्मणत नाहीं त्याप्रमाणें मोक्ष ह्मणजे कांहीं एकादा विशिष्ट प्रदेश नव्हे. आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा तीन प्रकारच्या दुःखांतून सुटका ह्मणजे मोक्ष होय असें आमचें तत्वज्ञान सांगतें. ग्रीक तत्वज्ञानांत सुख ( happiness ) हें जीविताचें ध्येय मानिलें असून त्याच्या शोधाचा विचार—केवळ तत्कालिक आनंद देणाऱ्या गोष्टींचा ( pleasure ) नव्हे--त्या तत्वज्ञानात प्लेटो, ॲरिस्टॉटल इत्यादि तत्त्वज्ञांनीं केला आहे. पण आमच्या सर्वदर्शनांत अपवर्ग ह्मणजे मोक्ष हेंच ध्येय मानिलें आहे. सांख्य, योग, वेदांत, न्याय, इत्यादि सर्वांचा अभिप्राय या बाबतींत सारखाच आहे. 'दुःखत्रयाभिघातात्' असेंही सांख्यकारिकेंत आहे. मोक्ष, कैवल्य, अपवर्ग इत्यादि शब्दांनीं दर्शविलेली स्थिति मनुष्यजीविताचें ध्येय असा आमच्या सर्व शास्त्रकारांचा सिद्धान्त असून त्या ध्येयाचा जवळचा उपाय म्हणजे संन्यास व पहिले तीन आश्रम हे त्याचीं उपकारक साधनें होत.

## आश्रमाच्या कल्पनेचा इतिहास

चातुर्वर्ण्याचा विचार करतांना वर्ण शब्द ऋग्वेदापासून दिसत असून प्रथम आर्य व दास हे दोनच वर्ण आढळत होते, पण पुढें वेदकालांतच चातुर्वर्ण्य व्यवस्था स्थापित झालेली होती इत्यादि गोष्टी सांगितल्या आहेतच. आश्रमांचाहि

तसाच प्रकार असून ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ्य आणि संन्यास किंवा पारिव्राज्य हे चार आश्रम आरंभीं असलेले आढळत नाहींत. वर्णाच्या कल्पनेनंतर कांही काळानें आश्रमाची कल्पना आलेली दिसते. आश्रम हा शब्द संहिता, ब्राह्मण व उपनिषदें यांत येत नाहीं. पण आश्रमातील कांहींची कल्पना ऋग्वेदांतहि आढळते. श्वेताश्वतर उपनिषदात 'तपःप्रभावाद्देवप्रसादाच्च ब्रह्म ह श्वेताश्वतरोऽथ विद्वान्। अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रं प्रोवाच सम्यगृषिसंघजुष्टम्' (६ २१) असा मंत्र आला असून त्यांत 'ज्ञानी झालेल्या श्वेताश्वतरानें आश्रमांच्या पलीकडे गेलेल्यांना ज्ञान सांगितलें' असें म्हटलें आहे. यात आश्रम शब्द आला आहे, पण श्वेताश्वतरोपनिषद् मुख्य उपनिषदांत येत नाहीं व तें दशोपनिषदांइतकें प्राचीन नाहीं. तथापि अष्टोपनिषदाप्रमाणें तें अर्वाचीनहि नाहीं. या शिवाय इतर प्राचीन वैदिक वाङ्मयांत आश्रम हा शब्द आढळत नाहीं. तथापि ब्रह्मचारी हा शब्द ऋग्वेदांत येतो. बृहस्पतीला ब्रह्मचारी म्हटल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे (ब्रह्मचारी चरति वेविषद् इ.। ऋ. १०, १०९ ५. व अथर्व. ५, १७, ५, ऋग्वेदांत गृहस्थाश्रमाचाहि उल्लेख असून त्याला गार्हपत्य असा शब्द लाविलेला आहे (गृभ्णामि ते सौभगत्वाय हस्तं...गार्हपत्याय देवाः। ऋ. १०. ८५. ३६.). हे दोन आश्रमच प्राचीन दिसतात. अथर्व वेदाच्या एका सूक्तांत (११. ५) सव्वीस मंत्र असून त्यांत सर्वत्र ब्रह्मचर्याची स्तुति आहे. शतपथ ब्राह्मणांत (११, ५, ४) 'ब्रह्मचर्यमागाम्' म्हणजे मी ब्रह्मचर्याप्रत प्राप्त झालों असा आरंभ करून ब्रह्मचर्याश्रमांत करावयाच्या अनेक गोष्टींचा म्हणजे अग्नीला समिध् देणें, सावित्री । उपदेश, मधुसेवन न करणें, भिक्षाचर्य, गुरुशुश्रूषा, इत्यादिकाचा निर्देश केलेला आहे. तैत्तिरीय आरण्यकांत (२, १८) ब्रह्मचारी अवकीर्णि झाला (त्याच्याकडून स्त्रीसंभोग घडला) तर त्यासाठीं करावयाचें प्रायश्चित सांगितलें आहे. छांदोग्योपनिषदांतील सत्यकाम जाबालाची कथा आतां सर्वांस माहित झालीच आहे. त्यात जाबाल मातेला म्हणतो, 'ब्रह्मचर्यं भवति विवत्स्यामि किंगोत्रोऽहमस्मीति' (४, ४, १) मला ब्रह्मचर्य आचरावयाचें आहे, तर माझें गोत्र कोण? त्याच उपनिषदांत पुढें सहाव्या अध्यायांत श्वेतकेतु आरुणेयाचा पिता त्याला म्हणतो 'श्वेतकेतो वस ब्रह्मचर्यम्' (६,१,१) हे श्वेतकेतो आतां तूं ब्रह्मचर्य आचर. कठ (१, २, १५) व मुंडक (२, १ ७) या उपनिषदांतहि 'यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति।' व 'तस्माच्च देवा बहुधा संप्रसूताः........श्रद्धा सत्यं ब्रह्मचर्यं विधिश्च।' असा ब्रह्मचर्याचा उल्लेख आढळतो.

पण वेदांत वानप्रस्थ व संन्यास हे शब्द नाहींत. संन्यासी शब्दाचा प्रतिशब्द वाटेल असा यति शब्द वेदात येतो. पण त्यांत यति म्हणजे जादूटोणा करणारा असा कुत्सितार्थ आहे. इंद्रानें यतींना लांडग्यां

पुढें टाकिलें ( इन्द्रो यतीन्सालावृकेभ्यः प्रायच्छत् । तै. सं. ६, २, ७, ५; काठक सं. ८, ५; ऐ. ब्रा. ३५, २ ) इत्यादि कथा वेदांत आली असून तिचा उल्लेख आरंभींच्या एका व्याख्यानांत केलाच आहे. त्यावरून यति शब्द संन्यासी या प्रौढ अर्थी तेव्हां योजलेला नसे असें दिसतें. वेदांतील यति व यातु ( जादू ) यांत एकच धातु ' यत् ' हा आहे. यातु पासूनच व्युत्पत्तिशास्त्राच्या नियमांप्रमाणें यचा ज व तचा द होऊन जादू शब्द झाला आहे. यातु करणारे ते यति म्हणजे जादूगार. तथापि ' वातवसन ' म्हणजे वात हेंच वस्त्र ज्याचें असे ' मुनयः ' ऋग्वेदांतहि आले आहेत ( १०, १३६, २ ). तात्पर्य संन्यासाश्रम व वानप्रस्थाश्रम हे संहिताकाळीं व ब्राह्मणकाळीं अस्तित्वात नसावे असें दिसते. पण पुढें उपनिषत्काळीं ते चालू झाले. संहिता व ब्राह्मण यांच्या काळीं ब्रह्मचर्य आणि गार्हस्थ्य यांचेंच विशेष महत्व होतें व त्यावेळीं यज्ञयागावर मोठा भर होता. परंतु उपनिषत्काळीं या यज्ञयागांवरील श्रद्धा उडत जाऊन ज्ञानाचें व वैराग्याचें महत्त्व वाढलें आणि विचारक्रान्ति होऊन संन्यासावर भर देण्यांत आलेला आढळतो. ब्राह्मणग्रंथाच्या शेवटीं असलेलीं जीं आरण्यकें त्यात यज्ञाची निष्फलता व तीमुळें लागलेली तळमळ दिसून येते. या ग्रंथांत यज्ञाचें वास्तविक स्वरूप सोडून त्यांवर आध्यात्मिक रूपकें बसविण्यात येऊं लागलीं. सत्कर्मांनें प्राप्त झालेल्या उत्तम लोकांचीहि परिसमाप्ति होते ( तद्यथेह कर्मचितो लोकः क्षीयते एवमेवामुत्र पुण्यचितो लोकः क्षीयते । छांदोग्य. ८, १, ६ ) असें मानूं लागले. मुंडकोपनिषदांतहि हाच अभिप्राय सांगितला आहे, ' यत्कर्मिणो न प्रवेदयन्ति रागात्तेनातुराः क्षीणलोकाश्च्यवन्ते ।' [ १, २, ९ ]; 'नाकस्य पृष्ठे ते सुकृतेऽनुभूत्वेमं लोकं हीनतरं चाविशन्ति ' । [ १, २, १० ]; 'परीक्ष्य लोकान्कर्मचितान्ब्राह्मणो निर्वेदमायान् नास्त्यकृतः कृतेन । ' ( १, २, १२ ).

चारी आश्रमांचा प्रथम उल्लेख ऐतरेयब्राह्मणांत ( ३३, ११ ) आढळतो. 'किन्नु मलं किमजिनं किमु श्मश्रूणि किं तपः । पुत्रं ब्रह्माणमिच्छध्वं स वै लोको बदावदः' असें त्यांत म्हटलें आहे. यांतील आजिन, श्मश्रु, तप इत्यादि शब्द ब्रह्मचर्य, संन्यास व वानप्रस्थ यांची प्रतीकें ( symbols ) होत. हे तीन आश्रम काय करावयाचे, गृहस्थाश्रमी होऊन पुत्रांची इच्छा करा, पुत्रच ब्रह्म होय, तोच अत्यंत स्तुत्य असा लोक आहे असें म्हणून गृहस्थाश्रमाची यांत स्तुति केलेली आहे. उपनिषदांत या चारी आश्रमांची कल्पना आहे; पण तसे प्रत्यक्ष शब्द ज्या ठिकाणीं चारी आले आहेत तेथें नाहींत; मात्र 'नायमात्मा बलहीनेन लभ्यो न च प्रमादात्तपसो वाप्यलिंगात् । ( मुं. ३, २, ४ ); वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाः संन्यासयोगाद्यतयः शुद्धसत्त्वाः । ' ( मुं ३, २, ६ ) या ठिकाणीं संन्यासाचा निर्देश आहे. छांदोग्योपनिषदांत तीन आश्रमांचे दर्शक असे तीन धर्मस्कंध म्हणजे धर्मांचे प्रकार सांगितले आहेत ( २, २३, १ ) त्यांतील ' यज्ञोऽध्ययनं दानमिति

प्रथमः तप एव द्वितीयः ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयः......ब्रह्मसंस्थो अमृतत्वमेति' पहिला गृहस्थ, दुसरा तापस म्हणजे वानप्रस्थ, तिसरा ब्रह्मचारी व चवथा ब्रह्मसंस्थ म्हणजे परिव्राट्. ब्रह्मचारी उपकुर्वाण व नैष्ठिक असा दोन प्रकारचा असतो, त्याविषयीं विवेचन पुढें येईलच. बृहदारण्यकोपनिषदांत याज्ञवल्क्य व मैत्रेयी यांच्या कथेंत (४, ५, २) याज्ञवल्क्य म्हणतो, 'हे मैत्रेयि, मी आतां घर सोडून जाणार आहें (मैत्रेयीति होवाच याज्ञवल्क्यः प्रव्राजिष्यन्वा अरेऽहमस्मात्स्था-) नादस्मि). यांत प्रव्रज्याश्रमाचा म्हणजे संन्यासाचा उल्लेख आहे. संन्याशाला परिव्राजक, परिव्राट्, मुनि, यति, संन्यासी, भिक्षु अशीं विविध नांवें आढळतात व त्यांत प्रत्येकीं निरनिराळी कल्पना आढळते. गृह सोडून जाणें (प्रव्रज्), ईश्वरध्यान करीत रहाणें (मन्), इंद्रियदमन करणें (यम्), सर्व कर्मांचा त्याग करणें (संन्यस्), भिक्षु (म्हणजे भिक्षा मागून शरीरयात्रा चालविणारा) यांपैकीं एकेक कल्पना घेऊन हे शब्द संन्याशाला लावण्यांत आलेले दिसतात. प्रव्रज्या हा शब्द बौद्धवाङ्मयांतहि घेतलेला असून त्याचें त्यांत पब्बजा असें रूप आढळतें. तसाच संन्यासिवाचक भिक्षु शब्दहि भिक्खु या रूपानें त्यांत दिसतो. पण बौद्धधर्माचा विचार अप्रस्तुत असल्यामुळें त्यांत खोल जाण्याचें कारण नाहीं.

या चारी आश्रमांचें जाबालोपनिषदांत चांगलें वर्णन आहे. त्यांत म्हटलें आहे, 'ब्रह्मचर्यं परिसमाप्य गृही भवेत् गृही भूत्वा वनी भवेत् वनी भूत्वा प्रव्रजेत्। यदि वा इतरथा ब्रह्मचर्यादेव प्रव्रजेत् गृहाद्वा वनाद्वा। ........यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्।' ब्रह्मचर्य संपल्यावर गृहस्थ व्हावें, नंतर वानप्रस्थ व्हावें व शेवटीं प्रव्रज्या घ्यावी. किंवा ब्रह्मचर्यानंतर लगेंच परिव्राट् व्हावें, नाहीं तर गार्हस्थ्यानंतर किंवा वनानंतर आहेच......ज्या दिवशीं वैराग्य येईल त्या दिवशींच कोणत्याहि अवस्थेंतून सर्वसंगपरित्याग करावा (जा उ. ४). या आश्रमांसंबंधाचे तीन पक्ष मांडण्यांत येतात, १ समुच्चय २ विकल्प आणि ३ बाध. जाबालोपनिषदांतील वर्णनांत समुच्चय सांगून मग विकल्पपक्षही सांगितला आहे. म्हणजे ब्रह्मचर्यादि सर्व आश्रमांतून क्रमानें गेलेंच पाहिजे असा समुच्चय सांगून संन्यास हा वैराग्यावर अवलंबून असल्यामुळें ज्यावेळीं वैराग्य उत्पन्न होईल त्यावेळींच तो घ्यावा, मग त्यावेळीं मनुष्य ब्रह्मचर्यांत असो, गृहस्थ असो वा वानप्रस्थ असो असें सांगितलें आहे. अर्थात् हें वैराग्य खरें वैराग्य पाहिजे, केवळ श्मशान वैराग्य नसावें. बाधपक्ष म्हणजे ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रम एव्हढे दोनच सर्वसाधारण आश्रम आहेत, इतर आश्रम सर्व लोकांसाठीं नाहींत; अन्ध, पंगु वगैरे लोकांसाठीं पाहिजे तर त्यांचा अवलंब करावा असें मत.

संन्यासाश्रमांत अमुक केलें पाहिजे याविषयीं प्राचीन ग्रंथांत कांहीं सांगितलेलें दिसत नाहीं. बृहदारण्यकांत 'ते ह स्म पुत्रैषणायाश्च वित्तैषणायाश्च लोकैषणायाश्च व्युत्थायाथ भिक्षाचर्यं चरन्ति।' (४, ४, २२), वैराग्य प्राप्त झालेले पुरुष पुत्र,

वित्त, स्वर्ग इत्यादिकांच्या मागें न लागतां त्या सर्व गोष्टी सोडून भिक्षा मागत फिरतात, एवढेंच सांगितलें आहे. पण आजचे बैरागी निराळेच असतात. नुकताच येथें ठाकुरद्वारीं एक बैरागी वारला. तेव्हां त्याची पोतडी शोधून पहातां तींत ७५० रु. सांपडले! संन्याशानें अमुक गोष्ट कर्तव्य म्हणून केली पाहिजे असें प्राचीन उपनिषदांत सांगितलें नाहीं. पण जाबालोपनिषदांत संन्याशाच्या आचरणाचे नियम दिलेले आढळतात. 'अथ परिव्राड् विवर्णवासा मुण्डोऽपरिग्रहः शुचिरद्रोही'। (जा. ३, ५). पण हें उपनिषद् प्राचीनांपैकीं नाहीं. छांदोग्यांत तीन धर्मस्कंध सांगतांना परिव्राड् सूचित केलेला आहे, पण त्यानें अमुक कर्म केलें पाहिजे असा विधि नाहीं, केवळ वस्तुस्थिति सांगितली आहे. तीन धर्मस्कंधाविषयींच्या या छांदोग्य वचनाचा ब्रह्मसूत्रात (३, ४, १८-२०) विचार करून त्याविषयींचे निरनिराळे निर्णय दिले आहेत. 'परामर्शं जैमिनिरचोदना चापवदति हि' (१८) या सूत्रांत 'त्रयो धर्मस्कंधाः' या उपनिषद्वचनावरून इतर आश्रम केले पाहिजेत असा विधि निघत नसून त्यांत केवळ त्या इतर आश्रमांचा परामर्श घेतला आहे असें जैमिनीचें मत दिलें आहे. 'त्रयो धर्मस्कंधाः' या वाक्यांत विध्यर्थ किंवा आज्ञार्थ नाहीं, तसा असेल तेव्हांच तें वचन विधि किंवा चोदना होऊं शकतें. पुढील 'अनुष्ठेयं बादरायणः साम्यश्रुतेः' या सूत्रांत इतर आश्रमांचेंहि अनुष्ठान केलें पाहिजे असें बादरायणाचें मत दिलें आहे; कारण 'त्रयो धर्मस्कंधाः' या श्रुतिवाक्यांत सर्व आश्रम सांगितले आहेत व ते सांगण्याचा हेतु ते आचरावे हाच असला पाहिजे. जाबालोपनिषदांत 'व्रजेत्' असा संन्यासाचा विधि सांगितला आहे, व हा विधि जैमिनि व बादरायण यांचे पुढें असता तर अशी मतभिन्नता उत्पन्न होऊं शकली नसती. यावरून जाबालोपनिषद् हें ब्रह्मसूत्रकाळीं नव्हतें किंवा असल्यास प्रमाणभूत नव्हतें असें अनुमान काढण्याला हरकत दिसत नाहीं. या आश्रमांच्या आवश्यकतेसंबंधानें जे तीन पक्ष पूर्वीं सांगितले त्यांतील बाधपक्ष म्हणतो कीं वानप्रस्थ व संन्यास हे कोणी घेऊं नयेत. हे आश्रम अंधळे, थोटे, म्हणजे ज्यांना गृहस्थाश्रम शक्य नाहीं त्यांनीं घ्यावयाचे आहेत. बाधपक्षाच्या मतें ब्रह्मचर्य आणि गार्हस्थ्य हींच प्रत्येकाला विहित होत. बौधायन व गौतम हे गृहस्थाश्रमालाच प्रमुख मानतात. बौधायन म्हणतो (२, ६, २९) 'ऐकाश्रम्यं त्वाचार्या अप्रजननत्वादितरेषाम्। तत्रोदाहरन्ति। प्राल्हादिर्वै कपिला नामासुर आस। स एतान्भेदांश्चकार। तान्मनीषी नाद्रियेत'। एक गृहस्थाश्रम हाच खरा, इतरांत वंशवृद्धीची योजना नाहीं. इतर आश्रमांचे भेद कपिल नामक असुरानें केले, त्यांचा आदर सुज्ञानें करूं नये. गार्हस्थ्याचें श्रुतीनें 'यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात्।; एतद्वै जरामर्यं सत्रं यदग्निहोत्रं;। कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेत् शतं समाः।' इत्यादि प्रत्यक्ष विधान केलें असल्यामुळें तोच एक आश्रम खरा असें गौतम सांगतो (३, ३५) 'ऐकाश्रम्यं त्वाचार्याः प्रत्यक्षविधानाद् गार्हस्थ्यस्य।'. महाभारताच्या शांतिपर्वांत

'( १२, १२–१३ ) नकुलाच्या तोंडी अशी कथा घातली आहे कीं, गृहस्थाश्रम व इतर आश्रम यांची तुलना करण्यासाठीं एकदां त्याला तराजूच्या एका पारड्यांत टाकून दुसऱ्या सर्व आश्रमांना दुसऱ्या पारड्यांत घातलें, त्यावेळीं गार्हस्थ्याचें पारडें खालीं येऊन दुसरें अगदीं वर गेलें ! कारण गृहस्थाश्रमाच्या योगें काम व स्वर्ग या दोहोंची प्राप्ति होत असल्यामुळें तोच सर्वांत श्रेष्ठ होय. या वचनांवरून गौतम व बौधायन यांच्याहि पुढें जाबालोपनिषद् नव्हतें असें दिसतें.

संन्यास ह्मणजे सर्व कर्मांचा त्याग. पण गीतेंत काम्य कर्मांचा त्याग ह्मणजे संन्यास असें ह्मटलें आहे ( काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः । १८, २ ). कर्मे तीन प्रकारचीं सांगितलीं आहेत, नित्य, नैमित्तिक व काम्य. संध्यावंदनादि जीं अवश्य कर्तव्यें, जीं न केल्यानें दोष घडतो तीं नित्यकर्में. मुलगा झाला असता त्याचें जातकर्म करणें, किंवा ग्रहण आलें असतां करावयास सांगितलेले जप, दान इत्यादि हें नैमित्तिक कर्म आणि स्वर्गासाठीं ज्योतिष्टोम करणें, किंवा पुत्रासाठीं पुत्रकामेष्टि हीं काम्य कर्में होत. अशा काम्यकर्मांचा त्याग ह्मणजे संन्यास असें गीता सांगते. दोष घडूं नये ह्मणून नित्य व नैमित्तिक कर्में केलींच पाहिजेत पण काम्य कर्मांचें तसें नाहीं ह्मणून तीं टाकावीं असा खुबीचा मार्ग गीतेनें स्वीकारिला.

पूर्वी संन्यासाला तादृश महत्त्व नव्हतें. आपस्तंबानें चारी आश्रम सांगून 'तेषु सर्वेषु यथोपदेशं अव्यग्रो वर्तमानः क्षेमं गच्छति' ( २, ९, २१, १ ) ह्मणजे कोणत्याहि आश्रमाचें यथोपदेश पालन केल्यानें कल्याण प्राप्त होतें असें ह्मटलें आहे; व पुनः शेवटीं त्यानें ( २. ९. २४. ८ ) तेंच सांगितलें आहे ( न तु तज्ज्येष्ठमाश्रमाणाम् ). गीतेंत तर 'कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इन्द्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते' ( ३, ६ ) असा खोट्या संन्यासाचा धिक्कार केला आहे. मनु हा समुच्चयवादी आहे. 'सर्वेऽपि क्रमशस्त्वेते' म्हणजे हे सर्व आश्रम क्रमाक्रमानें स्वीकारले पाहिजेत असें ह्मणून ( ३, ८८ ), अवेळीं संन्यास घेणारा पतन पावतो असें त्यानें सांगितलें आहे ( ऋणानि त्रीण्यपाकृत्य मनो मोक्षे निवेशयेत् । अनपाकृत्य मोक्षं तु व्रजमानः पतत्यधः । ३, ३५ ). याज्ञवल्क्य हा विकल्पवादी होता. त्यानें ( ३, ५६–५७ ) जाबालोपनिषदाचा अनुवाद करून 'वनाद् गृहाद् वा कृत्वेष्टिं सार्ववेदसदक्षिणाम् ।...शक्त्या च यज्ञकृन्मोक्षे मनः कुर्यात्तु नान्यथा' असें सांगितलें आहे. हेंच मत वसिष्ठाचें होतें ( ७. ३ ). गौतम हा बाधवादी होता हें पूर्वी सांगितलेंच आहे.

वेदान्तसूत्राच्या तिसऱ्या अध्यायांतही आश्रम कर्मांचा विचार केलेला आहे ( ३, ४, ३२–६५ ); 'विहितत्वाच्चाश्रमकर्मापि' व 'सहकारित्वेन च' या सूत्रांत श्रुतीनें आश्रमकर्में विहित ह्मणून सांगितलीं असल्यामुळें ज्ञानोत्पत्तीला सहायक होत व म्हणून तीं करावी असा निष्कर्ष काढिला आहे.

# चार आश्रमांचें संक्षिप्त वर्णन

धर्मसूत्रांपासून पुढें आश्रम शब्द सरळपणें योजिलेला आढळतो. ' ब्रह्मचारी गृहस्थो भिक्षुर्वैखानसः ।' ( गौ. ध. सू. ३. २ ); चत्वार आश्रमा गार्हस्थ्यमाचार्यकुलं मौनं वानप्रस्थ्यमिति' ( आप. ध. सू. २, ९, २१. १ ), ' चत्वार आश्रमाः । ब्रह्मचारिगृहस्थवानप्रस्थपरिव्राजकाः । ' ( वसिष्ठ ध. सू. ७, १-२ ), असें स्पष्ट शब्द त्यांत आहेत. ब्रह्मचारी दोन प्रकारचा असतो, उपकुर्वाणक आणि नैष्ठिक. अवश्य तें वेदाध्ययन म्हणजे एक, दोन तीन किंवा चार वेदांचें अध्ययन बारा, चौवीस, छत्तीस किंवा अठ्ठेचाळीस वर्षे करून मग गृहस्थाश्रम स्वीकारणारा तो इतरांना उपकारक म्हणून उपकुर्वाण ब्रह्मचारी आणि शेवटपर्यंत अध्ययन करीत रहाणारा तो नैष्ठिक. या आश्रमातील कर्तव्यें, अध्ययन, उदकुम्भहरण, एध ( जळण ), समिदाधान ( अग्नीला समिध् देणें ), आचार्यरक्षण, तप, भिक्षाचर्य, अभिवादन, उपसंग्रहण, गुरुशुश्रूषा, वेदाध्ययन, व्रतसमापन अशीं क्रमानें असून तीं दक्षस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति ( १, १६-३२ ), गौतमधर्मसूत्र ( २३, १७-१९ ), आपस्तंब धर्मसूत्र (१, १,३१ ११ ते १, २, ७, ३० )इत्यादि अनेक ठिकाणीं सांगितलीं आहेत.

गृहस्थाश्रम सर्वांना ठाऊकच आहे. दक्षस्मृतींत त्याची थोरवी मोठी सांगितली आहे. दक्ष म्हणतो ' गृहाश्रमात्परं नास्ति यदि भार्या वशानुगा । तया धर्मार्थकामानां त्रिवर्गफलमश्नुते । ' ( अ. ४ ) पत्नी अनुकूल असली तर गृहस्थाश्रमाहून मोठें कांहींच नाहीं. सर्व इतर आश्रम गृहस्थावर अवलंबून असल्यामुळें गृहस्थाश्रम श्रेष्ठ असें गौतम म्हणतो ( ४, ९ ). आपस्तंब, वसिष्ठ, मनु इत्यादींनींहि असेंच वर्णन केलें आहे. ' सर्वेषामपि चैतेषां वेदस्मृतिविधानतः । गृहस्थ उच्यते श्रेष्ठः स त्रीनेतान्बिभर्ति हि ।। यथा नदीनदाः सर्वे सागरे यान्ति संस्थितिम । तथैवाश्रमिणः सर्वे गृहस्थे यान्ति संस्थितिम । मनु ६, ८८-८९'. गृहस्थ दोन प्रकारचा असतो, शालीन आणि यायावर. शालीन म्हणजे शाळेंत अर्थात् घरात रहाणारा. शालीन म्हणजे नम्र अथवा मर्यादशील हा अर्थ पुढें आला. यायावर म्हणजे फिरत रहाणारा. या दोहोंमध्यें यायावर श्रेष्ठ असें सांगितलें आहे ( मिताक्षरा या. स्मृ. १, १२८ वरील ' यायावरः श्रेष्ठः याजनाध्यापनप्रतिग्रहरिक्थसंचयवर्जनात्' ); कारण तो याजन, अध्यापन, प्रतिग्रह, वडिलोपार्जित धन, द्रव्यसंचय या वृत्तींचा त्याग करतो. यजन याजनादि सहाहि कर्मे करणारा, नोकरचाकर, पशु, घरदार,द्रव्यसंचय, धान्यसंग्रह इत्यादि करून लोकांशीं नीटपणें रहाणारा तो शालीन होय. यायावर शिलोञ्छ वृत्तीनें रहातो म्हणजे धनधान्याचा केव्हांहि संग्रह न करतां शेत कापून नेल्यावर त्यांत पडलेले दाणे वेंचून त्यांवर निर्वाह करतो. ब्राह्मण गृहस्थानें संग्रह फार करूं नये व ज्या ज्या मानानें संग्रह कमी त्या त्या मानानें तो श्रेष्ठ असें याज्ञवल्क्य म्हणतो ( कुशूलकुंभीधान्यो वा त्र्याहिकोऽश्वस्तनोऽपि वा । जीवेद्वापि शिलोञ्छेन श्रेयानेषां परः परः । १, १२८ ).

पण अशा वृत्तीचा गृहस्थ मिळणें कठीण आहे. शालीनांतही आणखी चार पायऱ्या सांगितल्या आहेत. याजन, अध्यापन, प्रतिग्रह, कृषि, वाणिज्य व पाशुपाल्य या सहा वृत्तीनें रहाणारा तो कनिष्ठ ( षड्भिर्जीवत्येकः ). याजन, अध्यापन व प्रतिग्रह या तिहींवरच रहाणारा तो त्याहून वरचा, याजन व अध्यापन एवढींच करणारा तो त्याहून श्रेष्ठ आणि केवळ अध्यापनानेंच वृत्ति करणारा तो सर्वांत श्रेष्ठ. चंडेश्वराच्या ( १४ वें शतक ) गृहस्थरत्नाकरांत गृहस्थाचीं कर्में विस्तारानें दिलीं आहेत. त्यांत ब्राह्म मुहूर्तावर म्हणजे पहाटेस उजाडण्यापूर्वी अर्धा प्रहर उठून आत्महिताचें ध्यान करावें असा आरंभ करून शौच, दंतधावन, स्नान, देवपितृतर्पण, प्रातःसंध्या, देवपूजा, जपयज्ञ, पंचमहायज्ञ, भोजन, सायंसंध्या, अग्निहोत्र, भोजन व निद्रा अशीं मुख्य कर्में सांगितलीं आहेत. यांतील शौच, दंतधावन, स्नान, भोजन व निद्रा हीं आपण सर्व बहुधा करतोंच. या शिवाय एखाद्या जवळ तीन वर्षे पुरेल इतकें धान्य असेल, तर त्यानें सोमयाग करावा असेंहि सांगितलें आहे. असें करतांना योगक्षेमाची अडचण पडलीच तर श्रीमंतांकडे किंवा राजाकडे जावें असें म्हटलें आहे ( योगक्षेमार्थमीश्वरगमनम् ).

वानप्रस्थ म्हणजे वनं प्रतिष्ठते ( वनांत रहाण्यासाठीं जावयास निघतो ) किंवा वने प्रकर्षेण तिष्ठति (वनांतच सर्वथैव रहातो तो). वानप्रस्थानें काय करावें या विषयीं मुंडकोपनिषद् म्हणतें ' तपःश्रद्धे ये ह्युपवसन्त्यरण्ये शांता विद्वांसो भैक्षचर्यां चरन्तः । सूर्यद्वारेण ते विरजाः प्रयान्ति यत्रामृतः स पुरुषो ह्यव्ययात्मा । ' ( १ २, ११ ). शान्त व ज्ञानी पुरुष भिक्षा मागून व रानांत राहून तप करतात, ते सूर्य मार्गानें ब्रह्मलोकाप्रत जातात. यांत तपः शब्दावरून वानप्रस्थाचा बोध होतो. तथापि यांत विशेष संबंध देवयानमार्गाचाच आहे. ज्ञानी पुरुष देवयान मार्गानें जातात व ते या लोकीं परत येत नाहींत, पण कर्मनिष्ट पितृयाण मार्गानें पितृलोकास जाऊन कर्मफल संपलें म्हणजे या लोकीं परत येतात. देवयान व पितृयाण किंवा उत्तरायण व दक्षिणायन यांचें वर्णन गीतेंत ( अ. ८, २४–२५ ) दिलें आहे. वानप्रस्थाचें वर्णन मनु ( ६, १– ३२ ), याज्ञवल्क्य ( ३, ४५–५५ ), महाभारत शांतिपर्व (९, ४—११), आपस्तंब [२, ९, २१, १८ते २.९.२३. २), (वसिष्ठ ९, १–११), स्कन्दपुराण ( काशीखण्ड पूर्वार्ध अध्याय ४१. १—१३ ) इत्यादि ठिकाणीं केलेलें आहे. पण हा वानप्रस्थाश्रम आतां लुप्त झाला आहे. संन्यास बाह्यरूपानें तरी सांप्रत कोठें कोठें पहावयास मिळतो, पण वानप्रस्थ मुळींच दिसत नाहीं. या कारणास्तव कोणी वानप्रस्थाचा संन्यासाच्या मागून उल्लेख करतात

गृहस्थ होऊन पुत्रप्राप्ति झाल्यानंतर पन्नास वर्षे वयाला झालीं व पुत्र कर्ता झाला, पुत्राला पुत्र झाला म्हणजे वानप्रस्थाश्रम घ्यावा. वनांत जातांना स्त्रीला पुत्राच्या स्वाधीन करावें किंवा ती म्हणेल तर तिला आपल्याबरोबर घेऊन जावें. याज्ञवल्क्य

म्हणतो, ' सुतविन्यस्तपत्नीकः तया वा ऽनुगतो वनम्। वानप्रस्थो ब्रह्मचारी साग्निः सोपासनो व्रजेत्।' (३, ४५). महाभारतांत धृतराष्ट्र गांधारीला घेऊन वनांत गेला असें सांगितलें आहे (आश्रमवासिपर्व, १९). श्रीकृष्ण निजधामीं गेल्यावर त्याच्या स्त्रियांपैकीं रुक्मिणी आदिकरून कांहींनीं सहगमन केलें, पण सत्यभामा आणि दुसऱ्या कित्येक जणी वानप्रस्थ झाल्या, अशी कथा महाभारताच्या मौसलपर्वांत आहे (सत्यभामा तथैवान्या देव्यः कृष्णस्य संमताः। वनं प्रविविशू राजंस्तापस्ये कृतनिश्चयाः। ७, ७४). यावरून स्त्रियानाहि स्वतंत्रपणें वानप्रस्थ होतां येत होतें असें दिसून येतें. वानप्रस्थानें कसें रहावें याविषयीं अनेक गोष्टी सांगितल्या आहेत. न नांगरलेल्या जमिनींत जें धान्य पिकेल तें घेऊन त्यावर अग्निसंतर्पण, पितृश्राद्धादि, अतिथिपूजन, चाकरनोकरांना अन्नदान, इत्यादि करावें. फारसा संचय करूं नये. संचय केलाच तर अश्विन महिन्यात नवें धान्य झालें म्हणजे तो सर्व देऊन टाकावा. इंद्रियदमन करावें, तीन वेळा स्नान करावें, प्रतिग्रह घेऊं नये, वेदाध्ययनात मग्न असावें, सर्वांचें हित करावें. उखळ, पाटावरवंटा इत्यादिकांचा उपयोग न करता दातांनीं खाता येतील तेवढींच फळें खावीं, धान्यहि दगडांवर कुटून खावें, अवश्य तर भिक्षा मागून आणलेल्या अन्नातील सोळा घांस खावे. * संन्याशाला आठच घांस सांगितले असून वानप्रस्थाला सोळा व गृहस्थाला बत्तीस घास सांगितले आहेत. × ब्रह्मचाऱ्यानें मात्र वाटेल तितकें खावें, कारण त्याला शारीरश्रम पुष्कळ करावयाचे असतात (अपरिमितं ब्रह्मचारिणः). असो. वानप्रस्थानें जमिनीवर निजावें, दिवसा बसूं नये, फिरत रहावें, बसलाच तर ईश्वराचें ध्यान करीत बसावें. याविषयीं याज्ञवल्क्य स्मृतींत श्लोक आहेत ते असेः—

अफालकृष्टेनाग्नींश्च पितॄन्देवातिथीनपि।
भृत्यांश्च तर्पयेत् श्मश्रुजटालोमभृदात्मवान्॥ ४६॥
अह्नो मासस्य षण्णां वा तथा संवत्सरस्य वा।
अर्थस्य संचयं कुर्यात्कृतमाश्वयुजे त्यजेत्॥ ४७॥
दान्तस्त्रिषवणस्नायी निवृत्तश्च प्रतिग्रहात्।
स्वाध्यायवान्दानशीलः सर्वसत्त्वहिते रतः॥ ४८॥
दन्तोलूखलिकः कालपक्काशो वाश्मकुट्टकः॥ ४९॥
स्वप्याद्भूमौ शुची रात्रौ दिवा संप्रपदैर्नयेत्।
स्थानासनविहारैर्वा योगाभ्यासेन वा तथा॥ ५०॥ इ०

याज्ञवल्क्यानें आठच घास सांगितले आहेत (ग्रामादाहृत्य वा ग्रासानष्टौ भुंजीत वाग्यतः। ३,५५).

× अष्टौ ग्रासा मुनेर्भक्ष्या षोडशारण्यवासिनः। द्वात्रिंशतं गृहस्थस्यापरिमितं ब्रह्मचारिणः॥ वसिष्ठ ६. २० व बौधायनधर्मसूत्र २. ७. २२.

चवथा आश्रम संन्यास. यांत पुष्कळ प्रकार आहेत. कुटीचर किंवा कुटीचक म्हणजे झोपडें बांधून त्यांत रहाणारा; बहूदक म्हणजे पुष्कळांकडून आणून खाणारा; हंस आणि परमहंस. यांचीं लक्षणें व धर्म मनुस्मृति [ ६, ३३-९७ ], याज्ञवल्क्यस्मृति [ ३ ५६-६६ ], दक्ष (७, २८), वसिष्ठ [ १० ], आपस्तंबधर्मसूत्र [ ९, २१, ७-२० ], वैखानसधर्मप्रश्न ( १. ९) इत्यादि ठिकाणीं वर्णिले आहेत. नैष्ठिक ब्रह्मचर्य किंवा संन्यास हा पंगु, काण, अंध अशांसाठींच आहे असा एक पक्ष पूर्वी सांगितला, पण तो शंकराचार्य, मिताक्षराकार, इत्यादिकांना संमत नाहीं. कुटीचकादि संन्यासभेद वृद्धपराशर, स्कंदपुराण इत्यादि ग्रंथांत सांगितले आहेत. वृद्धपराशर म्हणतो, कुटीचक म्हणजे पुत्रादिकांकडून झोपडी बांधवून, षड्विकारांचा त्याग करून, विधिपूर्वक संन्यास घेऊन, तीन दंड, भगवी वस्त्रें इत्यादि धारण करून शुचिर्भूतपणें जप, वेदाध्ययन, ईश्वरध्यान करीत पुत्रांकडून केवळ निर्वाहापुरतें अन्न प्रत्यहीं मागून, त्याच झोपडींत जो नित्य रहातो, तो ‘ कुटीचका नाम पुत्रादिभिः कुटीं कारयित्वा... विधिवत्संन्यासं गृहीत्वा त्रिदंडजलपवित्रकाषायवस्त्रधारिणः........पुत्रादेव भिक्षाकाले अन्नं यात्रामात्रमुपभुञ्जानाः तस्यामेव कुट्यां नित्यं वसन्तः आत्मानं मोक्षयन्ति ।. बहूदक हे कुटीचकाप्रमाणें इतर बाबतींत राहून अन्न मात्र चांगल्या वृत्तीच्या ब्राह्मणांच्या घरांतून भिक्षा मागून आणितात. ‘ तत्र बहूदका नाम त्रिदंडकमण्डलुकाषायधातु-वस्त्रग्रहणवेषधारिणः साधुवृत्तेषु मधुमांसलवणपर्युषितान्नं वर्जयन्तः सप्तागारेषु... भैक्षं कृत्वा मोक्षमेव प्रार्थयन्ते ’ ( वैखानसधर्मप्रश्न ). स्कंदपुराणांत बहूदक हे सातच घरें भिक्षा मागतात व यज्ञोपवीतहि धारण करतात असें म्हटलें आहे. कोणी सात घरांच्या जागीं तीन किंवा पांचहि घरें सांगतात. संन्याशाच्या भिक्षेसंबंधानें मनूनें तर मौज केली आहे. तो म्हणतो ‘ विधूमे सन्नमुसले व्यङ्गारे भुक्तवज्जने । वृत्ते शरावसंपाते भिक्षां नित्यं यतिश्चरेत् ।। ( ६. ५६ ). घरांतून विस्तव विझवून टाकल्यामुळें धूर येत नाहींसा झाला, दळणकांडण संपून मुसळें जाग्यावर गेलीं, सगळ्या माणसांचीं जेवणें उरकून गेलीं, उष्टीं काढून सामसूम झालें म्हणजे मग यतीनें भिक्षा मागावयास बाहेर पडावें ! अशा वेळीं त्याला भिक्षान्न कितीसें मिळणार ? पण त्यावरच त्यानें निर्वाह केला पाहिजे. असा हा संन्यास मोठा कठीण आहे.

हंसाचें स्कंदपुराणांत ‘ हंसः कमण्डलुं शिक्यं भिक्षापात्रं तथैव च । कंथाकौपीन-माच्छाद्यमङ्गवस्त्रं बहिःपटम् ।। एकं तु वैणवं दण्डं धारयेन्नित्यमादरात् । देवतानाम-भेदेन कुर्याद् ध्यानं समर्चयेत् ।।” पहिल्या दोन प्रकारांत त्रिदंड होते, तर हंसाला एकच वेणुदंड सांगितला. वस्त्रें मात्र हंसाला बरींच दिलीं आहेत. वैखानसधर्मप्रश्नांत

गोमयाहारिणो मासोपवासिनो वा नित्यं चान्द्रायणव्रातिनो नित्यमुत्थानमेव प्रार्थयन्ते ।'. परमहंसानें शरीर झांकण्याला कौपीन (लंगोटी) व थंडीच्या निवारणार्थ कंथा (गोधडी), रुद्राक्षांची माळ व एकच वांबूचा दंड घ्यावा, व एकदांच मधुकरीचें अन्न खावें; तसेंच त्यानें त्रिदंड, शिखा, यज्ञोपवीत व नित्यकर्म यांचा त्याग करावा. अशी परमहंसाची वृत्ति स्कंदपुराणात दिली आहे. 'परमहंसा नाम वृक्षैकमूले शून्यागारे स्मशाने वा वासिनः साम्बरा दिगम्बरा वा' वैखानसधर्मप्रश्न १.९.५. परमहंसाचें स्वरूप असें असतां आपण आज कोणत्याहि संन्याशाला सर्वतंत्रस्वतंत्र, परमहंस परिव्राजकाचार्य अशा पदव्या मायन्यांत लिहून देत असतों. मायन्यांत ज्या पदव्या सांगितल्या आहेत, त्याना फारच थोडे पीठस्थ आचार्य पात्र असतात. अशा रीतीचीं माणसें आचार्यपीठावर येत असल्यामुळें प्रसंगीं त्यांची हास्यास्पद स्थिति होते हें बऱ्याच जणांना माहिती असेल.

हा संन्यास वसिष्ठानें राजपत्न्यांना सांगितला आहे ( १९, ३३–३४ ). राजांना पुष्कळ स्त्रिया असत. राजाच्या मरणानंतर त्यांचा अन्न व वस्त्र यांशिवाय कशावरहि अधिकार नसावयाचा. तेव्हां तेवढयावर ज्यांचा संतोष नसेल त्यांनीं संन्यास घ्यावा. वसिष्ठ म्हणतो ' राजपत्न्यो ग्रासाच्छादनं लभेरन् । अनिच्छन्त्यो वा प्रव्रजेरन् ' ॥.

एकदां संन्यासाश्रम स्वीकारल्यावर त्याचा त्याग केल्यास तसें करणारा दास होतो, असा माणूस ब्राह्मण असेल तर त्याला राजानें हाकून द्यावा पण तो क्षत्रिय किंवा वैश्य असेल तर त्याला दास करावें. याज्ञवल्क्य म्हणतो, ' प्रव्रज्यावासितो राज्ञो दास आमरणान्तिकम् । ' [ २, १८३ ]. कात्यायन म्हणतो ' प्रव्रज्याऽवासिता यत्र त्रयो वर्णा द्विजातयः । निर्वासं कारयेद् विप्रं दासत्वं क्षत्रिये भृगुः ' ।. यांतील क्षत्रिय शब्द उपलक्षण समजून त्यावरून वैश्य व शूद्र यांचाहि त्यांत अंतर्भाव केला पाहिजे असें व्यवहारमयूखांत नीलकंठानें म्हटलें आहे. दक्षानें म्हटलें आहे कीं, संन्यास घेतल्यावर जो कोणी त्याप्रमाणें वागणार नाहीं त्याच्या अंगावर कुत्र्याच्या पायाचें चिन्ह उमटवून राजानें त्याला तत्काल हद्दपार करावें. परिव्रज्यां गृहीत्वा तु यः स्वधर्मे न तिष्ठति । श्वपदेनांकयित्वा तु राजा शीघ्रं प्रवासयेत् । ( ७, ३३ ). ज्ञानेश्वरांचे वडील संन्यास घेऊन पुनः गृहस्थ झाले, त्यावेळीं त्यांच्यावर तत्कालीन ब्राह्मणांनीं जें काहूर केलें, तें शास्त्रात सांगितल्या प्रमाणें योग्यच होतें, असें म्हणावें लागतें.

## संन्यासाला महत्त्व कां आलें ?

ज्याला ऐहिक किंवा पारलौकिक असें कांहीं मिळवावयाचें नाहीं असा मनुष्यच वस्तुतः संन्यासी होणार व जगाचें कल्याण चिन्तणारा व ' वसुधैव कुटुंबकम् ' अशी त्याची स्थिति असल्यामुळें प्रत्येकाला तो ज्ञानोपदेशाच्या

द्वारा सन्मार्गाला लावणारा होणार अशा बुद्धीनें संन्याशाला महत्त्व प्राप्त झालें. तप, ज्ञान इत्यादिकांमुळेंच ब्राह्मण श्रेष्ठ होतो, तीं नसतील तर त्याला ब्राह्मणब्रुव ह्मणजे नामधारी ब्राह्मण ह्मणतात (तपःश्रुताभ्यां यो हीनो जातिब्राह्मण एव सः । ').
किंवा ' गर्भाधानादिभिर्युक्तस्तथोपनयनेन च । न कर्मकृन्न चाधीते स भवेद् ब्राह्मण-ब्रुवः ॥'. त्याप्रमाणें खरा संन्यासी म्हणजे ब्रह्मवेत्ता असला पाहिजे व तो सर्वांत श्रेष्ठ होय असें मनूनें ' भूतानां प्राणिनः श्रेष्ठा......कृतबुद्धिषु कर्तारः कर्तृषु ब्रह्मवेदिनः ॥ ' ( १, ९६–९७ ) यांत सांगितलें आहे. ज्ञान्यामध्यें क्रियापर श्रेष्ठ व त्यांतहि अध्यात्मज्ञानी श्रेष्ठ होत. असें असल्यामुळें या सर्व श्रेष्ठपणाच्या लक्षणांनीं युक्त अशा संन्यासाश्रमाला महत्त्व देण्यांत आलें हें ठीकच आहे. त्रिदंडी संन्यासी कोणाला म्हणावें हें सांगतांना दक्ष म्हणतो, ' वैणवेन त्रिदंडेन न त्रिदंडीति कथ्यते । अध्यात्मदंडयुक्तो यः स त्रिदंडीति कथ्यते । ' बांबूच्या दंडानीं संन्यासी त्रिदंडी होत नाहीं, तर अध्यात्मदंडानेंच तो तसा होतो. हे तीन अध्यात्म दंड म्हणजे ' वाग्दंडोऽथ मनोदंडः कर्मदंडश्च ते त्रयाः । ' वाग्दंड, मनोदंड व कर्मदंड होत. हे दंड ज्यापाशीं आहेत, तोच खरा त्रिदंडी होय ( यस्यैते तु त्रयो दंडाः स त्रिदंडीति कथ्यते ॥ दक्ष ७, २९–३० ).

## संन्यास कोणी घ्यावा ?

संन्यास घेण्याला अधिकारी कोण या प्रश्नाविषयीं अनेक मतें प्रतिपादिलेलीं आहेत. ' परीक्ष्य लोकान्कर्मचितानब्राह्मणो निर्वेदमायात् ' या मुंडकश्रुतींत ( १, २, १२ ) ब्राह्मण शब्द आहे. बृहदारण्यकांत ' एतं वैवमात्मानं विदित्वा ब्राह्मणाः पुत्रैषणायाश्च......व्युत्थाय भिक्षाचर्यं चरन्ति । ' ( ३, ५, १ ) या वचनांत ब्राह्मण शब्दच आहे. हा ब्राह्मण शब्द उपलक्षण समजून कित्येक जण त्यांत सर्व द्विजाचा म्हणजे क्षत्रियवैश्याचाहि अंतर्भाव करतात. पण शंकराचार्यांनीं संन्यासाचा अधिकार ब्राह्मणालाच आहे असें ठरविलें आहे ( ब्राह्मणानामेवाधिकारो व्युत्थाने ). पण त्यांचे शिष्य जे सुरेश्वराचार्य त्यांचें मत उलट आहे. ते म्हणतात, ' त्रयाणां अविशेषेण संन्यासः श्रूयते श्रुतौ । यदोपलक्षणार्थं स्याद् ब्राह्मणग्रहणं तदा ॥ ( बृ. उ. भाष्यवार्तिक पान १२५४ ). सुरेश्वराचार्य हेच पूर्वीचे विश्वरूप नांवाचे याज्ञवल्क्यावरील टीकाकार होत. त्या टीकेंत ब्राह्मणांनींच संन्यास घ्यावा असें त्यांनीं म्हटलें आहे. * पण पुढें त्यांचें मत बदललें व शंकराचार्य हे त्यांचे गुरु असतांहि प्रथम गुरूचा अभिप्राय सांगितल्यावर त्यांच्याविरुद्ध आपलें मत स्पष्ट सांगण्यास ते कचरले नाहींत. मिताक्षराकार ब्राह्मणांनाच हा अधिकार देतात व मनूचीं वचनें देऊन त्याचें समर्थन करतात. त्यांचें म्हणणें

---

* द्विजग्रहणं ब्राह्मणार्थं तेषामेव संन्यासोपदेशात् । याज्ञ. ( ३, ६१ ) ' भयं हित्वा च भूतानां अमृतीभवति द्विजः ।' या श्लोकावरील टीका.

असें कीं ' आत्मन्यग्नीन्समारोप्य ब्राह्मणः प्रव्रजेत् गृहात् । ' ( ६, ३८ ) असा उपक्रम करून ' एष वोऽभिहितो धर्मो ब्राह्मणस्य चतुर्विधः । ' ( ६, ९७ ) असा त्या ब्राह्मण धर्माच्या विषयाचा उपसंहार केलेला असल्यामुळें मनु ब्राह्मणालाच हा अधिकार देतो इतरांना देत नाहीं. यमस्मृतींत ' द्वितीयमायुषो भागमुषित्वा तु गृहे द्विजः । तृतीयमायुषो भागं गृहमेधी वने वसेत् ।' असें म्हणून द्विज शब्दच योजिला आहे, त्यावरून त्याचें मत सर्व त्रैवर्णिकांना वानप्रस्थाचा व संन्यासाचा अधिकार आहे असें दिसतें. महाभारतांत युधिष्ठिर वानप्रस्थ व सन्यासी होऊं पहात होता, तेव्हां त्याला तसा क्षत्रियाला अधिकार नाहीं असें कोणी सांगितलेलें नाहीं ( शां. प. ९, १२–१३ अथ वैकोहमेकाहमेकैकस्मिन्वनस्पतौ । चरन् भिक्षां मुनिर्मुण्डः क्षपयिष्ये कलेवरम् ।। पांसुना समभिच्छन्नः शून्यागारप्रतिश्रयः । वृक्ष मूलनिकेतो वा त्यक्तसर्वप्रियाप्रियाः।।).कालिदासानें रघुवंशांत सूर्यवंशाचें सामान्य वर्णन करतांना ' वार्धके मुनिवृत्तीनां योगेनान्ते तनुज्यजाम् ' अशीं विशेषणें त्यातील राजांना लाविलीं आहेत व त्याची पुढें उदाहरणें देऊन रघूचा यतिपणा तर सविस्तर वर्णिला आहे. रघु गांवाबाहेर आवसा ( आवसथ ) घालून त्यांत राहिला, व मुनिवृत्तीनें वागून स्थितप्रज्ञ होत्साता परमात्मदर्शन करून घेता झाला असें रघुवंशाच्या आठव्या सर्गांत ( श्लोक १४-२५ ) सविस्तर वर्णन आहे. महाभारतांत ( शां. प. ६१, १२–१४ ) तर शूद्रालाही सर्व आश्रमांचा अधिकार सांगितला आहे. ( अभ्यनुज्ञातराजस्य शूद्रस्य जगतीपते । ... ... आश्रमाः विहिताः सर्वे वर्जयित्वा निराशिषम् । ). योगियाज्ञवल्क्यानें ब्राह्मणाला चार आश्रम, क्षत्रियाला तीन ( वानप्रस्थापर्यंत ), वैश्याला दोन [ ब्रह्मचर्य व गार्हस्थ्य ] आणि शूद्राला एकच आश्रम (गृहस्थाश्रम) असे सांगितले आहेत (१, २८) व वामन पुराणांत (१४, ११७-११८) तोच अभिप्राय व्यक्त केलेला आहे. वैखानसधर्मप्रश्नांतही तसेंच म्हटलें आहे ब्राह्मणानां चातुराश्रम्यं क्षत्रियाणां त्र्याश्रम्यं वैश्याना द्व्याश्रम्यं विहितम् । १, ९, ८). वामनपुराणांत वैश्याला दोन आश्रम म्हणजे गार्हस्थ्य व वानप्रस्थ हे सांगितले आहेत. पराशरस्मृतीवरील [ १, २ ] माधवाच्या टीकेंत ब्राह्मणालाच संन्यासाचा अधिकार आहे असा कांहींचा अभिप्राय सांगून दुसरेंहि मत दिलें आहे. हा माधव विजयानगरच्या बुक्क राजाचा मंत्री होता व सायण, माधव, इत्यादि सर्व त्यांचींच नावें होत असेंही कांही जण म्हणतात. या माधवाचार्यांचा ६०० वर्षांचा उत्सव पुढील वर्षी मद्रास इलाख्यांत होणार आहे. पण त्या प्रसंगीं असल्या प्रश्नांची चिकित्सा होईल कीं नाहीं याचा वानवाच आहे.

संन्याशानें यज्ञोपवीत तोडावें असें शंकराचार्य म्हणतात व त्याला जाबालोपनिषदांत [ ६, ' त्रिदण्डं कमण्डलुं शिक्यं पात्रं जलपवित्रं शिखां यज्ञोपवीतं चेत्येत-

त्सर्वे भूः स्वाहेत्यप्सु परित्यज्यात्मानमन्विच्छेत् ] आधार आहे. पण त्यांचे शिष्य सुरेश्वराचार्य यांचें म्हणणें असें कीं परमहंस यतीनें मात्र सूत्रत्याग करावा, हंसांनीं करूं नये. पण प्रस्तुत काळीं सर्वच संन्यासी यज्ञोपवीत टाकून देतात. संन्याशाला कोणताच निर्बंध नाहीं, असाहि आज समज आहे. पण पूर्वी तशी कल्पना नव्हती. केवळ बाह्य चिन्ह हें धर्माचें लक्षण नसून कृतिच धर्माचें साधन होय (न लिंगं धर्मकारणम्) असें मनु व याज्ञवल्क्य सांगतात. मनु म्हणतो 'दूषितोऽपि चरेद्धर्मं यत्र तत्राश्रमे रतः। समः सर्वेषु भूतेषु न लिंगं धर्मकारणम्।' (६, ६६). याज्ञवल्क्यानें म्हटलें आहे, 'नाश्रमः कारणं धर्मे क्रियमाणो भवेद्धि सः। अतो यदात्मनोऽपथ्यं परस्य न तदाचरेत्।' [ ३, ६५ ]. सत्य, अस्तेय, अक्रोध, ह्री, शौच इत्यादि धर्म सर्वांनाच लागू आहेत ( या. ३, ६६ व मनु ६. ९१–९२ ). यास्तव संन्यासी जर वाटेल तसे वागतील तर ते व कुत्रे यांत भेद तो काय असा स्पष्ट प्रश्न एका श्लोकांत विचारिला आहे (बुद्धाद्वैतसतत्त्वस्य यथेष्टाचरणं यदि। शुना तत्त्वदृशां चैव को भेदो ऽशुचिभक्षणे॥). यास्तव परमहंस झाला तरी त्यानें वाटेल तसें वागणें इष्ट नाहीं ( अतः परमहंसानामपि न कामचार इत्यभिप्रायः ).शांतिपर्वांतील एका कथेंत भीमानें संन्यासाची टवाळी करून कर्मच केलें पाहिजे असें युधिष्ठिराला सांगितलें व म्हटलें कीं, केवळ संन्यासानेंच जर कोणी सिद्धि मिळवूं पाहील, तर पर्वत व वृक्ष यानाहि ती का मिळूं नये? 'यदि संन्यासतः सिद्धिं राजा कश्चिदवाप्नुयात्। पर्वताश्च द्रुमाश्चैव नित्यं सिद्धिमवाप्नुयुः॥ २४॥ तस्मात्कर्मैव कर्तव्यं नास्ति सिद्धिरकर्मणः॥ २६ (१०). काही ठिकाणीं संन्यासाचा कलिवर्ज्य प्रकरणात अन्तर्भाव केला आहे. उदाहरणार्थ, 'संन्यासं पलपैतृकम्,' तथापि संन्यास घेण्याची पद्धत सारखी चालूच आहे. यावरून सनातनी म्हणविणाऱ्या लोकाना मान्य असलेल्या ग्रंथाविरुद्धहि आचार कसे चालू होतात व सनातनीहि पाळतात तें दिसून येईल. कलीचीं ४४०० वर्षे झाल्यानंतर संन्यास कोणी घेऊं नये असेंहि सांगितलें आहे. * हेंच वर्ष देण्याचें कारण बहुधा त्यावेळीं अलावदीन खिलजी व मलिक काफर सारखे मुसलमानी बादशहा व सेनापति त्रास देऊं लागल्यामुळें असें सांगितलें असावें.

## उपसंहार.

या प्रमाणें चारी आश्रमांचा परामर्श घेतल्यावर आतां आजच्या स्थितींत आपण काय करावें याचा थोडा विचार करूं. पहिला जो ब्रह्मचर्याश्रम त्याचें सांप्रत सोंग उरलें

---

* चत्वार्यब्दसहस्राणि चत्वार्यब्दशतानि च। कलेर्यदा गमिष्यन्ति तदा त्रेतापरिग्रहः॥ संन्यासश्च न कर्तव्यो ब्राह्मणेन विजानता। हें वचन व्यासाच्या संन्यासपद्धतींत आहे असें नागोजिभट 'व्रात्यताप्रायश्चित्तनिर्णय' या आपल्या ग्रंथांत म्हणतात.

आहे. सध्याहि ब्रह्मकर्मे शिकविण्यासाठीं मोफत वर्ग काढिला तरीहि त्यांत फार कोणी आपलीं मुलें पाठवीत नाहींत. काळ बदलल्यामुळें असें होणें स्वाभाविक आहे. ब्रह्मचर्य हा आश्रम म्हणून आतां राहिला नाहीं. तरी त्याला अनुलक्षून सांगितलेली शिस्त मात्र पाळणें आजहि शक्य आहे व ती पाळावी. गृहस्थाश्रम आजहि बराच चालू आहे. त्याचें श्रेष्ठत्व मन्वादिकांनीं ठसठशीतपणें सांगितलें आहेच. तेव्हां खोट्या संन्यास धर्माचा बडेजाव व गृहस्थाश्रमाची निंदा करणें हें योग्य होणार नाहीं. तिसरा वानप्रस्थाश्रम आतां लुप्त झाला असल्यामुळें त्याचा विचार करण्याचें कारण नाहीं. उरला जो संन्यासाश्रम त्यांतील कल्पना चांगली असल्यामुळें ती व्यवहारात आणावयाचा प्रयत्न केला पाहिजे. आज सरकारी नोकरींतून निवृत्त झालेल्या लोकांनीं किंवा इतर व्यवसाय करून सुस्थिति प्राप्त झालेल्या वृद्धांनीं संन्यास घ्यावा. म्हणजे त्यांनीं भगवीं वस्त्रें धारण करावीं असें नव्हे, तर स्वतःच्या कुटुंबाचीच सदासर्वदा काळजी करीत न बसतां कांहीं लोककल्याणाचें कार्य हातीं घ्यावें, स्वार्थ थोडा कमी करीत न्यावा व परमार्थाकडे अधिकाधिक वळावें. अर्थात् या गोष्टी लहानपणापासून थोडी बहुत संवय असेल तरच प्रायः हातून घडतील,एरवीं नाहींत. पण शक्य तो प्रयत्न व्हावा. स्वार्थ हा सर्वांनाच आहे. गाय देखील आपल्या वासराला चाटते. तेव्हां तो कमी कमी करीत निरक्षर अल्पज्ञानी यांच्या शिक्षणासारख्या कामाकडे सेवानिवृत्तांनीं व इतर सुस्थिति प्राप्त झालेल्या लोकांनीं लक्ष दिलें तर कितीतरी कार्य होऊं शकेल. आपल्या कुटुंबाव्यतिरिक्त असलेल्या व्यक्तींचे दुःखाचा परिहार करणें, त्यांना मदत करणें, त्याच्याशीं सहानुभूति व प्रेम दाखविणें यांतच मनुष्यांतील ईश्वरांश प्रकट होत असतो. अशा प्रकारचें नवें स्वरूप जुन्या संन्यासाला आज देतां येण्यासारखें आहे. तसें झाल्यास केवळ पोषाखावरून साधु संन्यासी होणाऱ्यांचा जो बडेजाव निष्कारण फार होतो आहे तो नष्ट होईल व तसा तो झाला पाहिजे. हें थोडेसें विषयान्तर झालें खरें, पण ओघास आलें म्हणून त्याविषयीं हे चार शब्द सांगितले.

# भक्ष्याभक्ष्य-विचार.

## सामान्यदिग्दर्शन

भक्ष्याभक्ष्य विचाराचा संबंध आजच्या जातिभेदाशीं अगदीं निकट आहे. आजच्या जातिसंस्थेचीं मुख्य तीन बाह्य चिन्हें आहेत. १ अस्पृश्य जाति, २ विवाहाचे निर्बंध आणि ३ भक्ष्याभक्ष्याचे निर्बंध. धंद्याचाहि संबंध जातिसंस्थेशीं आहे. पण आतां तो विशेष महत्त्वाचा राहिलेला नाहीं. या व्याख्यानांत भक्ष्याभक्ष्याचें जें विवेचन मी करणार आहे, तें ऐकून कांहीं जण माझ्यावर पत्रांचा भडिमार करतील व मला उत्तर द्यावयासहि सांगतील. पण मी त्यांना उत्तर देण्याच्या भानगडींत पडणार नाहीं. अशा प्रश्नांना उत्तरें देतां येणार नाहींत असें नाहीं; पण अवश्य ते ग्रंथ वाचून जर कोणी प्रश्न विचारील तर ठीक; नाहींतर त्यांना काय उत्तर द्यावयाचें? या बाबतींत मला थोडा व्यक्तिशः खुलासा मात्र करावासा वाटतो. आपल्यामध्यें कांहीं सन्मान्य देशभक्त पुढारी आहेत व त्यांचें म्हणणें पुष्कळ बाबतींत मलाहि मान्य आहे. पण कित्येक बाबतींतील त्यांचें मत मान्य करावयास मी तयार नाहीं. त्या पुढाऱ्यांचें म्हणणें असें कीं, आपण मांसाहार सांप्रत सोडला ही गोष्ट इष्ट नाहीं, त्यामुळें आपण दुबळे झालों, यास्तव मांसाहारवर्जन आपण सोडल्यास म्हणजे पुनः मांसाहार करूं लागल्यास आपल्याला अधिक चांगले दिवस येतील, आपली संघशक्ति वाढेल आणि आपण आपल्याला विरोध करणाऱ्या मंडळींच्या संघशक्तीला तोंड देऊं शकूं. पुढारी आम्हांला सामान्यतः मान्य असले, तरी सर्वच गोष्टींत त्यांचें आम्हीं मानूं असें नाहीं. निदान माझी तरी वृत्ति तसें मानण्याची नाहीं. भक्ष्याभक्ष्य विचाराच्या बाबतींत त्यांच्या म्हणण्यांत मला हेत्वाभास दिसतो. हेत्वाभास म्हणजे हेतूचा किंवा कारणाचा आभास, खरा हेतु नव्हे. त्यांचा विचार आमच्या विचारांशीं जुळत नाहीं. हिंदुस्थानांत आज ज्यांनीं मांसाहार सोडला आहे त्यांनीं तो पुनः स्वीकारण्याचें कारण नाहीं असें माझें मत आहे. मांसनिवृत्तांनीं मांस खाऊं लागावें अशी आवश्यकता मला दिसत नाहीं. मांस न खाण्यामुळें आमचें कोठें अडलें आहे असें नाहीं. आपल्या देशांत आज निदान शेंकडा ८० लोकांना तरी मांसभक्षणाची अनुज्ञा आहे. ते लोक मांसभक्षण करीत नसतील तर तो त्यांचा दोष आहे, शास्त्राचा नाहीं. क्षत्रिय, वैश्य व शूद्र आणि सर्व अंत्यज यांना मांसभक्षण वर्ज्य नाहीं. ब्राह्मणांतहि सर्वांनांच तें वर्ज्य आहे असें नाहीं. उत्तर हिंदुस्थानांतील पुष्कळ ब्राह्मण मत्स्याहारी तरी आहेत. कसोशीनें गणती केली तर ज्यांना मांसाशन रूढीनें सर्वथा वर्ज्य आहे, असे शेंकडा

दहा लोकहि मिळणार नाहींत. शेकडा वीस हा हिशोब अगदीं उदार धोरणानें मीं धरिला आहे. असें असल्यामुळे मांसाहार वर्जनाचे परिणाम एकंदर समाजावर कां दिसावे ? सांप्रत आपला समाज दुर्बल झाला आहे ही गोष्ट खरी. पण मांसाहार करणाऱ्या इतर देशांत तरी काय स्थिति आहे ? वाटेल त्या प्राण्याचें मांस खाणाऱ्या चिनी लोकांचें आपण उदाहरण घेऊं. चिनी लोकांची संख्या चाळीस पन्नास कोट तरी आहे. पण पांच कोटी जपानी लोकांनीं त्यांना नकोसें करून सोडलें आहे. दोघांचे धर्म व संस्कृति सामान्यतः सारखींच असून जपानी लोक चिनी लोकांच्या मानानें ठेंगूहि आहेत. असें असतां जपान्यांनीं चीनवर वर्चष्मा का गाजवावा ? ही गोष्ट लक्षांत घेतली तर आपला समाज केवळ मांसाहारवर्जनामुळें दुबळा झाला आहे असें म्हणवत नाहीं. केवळ मांसाहार हेंच कांहीं सामर्थ्याचें साधन नाहीं. राजकीय स्वातंत्र्य हें जें ध्येय आहे तें मिळविण्याची सर्व देशांत मान्य अशीं साधनें म्हणजे संघशक्ति, चिकाटीचे प्रयत्न, शस्त्रास्त्रांची माहिती, तीं तयार करण्याचें ज्ञान, स्वार्थत्याग इत्यादि गोष्टी होत व त्यावर कोणत्याहि देशाचें स्वातंत्र्य अवलंबून आहे. या बाबतींतहि दोन्ही पक्ष समबल असतील तर ज्यांच्यांत संघटन शक्ति व शस्त्रास्त्र तयारी अधिक जास्त त्यालाच शेवटी सिद्धि मिळणार. वास्तव या सिद्धीचा मांसाशनाशीं फारच थोडा संबंध आहे.

मनुष्य समाजांत आढळणारी ही गोष्ट पशु समाजालाहि लागू आहे. हत्ती हा पशु मांस खात नाहीं, तरी तो सर्वांत बलाढय आहे. क्रूरपणा व चपलता हे गुण सिंह वाघ या प्राण्यांत अधिक आहेत हें खरें. पण शक्ति पाहिली तर हत्तींत ती इतकी आहे कीं, सिंहहि जर त्याच्या सोंडेच्या तडाख्यात सापडला तर त्याचा चुराडा होईल, गेंड्याचेंहि तसेंच आहे. त्याची शिकार करणें फार कठीण असें शिकारी लोक सांगतात. तो प्रसंगीं सिंहालाहि आपल्या शिंगानें मारितो असें शिकारी लोक लिहितात. गवा हाहि केवळ शाकाहारी असून बलाढय आहे. रेडाहि तसाच. रेड्यामध्यें क्रूरपणाहि असतो. तात्पर्य मांसाहार सोडल्यामुळें आम्हीं दुबळे झालों हें म्हणणें मला पटत नसून त्या दुबळेपणाचीं दुसरीं कारणें आहेत. पण तो विषय प्रस्तुत नसल्यामुळें त्यात अधिक आतांच शिरण्याचें कारण नाहीं.

या बाबतींत आणखीहि एका गोष्टीचा उल्लेख केला पाहिजे. मांसवर्जनानें दौर्बल्य आलें हें जसें खरें नाहीं, त्याचप्रमाणें मांस खाणारे लोक मांसनिवृत्त लोकांपेक्षां हीन होत ही कल्पनाहि त्याज्य आहे. निर्मांस मनुष्य हा श्रेष्ठ होय असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. ही गोष्ट पूर्व संस्कृतीचा ऐतिहासिक दृष्टीनें विचार करतां स्पष्ट दिसून येते हें निक्षून सांगणें अवश्य वाटतें. मांस भक्षणांत कांहीं दोष आहे असें नाहीं, ती एक स्वाभाविक प्रवृत्ति आहे, पण तें सोडल्यानें कांहीं विशिष्ट फळ मिळतें एवढेंच मनु सांगतो. तो म्हणतो, ' न मांसभक्षणे दोषो न

मद्ये न च मैथुने। प्रवृत्तिरेषा भूतानां निवृत्तिस्तु महाफला ॥' (५, १६). शिक्षण, आर्थिक स्थिति इत्यादि गोष्टी समान असतां निर्मांस लोकांपेक्षा मांसाहारी लोकांत गुन्ह्यांची प्रवृत्ति व कठोरता हे दोष जास्त असण्याचा संभव असतो. मद्यपी तर स्वतःला विसरून पशु बनतो व त्याच्या हातून फार मोठे अपराधहि घडतात, म्हणून मद्य व मांस यांपासून निवृत्त व्हावें असें शास्त्रकारांनीं सांगितलें. अमुक करा असें न सांगतां अमुक करूं नका असेंच सांगण्यावर शास्त्रकारांचा भर आहे असें कांहींसें दिसतें हें खरें. लहान मुलांच्या बाबतींतहि अमुक करूं नका, तमुक करूं नका असेंच आपण त्यांना अधिक सांगतों, पण तो दोष होय असें आधुनिक शिक्षणशास्त्रज्ञ म्हणतात आणि काय करूं नये हें सांगण्यापेक्षा काय करावें हेंच सांगण्यावर भर द्यावा असें सुचवितात. पण अवश्य अशा सामान्य गोष्टी करण्याकडे सर्वांचीच प्रवृत्ति असते. उदाहरण पैसा मिळव असें कोणाला सांगण्याची आवश्यकता नसते, तो प्रत्येकजण मिळवीतच असतो. तेव्हा पैसा अनाठायीं खर्च करूं नको हेंच सांगणें अवश्य असतें. ही गोष्ट लक्षात घेऊनच शास्त्रकारांनीं मद्यमांसादि पदार्थांपासून निवृत्त होण्याचा उपदेश केलेला आहे.

## प्राचीन परिस्थिति

प्राचीन वैदिक वाङ्मयांत म्हणजे संहिता व ब्राह्मणें यांत सर्वांना सर्व प्रकारचें खाणेंपिणें चालत असल्याचें दिसून येतें. तत्कालीन मनुष्याचें ध्येय स्वर्गप्राप्ति करून घेणें एवढेंच होतें व त्यासाठीं ते यज्ञ करीत. मांसाशन त्यांच्या आड येत नव्हतें इतकेंच नव्हें तर तें अवश्यच होतें. पण उत्तर वैदिक वाङ्मयांत हें ध्येयच पालटलें. स्वर्ग मिळाला म्हणजे सर्व मिळालें असें नाहीं अशी कल्पना उत्पन्न झाली. यज्ञयागांनीं स्वर्ग मिळाला तरी तो तात्पुरताच, त्याच्या योगानें आत्म्याचें कल्याण होत नाहीं. मोक्ष हाच परम पुरुषार्थ होय; जीवात्मा व परमात्मा हे वस्तुतः अभिन्नच असल्यामुळें प्राणिमात्रांत सर्वत्र एकच चैतन्य भरून राहिलें आहे असें तत्त्वज्ञान प्रसृत झालें. प्राण्यांचा घात करणें ह्मणजे आपल्या स्वतःमध्यें जें चैतन्य आहे त्याचाच घात करणें असें वाटूं लागलें व त्यामुळें मांसनिवृत्ति चालू झाली. बौद्ध व जैन या धर्मांतील अहिंसेच्या उपदेशानेंच मांसनिवृत्ति होऊन शाकाहार चालू झाला अशी जी कल्पना आहे ती खरी नाहीं. या धर्मांनीं अहिंसेवर आत्यंतिक भर दिला व त्यामुळें मांसनिवृत्तीला जोराची चालना मिळाली एवढें खरें. पण मांसनिवृत्तीला आरंभ उपनिषत्कालांत उत्पन्न झालेल्या तत्वज्ञानानेंच प्रथम केला यांत शंका नाहीं. बौद्ध धर्मानेंच अहिंसेची स्थापना केली असें नाहीं, ही गोष्ट अनेक प्रमाणांवरून सिद्ध होते. स्वतः गौतम बुद्ध वराहाचें मांस फार खाल्यामुळें मरण पावला असें ह्मणतात, पण कांहींच्या मतें तसा प्रकार नाही. तेव्हां तो प्रश्न

सोडून दिला तरी बुद्धानंतर दोन अडीचशें वर्षांनीं होऊन गेलेल्या ( इ. स पूर्वी २६७ च्या सुमारास ) अशोक राजाच्या शिलालेखांत पशुहत्येचे व मांसभक्षणाचे उल्लेख आहेत. बौद्धधर्माच्या पहिल्या उत्कर्षाला या अशोकाचेच परिश्रम पुष्कळ अंशीं कारण झालेले होते. त्याच्या पूर्वीपासूनच सर्वत्र एक आत्माच भरलेला आहे असें तत्वज्ञान पसरलें होतें व त्यामुळें स्वाभाविकपणेंच प्राणिवधाविषयींची प्रवृत्ति कमी होऊन निर्मांस व्हावें अशी इच्छा पुष्कळांना होऊं लागली होती. कौटिलीय अर्थशास्त्रांत ( ८, ३ ) राजांचीं ' मृगया द्यूत स्त्रियः पानम् ' अशीं चार कामज व्यसनें सांगितलीं असून त्यांत पान म्हणजे मद्यपान हें सर्वांत वाईट असें सांगितलें आहे. कामन्दकानेंहि ( १, ५४ ) तसेंच म्हटलें आहे ' मृगयाक्षास्तथा पानं गर्हितानि महीभुजाम् । दृष्टास्तेभ्यस्तु विपदः पाण्डुनैषधवृष्णिषु । '. राजांनीं मृगया अक्षक्रीडा व मद्यपान हीं करूं नयेत. कारण मृगयेमुळें पांडु राजाचा नाश झाला; द्यूतामुळें नलराजा विपद्ग्रस्त झाला व मद्यपानामुळें यादवांनी स्वतःचा संहार करून घेतला. यादवांनीं कृष्णपुत्र सांबाला गर्भवती स्त्रीचें सोंग देऊन ऋषींपुढें नेलें व ऋषींनीं रागावून शाप दिल्यामुळें सांबाच्या उदरापासून एक लोखंडाचें पातें निघालें, तें घासून घांसून अगदीं बारीक झाल्यावर त्यांनीं फेंकून दिलें. घासलेल्या लोखंडापासून लव्हे उत्पन्न झाले व शेवटीं यादव मद्यपान करून उन्मत्त झाले असतां एकमेकांत कुरापत काढून त्यांनीं त्या लव्ह्यांनीं एकमेकांना मारिलें आणि कृष्णहि स्वतः एका झाडाखालीं पडून राहिला असतां एका व्याधानें तो यादवांनीं टाकून दिलेला लोखंडाचा तुकडा लावलेला बाण त्याच्यावर टाकिला व त्यामुळें कृष्ण मरण पावला. इत्यादि गोष्ट महाभारताच्या मौसलपर्वांत सांगितलेली प्रसिद्धच आहे. यादवांच्या या परस्पर कलहावरूनच यादवी शब्द आपसांतील कलह या अर्थानें रूढ झालेला आहे. असें हें मद्यपानाचें व्यसन वाईट म्हणून सांगितलेलें आहे. कौटिल्याचें एतद्विषयक विवेचन सारेंच मजेदार आहे. तो म्हणतो, स्त्रीभोगांत कांहीं तरी अर्थ आहे. कारण त्यामुळें वंशवृद्धि करणारी सन्तति तरी उत्पन्न होते, पण मद्यपानांत कांहींच अर्थ नाहीं. मद्यपी वाटेल तें करतो [यत्र तत्र प्रवर्तते] व शेवटीं नाश पावतो.

## नवमतवाद्यांना थोडी सूचना

कौटिल्य आणि कामंदक हे कांहीं धर्मशास्त्री नव्हते. ते अर्थशास्त्री होते. अर्थशास्त्र आणि धर्मशास्त्र यांत धर्मशास्त्र बलवत्तर मानतात ही गोष्ट सोडून दिली तरी हे अर्थशास्त्री काय म्हणतात हें आजच्या कांहीं नवमतवाद्यांना सांगणें अवश्य आहे. आजचे कांहीं नवमतवादी तरुण स्त्रीपुरुषांच्या सुंदर गोष्टी लिहितात व लोकांना वाचण्याची संवय लावतात ही चांगली गोष्ट आहे; पण तसें करतांना कांही मर्यादाहि ठेवणें अवश्य आहे. आज कोणत्याहि मासिकाकडे पाहिलें तरी त्यावर दर्शनी चित्र बहुधा स्त्रीचें असतें. स्त्रियांच्या प्रेमाच्या गोष्टी, स्त्रियांचीं चित्रें, यांशिवाय मासिक पुस्तक

निघूंच शकत नाहीं असें झालें आहे. पण आपल्याला स्वातंत्र्य मिळवावयाचें आहे हें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्यासाठीं या गोष्टींचा अतिरेक उपयोगी पडणार नाहीं. ‘ शेतकरी आणि कामकरी यांशिवाय मी कोणाला मान देत नाहीं ’ ( Two men I honour and no third ) हें कार्लाइलचें वचन लक्षांत ठेवण्यासारखें आहे. कामंदक म्हणतो, ‘ स्त्रीमुखालोकनतया व्यग्राणामल्पचेतसाम् । ईहितानि हि गच्छन्ति यौवनेन सह क्षयम् । ’ केवळ स्त्रियांच्या तोंडाकडे पहात त्यांतच व्यग्र होऊन जाणाऱ्या तरुणांच्या साऱ्या आकांक्षा यौवनाबरोबरच क्षय पावतात. वास्तव स्वातंत्र्यासारख्या गोष्टी ज्यांना मिळवावयाच्या आहेत अशा जिगीषूंनीं मनस्वी म्हणजे लोकमान्य टिळकांप्रमाणें निधड्या छातीचे ( iron-willed ) असलें पाहिजे. याविषयीं सूर्याचें उदाहरण देऊन राजतरंगिणीकार म्हणतो, ‘ सगळ्या जगाचें प्रथम आक्रमण केल्यावरच सूर्य झाला तरी संध्येच्या भजनीं लागतो ’ ( असमाप्तजिगीषस्य स्त्रीचिन्ता का मनस्विनः । अनाक्रम्य जगत्कृत्स्नं नो सन्ध्यां भजते रविः ॥ ). नुकताच राष्ट्रीयसभेचा मोठा उत्सव होऊन गेला, पण त्यांत ठरल्याप्रमाणें अंमलबजावणी झाली तरच उपयोग ! असो. सांगावयाचें तात्पर्य एवढेंच कीं, स्वाभाविक ज्या प्रवृत्ति आहेत त्यांना शास्त्रकारांनीं दोष देत न बसता त्यांच्यापासून निवृत्त होण्याचा जो उपदेश केला त्यांतील बीज असें आहे कीं, त्या निवृत्तीमुळें समाजाला कांहीं महत्कार्य साध्य करतां यावें.

मांसप्रवृत्ति किंवा मांसनिवृत्ति यांतच कांहीं विशेष आहे असें नाहीं. माझें तर मत असें आहे कीं यापुढें पन्नास शंभर वर्षांनीं सर्व जगांतील मानव समाजाचा बराच मोठा भाग मांसनिवृत्त होईल; कारण त्याला तसें व्हावेंच लागेल. मनुष्य समाज इतका वाढेल कीं इतक्यांना मांसाहाराला पुरतील एवढे प्राणीच आधीं रहातील कीं नाहींत याची शंका आहे. शिवाय शास्त्रीय शोधांनीं हवेंतील नत्रापासून ( Nitrogen ) बनलेलीं अन्नद्रव्यें (Synthetic foods) तयार करतां येऊं लागतील व तीं वड्यांच्या रूपानें सर्वांना मिळतील. दिवसानुदिवस दुधासारखे पदार्थ कमी कमी होऊं लागलेले आपण पाहतों. चाळीस वर्षांपूर्वी रुपयाला बारा शेर दूध मिळत असे तें आज तीन शेर मिळतें आणि जें मिळतें त्याचा बराच भाग ज्यांत कांहीं अर्थ नाहीं अशा चहांतच खर्च होतो. तात्पर्य एवढेंच कीं कांहीं काळानें प्राणिज अन्न मिळणेंच कठीण होऊन बहुजन समाजाला मांसनिवृत्त व्हावें लागेल.

## अतिरिक्त कल्पना सोडा

मांसनिवृत्तींत सारा धर्म सांठविला आहे, किंवा जो मांसनिवृत्त असेल तोच सर्वांहून श्रेष्ठ इतर गोष्टी पाहण्याचें कारण नाहीं असें कोणत्याहि स्मृतींत सांगितलेलें

नाहीं. पण दहाव्या अकराव्या शतकापासून मुसलमानांशीं संबंध आल्यामुळें मुळांतील चांगल्या तत्त्वांचा अतिरेक झाला. बाहेर धर्माचरणाला क्षेत्र मिळेनासें झालें, तेव्हां तो घरांत बसूनच पाळावा अशी प्रवृत्ति झाली व त्यामुळें चमत्कारिक कल्पना उत्पन्न होऊं लागल्या. उदाहरणार्थ, प्राचीन ग्रंथांत जननाशौच केवळ आईबापांनांच सांगितलें आहे. पण आतां त्याचा अतिरेक होऊन कलकत्त्यास जन्मलेल्या मुलाचा सोहेर पुण्यांतील लग्नमुंजी बंद ठेवण्याला कारणीभूत होऊं लागला. 'आहारशुद्धौ सत्वशुद्धिः सत्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः । स्मृतिलंभे सर्वग्रंथीनां विप्रमोक्षः' असें छांदोग्योपनिषदांत सांगितलें आहे. सात्त्विक आहारामुळें मन सात्त्विक होतें, मन पवित्र झालें ह्मणजे स्मृति शुद्ध होते. स्मृति ह्मणजे आपण ब्रह्मच आहों कोणी निराळे नव्हे हें ज्ञान व या ज्ञानानेंच मोक्ष मिळतो. मोक्ष ही कांहीं स्वतंत्र वस्तु नाहीं. मीं तूं अशा भेदाच्या ग्रंथी ही स्मृति शुद्ध झाल्यानें तुटतात व वास्तविक सिद्ध असलेल्या अनन्यत्वाची प्रतीति येते (भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः । मुं. उ.). आहारशुद्धि झाली तरी बारा शुद्धिसाधनांपैकीं एक साधन ह्मणूनच सांगितलेली आहे. आहार ह्मणजे अन्न असा अर्थ आहे, पण शंकराचार्य तसा अर्थ न घेतां 'आह्रियते इति आहारः शब्दादिविषयविज्ञानम्' असा घेतात व आहारशुद्धि ह्मणजे राग, द्वेष, मोह इत्यादिकांपासून अलिप्त असें विषयांचें ज्ञान असें समजतात. पण हा अर्थ प्राचीन काळीं नव्हता. हारीतधर्मसूत्रांत 'आहारशुद्धौ सत्वशुद्धिः' हें वचन आचार्यांचें म्हणून उध्दृत करून 'तस्माच्छुचिः यथार्थपरिमिताहारः स्यात्' म्हणजे यथाप्रमाण अन्नसेवन करून शुद्ध व्हावें एवढेंच सांगितलें आहे (अपरार्काची या. स्मृ. टीका पान २२१). शंखलिखितांचें याविषयींचें मत अपरार्कानें उद्धृत केलें आहे तें असें—'सुरालशुनपलाण्डुगृंजनमांसान्यभक्ष्याणि विवर्जयेत् । आहारमयं हि शरीरम् । तन्मयत्वाद् ब्राह्मणः संकीर्यते । मातुरशितपीतादिभिर्गर्भः सम्भवति ।' आहार शुद्धि म्हणजे सुरा, लसूण, कांदा, गाजर, मांस हे पदार्थ वर्ज्य करणें; शरीर हें अन्नमय असतें. माता जें खाते किंवा पिते त्यावरच गर्भाचें पोषण होतें, यास्तव आईबापांनीं पवित्र आहार ठेवावा असा शंखलिखितांच्या म्हणण्याचा भावार्थ आहे. विष्णुधर्मसूत्रांत म्हटलें आहे (२२, ८९) 'सर्वेषामेव शौचानामन्नशौचं परं स्मृतम् । योन्ने शुचिः स हि शुचिर्न मृद्वारिशुचिः शुचिः' ॥ अन्नशुद्धि हीच सर्वांत मोठी शुद्धि. माती व पाणी लावणें हीच कांही शुद्धि नव्हे. तात्पर्य मांसनिवृत्तीच्या मुळाशीं मन पवित्र करण्यासाठीं आहारशुद्धि व सर्वांच्या अंतर्यामीं एकच आत्मा आहे हें तत्त्व या गोष्टीच आहेत.

मांसनिवृत्ति, सोंवळेंओंवळें इत्यादि निर्बंध मूळांत आपलें श्रेष्ठत्व स्थापण्यासाठीं ब्राह्मणांनींच उत्पन्न केलें असें कांहीं जण म्हणतात. ज्योतिषी व गणिती बेंटले

हा तर म्हणतो कीं, इ. स. १४ व्या किंवा पंधराव्या शतकाच्या सुमारास ब्राह्मणांनीं आपले सर्वच ग्रंथ निर्माण करून त्यांना प्राचीनत्व दिलें म्हणजे (forgery) केली. पण हें म्हणणें हास्यास्पद आहे. स्वतःच्या मुलाला जेवणाच्या वेळीं व स्त्रीला विवक्षित काळीं अस्पृश्य मानतात, यांत कोठें श्रेष्ठत्वाची कल्पना आहे ? असे निर्बंध घालण्यानें ब्राह्मणांनीं आपलेच पाय बांधून घेतले. त्यांत श्रेष्ठकनिष्ठपणाची कल्पना आरंभीं मुळीच नव्हती. पण पुढें तशी कल्पना उत्पन्न होऊन तिचा अतिरेक झाला हें मात्र खरें. ही कल्पना उत्पन्न झाल्यावर कनिष्ठ म्हणून समजल्या जाणाऱ्या लोकांना दुःख होणें स्वाभाविक होतें. त्यांच्या दुःखाची कल्पना, जावें त्याच्या वंशा तेव्हांच कळण्यासारखी आहे. नाहीं तर परदुःख शीतळ असतें. शुद्धीची साधनें बारा असून आहार हें त्यांपैकीं केवळ एक आहे हें पूर्वीं सांगितलेंच आहे. मनु म्हणतो, 'ज्ञानं तपोऽग्निराहारो मृन्मनो वार्युपाञ्जनम् । वायुः कर्मार्ककालौ च शुद्धेः कर्तॄणि देहिनाम् ॥' (५, १०५). मनुष्याच्या शुद्धीचीं साधनें ज्ञान, तप, अग्नि, आहार, माती, मन, पाणी, सारवण, वारा, कर्म, सूर्य व काळ अशीं आहेत; पण त्यांहूनहि अर्थशौच म्हणजे कोणाच्याहि धनाचा अन्यायानें अपहार न करणें हें श्रेष्ठ होय (सर्वेषामेव शौचानामर्थशौचं परं स्मृतम् । योऽर्थे शुचिः हि स शुचिर्न मृद्वारिशुचिः शुचिः ॥ ५, १०६). वरतीं विष्णुधर्मसूत्रांतील श्लोकांत 'अन्ने शुचिः' आहे त्या ठिकाणीं मनुस्मृतींत 'अर्थे शुचिः' असा फरक आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे व मनूचेंच वचन जास्त सयुक्तिक आहे. तेव्हां आहारालाच महत्त्व देऊन त्यावरून श्रेष्ठकनिष्ठपणाची कल्पना काढणें म्हणजे अतिरेक होय यांत शंका नाहीं.

## ऐतिहासिकदृष्ट्या विचार

आतां भक्ष्याभक्ष्याचा ऐतिहासिकदृष्टीनें विचार करूं. ऋग्वेदांत एका ऋचेंत (१०, ८६, १४) पसतीस बैल इंद्रासाठीं शिजविल्याचा उल्लेख आहे. त्या ऋचेंत इंद्रच स्वतः म्हणतो 'उक्ष्णो हि मे पंचदश साकं पचन्ति विंशतिम् । उताहमद्मि पीव इदुभा कुक्षी पृणंति मे ॥' माझ्यासाठीं एकदम पसतीस बैल शिजवितात, आणि ते मी खातों व लठ्ठ होतों; माझ्या दोन्ही कुशी भरून टाकितात. या विषयांत मीं फार खोल जात नाहीं व तसें जाण्यांत अर्थहि नाहीं. पण एवढेंच सांगितलें पाहिजे कीं, यज्ञयागांत पशूंची हिंसा सारखी होत होती. मधुपर्क हा आदराचा विधि सन्माननीयांच्या स्वागतासाठीं करावयाचा असून त्या संबंधानें 'नामांसो मधुपर्को भवति' (१, २४–२६) मांसाशिवाय मधुपर्क होत नाहीं असें आश्वलायनगृह्यसूत्रांत सांगितलें आहे. त्या सूत्रांत मधुपर्क प्रसंगीं म्हणावयाचा गाईसंबंधाचा जो मंत्र दिला आहे तो ऋग्वेदांतील असून त्यांत म्हटलें आहे, 'माता रुद्राणां दुहिता वसूनां स्वसाऽऽदितानाममृतस्य नाभिः । प्र नु वोचं चिकितुषे जनाय मा गामनागामदितिं वधिष्ट ।' (ऋ.

८, १०१. १५ ) रुद्रांची आई, वसूंची मुलगी, व आदित्यांची बहीण व अमृतत्वाचें गाठोडेंच जणूं अशी ही निरपराधी गाय मारूं नको असें मीं त्या जाणत्या माणसाला सांगितलें. मानवगृह्यसूत्रांत ( १, ९, १९–२२ ) मधुपर्काच्या वर्णनांत सांगितलें आहे कीं ' तरवार हातांत घेऊन ही गाय आहे असें म्हणतो. अतिथि नको मारूं म्हणेल तर तिला सोडून देतो. मग दुसऱ्या पशूंचें मांस किंवा पायस देतो. कारण मधुपर्क मांसविरहित होत नाहीं असें श्रुतींत सांगितलें आहे.' हिरण्यकेशिगृह्यसूत्रांत तसेंच वर्णन आहे ( १,१३, १०–१५ ) ' अथास्मै स्नातकाय गौरिति प्राह। तस्याः कर्म उत्सर्गो वा ।... उत्सर्गेऽन्येन मांसेनान्नं संस्कृत्याथास्मै भूतमिति प्राह।' ' स्नातक म्हणजे ब्रह्मचर्य संपवून गृहस्थ होऊं पहाणारा मनुष्य आला असतां त्याला म्हणावें ही गाय. तिला मारावी किंवा सोडावी......सोडून दिल्यास दुसऱ्या प्राण्याच्या मांसानें अन्नाला संस्कार करून म्हणावें कीं जेवण तयार झालें. ' बौधायनगृह्यसूत्रांत विवाहाङ्गभूत मधुपर्काच्या प्रसंगीचा विधि सांगतांना म्हटलें आहे कीं, 'गाईला सोडून दिल्यावर मेंढा किंवा बोकड कापावा, किंवा दुसऱ्या वन्य पशूचें मांस घ्यावें. पण मांसाशिवाय मधुपर्क पुरा होणार नाहीं. तसें करणें शक्यच नसेल तर पिठाचें अन्न करावें ( तस्यामुत्सृष्टायां मेषमजं वालभते। आरण्येन वा मांसेन। न त्वेवामांसोऽर्घ्यः स्यात्। अशक्तौ पिष्टान्नं संसिध्येत्। १, २, ५१–५४ ) ऐतरेय ब्राह्मण ( ३, ४ ), शतपथब्राह्मण ( ३, ४, १, २ ) यांतहि अतिथिपूजेच्या प्रसंगीं बैलाच्या व बोकडाच्या मांसाचा उल्लेख आहे. या बाबतींत एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं वैदिक कालीं गाईला पावित्र्य नव्हतें असें नाहीं. तसें पावित्र्य होतें आणि ह्मणून तिचें मांस पवित्र ह्मणून खावें असाही विधि वाजसनेयश्रुतींत होता. ख्रिस्ती धर्मांतील युकारिस्ट किंवा प्रभुभोजन नांवाच्या संस्कारांतहि हाच प्रकार आढळतो. त्या प्रसंगीं मद्य व भाकर यांचें रूपान्तर अनुक्रमें ख्रिस्ताचें रक्त व मांस यांत होतें असें जुने ख्रिस्ती ( रोमन कॅथॉलिक ) मानितात व त्या पवित्र भावनेनेंच त्याचा स्वीकार करावयाचा असतो. या प्रकाराला ट्रॅन्सब्स्टॅन्शिएशन ह्मणजे पदार्थान्तरीभवन असें ह्मणतात. नवे ख्रिस्ती ( प्रॉटेस्टंटपंथी ) हा प्रकार मानीत नाहींत ती गोष्ट वेगळी. पावित्र्याची कल्पना त्या वेळीं आजच्याहून निराळी होती, एवढें त्यांतील तात्पर्य. ह्मणून प्राचीन गृह्य व धर्मसूत्रें यांत मधुपर्क, श्राद्ध व अतिथिपूजा यांत मांस आवश्यक ह्मणून सांगितलेलें आहे.

पण या प्रसंगांशिवाय इतरत्रहि मांसाशन अनुमत ह्मणून सांगितलेलें होतें व त्या संबंधी बारीक नियमहि पुष्कळ होते. पण त्यांचा सविस्तर विचार न करतां कांहीं उदाहरणें मात्र पाहूं. वसिष्ठधर्मसूत्र ह्मणतें ( १४,३० ) 'श्वाविच्छल्यकशशकच्छपगोधाः पंचनखानां भक्ष्याः '; पांच नखांच्या प्राण्यांपैकीं श्वाविधू, शल्यक, ससा, कांसव, घोरपड खावे. ' ' धेन्वनडुहावपन्नदंताश्च । ' ( वसिष्ठ १४. ४५ ).

धेनु व अनडुह ह्मणजे बैल हीं मेध्य ( पवित्र ) असल्यामुळें खावीं ( धेन्वनडुहो-र्भक्ष्यम् । मेध्यमानडुहामिति वाजसनेयकम् । ) असें आपस्तंबधर्मसूत्र ( १, ५, १४, २९ ) वाजसनेयश्रुतीचा आधार घेऊन सांगतें. गौतमधर्मसूत्रांत ( १७, २७-२८ ) हि तसेंच ह्मटलें आहे. वेदकाळींच मांसनिवृत्तीचा आरंभ झाला असून त्यांतून मेध्य व अमेध्य असे पशूंचे भेद करण्यांत आले व तदनुसार भक्ष्याभक्ष्याचे नियम ठरविण्यांत आले. अश्व, गो, अवि, अज, हे मेध्य व किंपुरुष, गौरमृग, गवा, उंट, शरभ अमेध्य असें ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलें आहे (६,८). पण अहिंसावृत्ति बळावत चालली, तेव्हां पशूंच्या जागीं दुसरे पदार्थ येऊं लागले. 'पुरोडाश ह्मणजे पशुच होय, पुरोडाशानें यजन केलें ह्मणजे पशूनें यजन केल्यासारखेंच होतें' असें प्रतिपादन होऊं लागलें ( स वा एष पशुरेवालभ्यते यत्पुरोडाशः सर्वेषां वा एष पशूनां मेधेन यजते यः पुरोडाशेन यजते ॥ ऐ. ब्रा. ६, ९ ). मेध्य पशुहि अग्निभोवतीं फिरवून न मारतां सोडण्यांत येऊं लागले. तैत्तिरीय ब्राह्मणांत ( ३, ९, ३, ३ ) 'पर्यग्निकृतानारण्यान् उत्सृजन्त्यहिंसायै' असें म्हटलें असून त्यात अहिंसा शब्द आला आहे. छांदोग्य उपनिषदांत 'अहिंसन् सर्व भूतानि अन्यत्र तीर्थेभ्यः' ( ८,१५ ) म्हणजे देव, पितृ व अतिथि यांच्या पूजनाव्यतिरिक्त प्रसंगीं कोणत्याहि प्राण्याची हिंसा न करणारा ब्रह्म लोकास जातो असें सांगितलें असून तप, दान, सरळपणानें वागणें, अहिंसा, सत्यभाषण यांना ज्ञानी पुरुषाच्या ज्ञानयज्ञांतील दक्षणा म्हटलें आहे ( अथ यत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणाः । छान्दोग्य ३,१७.४ ). म्हणजे पशुयज्ञ करण्याचें कारण नाहीं, तप आर्जव इत्यादि केलें म्हणजे झालें असा भावार्थ त्यांत दर्शविला आहे. प्रजापतीनें देव, असुर व मानव यांना द या एकाच अक्षरानें दाम्यत, दयध्वम् व दत्त असे तीन संदेश अनुक्रमें दिल्याची बृहदारण्यकांतील कथा ( ५,२ ) पूर्वी सांगितली आहेच. तींत दया म्हणजे अहिंसा हा सन्देश क्रूर असुरांना दिला होता.

## अहिंसातत्त्वाचा उगम

या इतिहासावरून अहिंसेचें तत्त्व वैदिक काळींच प्रतिपादण्यांत येऊं लागल्याचें दिसून येईल. अर्थात बौद्ध व जैन यांनीं तें चालू केलें असें म्हणतां येत नाहीं. बुद्धाच्या मताचा प्रसार होऊं लागला तेव्हां क्षत्रिय बौद्ध झाले. स्वतः गौतमबुद्ध हा आपल्याला क्षत्रिय म्हणवीत असे. बुद्धानें जातिभेद नष्ट केला असें म्हणतात, पण तेंहि खरें नाहीं. त्यानें एवढेंच सांगितलें कीं, निर्वाणाला जातीची गरज नाहीं; ज्ञातीवर निर्वाण अवलंबून नाहीं. पण तो आपल्या स्वतःला क्षत्रिय व म्हणून ब्राह्मणांहून श्रेष्ठ म्हणे. त्याचा वर्णक्रम ब्राह्मण क्षत्रिय वैश्य शूद्र असा नसून क्षत्रिय ब्राह्मण वैश्य शूद्र असा होता. बुद्धाला निर्वाणासाठीं ब्राह्मण नको होता, देव नको

होता व आत्माहि नको होता. या विषयीं पुष्कळ सांगण्यासारखें आहे, पण तो आपला विषय नाहीं, म्हणून त्यांत खोल जाण्याचें कारण नाहीं. एवढें खरें कीं बौद्ध व जैन यांनीं अहिंसेवर विशेष जोर दिला. त्या वेळच्या समाजापैकीं बरेच क्षत्रिय बौद्ध झाले तसे बरेच वैश्य जैन झाले व शूद्र बौद्ध झाले. बौद्धधर्मांत येणाऱ्यांना ज्या दहा प्रमुख गोष्टी सांगतात, त्यांत अहिंसेला पहिलें स्थान आहे. बौद्धधर्माचा बडा पुरस्कर्ता जो चक्रवर्ती अशोक त्याचीं जीं शैलशासनें किंवा शिलालेख आहेत त्यांतील पहिल्यांत त्यानें आपल्या मुदपाकखान्याची पहिली स्थिति व नंतरची स्थिति वर्णिली आहे; तींत तो म्हणतो, ' पियदसिस लाजिने अनुदिवसं बहुनि पानसहसानि आलभिविसु सुपठाये । से इदानीं...तदा तिन्नि एव पानानि आलभियन्ति दुवे मजुला एके मिगे । एतानि पि च तिनि पानानि नो आलभियिसन्ति ।' मी जो प्रियदर्शी त्याच्या स्वयंपाकघरांत प्रत्यहीं हजारों प्राणी मारिले जात, पण त्या ठिकाणीं आता दोन मयूर व एक हरिण एवढेच मारण्यांत येतात, पण यापुढें हे तिन्ही प्राणीहि मारण्यांत येणार नाहींत. परंतु दुसऱ्या शासनांत त्यानें पशूंना रोगमुक्त करण्यासाठीं पशुचिकित्सालयें काढिलीं असें सांगितलें आहे. पशुचिकित्सालयें म्हणजे व्हेटनेरी हॉसपिटल्स आतांच आलीं असें नाहीं. याप्रमाणें वैदिक काळींच पशुहिंसेविरुद्ध कल्पना उत्पन्न होऊन त्या अहिंसाकल्पनेची मजल पशुचिकित्सालयें काढण्यापर्यंत आली. ही उत्क्रांति कशी होत गेली हें पाहूं.

यज्ञयाग करून स्वर्गप्राप्ति करून घ्यावयाची ही कल्पना मागें पडून तिच्या जागीं मोक्षप्राप्तीची कल्पना येऊं लागली व त्या प्रीत्यर्थ चित्तशुद्धीसाठीं आहारशुद्धीची आवश्यकता वाटूं लागली. मोक्ष म्हणजे कांहीं स्वतंत्र वस्तु नसून सर्वांभूतीं एकच आत्मा आहे हें ओळखणें अशी तात्विक कल्पना आल्यामुळें ' आत्मवत् सर्व भूतानि यः पश्यति स पश्यति ' असा सिद्धांत पुढें आला व मांसनिवृत्ति चालू झाली. ही पहिली पायरी. पण अनेक शतकांची वहिवाट एकदम मोडणें शक्य नसल्यामुळें या अहिंसेच्या कल्पनेची जुन्या वहिवाटीशीं सांगड घालण्याचा प्रयत्न होऊन यज्ञांत मात्र प्राणिहिंसा करावयास हरकत नाहीं, कारण यज्ञांतील हिंसा ही हिंसाच नव्हे, असा सिद्धान्त स्थापित झाला. यज्ञांत मंत्रपूत करून मारिलेले पशु स्वर्गांत जातात अशी कल्पनाहि त्यासाठीं करण्यांत आली. महाभारताच्या वनपर्वांत म्हटलें आहे, ' यज्ञेषु पशवो ब्रह्मन् वध्यन्ते सततं द्विजैः । संस्कृताः किल मंत्रैश्च तेऽपि स्वर्गमवाप्नुवन् । ( अ. २०८ ). मनूनें ( ५, ४०–४२ ) तोच आशय सांगितला आहे. तो म्हणतोः—

औषध्यः पशवो वृक्षास्तिर्यञ्चः पक्षिणस्तथा ।
यज्ञार्थं निधनं प्राप्ताः प्राप्नुवन्त्युत्सृतीः पुनः ॥

मधुपर्के च यज्ञे च पितृदैवतकर्मणि ।
अत्रैव पशवो हिंस्या नान्यत्रेत्यब्रवीन्मनुः ॥
एष्वर्थेषु पशून्हिंसन्वेदतत्त्वार्थविद्द्विजः ।
आत्मानं च पशुं चैव गमयत्युत्तमां गतिम् ॥

यज्ञांत वधिलेले पशुपक्षी किंबहुना ओषधि सुद्धां उत्तम गतीला जातात. मधुपर्क, श्राद्ध, यज्ञ या प्रसंगांखेरीज पशुहिंसा करूं नये. वसिष्ठ ( ४, ५-८ ), विष्णु ( ५१, ६४ ), शांखायनगृह्यसूत्र [ २, १६ ] यांतहि हाच भाव दाखविला आहे. पण मनूचें मन द्विधा झालें होतें. त्यानें एकदां 'तस्माद्यागे वधोऽवधः' [ ५, ३९ ] यज्ञांतील वध हा वधच नव्हे असें सांगितलें, पण पुनः 'न च प्राणिवधः स्वर्ग्य-स्तस्मान्मांसं विवर्जयेत्' ( ५, ४५ ) प्राणिवधापासून स्वर्ग मिळत नाहीं, म्हणून मांस वर्ज्यच करावें असें ठांसून सांगितलें. या प्रश्नावर भिन्न भिन्न मतें प्रतिपादण्यांत येऊं लागलीं व मांससंबंधामुळें यज्ञकर्म हें एकंदरींत अशुद्धच असें म्हणूं लागले, तेव्हां ब्रह्मसूत्रकारांनीं ( ३, १, २५ ) 'अशुद्धमिति चेन्न शब्दात्' असा सिद्धान्त मांडला. यज्ञकर्म हें हिंसायोगामुळें अशुद्ध ठरत नाहीं, कारण वेदानें तें करावयास सांगितलें आहे. 'न हिंस्यात्सर्वा भूतानि' हा अहिंसेचा नियम खरा, पण 'अग्नीषोमीयं पशुमालभेत' हा त्याला अपवाद वेदांनींच सांगितला, तेव्हां तो अशुद्ध म्हणतांच येणार नाहीं. वसिष्ठ म्हणतो कीं, श्राद्धप्रसंगीं किंवा देवकर्माच्या वेळीं यतीला बोलाविलें असतां जर तो मांस टाकून देईल तर तो नरकास जाइल ! 'नियुक्तस्तु यतिः श्राद्धे दैवे वा मांसमुत्सृजेत् । यावन्ति पशुरोमाणि तावन्नरकमृच्छति ।' ( ११, ३४ ). मनूनेंहि एकदां ( ५, ३५ ) 'नियुक्तस्तु यथान्यायं यो मांसं नात्ति मानवः । स प्रेत्य पशुतां याति संभवानेकविंशतिम् ॥' जो मनुष्य विधीप्रमाणें श्राद्धादिकर्माला बोलाविलें असतां मांस खाणार नाहीं, तो एकवीस वेळां पशूच्या जन्मास जाईल, असें म्हटलें; पण पुनः त्यानेंच यावज्जीव मांस न खाणाऱ्याला शंभर अश्वमेधांचें फळ मिळतें ( वर्षे वर्षेऽश्वमेधेन यो यजेत शतं समाः । मांसानि च न खादेद्यस्तयोः पुण्यफलं समम् । ५, ५३ ) असेंहि सांगितलें. महाभारतांतहि अहिंसेची अतोनात स्तुति करून 'अहिंसा परमो धर्मः सर्वप्राणभृतां वर' ( आदिपर्व ११, १३ ), 'अहिंसा परमो धर्मस्तथाहिंसा परो यमः । अहिंसा परमं दानमहिंसा परमं तपः ।' ( अनु. प. ११६, ३८ ) असा निष्कर्ष काढिला आहे.

## हिंसा व अहिंसा यांची तडजोड

पण या अहिंसेच्या स्तुतीवर बंधनें घालण्यांत आली. रामायणांत ( किष्किंधाकाण्ड १७, ३९ ) 'पंच पंचनखा भक्ष्या ब्रह्मक्षत्रेण राघव' पांच नखांचे पांच पशु खावे असें सांगून 'शल्यकः श्वाविधो गोधा शशः कूर्मश्च पंचमः' अशीं त्यांचीं नांवें

दिलीं आहेत. याज्ञवल्क्य ( १, ११७ ), विष्णु ( ५१, ६ ), मनु ( ५, १८ ) यांनीं त्याचा अनुवादहि केला आहे. पण पुढें मीमांसकांनीं ठरविलें कीं, हा खाण्याचा अपूर्वविधि नसून, यांशिवाय इतर तर कधीं खाऊंच नयेत असा परिसंख्याविधि होय, म्हणजे यांत हे खावेच असें सांगितलें नसून यांच्याशिवाय इतर टाळणें मात्र अवश्य आहे, सांगितलेले एवढे प्रसंगोपात्त खाल्ले तर चालतील इतकेंच. या भक्ष्य व अभक्ष्य प्राण्यांच्या नांवांसंबंधानें सर्वांचें एकमत नाहीं. वसिष्ठानें चाळीस वर्ज्य प्राण्यांचीं नांवें देऊन तदितर प्राणी खावे असें ह्मटलें आहे. मनूनें मासे खाऊं नये असें सामान्यतः सांगून पांच प्रकारचे खावे असें सांगितलें ( ५, १६ ). मांस खाऊं नये, पण प्राणसंकट, देवकर्म, श्राद्ध या प्रसंगीं खावें असें याज्ञवल्क्य म्हणतो ( प्राणात्यये तथा श्राद्धे...खादन्मांसं न दोषभाक् । १, १७९ ). मनूनेंहि तसेंच म्हटलें आहे आहे; ' प्रोक्षितं भक्षयेन्मासं...प्राणानामेव चात्यये ' । ( ५, २७ ). ' सर्वान्नानुमतिश्च प्राणात्यये तद्दर्शनात् ' या ब्रह्मसूत्रांतहि [३,४,२८] हाच निष्कर्ष काढिला आहे. छांदोग्योपनिषदांत उषस्तिचाक्रायणाची कथा आहे १, १० ]. कुरुदेशांत एकदां गारांचा वर्षाव होऊन ( किंवा टोळधाडीमुळें ) सर्व पिकांचा नाश झाला. तेथें उषस्ति रहात असून दुष्काळामुळें त्याची अत्यंत वाईट स्थिति झाली. तो फिरत असतां एक गृहस्थ कुळीथ खातांना त्याला आढळला. त्याच्याशीं त्यानें कुळीथ मागितले. तो गृहस्थ म्हणाला, मजजवळ एवढेच आहेत, अधिक नाहींत. उषस्ति म्हणाला, तर यातीलच थोडे दे. त्या गृहस्थानें थोडे कुळीथ त्याला दिले व पाण्याचें भांडेंहि त्याच्यापुढें केलें. तेव्हां कुळीथ खाऊन उषस्ति म्हणाला, मला हें उष्टें पाणी नको. गृहस्थानें विचारलें, मग हे कुळीथ नव्हते का उष्टे ? उषस्तीनें उत्तर केलें, कुळीथ उष्टे होते खरे, पण ते मी न खातों, तर जगलोंच नसतों, ( न वा अजीविष्यमिमान्न खादन् ) म्हणून खाल्ले. आतां पाण्यावाचून म्हणशील तर चांगलें पाणी कोठेंहि मिळूं शकेल ( कामो मे उदपानं ) म्हणून मीं तुझें उष्टें पाणी पीत नाहीं. प्राणसंकट ओढवलें असतां वाटेल तें खावें हेंच या गोष्टीचें तात्पर्य असून त्यावरच ' सर्वान्नानुमतिश्च प्राणात्यये तद्दर्शनात् ' या सूत्राची उभारणी केलेली आहे. पण हळुहळु पुढें झालेल्या स्मृति व पुराणें यांनीं या सवलतीचा संकोच करून मांसाशन ब्राह्मणानाच काय पण इतरांनाहि वर्ज्य केलें व कालिवर्ज्य प्रकरणांत ' वरातिथिपितृभ्यश्च पशूपाकरणक्रिया ' म्हणजे मधुपर्क, श्राद्ध इत्यादि प्रसंगींच्या पशूवधाचाहि वर्ज्य गोष्टींत अन्तर्भाव केला. बाराव्या शतकापासूनच्या निबन्ध ग्रंथांत हें वचन आढळून येतें. प्रजापतिस्मृति [ १४८ ] म्हणते ' पुण्यप्राप्तीसाठीं प्राण्यावर करुणा करावी. अहिंसा हाच परमश्रेष्ठ धर्म आहे, यास्तव सर्वत्र आत्मवत् दृष्टि ठेवावी ' (कारुण्यं प्राणिषु प्रायः कर्तव्यं पुण्यहेतवे । अहिंसा परमो धर्मः तस्मादात्मवदाचरेत् ॥ ). कलियुगांत युगधर्मानुसार सर्व प्रकारच्या मांसाबरोबर मद्यहि

वर्ज्य करावें असें प्रजापतिस्मृति म्हणते [ मद्यमप्यमृतं श्राद्धे कलौ तत्तु विवर्जयेत् । मांसान्यपि हि सर्वाणि युगधर्मक्रमाद्भवेत् । १५१ ]. पुढें तर मांसाचें रूपान्तर माष [ उडीद ] होत अशी कल्पना करून श्राद्धादि प्रसंगीं माषान्न म्हणजे उडीद घालून केलेले वडे इत्यादिक आवश्यक ठरविण्यांत आले. प्रजापति म्हणतो, 'अतो माषान्नमेवैतत् मांसार्थे ब्रह्मणा कृतम् । पितरस्तेन तृप्यन्ति श्राद्धं कुर्यान्न तद्विना ' ॥ [ १५२ ]. अशा रीतीनें मांसान्नाच्या जागीं माषान्न बसविण्यात आलें व त्याची स्तुतीहि होऊं लागली. मांसाप्रमाणें माषहि बलसंवर्धक आहेत, तसाच त्यांना सुंदर वास व चव आहे असें सांगण्यात येऊं लागलें. प्रजापतीनें या विषयीं ' यथा बलिष्ठं मांसत्वान्माषान्नमपि तत्समम् । सौगन्धिकं च स्वादिष्ठं मधुरं द्रव्यभेदतः ' ( १५३ ) असें म्हटलें असून खाण्यासंबंधानें जे विधि निषेध घालून दिले आहेत ते देशधर्म युगधर्म इत्यादिकांना अनुसरून पाळावे असें सांगितलें आहे ( भक्ष्यं भक्षविधौ यत्तु गर्हितं तद्विवर्जयेत् । अभक्ष्यमपि भक्ष्यं स्याद्देशधर्मेण वै मुने । १५४ ). ही प्रवृत्ति इ. स. ७ व्या ८ व्या शतकापासून झाली.

मांस वर्ज्य करण्याची प्रवृत्ति झाली, तरी पंचमहापातकांत त्याची गणना कोणी केलेली नाहीं. हत्या, मद्यपान, चोरी, व्यभिचार इत्यादि कृत्यें सर्व धर्मांत महापातकें म्हणून सांगितलीं आहेत. ख्रिस्ती धर्मांत त्यांना प्रायमरी सिन्स म्हणजे मुख्य पातकें म्हणतात व खोटी साक्ष देणें याचाहि त्यांत अन्तर्भाव करतात. पण खोट्या साक्षीला आमच्याकडे महापातकांत घाललेलें नाहीं. असो. आज ज्या भलत्याच मोठेपणाच्या कल्पना झालेल्या आहेत तशा पूर्वी नव्हत्या व त्यामुळें भक्ष्याभक्ष्यावरून श्रेष्ठकनिष्ठपणाहि ठरवित नसत. मद्यपान हें स्मृतिकारांनीं महापातकांत घातलें आहे.पण अति प्राचीनकाळीं एकदां तें सभ्य लक्षणांत मोडत होतें असें दिसतें. आपल्या हातून अपराध घडतात ते कांहीं प्रसंगी सुरापानामुळें घडतात असें ऋग्वेदांतील एका मंत्रांत ऋषि वरुणाला म्हणत असल्याचें पूर्वी सांगितलें आहेच ( न स स्वो दक्षो वरुण ध्रुतिः सा सुरा मन्युर्विभीदको अचित्तिः । ऋ. ७,८६, ६ ). या शिवाय ' शतं कुंभानामसिञ्चन्त सुरायाः ' ( ऋ. १,११६, ७ ) इत्यादि मंत्रातहि सुरामाहात्म्य आलेलें आहे. ही सुरा सोमरसाहून भिन्न होती. कारण तैत्तिरीय संहितेंत ( २, ५, १, १ ) विश्वरूप त्वाष्ट्राचें वर्णन करतांना ' त्याला तीन तोंडें होतीं, एक सोम पिणारें, दुसरें सुरा पिणारें व तिसरें अन्न खाणारें ' ( तस्य त्रीणि शीर्षाण्यासन् सोमपानं सुरापानं अन्नादनम् ) असे शब्द योजिलेले आहेत. काठकसंहितेंतहि तसेंच सांगितलें असून ( १२, १० ) ऐतरेय ब्राह्मणांत ( ३७, ४ ) सुरा सोम यांना भिन्न म्हटलें आहे. सोमरस हा आजच्या चहा सारखा कांहीं तरी होता ! !

काठकसंहिताकाळीं सुरापानाचा त्याग होऊं लागला होता, निदान ब्राह्मण ती पिईनासे झाले होते. ' सुरा पिऊन लहानमोठीं माणसें म्हणजे सून व सासरा

एकत्र गोंधळ घालूं लागत. यास्तव पाप लागेल म्हणून ब्राह्मण सुरा पीत नाहीं असें ब्राह्मणानें क्षत्रियाला सागावें, ' असें काठकसंहितेंत ( १२. १० ) सांगतलें आहे. सौत्रामणी यागांत सुरेचें हवन केल्यावर राहिलेला भाग पिण्यासाठीं पेसै देऊन ब्राह्मण आणावा लागे. तसा ब्राह्मण वेळीं मिळत नसे व त्यामुळें तो न मिळाल्यास उरलेली ती सुरा वारुळाच्या छिद्रांत नेऊन ओतावी असें सांगितलें आहे ( ब्राह्मणं परिक्रीणीयादुच्छेषणस्य पातारम्। यदि ब्राह्मणं न विन्देत् वल्मीकवपाया-मवनयेत्। सैव ततः प्रायश्चित्तिः। तै. ब्रा. १, ८, ६, २ ). या गोष्टीचा शबरा-स्वामीनें ' सौत्रामण्यां च ग्रहेषु। तद्वच्च शेषवचनम्। ' जै. सू. ३, ५, १४–१५ ( या मीमांसासूत्रांवरील ) भाष्यांत उल्लेख केला आहे. पुढें सुरापान कलिवर्ज्य प्रकरणांत अंतर्भूत करण्यांत आलें व ' नराश्वमेधौ मद्यं च कलौ वर्ज्यं द्विजातिभिः ' असा त्याचा निर्देश ब्रह्मांडपुराणांत आढळत असल्याचें अपरार्कानें दाखविलें आहे.

पण याहि निषेधावर श्लेष होऊं लागले. विष्णुधर्मसूत्रांत ( २२, ८३–८५ ) मद्य दहा प्रकारचें सांगितलें आहे. ' माधूक, ऐक्षव, टाङ्क ( कवठाचें ), कौल ( जांभळांचें ), खर्जूर, पानस [ फणसाचें ], मृद्वीक ( द्राक्षांचें ), माध्वीक, मैरेय, व नारिकेलज. पुलस्त्यानें बारा प्रकारचीं मद्यें सांगितलीं आहेत. मनूनें गौडी, पैष्टी व माध्वी अशी तीन प्रकारची सुरा सांगितली असून ( ११, ९३ ) त्यांतील कोणताहि प्रकार द्विजांनीं पिऊं नये असा निषेध केला आहे. शंखस्मृतींतहि ' सुरां पिबन्ति त्रिदशाः सा चापेया द्विजातिभिः ' असा निषेध आढळतो. आपस्तंबानेंहि ' सर्वं मद्यमपेयम् ' ( १, ५, १७ २१ ) असा मद्याचा सर्वथैव निषेध केलेला आहे. कांहीं प्रकार क्षत्रियांनीं पिण्यास हरकत नाहीं, पण पैष्टी त्यांनीहि पिऊ नये. तंत्रवार्तिककार म्हणतो ' सर्वेच त्रैवर्णिकांना सुरा निषिद्ध आहे, पण मधु आणि सीधु यांचा क्षत्रिय व वैश्य यांना निषेध नाहीं. ' ब्रह्मचाऱ्याला मधु व मांस यांचा निषेध सर्वांनींच केला आहे; मानवगृह्यसूत्र ( १, १, १२ ), काठक गृ. सू. [ १, १, ७ ], आप. गृ. सू. [ १, १, ४, ६ ] इ० '

## शाकाहारांतील भक्ष्याभक्ष्यविचार

शाकाहाराच्या बाबतींतहि भक्ष्याभक्ष्याचे सूक्ष्म नियम आढळून येतात. अभोज्य पदार्थांचे अनेक प्रकार केलेले असून त्यांतील पहिला स्वरूपतः अभोज्य किंवा जातिदुष्ट असा आहे ( अभोज्यांत कित्येक प्राणी येतात त्यांचा उल्लेख पूर्वी केलाच आहे ). शाकाहारापैकीं पलांडु, लशुन, गृञ्जन ( गाजर ) हीं खाल्लीं असतां चांद्रायण केल्यावांचून शुद्धि होत नाहीं असें याज्ञवल्क्य सांगतो (१,१७६ पलांडुं... लशुनं गृञ्जनं चैव जग्ध्वा चांद्रायणं चरेत्). या बाबतींत आतां धर्मशास्त्र व वैद्यशास्त्र यांचा विरोध आला आहे. धर्मशास्त्र जे पदार्थ वर्ज्य मानतें तें वैद्यशास्त्र रोगनाशक, बलवर्धक असें

मानतें. लसूण धर्मशास्त्राला वर्ज्य वाटते, पण मधुरादि सहा रसांपैकीं एक अम्ला-शिवाय सर्व रस तींत आहेत, यास्तव ती खावी, तिची माळ गळ्यांत घालावी इत्यादि गोष्टी वैद्यशास्त्र अवश्य म्हणून सांगतें. व राहूच्या घशांत अमृत जात असतां त्याचें शिर कापल्यामुळें रक्तमिश्र अमृतबिन्दु पृथ्वीवर पडला त्यांतून लसूण उत्पन्न झाली, असेंहि वर्णन वैद्यक ग्रंथांनीं केलें आहे. धर्मशास्त्राप्रमाणें कलञ्ज म्हणजे पोपया, टोमाटो सारखे बिलबिलीत पदार्थ खाणें निषिद्ध तर वैद्यशास्त्राप्रमाणें ते पाचक व जीवन द्रव्ययुक्त आहेत. स्वरूपतः अभोज्यांत शेळीच्या दुधाखेरीज इतर द्विस्तन प्राण्याचें दूधहि शंखानें घातलें आहे ( सर्वासां द्विस्तनानां क्षीरमभोज्यमजावर्जम् ).

अभोज्यान्नाचे इतर प्रकार म्हणजे आश्रमदुष्ट, स्थानदुष्ट, कालदुष्ट, परिग्रहदुष्ट, संसर्गदुष्ट, क्रियादुष्ट, निमित्तदुष्ट, असे आहेत. मधु मांस क्षार इत्यादि ब्रह्मचाऱ्याला व गांवांतून आणलेलें अन्न वानप्रस्थाला आश्रमामुळें अभक्ष्य होय. बाजारांतून आणलेलें अन्न स्थानदुष्ट होय. पण मांस, मध, मीठ हीं बाजारांतलीं चालतील असें आपस्तंब म्हणतो ( १, ५, १७, १४-१५ ). शिळें अन्न कालदुष्टांत मोडतें, तें खाऊं नये; पण त्याला फणफणणारें ताक, पोहे, सातु, भाज्या, पीठ, दहीं, कंद, मुळें, फळें असे अपवाद आपस्तंबानें सांगितले आहेतच ( १, ५, १७, १७-१९ ). वेश्येकडील अन्न, गणान्न, बहिष्कृतांकडचें अन्न हीं परिग्रहदुष्ट होत. कुत्रा, कावळा इत्यादिकांचा स्पर्श झालेलें अन्न, पायाला लागलेलें अन्न, केश किंवा कीड गेलेलें अन्न हीं संसर्गदुष्ट होत, तीं खाऊं नयेत ( मनु. ५, १२५ ). गाईनें हुंगलेलें अन्न, क्रियादुष्ट आसून अशौचातील अन्न निमित्तदुष्ट समजावें ( नाशौचे कस्यचिदन्नमश्नीयात् । विष्णु २२, ७ ).

कोणाच्या हातचें खावें, याविषयावरहि मतभेदाचीं रणें असून त्यांत पुनः आश्रमभेद, वर्णभेद, युगभेद या कारणांनीं फरक सांगितले आहेत. ब्रह्मचाऱ्यानें कोणत्याहि वर्णाच्या माणसाकडून अन्न घ्यावें, मात्र पतिताकडून म्हणजे महापातक्याकडून घेऊं नये असें गौतम म्हणतो ( २, ४१ ). मनूचेंहि मत बहुतेक तसेंच आहे ( २, १८३-१८५ ). अपपात्र ( ज्यांनीं भांडें घेतलें असतां तें वापरतां येत नाहीं असे लोक ) किंवा पतित यांच्याशिवाय कोणाकडूनहि ब्रह्मचाऱ्यानें भिक्षा आणावी, असें आपस्तंब सांगतो ( १, १, ३, २५ ). स्नातक आणि गृहस्थ यांनीं शूद्रांशिवाय कोणत्याहि धार्मिक त्रैवर्णिकांकडून अन्न घ्यावें आणि शूद्रहि जर त्याचा निकटवर्ती असेल तर त्याच्याकडूनहि घ्यावें असें आपस्तंब सांगत असून ( १, ६, १८, १३-१४ ), याज्ञवल्क्याच्या मतें आपला नोकर, नापित गवळी, कुलमित्र, अर्धेलीनें शेत करणारा हे शूद्र असले तरी त्यांच्या हातचेंहि खाण्यास हरकत नाहीं (शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्धसीरिणः । भोज्यान्ना नापितश्चैव यश्चात्मानं निवेदयेत् । १, १६६ )

पुढें हे सर्व प्रकार कलिवर्ज्यांत ढकलले गेल्यामुळें बंद झाले. मनूनें तोच आशय सांगितला असून ( ४, २५३ ) गौतमानें 'वणिक्चाशिल्पी' म्हणजे अशिल्पी असा वैश्य अथवा कुंभार यांची भर घातली आहे ( १७, ६–७ ). आपस्तंबानें ( १, ६, १९, २–११ ) 'क आश्यान्नः' म्हणजे कोणाच्या हातचें अन्न खावें असा प्रश्न करून व त्यावर निरनिराळीं मतें दाखवून शेवटीं असा निर्णय दिला आहे कीं 'पुण्यस्येप्सतो भोक्तव्यम् । पुण्यस्यानीप्सतो न भोक्तव्यम् । यतः कुतश्चाभ्युद्यतं भोक्तव्यम् ।' पवित्र व मनापासून अन्न देणाऱ्याच्या हातचें खावें, पण मनापासून न देणाऱ्याच्या हातचें खाऊं नये, प्रसंगीं तर कोणीहि आणून देईल तें खावें.

कोणी शिजविलेलें अन्न खावें, या विषयावरहि मतभेद आहेत. त्रैवर्णिकांनीं त्रैवर्णिकांकडे जेवावें असा पूर्वीचा प्रकार होता. पण आता कांहीं ब्राह्मणहि दुसऱ्या कांहीं ब्राह्मणांकडे जेवत नाहींत. वैष्णव अवैष्णवांकडे जेवत नाहींत, अशीं उदाहरणें दृष्टीस पडतात. अशा कल्पनांमुळें सतरा पुरभय्ये तर अठरा चुली, असे प्रकार आपल्या समाजांत आढळतात. पंडित मदन मोहन मालवीय आपलें आपण शिजवून खाणाऱ्या पैकींच आहेत. पण राष्ट्रकार्याची हांक ऐकतांच त्यांनीं विलायतेस जाण्यासहि मागें पुढें पाहिलें नाहीं. ज्यांच्याकडे जेऊं नये अशांची जी लांबलचक नामावळी दिलेली आहे, तिचा विचार केल्यास आपल्याला बाहेर कोठें जेवणेंच अशक्य होईल. त्या नामावळींत अग्निहीन ( अग्निहोत्र न पाळणारा ), कदर्य (चिकू माणूस), बद्ध, चोर, क्लीब, रंगावतारी ( नट ), वेण ( बुरुड ), अभिशस्त ( पातकी ), वार्धुषिक ( व्याज घेणारा सावकार ), दीक्षित ( यज्ञदीक्षा घेऊन अग्निषोमीय होण्यापूर्वी ), बहुयाजक, चिकित्सक ( वैद्य ), आतुर ( असाध्य रोगानें पछाडलेला ), क्रुद्ध, पुंश्चलीदत्त, विद्विष् (द्वेष करणारा ), क्रूर, उग्र, पतित, व्रात्य, दाम्भिक, उच्छिष्टभोजी, अवीरस्त्री, स्वर्णकार, स्त्रीजित, ग्रामयाजिन् ( गांव जोशी ), शस्त्रविक्रयिन्, कर्मार ( लोहार ), तन्तुवाय ( कोष्टी ), श्ववृत्ति ( पाय धुणें इत्यादि हलकीं कामें करणारा ), नृशंसराज, रजक ( धोबी ), कृतघ्न, वधजीविन्, चेलधार, सोमविक्रयी, बन्दिन् ( भाट ) अशा लोकांचा समावेश केलेला असून वासिष्ठ ( १४, २–११ ), विष्णु ( ५७, २–५ ), याज्ञवल्क्य ( १,१५९–१६४ ), मनु ( ४, २०५–२२० ) इत्यादि ठिकाणीं त्यांचीं नांवें आढळून येतील. याशिवाय मुलीला मूल झालें नाहीं तोंपर्यंत तिच्याकडे जेऊं नये ( स्वसुता अप्रजा तावत् नाश्नीयात्तद्गृहे पिता । ३०५) असें अत्रीचें ह्मणणें आहे. कांहीं पदार्थ कोणाकडूनहि घेतले तरी चालतात. जळवणाचीं लाकडें, यवस, फळेंमुळें, मध, दूध, दहीं, लाह्या, फुलांच्या माळा, इत्यादि असले पदार्थ होत. गौतमधर्मसूत्र ( १७, ३–४ एधोदकयवसमूलफलं...मार्ग–शाकान्यप्रणोद्यानि सर्वशः । ),

मनु (४, २५० शय्यां गृहान्कुशान्...धाना मत्स्यान्पयो मांसं शाकं चैव न निर्नुदेत्।), अत्रि ( २५०–२५१ आर्द्रं मांसं घृतं तैलम्...स्नेहपक्वं च तक्रं च शूद्रस्यापि न दुष्यति। ) यांत असले पदार्थ सांगितले असून त्यांत मतभेद दिसतातच

## पंक्तिभेद

एकपंगत आणि सहभोजन हेहि विषय भक्ष्याभक्ष्यविचारांत येतात. सहभोजन ह्मणजे एका ताटांत जेवणें किंवा एकमेकाजवळ बसून जेवणें असाहि अर्थ होतो. ऐतरेय आरण्यकांत ( ५, ३, ३. १८ ) 'नेदंविद् अनेदंविदा समुद्दिशेन्न सह भुंजीत न सधमादी स्यात्'—हें जाणणारानें न जाणणाऱ्या बरोबर जेऊ नये, असें सांगून विशिष्ट सहभोजनाचा निषेध केला आहे. ज्यांच्यांशीं सहभोजन करूं नये असें सांगितलें त्यांच्याशीं जेवावयास बसलें असतां उदक, भस्म, द्वार, वाट, इत्यादि मध्यें आल्यास दोष लागत नाहीं असें लघुहारीतांत ( ७४ ) व बृहस्पति-स्मृतींत ( अपरार्कानें उद्धृत केलेल्या वचनांत ) सांगितलें आहे [उदकं च तृणं भस्म द्वारः पंथास्तथैव च। एभिरन्तरितं कृत्वा पंक्तिदोषो न विद्यते। लघुहारीत; 'अग्निना भस्मना चैव सलिलेन विशेषतः। द्वारेण स्तंभमार्गेण षड्भिः पंक्तिर्विभिद्यते ]

## उपसंहार

या सर्व गोष्टींचा विचार करतां प्रस्तुत स्थितींत आपण काय करावें याचा निर्णय करणें कठीण नाहीं. स्वतःच्या घरांत वाटेल तें ज्यानें त्यानें करावें, पण सभा संमेलनें इत्यादि सार्वजनिक ठिकाणीं पंक्तीचे वाद माजाविणें अयुक्त होय. सार्वजनिक ठिकाणीं शाकाहार असल्यास पंक्तिभेद मानूं नये. शाकाहारी कुटुंबांकडे कोणालाहि जेवावयास अडचण नसावी, अशा प्रकारचा आचार प्रचलित झाला पाहिजे. शाकाहारी व मांसाहारी ह्यांच्या भावनांतच थोडा फरक असल्यामुळें शाकाहाऱ्यांना मांसाहारी म्हणून प्रसिद्ध असलेल्या वर्गांकडे भोजन करण्यास सांगणें आज तरी व्यवहार्य नाहीं, परंतु शाकाहाराचा पाक असतांना दोन्ही प्रकारच्या लोकांना एका पंक्तींत बसण्याचा आचार लोकमान्य व्हावा इतकेंच आज म्हणणें आहे. शास्त्रांत अभक्ष्य पदार्थांचें जें विवेचन आहे, त्यांतील टोमाटो, लसूण, कांदा, गांजर, कोहळा, डीक, हिंग, शेवग्याच्या शेंगा, यांचा निषिद्धपणा आतां बहुतेक गेला आहे, तेव्हा त्या दृष्टीनें कांही अडचण येणार नाहीं. या वर्ज्य पदार्थांत जीवनतत्वांचा ( Vitamine ) बराच भाग असतो, म्हणून ते सर्वत्र खाण्यांत येतात. परिस्थितीप्रमाणें खाळावळींत जेवल्याशिवाय पुष्कळांना गत्यंतर नसतें. तेव्हां पूर्णपणें शाकाहार असलेल्या सार्वजनिक ठिकाणीं पंक्तिभेद न मानतां खोट्या श्रेष्ठकनिष्ठ भावाची कल्पना विसरून सर्वांनीं एकपंक्तींत बसून जेवण्यास हरकत नाहीं. शेंपन्नास वर्षांनीं बहुतेक सर्वच मांसनिवृत्त होतील किंवा बहुतेकांस व्हावे लागेल असें माझें मत मी पूर्वीं सांगितलेंच आहे.

# स्त्रिया, त्यांचीं कर्तव्यें आणि हक्क



हा विषय पुरुष आणि स्त्रिया या दोघांनाहि महत्वाचा आहे. स्त्रियांचीं कर्तव्यें आणि हक्क ह्मणजे केवळ आजचीं कर्तव्यें व हक्क असा अर्थ नाहीं. ऐतिहासिक दृष्टयाच या विषयाचा विचार प्रस्तुत करावयाचा आहे. या विषया संबंधाच्या कित्येक गोष्टी पूर्वी संस्कार, विवाह इत्यादिकांच्या विवेचनांत येऊन गेल्याच आहेत. या व्याख्यानांत त्यांचा सामाजिक दर्जा व हक्क कसे काय होते हें पहावयाचें आहे. समाजांत स्त्री अनेक नात्यांनीं वावरते. आई, मुलगी, बायको, बहीण इत्यादि नातीं तिचीं असतात. हीं निरनिराळीं नातीं घेऊन या विषयाचा विचार करूं. स्मृतींत अनेक विषय येतात. उदाहरणार्थ याज्ञवल्क्यस्मृति घेतली तर तिचे तीन भाग आहेत, आचाराध्याय, व्यवहाराध्याय व प्रायश्चित्ताध्याय. यांतील व्यवहाराध्यायांत माणसाचे खासगी अधिकार, वाक्पारुष्य, दंडपारुष्य, दायभाग, दान इत्यादि विषय येतात. या व्याख्यानांत स्त्रियांसंबंधानें हें व्यवहारकांड काय ह्मणतें याचाच थोडक्यांत विचार करावयाचा आहे.

सामान्यतः सर्व सुधारलेल्या समाजांत पुरुष व स्त्रिया यांची संख्या थोड्या बहुत फरकानें समान असते. निसर्गाचीच ही योजना आहे. ह्मणजे असें ह्मणतां येईल कीं, समाजरूपी रथाचीं दोन चाकेंच पुरुष व स्त्रिया हीं होत 'यथा ह्येकेन चक्रेण न रथस्य गतिर्भवेत्' जसा एकाच चाकानें रथ चालूं शकत नाहीं, त्याप्रमाणें स्त्रीपुरुषांच्या सहकार्याशिवाय समाजहि चालणार नाहीं. समाजाचा उत्कर्ष या सहकार्यावर अवलंबून आहे. कित्येक लोक स्त्रियांचाच कैवार घेऊन बोलतात तर दुसरे त्यांची सर्वथैव निंदा करून त्यांना मूर्ख साहसी अशीं दूषणें देतात. 'अनृतं साहसं माया मूर्खत्वमतिलोभिता' इत्यादि दुर्गुण स्त्रियांत स्वाभाविकपणेंच असतात असें या दुसऱ्या पक्षाचें म्हणणें असतें. धर्मशास्त्रांचे ग्रंथ पुरुषांनीं केले त्यावेळीं स्त्रिया विद्वान् नव्हत्या निदान लेखक नव्हत्या. यास्तव त्यांच्याविषयीं एकपक्षीं लिहिण्यांत आलें असें म्हणतात. पण धर्मशास्त्रांत स्त्रियांची स्तुति जशी येते तशी निंदाहि येते. पुरुष हे सारे अरेराव व जुलमी, स्त्रियांनीं आपल्याला देव मानावें असें समजणारे आहेत असें स्त्रियांनीं समजणें व उलट स्त्रिया म्हणजे साऱ्या मूर्ख लबाड असें पुरुषांनीं प्रतिपादणें हीं दोन्हीं अयुक्तच. स्त्रिया म्हणजे

येथून तेथून साऱ्या देवी व पुरुष तेवढे सगळे जुलमी असें म्हणणेंही चुकीचें आहे. सगळ्याच स्त्रिया तारा मंदोदरीच्या वर्गांतील आहेत किंवा त्या पुढें मागें साऱ्या देवता ( Angels ] होतील असेंहि नाहीं.

पूर्वीच्या ग्रंथांत पुरुषग्रंथकारांनीं स्त्रियांची बाजू मांडली नाहीं हें थोडेसें खरें असलें तरी स्त्रियांचा कैवार घेणारे कांहीं ग्रंथकार झाले आहेत. उदाहरणार्थ याज्ञवल्क्यस्मृतीवरील विज्ञानेश्वराच्या मिताक्षरानामक टीकेवर बालंभट्टी म्हणून जी टीका आहे तिच्याविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे. ही टीका लक्ष्मीदेवी नामक स्त्रीच्या नांवावर कांही जण घालतात; पण खरा प्रकार तसा दिसत नाहीं. या टीकेंत स्त्रियांचा फार कैवार घेतलेला आढळतो म्हणून ती स्त्रीकृत आहे असें समजतात व त्या कारणास्तव 'पत्नी दुहितरश्चैव पितरौ भ्रातरस्तथा' (या. २, १३५–१३६) इत्यादि श्लोकांवरील बाळंभट्टी टीकेंत 'भ्रातरः' शब्दांत बहिणीचाहि अंतर्भाव होतो असें जें सुचविलें आहे, त्याला मुंबई हायकोर्ट मान्यता देत नाहीं. पुत्रहीन स्थितींत पुरुषाला मरण आल्यास त्याची संपत्ति कोणाकडे कोणत्या क्रमानें जावी हें या श्लोकांत सांगतांना प्रथम पत्नी, मग कन्या, त्यानंतर आईबाप, नंतर भाऊ, त्यांच्या नंतर भावांचे मुलगे, मग इतर गोत्रज व बंधु इत्यादि क्रम दिला असून बहिणीचा उल्लेख केलेला नाहीं. त्यामुळें बहिणीला भावाच्या द्रव्यांत वारसा केव्हांहि नाहीं असें सर्वजण म्हणतात. पण बाळंभट्टींत 'पुमान् स्त्रिया' या पाणिनिसूत्रानुसार 'भ्रातरः' हा एकशेष समजून बहिणींचाहि त्यांत अंतर्भाव केलेला आहे. अशा रीतीनें ही बालंभट्टी स्त्रियांची कैवारी आहे. तिचें कर्तृत्व स्त्रीकडे नसलें तरी इतर कांहीं शीला, विज्जा इत्यादि स्त्रिया प्राचीन काळीं काव्यकर्त्या म्हणून प्रसिद्ध होत्या. लीलावती नामक सुप्रसिद्ध स्त्री ज्योतिषी भास्कराचार्य यांची कन्या असून तिनेंच लीलावती नामक गणितशास्त्रावरील ग्रंथ रचिला असें म्हणतात; निदान तो तिच्यासाठीं रचिलेला होता असें दिसतें. धर्मशास्त्रावर सुद्धां यापुढें स्त्रिया ग्रंथ लिहूं लागतील यांत शंका नाहीं. हिंदु कायद्यासंबंधानें कु. बालुताई खरे व रा. केळकर यानीं 'हिंदुव्यवहारशास्त्र' नावाचा ग्रंथ अलीकडे लिहिलेला आहेच.

चाळीस वर्षांपूर्वीची आमच्या स्त्रियांची स्थिति त्यांच्या आजच्या स्थितीशीं ताडून पाहिल्यास यापुढें स्त्रिया धर्मशास्त्र, समाजशास्त्र, इत्यादि अनेक विषयांवर ग्रंथ लिहिण्यास समर्थ होतील असें सहज दिसून येईल. स्त्रियांना शिकून काय करावयाचें ? त्यांना काय नोकऱ्या करावयाच्या आहेत ? असे प्रश्न बहुधा त्यावेळीं विचारण्यांत येत. पण आतां तसले प्रश्न कोणी विचारीत नाहींत. उलट नवीन तरुण लग्न करतांना वधू किती शिकलेली आहे हेंच पाहातात; कोणी बी. ए. बायको पाहिजे म्हणतो तर कोणी मॅट्रिक तरी पाहिजे म्हणतो. मुलींना शिकवावें कीं नाहीं असाच जेथें वाद होता तेथें स्त्रियांच्या स्वतंत्र विद्यापीठाचा प्रश्नच नव्हता. पण आतां त्यांच्यासाठीं स्वतंत्र

विद्यापीठ प्रो. कर्वे यांनीं काढलें आहे. इतकी प्रगति आज चाळीस वर्षांत झाली. अर्थात स्त्रिया यापुढें आपलीं कर्तव्यें व हक्क यांना जागूं लागतीलच. पण या बाबतींत एवढें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, जेव्हां पूर्वीचे धर्मशास्त्रकार स्त्रियांच्या हक्का- वर गदा आणतात असें दिसतें, तेव्हां ते त्या स्त्रिया म्हणून तसें करतात असें मात्र नाहीं. सामाजिक जबाबदारीची जी कल्पना त्यावेळी रूढ होती, तिला अनुसरून त्यांनी निर्बंध घातले होते. पण त्यावरून स्त्रियांची निंदाच करण्याचा त्यांचा हेतु होता असें म्हणता येत नाही. मनूनें स्त्रियांना जशी दूषणें दिली आहेत, तशी त्यांची स्तुतिहि त्यानें पुष्कळच केलेली आहे. ' न हि निंदा निन्द्यं निन्दितुं प्रवृत्ता ' म्हणजे निंदा ही केवळ निंदेसाठीं नसते, तर कर्तव्य गोष्टीवर विशेष भर देण्यासाठीं असते. उदाहरण, दूध विकणारा ब्राह्मण तीन दिवसांनीं शूद्र होतो असें जेव्हा स्मृति सांगतात, तेव्हा त्याचा अर्थ तो खरोखर तिसऱ्या दिवशी शूद्र होतो असा नसून त्यानें दूध विकूं नये एवढेंच सांगण्याचा हेतु असतो. तसें नसतें, तर त्याच्या मुलमुलींना ब्राह्मण घराण्यांत स्थळें मिळण्याची पंचाईत पडली असती. पण तसा त्या निंदेचा अर्थ नाहीं.

प्रस्तुतच्या स्त्रीविषयक विशिष्ट कल्पना आपण पाश्चात्यांकडून घेतल्या आहेत. पण जरा इतिहासाकडे वळून पाहिल्यास काहीं काळापूर्वी यूरोपांत तरी स्त्रियांची स्थिति काय दृष्टीस पडते ? पंधरा सोळाशें वर्षांपूर्वीच्या होऊन गेलेल्या याज्ञवल्क्य स्मृतीनें स्त्रियाना जी पदवी समाजांत दिली तिच्या दशांशहि इंग्लिश स्त्रियाची स्थिति अवघ्या साठ वर्षांपूर्वी नव्हती. सन १८७३ या वर्षी इंग्लडात ' विवाहित स्त्रीविषयक कायदा ' ( Married Women's Property Act ) झाला. त्या पूर्वीच्या कायद्यानें एखाद्या स्त्रीला तिचा बाप, भाऊ अशा नातेवाईकाकडून स्थावर जंगम संपत्ति मिळाली तरी विवाहानंतर ती तिच्या नवऱ्याकडे जाई. जंगम संपत्तीचा नव- ऱ्यानें वाटेल तसा व्यय करावा, त्यांत बोलण्याचा त्या स्त्रीला अधिकार नसे. स्थावर संपत्तीवरहि नवऱ्याचाच अधिकार त्याच्या हयातीपर्यंत असे. आजहि जर १८७३ पूर्वी लग्न झालेलें एखादें जोडपें हयात असेल तर त्याला जुना कायदाच लागू होईल. त्या- नंतरच्या लग्नांना मात्र नवा कायदा लागू आहे. एखाद्या मनुष्याची स्थावर संपत्ति असून मृत्युपत्र केल्याशिवाय जर तो निपुत्रिक मृत झाला तर ज्येष्ठाधिकाराच्या ( Primogeniture ) नियमानुसार ती त्याच्या बायकोला न मिळतां हयात अस- लेल्या त्यांतल्या त्यात जवळच्या पुरुष नातेवाईकाला मिळे. पण याज्ञवल्क्यस्मृतीप्रमाणें अशा मनुष्याची संपत्ति प्रथम त्याच्या स्त्रीला मिळणार; स्त्री नसेल तर मुलींना, व त्या नसतील तर मुलीच्या मुलाला, नंतर आईबापांना, या क्रमानें ती मिळावयाची असते ( पत्नी दुहितरश्चैव इ० या. स्मृ. २, १३५ ). आमच्या स्मृति- कारांनीं स्त्रीधन स्वतंत्रपणें सांगितलें असून नवरा जर त्याला विशिष्ट बिकट प्रसंगा- शिवाय हात लावील, तर त्याला चोर समजून राजानें त्याला दंड करावा असें म्हटलें

आहे. व्याधिग्रस्त झाल्यामुळें औषधपाण्यासाठीं किंवा धनकोनें धरणें धरल्यास त्या-प्रसंगी मात्र स्त्रीधनाचा उपयोग नवऱ्याला करता येई. हिंदु व इंग्लिश या दोन्ही कायद्यात असा फरक आहे. मुसल्मानी कायद्यात मुलाबरोबर मुलींनाहि बापाच्या संपत्तीचा काही भाग मिळतो. आई, बायको, मुली, मुलगे या सर्वांमध्यें षष्ठांश, अष्टमांश अशा प्रमाणांत संपत्तीची विभागणी झाल्यामुळें एखाद दुसऱ्या पिढींतच मोठी संपत्ति देखील त्या कायद्यामुळें तुकडे तुकडे होऊन नष्ट होते. पण आमच्या कायद्याप्रमाणें एक एकटाच वारस होतो व त्यामुळें संपत्ति बराच काळ एकत्र राहूं शकते. संपत्तीच्या वारसदारांमधील वाटणीसंबंधाच्या या विविध कायद्यांतील कोणता उत्तम आहे हें सांगणें कठीण आहे. वस्तुतः त्याची तुलना करणेंच योग्य नव्हे. इ. स. पूर्वी किंवा त्यानंतर थोड्याच काळांत झालेले स्मृतिकार आणि आजच्या काळातील कायदे यांची तुलना कशी होऊं शकेल ?

स्त्री पुरुष या दोहोंना आत्मा, मन, शरीर हीं असल्यामुळें दोहोंच्याहि बाबतींत त्या सर्वांचा विकास झाला पाहिजे ही गोष्ट योग्य आहे; पण त्याबरोबर हेंही लक्षात ठेविलें पाहिजे कीं, स्त्रिया व पुरुष यांच्यांत कांहीं बाबतींत निसर्गानेंच फरक केलेला आहे. प्रजोत्पत्ति व बालसंगोपन या गोष्टी निसर्गानें स्त्रियांकडेच सोंपविल्या आहेत व त्या दृष्टीनें स्त्रिया आणि पुरुष याच्या कर्तव्यांत स्वाभाविकपणेंच थोडा बहुत भेद होणें अपरिहार्य आहे. आमच्या धर्मशास्त्रांत विवाहाचें ध्येय धर्म व प्रजा हें सांगितलें असून त्याविषयीं पूर्वीच्या व्याख्यानांत विवेचन येऊन गेलेंच आहे. पण आज तसें ध्येय मानण्याची प्रवृत्ति कमी कमी होऊं लागली असून भोग भोगण्याची प्रवृत्ति वाढत आहे. मुळांत हेतूच बदलल्यामुळें त्यावर उभारलेले विधिनिषेध आतां कसेसेच वाटूं लागले आहेत. पूर्वी पुत्र पाहिजे ही कल्पना जोरांत होती. पुत्राच्या योगानें पितृऋण फेडण्याची कल्पना तेव्हां होती. तिला अनुसरून पुत्राला जें महत्व मिळालें, त्यामुळें स्त्रियांविषयींच्या कित्येक कल्पना उत्पन्न झाल्या. पण पाश्चात्य देशांतहि ज्येष्ठापत्याच्या अधिकाराचा (Primogeniture) कायदा पुरुषानाच लागू होता, मुलगी वडील असेल तर तिला कांही बापाची संपत्ति मिळत नसे. आपल्याकडेहि वतनाचे हक्क स्त्रियांना मिळत नाहींत. असले कायदे राष्ट्राचें धोरण पाहून केलेले असतात. असो. समाजांत स्त्रियाचें नातें अनेक प्रकारचें असतें हें पूर्वी सांगितलेंच, त्या विविध नात्यांनीं स्त्रियांची स्थिति कशी दिसून येते तें आतां क्रमशः पाहूं.

## सामान्य दृष्टीनें विचार

स्त्रियांच्या शिक्षणाचा प्रथम विचार करूं. प्राचीनकाळीं स्त्रियांना शिक्षण अवश्य होतें असेंच दिसून येतें. परमेश्वराचे निश्वासभूत जे वेद × त्यांतील कित्येक सूक्तांच्या

× यस्य निश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत् । निर्ममे तमहं वन्दे विद्यातीर्थ–महेश्वरम् ॥ सायणभाष्य; ‘ अस्य महतो भूतस्य निश्वसितमेतद्यदृग्वदो यजुर्वेदः सामवेदः’ (बृह. उ. २. ४. १०)

कर्त्या किंवा द्रष्ट्या स्त्रिया आहेत. ऋग्वेदाच्या दहाव्या मंडळाच्या ३९ व ४० या सूक्तांची कर्त्री घोषा नांवाची स्त्री आहे. ही घोषा काक्षीवताची कन्या असून ( युवा ह घोषा पर्यश्विना यती राज्ञ ऊचे दुहिता पृच्छे वां नरा ॥ ५ ) तिला श्वेतकुष्ठाचा रोग होता. तेव्हा तिनें अश्विनाचें स्तवन केलें आणि त्यांनी संतुष्ट होऊन तिला रोगमुक्त केलें इतकेंच नव्हे, तर दिव्य असा पतीहि मिळवून दिला. घोषायै चित् पितृषदे दुरोणे जूर्यन्त्या अश्विना वदत्तम् ॥ ऋ. १,११७,७. रोगग्रस्त असल्यामुळें तिचें लग्न होईना व पित्याच्या घरींच ती वृद्ध होऊं लागली होती, असें वर्णन या मंत्रात आहे. अपाला आत्रेयी ही आणखी एक स्त्री एका सूक्ताची द्रष्ट्री किंवा कर्त्री आहे (ऋ. ८, ९१ ). अथर्ववेदांत ( ११, ५, १८ ) कन्या ब्रह्मचर्याच्या योगानें तरुण पति मिळविते असें ह्मटलें आहे (ब्रह्मचर्येण कन्या युवानं विन्दते पतिम् ।). यावरून मुलींच्या उपनयनाचीहि कल्पना होते. बृहदारण्यकोपनिषदांतील मैत्रेयी याज्ञवल्क्य संवादहि ( २, ४ ) या विषयीं महत्वाचा आहे. याज्ञवल्क्याच्या कात्यायनी व मैत्रेयी अशा दोन स्त्रिया असून कात्यायनी संसारी व मैत्रेयी तत्वज्ञानी होती. तो विरक्त होऊन संन्यास घेऊं लागला त्यावेळीं संपत्तीची वांटणी दोन्ही स्त्रियांत करावी असें त्यानें ठरविलें. तेव्हा मैत्रेयी म्हणाली ‘ ज्याच्या योगानें अमृतत्व मिळत नाहीं, तें वित्त मला नको. यास्तव तुमच्या जवळ अमृतत्व देणारें जें ज्ञान आहे तेंच मला सांगा ’ ( येनाहं नामृता स्यां किमहं तेन कुर्यां यदेव भगवान्वेद तदेव मे ब्रूहि । ). तेव्हा ‘ ठीक आहे तूं मला प्रिय तेंच बोललीस, यास्तव तूं मला प्रिय आहेस, तर चल, तुला तें ज्ञान सांगतों. ऐक आणि त्याचें मनन कर ’ ( प्रिया बतारे नः सती प्रियं भाषसे । एहि आस्स्व व्याख्यास्यामि ते व्याचक्षाणस्य तु मे निदिध्यासस्व ) असें म्हणून याज्ञवल्क्यानें मैत्रेयीला ‘ न वा अरे पत्युः कामाय पतिः प्रियो भवति आत्मनस्तु कामाय पतिः प्रियो भवति । ’ इत्यादि अनेक उदाहरणें सांगून शेवटीं ‘ आत्मा वा अरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः । मैत्रेयि, आत्मनो वा अरे दर्शनेन श्रवणेन मत्या विज्ञानेनेदं सर्वं विज्ञातम् ’ । हा उपदेश केला. याच उपनिषदांत पुढें ( ३,६,१ ) गार्गी वाचक्नवी व याज्ञवल्क्य यांचा संवाद आला आहे. गार्गी याज्ञवल्क्याला विचारते ‘ हें सर्व जग पाण्यावर आधारलेलें आहे, पण पाणी कशावर आधारलेलें आहे?’ त्यानें ‘ वायौ ’ असें सांगितलें तेव्हां ‘ वायु कशावर आहे ?’ असें पुनः गार्गी विचारते. असें होतां होतां शेवटीं सर्व लोक ज्या ब्रह्मलोकावर आधारलेले आहेत, तो ब्रह्मलोक कशावर आहे, असा तिनें प्रश्न विचारला, तेव्हां ‘हे गार्गि, या पलीकडे विचारूं नकोस, ज्या विषयीं प्रश्न करणें अयुक्त तें तूं विचारीत आहेस, तसें विचारूं नको, विचारशील तर तुझें डोकेंच जाईल, ’ ( अथ हैनं गार्गी वाचक्नवी पप्रच्छ याज्ञवल्क्येति होवाच । यदिदं सर्वमप्स्वोतं प्रोतं च

कस्मिन्नु खलु आप ओताश्च प्रोताश्च ।......कस्मिन्नु खलु ब्रह्मलोका ओताश्च प्रोताश्चेति । स होवाच गार्गि माऽतिप्राक्षीर्मा ते मूर्धा व्यपप्तदनतिप्रश्न्यां वै देवतामति पृच्छसि गार्गि माऽतिप्राक्षीरिति ). कारण यापुढें तर्क चालणार नाहीं, त्या गोष्टी आगमानेंच जाणल्या पाहिजे; ' अचिन्त्याः खलु ये भावा न तांस्तर्केण योजयेत् ' ।. अशा प्रकारचे वाद स्त्रिया करीत, यावरून त्यांच्या शिक्षणाची कल्पना सहज येईल. बृहदारण्यकांतच आणखी एका ठिकाणीं ( ६, ४, १७ ) विद्वान मुलगी व्हावी असें वाटल्यास काय करावें हें सांगताना ' सर्वमायुरियात् ' हा मंत्र म्हणून तीळ तांदूळ शिजवून केलेली खिचडी खावी असें म्हटलें आहे. स्त्रीशिक्षणासंबंधानें वैदिक वाङ्मयातील निर्देश असे आहेत.

हारीत धर्मसूत्रांत दोन प्रकारच्या स्त्रिया सांगितल्या आहेत: 'ब्रह्मवादिन्यः' व 'सद्योवध्वः '. सद्योवध्वः म्हणजे लग्न करून संसारात पडणाऱ्या आणि ब्रह्मवादिन्यः म्हणजे वेदाभ्यास करणाऱ्या. त्यात 'ब्रह्मवादिनीनामुपनयनमग्नीन्धनं वेदाध्ययनं स्वगृहे च भिक्षाचर्या' असें म्हणून ब्रह्मवादिनीनां उपनयन, अग्नीला समिधू देणें, वेदाभ्यास इत्यादि संस्कार कर्तव्यें सांगितलीं आहेत. पाणिनीनें ( ४, १, ३३ ) ' पत्युर्नो यज्ञसंयोगे ' या सूत्रात पतीपासून नी प्रत्यय लागून पत्नी शब्द झाला असें सांगताना यज्ञांत नवऱ्याबरोबर भाग घेते ती पत्नी असें म्हटलें आहे. पुढें त्याचा भाष्यकार पतंजलि म्हणतो ' पति शब्द ऐश्वर्यवाची आहे, कारण गृहस्थाला जे पंचमहायज्ञ करावयाचे असतात, त्यांचा तो ईश म्हणजे स्वामी आहे. ' या पंचमहायज्ञात स्त्रीचा सहकार लागतो म्हणून ती पत्नी. पाणिनीनें ( ४. १. १४ ) स्त्रीशिक्षणाची स्थिति दर्शविणारे ' काशकृत्स्ना ' आणि 'आपिशला' असें दोन शब्द व्युत्पादिले. काशकृत्स्निकृतमीमांसा शास्त्राचें अध्ययन करते ती काशकृत्स्ना ब्राह्मणी; आपिशलाचें, अध्ययन करणारी ब्राह्मणी ती आपिशला (वार्तिक–' पूर्वसूत्रनिर्देशोपिशलमधीते इति ). मीमांसा शास्त्राचें अध्ययन आज देखील फार थोडे पुरुष करतात. पण पाणिनि व कात्यायन याचे कालीं स्त्रियाहि तें करीत; या शिवाय उपाध्यायानी व उपाध्याया अशीं उपाध्याय शब्दाचीं दोन स्त्रीलिंगी रूपें देऊन उपाध्यायाची स्त्री ती उपाध्यायानी व प्रत्यक्ष स्वतः शिकविणारी ती उपाध्याया असा त्यांतील भेद पाणिनीनें दाखविला आहे. पाणिनीनें जे शब्द साधून दाखविले आहेत ते प्रचारांत होते म्हणून साधिले हें उघड आहे. पूर्व मीमांसेंत ' दंपत्योः सहाधिकारः ' या अधिकरणांत ( ६, १, १७–२१ ) स्त्रीचा यज्ञांतील बरोबरीचा अधिकार सांगितला पण यावर भाष्य करतांना शबरानें स्त्रिया अविद्वान् असतात असें म्हटलें आहे. त्याच्या वेळीं स्त्रिया अविद्य होत्या, त्यामुळें ' अतुल्या हि स्त्री पुंसा यजमानः पुमान् विद्वांश्च पत्नी स्त्री चाविद्या च । तस्मात्प्रतिषिद्धस्य पत्न्या अध्ययनस्य पुनःप्रसवे न किंचिदस्ति प्रमाणम् । ' असें म्हटलें. स्त्री पुरुषाच्या बरोबरीची नाहीं. पुरुष विद्वान् व स्त्री अविद्य. अर्थात् पत्नीला अध्यय-

यनाचा अधिकार आहे असें म्हणावयास शबराला कांही प्रमाणच सांपडलें नाहीं. तीन विशेष ठिकाणीं मात्र वेदाचा अधिकार तो स्त्रियांना देतो.

सूत्रकालानंतरच्या काळांतहि स्त्रियांना शिक्षणाची आडकाठी नव्हती. कालिदासाची शकुन्तला दुष्यन्ताला कमलपत्रावर प्रणयपात्रिका लिहिते. नाटकातील स्त्रिया प्रसंगोपात्त संस्कृतहि बोलणाऱ्या दाखविल्या आहेत. स्त्रियांचें शिक्षण अर्थात् पुरुषाच्या मानानें स्वाभाविकपणें कमी असतें. महाभारतात (विराटपर्व २, २९) पांडवानी गुप्तपणें विराटाकडे रहावयाचें ठरविलें, त्यावेळीं कोणी काय करावें याचा विचार चालला असता अर्जुनानें स्त्रीवेष घेऊन विराटाच्या नगरीतील स्त्रियांना गीत, नृत्य, वादन या कला शिकविण्याचें योजिलें. तो म्हणाला, ' गीतं नृत्यं विचित्रं च वादित्रं त्रिविधं तथा। शिक्षयिष्याम्यहं राजन् विराटस्य पुरस्त्रियः॥ ' यावरून राजकन्या व इतरहि ज्यांना शक्य होते त्या स्त्रिया लिहिणें, वाचणें तशाच इतर विद्या व कला शिकत असत हें उघड आहे. पण उत्तरोत्तर स्त्रीशिक्षणाचा लोप होत चालला. त्यांना उपनयनाची बंदी झाल्यामुळें वेदाध्ययन स्वाभाविकपणेंच बंद झालें. त्यानंतर त्यांचे संस्कार मंत्रपूर्वक होतनासे झाले. विष्णुधर्मसूत्र म्हणतें, ' स्त्रीणां विवाहः संस्कारः ' (२२, ३२) स्त्रियांना विवाह हा एकच संस्कार आहे. त्यांचे इतर संस्कार अमंत्रक (एता एव क्रियाः स्त्रीणाममन्त्रकाः तासां समंत्रको विवाहः। विष्णु २७, १३–१४).

मनूनें स्त्रियाविषयीं जें म्हटलें आहे, तें पाहून स्त्रिया त्याला दोष देतील. पण त्यानें तें म्हणणें आपलें म्हणून म्हटलेलें नाहीं; धर्मांत असें ठरलेलें आहे असें तो सांगतो. तो म्हणतो, ' नास्ति स्त्रीणां क्रिया मंत्रैरिति धर्मे व्यवस्थितिः। निरिन्द्रिया अमंत्राश्च स्त्रियोऽनृतमिति स्थितिः। ' (९,१८). यातील निरिन्द्रिय, अमंत्र व अनृत हे शब्द जाचण्यासारखे आहेत. मनूनें स्त्रियांकडे पतिशुश्रूषा, व गृहव्यवस्था, मुलांचें संगोपन हींच कामें सोंपविलीं आहेत. पण महाभारत रामायण यातील स्त्रिया केवळ मुलें पाळणाऱ्या होत्या असें म्हणवत नाहीं. विदुला व कुंती यांच्या कथा प्रसिद्धच आहेत. मुलगा युद्धाला भिऊन हातपाय गाळूं लागला असतां विदुलेनें त्याला सांगितलें ' वृत्तेः कार्पण्यलब्धाया अप्रतिष्ठैव ज्यायसी। काले हि समनुप्राप्ते त्यक्तव्यमपि जीवितम्॥ ' (उद्योग प. १०, ७७) दीनपणें पोटाला मिळवून रहाण्यापेक्षा मरण फार चागलें म्हणून प्रसंग आला असता जीविताचीहि क्षिति बाळगूं नये. कुंतीनें पाण्डवांना असाच उपदेश केला. द्रौपदीनें धर्माला असाच तेजस्वी विचार सांगितला. ती म्हणाली 'अलक्ष्मीराविशत्येनं शयानमलसं नरम्। निःसंशयं फलं लब्ध्वा दक्षो भूतिमुपाश्नुते॥ ' (वनपर्व अ. २७). विदुलादि स्त्रिया बी. ए, एम्. ए. नसतील, पण कर्तव्य जाणून तदनुसार कृति करणें हें जर शिक्षणाचें कार्य असेल, तर त्या सुशिक्षित होत्या यांत संशय नाहीं.

याप्रमाणें श्रुति व कित्येक स्मृति स्त्रीशिक्षणाच्या विरुद्ध नाहींत हें आपण पाहिलें. अर्थात् हें शिक्षण अनुकूलता असेल त्याप्रमाणें घेत असत. सर्व स्त्रिया सारख्या शिकत असें नाहीं. आतां मनूवर जो दुसरा आरोप आहे तो पाहूं. ' न भजेत् स्त्री-स्वतंत्रताम् ' असें तो म्हणतो; कोणत्याहि स्थितींत स्त्रीनें स्वतंत्रपणें काही करूं नये. 'बालया वा युवत्या वा वृद्धया वापि योषिता । न स्वातंत्र्येण कर्तव्यं किंचित्कार्यं गृहेष्वपि ॥ बाल्ये पितुर्वशे तिष्ठेत् पाणिग्राहस्य यौवने । पुत्राणां भर्तरि प्रेते न भजेत् स्त्री स्वतंत्रताम्' ॥ ( ५, १४७–१४८ ). पण पूर्वी सांगितल्याप्रमाणें तोहि दोष मनूचा नाहीं. ठरलेल्या गोष्टीचा तो केवळ अनुवाद करतो. ऋग्वेदांतही ' कल्याणी ह जाया कृपणं हि दुहिता ' बायको चांगली, पण मुलगी वाईट असें म्हटलें आहे. मुलीसाठीं बापाला दुसऱ्याकडे जाऊन हिचा स्वीकार करा, असें म्हणून तोंड वेंगाडावें लागतें, पण बायको घरीं येऊन संसार थाटून देते अशा उद्देशाचा वरील मंत्र आहे. ' कन्यापितृत्वं दुःखं हि नियतं मानकांक्षिणाम् ' हा त्यांतील भावार्थ. त्याला पुढें पारतंत्र्याचें रूप आलें व ' अस्वतंत्रा धर्मे स्त्री ' ( गौ. ध. सू. १८, १ ) ' अस्वतंत्रा स्त्री पुरुषप्रधाना ' ( वासिष्ठ ध. सू. ६, १ ), ' न स्त्री स्वातंत्र्यं विन्दते ' । ( बौ. ध. सू. २, २, ४५ ) अशा क्रमानें ' अस्वतंत्राः स्त्रियःकार्याः पुरुषैः स्वैर्दिवानिशम् ।...पिता रक्षति कौमारे भर्ता रक्षति यौवने । रक्षन्ति स्थविरे पुत्रा न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ' ॥ ( मनु ९, २–३ ) असें म्हणूं लागले. महाभारताच्या अनुशासन पर्वांतहि या मनुवचनाचा अनुवाद आहे ( २०, २१ ). याज्ञवल्क्यानेंहि ( १, ८५ ) ' न स्वातंत्र्यं क्वचित्स्त्रियाः ' असाच शेरा मारिला. कालिदासानेंहि शार्ङ्गरव नामक कण्वशिष्याच्या तोंडीं शकुन्तलेला उद्देशून 'पुरोभागे किं स्वातंत्र्यमवलंबसे ' ' अवदसे, स्वतंत्र होऊं पहातेस काय ? ' असा प्रश्न घातला आहे ( अंक ५ ).

याप्रमाणें स्त्रीला स्वातंत्र्य दिलेलें नसलें, तरी स्वामित्व दिलेलें होतें. तसें म्हटलें तर बापाला तरी स्वामित्व असलें तरी स्वातंत्र्य कोठें असतें ? वडिलार्जित संपत्तीचा कुटुंबासाठीं उपयोग करणें त्याच्याकडे असलें तरी विशेष अडचणीचे प्रसंग वगळून त्याला ती विकतां येत नाहीं. कर्ज फेडण्यासाठीं ती विकतां येते. पुनर्जन्माची कल्पना आपल्यांत असून कर्ज न फेडल्यास मनुष्य पुढील जन्मीं सावकाराचा बैल, दास, किंवा स्त्री होतो असें मानीत व त्यामुळें वडिलांना कर्जांत ठेवण्यापेक्षा संपत्ति विकून कर्ज फेडणें इष्ट वाटे. शिवाय आजच्या प्रमाणें मुदतीचा कायदा ( Limitation Act ) नव्हता, म्हणून तीन तीन पिढयाच्या कर्जाचा भार मनुष्यावर पडे; तीन वर्षांनंतर वचनचिठी आज जशी व्यर्थ होते, तसा प्रकार तेव्हां नव्हता. त्यामुळें कर्ज फेडीच्या बाबतींत अपवाद केला. स्त्री-धनावर स्त्रीचाच अधिकार ठेविलेला होता. तात्पर्य स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं असें सांग-

ण्यात धर्मशास्त्रकारांचा हेतु त्याची निंदा करावी असाच होता असें नाहीं. पण एकदां ती कल्पना चालू झाल्यावर तिची वाढ होऊन ती अतिरेकाला जाऊं लागली. नारद म्हणतो, 'स्त्रीकृतान्यप्रमाणानि कार्याण्याहुरनापदि। विशेषतो गृहक्षेत्रदानाधमनविक्रयान्' घर, शेत इत्यादिकांची विक्री, दान, गहाण करण्याचा स्त्रियांना अधिकार नाहीं. विशेष अडचणीच्या प्रसंगा व्यतिरिक्त त्यांनी केलेले असले व्यवहार बेकायदा समजावे. स्त्रियांना स्वातंत्र्य नाहीं असें प्रजापतीनेंच सांगितलें, असें अनुशासन पर्वात ( २०, १४ ) म्हटलें आहे ( ' प्रजापतिमतं ह्येतत् न स्त्री स्वातंत्र्यमर्हति ' ). या कल्पनेचा पुढें परिणाम असा झाला कीं, पति, पुत्र, भाऊ इत्यादि कोणीहि नसलेल्या स्त्रीच्या बाबतींत ' राजा भर्ता प्रभुः स्त्रियाः ' म्हणजे राजावर तिच्याविषयींची जबाबदारी आहे, असें ठरविण्यात आलें. अंध पंगु अशा अनाथांचा भारहि राजावर असे. इंग्लंडात गरीब लोकांच्या पोषणाचा कायदा ( Poor law ) आहे, तसा आपल्याकडे नव्हता. पण तो इंग्लंडमध्यें कसा काय चालविला जात असे हें पहावयाचें असेल तर चार्ल्स डिकन्सची ऑलिव्हर ट्विस्ट (Oliver Twist) ही कादंबरी वाचावी. तात्पर्य नुसता कायदा आहे एवढ्यावरून वस्तुस्थितीची कल्पना करता येणार नाही. स्त्रियांच्या पारतंत्र्याच्या बाबतीतहि हा नियम लक्षांत ठेविला पाहिजे.

## स्त्रियांची स्तुति

मनूनें स्त्रियांची निंदा केली आहे तशीच स्तुति देखील पुष्कळ केली आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे. स्त्रियांची स्तुति करतांना तो म्हणतोः—

यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः
यत्रैतास्तु न पूज्यन्ते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥ ३, ५२
संतुष्टो भार्यया भर्ता भर्त्रा भार्या तथैव च
यस्मिन्नेव कुले नित्यं कल्याणं तत्र वै ध्रुवम् ॥ ६०
जामयो यानि गेहानि शपन्त्यप्रतिपूजिताः
तानि कृत्याहतानीव विनश्यन्ति समन्ततः ॥ ५८

ज्या ठिकाणीं स्त्रियांना मान मिळतो तेथे देवता रममाण होतात, पण जेथें त्यांचा मान रहात नाहीं तेथें सर्व क्रिया निष्फल होतात. ज्या घरात स्त्री व पति एकमेकांवर संतुष्ट असतात तेथें नित्य कल्याण नांदतें. स्त्रियांचा अपमान झाल्यामुळें ज्या घरांवर त्या रुष्ट होतात, तीं घरें पिशाचानें पछाडल्याप्रमाणें होऊन सर्वस्वी नाश पावतात. महाभारताच्या अनुशासन पर्वात असेंच सांगितलें आहे ( ४६, ५–६ ). स्त्रियांना मान द्यावा, त्यांचे लाड पुरवावे, घरांत स्त्रिया कष्टी असतील तर तेथें कांही नीट होणारच नाहीं. स्त्रिया म्हणजे श्रीच होत, म्हणून कल्याणेच्छूनें त्यांना मान द्यावा ( श्रिय एताः स्त्रियो नाम सत्कार्या भूतिमिच्छता। अनु. प. ४६, १५ ). वराह-

मिहिरानें स्त्रियांचा कसा कैवार घेतला आहे हें पूर्वी एकदां दाखविलेंच आहे. चोराच्या उलट्या बोंबा म्हणतात त्याप्रमाणें आपला दुष्टपणा झाकण्यासाठी दुष्ट लोक स्त्रियांना दूषणें देतात, वस्तुतः त्या निष्पाप आहेत असें तो म्हणतो. महाभारताच्या शांति-पर्वांत तर 'स्त्रीचा खरोखर अपराध नसतो, पुरुषाचाच असतो' (एवं स्त्री नापरा-ध्नोति नर एवापराध्यति । २६७, ३८) असें म्हटलें आहे.

## स्त्रियांची निंदा

स्त्रीनिंदात्मक कांही श्रुतिवचनें पूर्वी सांगितलीं आहेत. स्त्रियांचें मन चंचल असतें व बुद्धि हलकी असते असें एका ऋग्मंत्रांत म्हटलें आहे:—इन्द्रश्चिद्धा तदब्रवीत् स्त्रिया अशास्यं मनः । उतो अह क्रतुं रघुम् । ऋ. ८, ३३, १७. तैत्तिरीय संहितेंत 'अवभृथमवयन्ति परा स्थालीरस्यन्ति उद् वायव्यानि हरन्ति । तस्मात् स्त्रियं जाता परास्यन्ति उत्पुमांसं हरन्ति ।' (६, ५, १०, ३) असें म्हटलें आहे. अवभृथ स्नान करावयाच्या ठिकाणीं वायव्यपात्रें तेवढीं उचलून नेतात व थाळ्या तेवढ्या वेदीवर टाकून जातात, म्हणून मुलगी जन्मली तेथेंच तिला टाकतात व पुत्राला मात्र उचलून घेतात. या वचनाचा आधार घेऊन झिमर नामक एका जर्मन ग्रंथकारानें हिंदुस्थानांत पूर्वी मुलींना मारून टाकण्याची चाल होती असा सिद्धान्त काढिला आहे! तैत्तिरीय संहितेंत आणखी 'तस्मात् स्त्रियो निरिंद्रिया आदायादीरपि पापात्पुंस उपस्ति-तरं वदन्ति ।' (६, ५, १०,३) असें एक वचन आहे. त्यात स्त्रियांना दुबळ्या, सोमपानाचा अधिकार नसलेल्या व पामर पुरुषाहूनहि हलु बोलणाऱ्या असें म्हटलें आहे. यांतील अदायादीः या शब्दावरून पुढें त्यांना दायभाग म्हणजे संपत्तीच्या वाटणींत भाग नाही असें ठरविण्यांत आलें. पण दाय म्हणजे या संदर्भात सोमरसाचा भाग एवढाच अर्थ आहे. या तैत्तिरीयसंहिता वचनाचा बोधायन धर्मसूत्र [ निरिंद्रिया ह्यदायादाश्च स्त्रियो मता इति श्रुतिः ], मनु [ ९,१८ निरिंद्रिया ह्यमंत्राश्च स्त्रियोऽनृतमिति स्थितिः ) यांनीं अनुवाद केला असून महाभारतात 'अनृताः स्त्रिय इत्येव सूत्रकारो व्यवस्यति' । ( अनु. प. १९,६ ) असा त्या विषयीं सूत्रकाराचा हवाला दिला आहे. अनुशासनपर्वांत स्त्रियांची निंदा परमावधीची केलेली आढळते [ अध्याय ३८ ]. लक्षावधि स्त्रियांत एखादीच पतिव्रता आढळा-वयाची, स्त्रियांहून पापी असें दुसरें कांहींच नाहीं ( तथा शतसहस्रेषु यदि काचित् पतिव्रता । न स्त्रीभ्यः किंचिदन्यद्वै पापीयस्तरमस्ति वै । इ. ) इत्यादि त्यांच्या विषयीं म्हटलें असून ही सारी निंदा स्त्रियांच्याच तोंडून करविलेली आहे. अशा प्रकारच्या निंदात्मक वचनावरून स्त्रियांना कोणत्याहि प्रकारें संपत्तीचा वारस होण्यास प्रतिबंध करण्यांत आला व हिंदुस्थानांत मुंबई आणि मद्रास खेरीज सर्वत्र सन १९२९ पूर्वी तसाच प्रतिबंध होता. मुंबई व मद्रास खेरीज बाकीच्या भरतवर्षात मृताची पत्नी,

मुलगी, आई, बापाची आई, व बापाची आजी या पांच स्त्रियांखेरीज कोणत्याहि स्त्रीला वारसा हक्क नव्हता. १९२९ च्या दुसऱ्या कायद्यानें मात्र हा प्रकार पालटून चार प्रकारच्या नातलगांना जवळचा वारसाचा अधिकार दिला आहे. मुलाची मुलगी, मुलीची मुलगी, बहीण व बहीणीचा मुलगा यांना या नव्या कायद्यानें क्रमशः वारसाचा अधिकार दिला आहे. धर्मभ्रष्ट, क्रूर, भेद पाडणाऱ्या, खोटें बोलणाऱ्या, साहसी, अशी शेलकीं विशेषणें स्त्रियांना लाविलेलीं आढळतात 'विमुक्तधर्माश्चपलास्तीक्ष्णा भेदकराः स्त्रियः' । असें रामायणांत (अरण्यकांड ४५,३०) म्हटलें असून 'अनृतं साहसं माया मूर्खत्वमतिलोभिता । अशौचं निर्दयत्वं च स्त्रीणां दोषाः स्वभावजाः' हा श्लोक तर सर्वप्रसिद्ध आहे. दशकुमार चरितांत तर प्रश्नोत्तररूप अशा एका आर्येत 'किं क्रूरं स्त्रीहृदयम्' असें एक प्रश्नोत्तर आलें आहे. हे सर्व ग्रंथकार पुरुष होते, ग्रंथ बायकांनीं केले असते तर 'किं क्रूरं नरहृदयम्' असें त्यांनीं म्हटलें असतें. तात्पर्य स्त्रियांची निंदा कित्येकांनीं निष्कारण फार केलेली आहे.

## पडद्याची चाल

स्त्रियांना पडद्यांत ठेवण्याची चाल मुसलमानांपासून या देशांत आली असें कोणी म्हणतात. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. ऋग्वेद काळींही स्त्रिया फारशा समाजांत येत नसत असें काहीं ऋग्मंत्रांवरून दिसून येते. 'गुहा चरन्ती मनुषो न योषा सभावती विदथ्येव सं वाक्' [ऋ. १,१६७,३] या मंत्रात मरुतांबरोबर असलेल्या रोदसीला अंतःपुरांतच नित्य वावरणाऱ्या स्त्रीची उपमा दिली आहे. दुसऱ्या एका मंत्रांत (८, २६,१३) 'अधिवस्त्रा वधू'चा म्हणजे वस्त्रानें झांकलेल्या नवऱ्या मुलीचा उल्लेख आहे (ऋ.८,३३,१९). या मंत्रात 'खालीं पहा, वर पाहूं नको, पाय अगदीं जोडून उभी रहा' (अधः पश्य च मोपरि सं तरां पादुकौ हर) असें वधूला सांगितलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत 'सासऱ्याला लाजणारी सून जशी सर्वांग झांकून येते' (तद्यथैवादः स्नुषा श्वशुराल्लज्जमाना निलीयमानैति इ.) अशी उपमा आढळते. पाणिनीनें सूर्यदर्शन न करणाऱ्या राजस्त्रिया (असूर्यपश्या राजदाराः) सांगितल्या आहेत. राजस्त्रिया पडद्यात असत. तंजावरच्या राजवाड्यांत राण्यांना बसण्याच्या जागा केलेल्या आहेत, तेथें अगदीं पूर्ण काळोख आहे. शाकुन्तलांत शकुन्तला दुष्यन्ताकडे गेली तेव्हां 'अवगुंठनवती' होती म्हणजे बुरखा घेतलेली होती (अंक ५.११). भासाच्या प्रतिमा नाटकांत (१, २०) 'अपनीयतामवगुंठनम्' तोंडावरील बुरखा दूर कर असे शब्द आहेत. रामायणांत वनवासास निघालेल्या सीतेचें वर्णन 'या न शक्या पुरा द्रष्टुं भूतैराकाशगैरपि । तामद्य सीतां पश्यन्ति राजमार्गगता जनाः' । (अयोध्या,३३,८) ज्या सीतेचें दर्शन आतांपर्यंत आकाशांत फिरणाऱ्या पक्ष्यांनाहि अशक्य होतें, ती आज राजमार्गावरून जाणाऱ्या येणाऱ्या लोकांच्या दृष्टीस पडणार असें केलें आहे. महाभारताच्या सभापर्वांत 'धर्मपत्नीला आजपर्यंत कोणी सभेंत नेलेलें नाहीं, पण तो

सनातनधर्म आज या कौरव सभेनें मोडला ! ( धर्म्यां स्त्रियं सभा पूर्वं न नयन्तीति नः श्रुतत् । स नष्टः कौरवेयेषु पूर्वो धर्मः सनातनः । सभा. ६८, ९)असें द्रौपदीच्या वर्णनात म्हटलें आहे. सामान्यतः स्त्रिया त्यावेळी बाहेर पडत नसत; या नियमाचा अपवाद रामायणात ( युद्ध. ११६, २८ ) ' व्यसनेषु न कृच्छ्रेषु न युद्धेषु स्वयंवरे । न क्रतौ नो विवाहे वा दर्शनं दूष्यते स्त्रियः ' असा दिला आहे. संकटकाळीं, युद्ध प्रसंगीं, स्वयंवरांत, यज्ञाच्यावेळीं, अथवा लग्नसमारंभात स्त्रीला मोकळेपणें फिरणें दूषणास्पद नाहीं. रामायणाच्या सुंदरकांडांत मारुति सीतेला रामाकडे चल म्हणाला, त्यावेळीं जावयाचें कसें असें तिने विचारिलें असतां, माझ्या खांद्यावर बसून चल असें मारुतीनें उत्तर दिलें. पण सीता म्हणाली 'नाहं स्प्रष्टुं स्वतो गात्रमिच्छेयं वानरोत्तम' मी आपण होऊन परपुरुषाच्या अंगाला स्पर्श करूं इच्छीत नाहीं.रावणानें दांडगाई करून उचलून आणलें तेथें तिचा उपाय नव्हता. महाभारताच्या वनपर्वात जयद्रथ द्रौपदी एकटी असतां तिच्याशीं बोलावयास आला त्यावेळीं तिनें त्याच्याशीं तसें बोलण्याचें नाकारलें व ती म्हणाली ' एका ह्ययं संप्रति ते न वाचं ददानि वै भद्र निबोध चेदम् । अहं ह्यरण्ये कथमेकमेका त्वामालपेयं निरता स्वधर्मे ।'( वन २६६, ३). तात्पर्य पडद्याची चाल आम्ही मुसलमानांपासून घेतलेली नसून पूर्वींपासून ती थोडीशी चालू होती. मात्र मुसलमानाचें उदाहरण पाहून ती बंगाल वगैरे प्रांतांत वाढली.

## माता

आतां माता या नात्यानें स्त्रियांविषयीं काय म्हटलें आहे तें पाहूं. तैत्तिरीय उपनिषदाच्या शीक्षाध्यायात ( Convocation address ) विद्याभ्यास संपवून घरीं जाण्यास निघालेल्या तरुणाना जो उपदेश केलेला आहे त्यांत प्रथम ' मातृदेवो भव ' मातेला देव मानून वागत जा, असे शब्द आहेत. वडिलांत श्रेष्ठ कोण हें सांगताना गौतम म्हणतो ' आचार्यः श्रेष्ठो गुरूणां माता इत्येके '( गौ. ध. सू. २, ५६ ). काहींच्या मतें माता हीच श्रेष्ठ. आपस्तंब म्हणतो, माता पुत्राविषयीं कितीतरी गोष्टी करते, म्हणून पुत्रानें तिची शुश्रूषा नित्य करावी, ती पतित झाली तरी तिला टाकूं नये ' माता पुत्रत्वस्य भूयांसि कर्माणि आरभते तस्यां शुश्रूषा नित्या पतितायामपि । ' ( १, १०, २८, ९ ). बौधायनहि असेंच सांगतो, ' पतितामपि मातरं बिभृयादनभिभाषमाणः' । माता पतित म्हणजे महापापी असली तर तिच्याशीं बोलूं नये,पण तिचें पालन पोषण केलें पाहिजे. वासिष्ठ म्हणतो कीं पिता पतित झाला तर त्याचा त्याग करावा, पण पुत्रासंबंधानें माता पतित होतच नाहीं, 'पतितः पिता परित्याज्यः माता तु पुत्रे न पतति'। [ १३, ४ ]. शंखस्मृतीत, माता ही धारिणी व पोषणी असते, म्हणून तिच्या ऋणांतून पुत्र सौत्रामणीयाग केल्याखेरीज मुक्त होत नाहीं, तिचा त्याग कधीं करूं नये असें सांगितलें आहे.'न मातापित्रोरन्तरमिच्छेत् पुत्रः कामं मातुरेवानुब्रूयात् । सा हि धारिणी

पोषणी च । न पुत्रः प्रतिमुच्येतान्यत्र सौत्रामणीयागात् जीवन्नृणान्मातुः । एवमत्याज्या माता पिता च'. वसिष्ठ, मनु यांनींहि मातेचा मोठा गौरव केला आहे. उपाध्याय, आचार्य पिता यांहूनहि माता श्रेष्ठ होय, असें ते म्हणतात; ' उपाध्यायान्दशाचार्य आचार्याणां शतं पिता । सहस्रं तु पितॄन्माता गौरवेणातिरिच्यते' (मनु २, १४५; वासिष्ठ १३,४८ ). याज्ञवल्क्य म्हणतो ( १, ३५ ) ऋत्विग्, उपाध्याय, आचार्य व गुरु हे एकाहून एक क्रमानें मान्य होत; पण त्या सर्वांहून माता श्रेष्ठ होय ' एते मान्या यथापूर्वमेभ्यो माता गरीयसी '. नानाफडणवीसांची आई युद्धात शिलच्याच्या हातांत सांपडली होती, तें समजल्यावर नानाला काय वाटलें हें त्याविषयींचीं पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत त्यात दिसून येतें.

# भार्या

भार्या या नात्यानें स्त्रीच्या दर्जाचा विचार करतांना पाश्चात्यांमधील कांहीं कल्पना सहजच दृष्टीपुढें येतात. स्त्री हा शब्दच चंचलत्वाशीं किंवा नीतिभ्रंशाशीं समानार्थक आहे, अशा आशयाचें इंग्रजींत एक वाक्य आहे ( **Frailty, thy name is woman** ). स्त्री ही मुळांतच स्वतंत्र नसून पुरुषाच्या करमणुकीसाठीं त्याच्या बरगडीपासून निर्माण करण्यात आली असें खिस्तीधर्मग्रंथांत म्हटलें आहे. **And the rib which the Lord God had taken from man made he a Woman and brought her unto the man** ( उत्पत्ति प्रकरण २, २०–२२ ). विवाहप्रसंगीं स्त्रीला ' माझा स्वामी, धनी म्हणून पतीची आज्ञा मीं मानीन ' अशी प्रतिज्ञा करावी लागत असे ( **I shall obey you my lord, my Master** ). आतां मात्र हें गेलें आहे. त्यांच्याकडे स्त्रियाना ' सुंदर जाति ' ( **Fair sex** ) व बायकोला नवऱ्याचें अधिक चांगलें अर्ध ' ( **Better half** ) असें म्हणण्याची वहिवाट आहे. अशाच आशयाच्या कल्पना आपल्याइकडेहि आढळतात. ऋग्वेदांत नववधूला उद्देशून ' संराज्ञी श्वशुरे भव ' सासऱ्यावर साम्राज्य चालविणारी हो इत्यादि म्हटलेलें असून पूर्वी या व्याख्यानांत त्याचा निर्देश आला आहेच. अथर्ववेदांत ( १४, १, २० ) ' गृहान् गच्छ गृहपत्नी यथासो वशिनी त्वं विदथमावदासि, ' घरीं चल घराची स्वामिनी होऊन रहा, इत्यादि वचनें आढळतात. तैत्तिरीय संहितेंत पत्नी म्हणजे पतीचें अर्ध (अर्धो वा एष आत्मनः यत्पत्नी । ६,१, ८,५ ) असें म्हटलें असून ' पुरुष हा पत्नीच्या योगानें पूर्ण होतो ' असं शतपथ ब्राह्मणांत [ ७, ७, २, ३ ] म्हटलें आहे. ऐतरेय आरण्यकांतहि तीच कल्पना ' तस्मात्पुरुषो जायां वित्त्वा कृत्स्नतरमिवात्मानं मन्यते ' [ १, २, ४ ] या शब्दांनीं व्यक्त केलेली आढळते. महाभारताच्या शांतिपर्वात १४४ वा अध्याय भार्याप्रशंसेनें भरला असून ' न गृहं गृहमित्याहुर्गृहिणी गृहमुच्यते । गृहं तु गृहिणीहीनमरण्यसदृशं मतम् ' । हा

पुष्कळांच्या तोंडीं असलेला श्लोक त्यांतच आला आहे. 'अर्धं भार्या मनुष्यस्य' इत्यादि आदिपर्वतांतील श्लोक पूर्वी सांगितला आहेच [ ७४, ४० ].

पतीच्या घरांतील अधिकारासंबंधानें ' सम्राज्ञी श्वशुरे भव ' इत्यादि ऋग्मंत्र पूर्वी सांगितला. ऐतरेय ब्राह्मणांत पतीची बहिण ही भावजयीच्या अनुरोधानें वागते असें बहिणीची थोडीशी कींव करून म्हटलें आहे. 'तस्मात् समानोदर्या स्वसा अन्योदर्यायै जायाया अनुजीविनी जीवति ' । [ १३, १३ ]. बहीण सहोदर असताहि बाहेरून आलेल्या भावजईचा तिला धाक वाटतो. घरांतील सामानसुमानावर पत्नीचा अधिकार असतो [ पत्नी हि पारिणह्यस्येशे ] असें तैत्तिरीयसंहितेंत वचन असून मनूनें 'अर्थस्य संग्रहे चैनां व्यये चैव नियोजयेत् । शौचे धर्मेऽन्नपक्त्यां च पारिणह्यस्य वेक्षणे '[९,११] या श्लोकांत त्याचा अनुवाद केलेलाहि पूर्वी दाखविला आहेच. स्त्रियांच्या घरांतील अधिकारासंबंधानें अलिकडील इतिहासांत राजगुरु दादोजी कोंडदेव याची गोष्ट प्रसिद्धच आहे. दादोजींनीं जेवतांना डाव्या हातानें स्वतः मीठ वाढून घेतलेलें पाहून त्यांच्या पत्नीनें अधिकारातिक्रमाबद्दल थट्टेनें तक्रार केली, तेव्हां दादोजींना ती पटून ते डावा हात उतरून टाकण्यास तयार झाले, पण पुनः पत्नीच्या विनवणीवरून तसें न करता त्या प्रसंगाची खूण ह्मणून अंगरख्याची डावी बाही मात्र ते त्यानंतर लावीनासे झाले.

## बहुपत्नीकत्वाची चाल

घटस्फोटासंबंधानें पूर्वी सविस्तर विवेचन केलें असल्यामुळें त्याची पुनरावृत्ति करीत नाही. बहुपत्नीकत्वाची चाल पूर्वी होती हें खरें, पण लागेल तितक्या स्त्रिया पुरुषानें कराव्या असें कोणी म्हटलेलें नाहीं. तथापि सपत्नी हा शब्द ऋग्वेदांत अनेक ठिकाणीं आला आहे [ ३,१,१०;३,६,४ इ. ]. दहाव्या मंडळींतील १४५ वें सूक्त तर सपत्नीबाधनासाठीं आहे, त्याप्रमाणें त्यांतील १५९ व्य सूक्ताचा विषय सपत्नी नाशन हा आहे. श्रीमंत लोक अनेक स्त्रिया करीत. तैत्तिरीयब्राह्मणांत ' श्रिया वा एतद्रूपं यत्पत्नयः । श्रियमेवास्मिंस्तद्दधाति । ' [ ३,९,४ ] या वचनात अनेक स्त्रिया म्हणजे श्रीमंतीचें लक्षण होय असें सुचविलें आहे. एका पुरुषाला अनेक स्त्रिया एका वेळीं असूं शकतात, पण एका स्त्रीला एका वेळीं अनेक पति मात्र असूं शकत नाहींत असें सांगून त्याचें समर्थन यूप व दोऱ्या यांच्या दृष्टान्तानें तैत्तिरीय संहितेंत केलें आहे. हेंहि त्या वचनासह पूर्वीच्या एका व्याख्यानात दाखविलें आहे. तैत्तिरीय संहितावचनासारखें ( ६,६,४,३ ) वचन ऐतरेय ब्राह्मणांतीह आलें आहे, ' तस्मात् एकस्य बह्व्यो जाया भवन्ति नैकस्यै बहवः सहपतयः । ' [ १२,११ ]. त्या ब्राह्मणांतील हरिश्चंद्र राजाला शंभर बायका होत्या ( तस्य ह शतं जाया बभूवुः । ' ६३.१ ). बृहदारण्यांतील प्रसिद्ध ज्ञानी याज्ञवल्क्यालाहि दोन स्त्रिया होत्या. सर्व धर्मसूत्रांप्रमाणें व स्मृत्यनुसारहि पुरुषाला वर्णक्रमानें एकाहून अधिक भार्या करतां येत असत. श्रीकृष्णाला सोळा हजार स्त्रिया होत्या असें पुराणांत व महाभारतांतहि [ मौसलपर्व ५,६]

ह्मटलें आहे. अर्वाचीन इतिहासांत सन ११२३ च्या सुमारास होऊन गेलेल्या गांगेय-देव अथवा विक्रमादित्य नामक राजाला शंभर स्त्रिया होत्या व त्याच्या सह त्यानें गंगेंत उडी घेऊन मुक्ति मिळविल्याचें वर्णन त्याच्या मुलाच्या ताम्रलेखांत आढळून येतें. त्या ताम्रलेखांत म्हटलें आहे 'प्राप्ते प्रयागवटमूलनिवेशबंधौ सार्धं शतेन गृहिणीभि-रमुत्र मुक्तिम्।' एपिग्राफिआ इंदिका ग्रंथ २, पान ४ ).

## त्या चालीवरील बंधनें

या प्रमाणें बहुपत्नीकत्वाची चाल रूढ असली, तरी शास्त्रकारांनीं ते स्वतः पुरुष असताहि, बंधनें घातली होती. उदाहरण, आपस्तंब म्हणतो 'धर्मप्रजासंपन्ने दारे नान्यां कुर्वीत' [ २, ५, ११, १२ ] एक पत्नी धर्मशील व प्रजा-सपन्न असेल तर दुसरी करूं नये; यापैकीं एकहि गोष्ट तिजपाशी नसेल तर दुसरी पत्नी करावी, पण ती अग्निहोत्र घेण्या पूर्वी; तें घेतल्यावर मग दुसरी पत्नी करूं नये; कारण पहिलीचा संबंध अग्निहोत्राशीं जडलेला असतो, व त्याचें ती अंगच बनते (आधाने हि सती कर्मभिः संबध्यते। येषामेतदंगम्।). विशिष्ट कारणास्तव स्त्रीचा त्याग करून दुसरी करावी असें शंख, बोधायन, मनु, याज्ञवल्क्य, इत्यादिक सांगतात. उदाहरणार्थ शंख म्हणतो, 'अप्रियशीला पुरुषद्वेषिणीमननुकूलां चाधिविन्देत'. याज्ञवल्क्य म्हणतो, 'सुरापी व्याधिता धूर्ता वन्ध्या ऽ र्थघ्न्यप्रियंवदा। स्त्रीप्रसूश्चाधिवेत्तव्या पुरुषद्वेषिणी तथा' ( १, ७३), स्त्री मद्यपान करणारी, व्याधिग्रस्त, लबाड, वांझ, द्रव्यनाश करणारी, कर्कशा, सर्व मुलीच होतात अशी असेल तर तिचा त्याग करून दुसरी पत्नी करावी. पण स्त्रीचा त्याग असें काही विशिष्ट कारण नसताना केल्यास 'त्यजन्दाप्यस्तृतीयांशमद्रव्यो भरणं स्त्रियाः' ( १, ७६ ) त्याग कर-णाराला त्याच्या संपत्तीचा तृतीयांश दंड करावा व त्याजवळ द्रव्य नसेल तर तिच्या पोषणाची तरी व्यवस्था त्याच्याकडून करवावी. टाकलेल्या स्त्रीच्याहि पोष-णाचा भार टाकणारावर होताच, कारण तसें न केल्यास मोठें पाप लागेल ( अधि-विन्ना तु भर्तव्या महदेनो ऽ न्यथा भवेत्। या. १, ७४ ) असें याज्ञवल्क्य म्हणतो.

## स्त्रीधर्म

वसिष्ठ, गौतम आपस्तंब इत्यादि प्राचीन धर्मसूत्रकारांनीं स्त्रीधर्माचें फारसें बंड माजविलेलें नाहीं. पण विष्णु, शंख, मनु, महाभारताचें शांतिपर्व ( अ. १४८ ) व अनुशासन पर्व ( अ. १२३ ), रामायण ( अयोध्याकांड ), भागवतपुराण ( ७, ११ ), भविष्य पुराण ( १, ११–१५ ), स्कन्दपुराणातील धर्मारण्यखंड ( अ. ७), काशीखंड, इत्यादि ठिकाणीं त्यावर फार भर दिलेला आढळतो. वेदाध्यय-नाचा स्त्रियांचा अधिकार नाहींसा झाल्यावर, पतिशुश्रूषा, बालसंगोपन व गृहकृत्यें एवढींच त्यांच्याकडे राहिलीं व त्यांवरच सर्वांनीं पुढें झोड उठविली.

पति कसाहि असला तरी स्त्रीनें त्याची देवासारखी सेवा करावी असें मनु म्हणतो (५,१५४-१५५), त्याच्या मतें त्यांना स्वतंत्रपणें यज्ञ व्रत इत्यादि करण्याची गरजच नाहीं. पतिसेवा करण्याचें कारण शांतिपर्वात असें दिलें आहे कीं, बाप, भाऊ, मुलगा हे झाले तरी नियमितच देणार पण पति देतो तें अमित असतें, यास्तव कोणतीहि स्त्री स्वाभाविकपणें पतिपूजन करील (अ. १४८ मितं ददाति हि पिता मितं भ्राता मितं सुतः। अमितस्य हि दातारं भर्तारं का न पूजयेत्।). स्त्रियांनीं चालावें कसें, बोलावें कसें, वागावें कसें या विषयीं शंख स्मृतींत बऱ्याच गोष्टी सांगितल्या आहेत, पण त्यांचा सविस्तर विचार करण्याची गरज नाहीं. पति प्रवासास गेला असतां स्त्रीनें कसें वागावें या विषयींहि मनु (९, ७५), याज्ञवल्क्य (१, ८४), वसिष्ठ (१७, ७८-७९), शंख इत्यादिकांनीं नियम घालून दिले आहेत.

## स्त्रियांचे हक्क

कित्येक माणसांच्या पोषणाचा भार कुटुंबाच्या मुख्यावर असतो व कसेंहि करून त्यानें तो उचललाच पाहिजे असें म्हटलें असून त्यांत वृद्ध मातापिता, साध्वी भार्या, लहान मूल यांचा समावेश होतो. ‘वृद्धौ च मातापितरौ साध्वी भार्या शिशुः सुतः। अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत्’ असा एक क्षेपक श्लोक प्रस्तुत मनु स्मृतींत [ ११, १० नंतर ] आढळतो. तसेंच स्त्री आपल्या इच्छेनें आपल्याला मिळते असें नसून देवांनीं ती दिलेली असते, देवांचें प्रिय करावें असें वाटणारानें साध्वी स्त्रीचें पोषण केलेंच पाहिजे असें म्हणून मनूनें (९, ९५) पत्नीच्या पोषणाचा भार पतीवर टाकला आहे. पति व पत्नी यांनीं जीवंत असत तोंपर्यंत एकमेकांशीं अव्यभिचारानें वागावें [ मनु ९, १०१ ] असेंहि तो म्हणतो. धर्म, अर्थ, काम या तीन पुरुषार्थांच्या बाबतींत पत्नीचें अतिक्रमण करूं नको असें पतीला विवाहप्रसंगीं सांगण्यांत येतें व त्याला तसें अतिक्रमण न करण्याची प्रतिज्ञा करावी लागते. ‘धर्मे चार्थे च कामे च नातिचरितव्या त्वया। नातिचरामि नातिचरामि नातिचरामि।’ पत्नीनें या बाबतींत अतिक्रम केला तरी कांहीं अटीवर तिचें पोषण पतीनें केलें पाहिजे, नाहींतर ती अधिक वाईट होईल असेंहि म्हटलें आहे. कित्येक प्रसंगीं मात्र तिचा त्याग करावा असें सांगितलें आहे. ( याज्ञवल्क्य १, ७०: १, ७२; वसिष्ठ २१, १०, शंख ३० )

अविभक्त कुटुंब असेल तर त्यांत स्त्रीला पतीच्या मागें केवळ अन्नवस्त्रच मिळण्याचा अधिकार आहे. कात्यायन म्हणतो, ‘स्वर्याते स्वामिनि स्त्री तु ग्रासाच्छादनभागिनी। अविभक्ते धनांशं तु प्राप्नोत्यामरणान्तिकम्’। भावांतील एखादा निपुत्रिक मरण पावल्यास त्याचें धन उरल्यांनीं आपसांत वांटून घ्यावें, मात्र स्त्रीधनाला हात लावूं नये, असें शंख म्हणतो ‘भ्रातृणामप्रजः प्रेयात्कश्चिच्चेत्प्रव्रजेत वा। विभजेरन् धनं तस्य शेषास्ते

स्त्रीधनं विना ' ।. पण विभक्त झाल्यावर 'पत्नी भर्तुर्धनहरी या स्यादव्यभिचारिणी ' पतीचें धन स्त्रीला मिळालें पाहिजे असें कात्यायन ह्मणतो. याविषयीं ' पत्नी दुहितरश्चैव पितरौ भ्रातरस्तथा ' या याज्ञवल्क्य वचनाचा उल्लेख पूर्वी केला आहेच त्याप्रमाणें विभक्त कुटुंबांत अपुत्र पतीच्या धनाचें स्वामित्व प्रथम त्याच्या बायकोकडेच येतें. बृहस्पति, वृद्धमनु, विष्णु यांनीं तोच आशय व्यक्त केला आहे. पत्नीला असा अधिकार पूर्वी नव्हता, याज्ञवल्क्यानें तो प्रथम दिला.

अविभक्त कुटुंबात पतीच्या मागें बायकांचे हाल कित्येक ठिकाणीं अनन्वित होतात. या दृष्टीनें तिला स्वतंत्रपणें रहाता यावें म्हणून नवीन कायदा होऊं घातला असून त्या योगानें पत्नीला समाईक संपत्तीत नवऱ्याला मिळाला असता इतका हिस्सा मिळावा अशी व्यवस्था होणार आहे. अर्थात तेणेंकरून अविभक्त कुटुंबपद्धति हळुहळू नष्ट होणार. ही गोष्ट वाईट कीं चागली हें सांगणें कठीण आहे; कारण माणसें कोटिक्रम करतात तो पुष्कळ वेळां तर्कशुद्ध नसतो. आतां नवीन जो समाजसत्तावाद इकडे येऊं पहात आहे, त्याप्रमाणें प्रत्येक मनुष्याला त्याच्या बुद्धि-शक्तीप्रमाणें काम करावें लागेल व त्याच्या गरजा पुरविण्याचें काम समाजसरकार करील. तसेंच कांहीं लोक प्रत्येक व्यक्ति पूर्ण स्वतंत्र असावी असेंहि म्हणतात. या दोन गोष्टींचा मेळ कसा घालवयाचा ? अविभक्त कुटुंबपद्धति ही 'वसुधैव कुटुंबकम् ' हें एक टोंक आणि व्यक्तीचें पूर्ण स्वातंत्र्य हें दुसरें टोंक यामध्यें आहे. त्यांत प्रत्येक व्यक्तीला कुटुंब दृष्टीनें यथाशक्ति काम करावें लागतें व त्याच्या गरजा कुटुंब भागवितें. समाज-सत्तेंत तरी मोठ्या प्रमाणावर हेंच होणार. अविभक्त कुटुंबांत ऐतखाऊ किंवा अंग-चोर निर्माण होतात, तसे निदान अंगचोर समाजसत्तेंतही होतील. असो. जयकरांनीं जो विद्याधनाचा कायदा पास करून घेतला त्याचीहि अशीच स्थिति आहे. समाईक कुटुंबातून द्रव्य घेऊन कोणी विद्यार्जन करील व त्या विद्येवर पुढें पुष्कळ धन मिळवील तर तें स्वतः त्याचेंच असें या नूतन कायद्यानें ठरविलें आहे. याचा परिणाम पुढें असा होईल कीं, समाईक संपत्तीतून एकाद्या मुलाला विशिष्ट शिक्षण घेण्याला पुष्कळ असें द्रव्यच मिळणार नाही.

## मुलींची स्थिति

मुलीला मुलाप्रमाणें पित्याच्या धनाचा वाटा ऋग्वेदकाळीं मिळत नव्हता. मुलगा बहिणीला पितृधन देत नाहीं, ' न जामये तान्वो रिक्थमारैक् । ' असें ऋग्वेदांत [ ३, ३१,२ ]आहे.पण पुत्राच्या अभावी स्त्री व तिच्या मागून मुली अशा क्रमानें पितृधनाची मालकी जावी असें याज्ञवल्क्यानें ' पत्नी दुहितरश्चैव' इत्यादि श्लोकात सांगितलें आहे. मुलाप्रमाणें मुलगीहि अंगसंभव असल्यामुळें तिला टाकून पितृधन दुसऱ्याकडे जाऊं नये असें मनूनें म्हटले असून बृहस्पति तसेंच सांगतो. ' यथैवात्मा तथा पुत्रः पुत्रेण दुहिता समा। तस्यामात्मनि तिष्ठन्त्यां कथमन्यो धनं हरेत् । ' [ मनु ९,१३० ];

"अंगादंगात्संभवति पुत्रवद्दुहिता नृणाम्। तस्मात्पितृधनं त्वन्यः कथं गृह्णीत मानवः'। [ बृहस्पति ]. मुलीला शिक्षण मिळून तिच्या लग्नाचीहि व्यवस्था व्हावी इतकी व्यवस्था पितृधनांतून होणें अवश्य आहे व लोक आतां कर्तव्यदक्ष होऊं लागल्यामुळें तशी व्यवस्था हळूहळू होतहि आहे. पण मुसलमानी कायद्याप्रमाणें मुलाच्या अर्ध्यानें मुलीला वाटा मिळावा असें कांहींचें म्हणणें आहे, तें मात्र तितकें व्यवहार्य व योग्य नाहीं. थोड्या वर्षांपूर्वी वारसाच्या कायद्याप्रमाणें मुंबई व मद्रास या प्रांताशिवाय इतरत्र विधवा इत्यादि वर सांगितलेल्या पाच स्त्रियांशिवाय बाकीच्यांना हक्क नव्हता. या बाबतींत मुंबई कायदा अधिक उदार आहे. पण मुंबई प्रांताखेरीज कोणत्याही कायद्याप्रमाणें विधवा भावजईला कांही वारसा मिळत नाहीं. लांबचे पुरुष नातेवाईक खातात, पण मुलीच्या मुलीला आजोबाच्या धनांतून कांही मिळत नाहीं अशी स्थिति होती. १९२९ च्या नव्या वारसाच्या कायद्यानें मात्र तींत सुधारणा केली आहे.

# उपसंहार

निरनिराळ्या नात्यांनीं स्त्रियांची स्थिति कशी आहे हें आतांपर्यंत पाहिलें. या विषयावर बोलावें तितकें थोडेंच आहे. येथें फक्त दिग्दर्शन केलें आहे. विधवांनीं दत्तक घेण्यासंबंधाच्या प्रिव्ही कौन्सिलच्या ठरावाविरुद्ध कायदा करण्याचें बिल मुंबई कायदे मंडळापुढें आलेलें आहे. यापुढें आपल्या मनाप्रमाणें आपल्या मुलांमुलींची व पत्नीची व्यवस्था व्हावी म्हणून सर्व साधारण स्थितींतील लोकांनीं दोन सवई लावून घेतल्या पाहिजेत; एक विमा काढण्याची व दुसरी मृत्युपत्र नीटपणें करून ठेवण्याची. यापुढें कांहीं झालें तरी जुनें धर्मशास्त्र जाऊन नवें कायदे शास्त्र येणार हें निश्चित आहे. तेव्हां दैवावर हवाला देऊन न बसतां या दोन वहिवाटी आपण जोरानें चालू केल्या पाहिजेत. कांही काळापूर्वी नवऱ्यानें विमा काढणें ही गोष्ट बायकोला कशीशीच वाटत असे. तीमुळें आपल्या पातिव्रता धर्माला धक्का बसतो असें बायकांना वाटे. पण त्यांत पतिव्रताधर्माला आड येण्यासारखें कांही नसून सरळ व्यवस्था होण्याचाच मार्ग आहे. मृत्युपत्र करणें म्हणजे मृत्यु जवळ आणणें अशीहि चमत्कारिक कल्पना पूर्वी होती, त्यामुळें मृत्युपत्र करावयाला पुरुष भीत असत. पण 'नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः' इत्यादि तत्वज्ञान उराशीं बाळगणाऱ्या आपण असल्या कल्पनांना थारा देणें अनुचित होय. वास्तव या दोन गोष्टींची वाढ आपण यापुढें अवश्य केली पाहिजे. जयकरांनीं पास करून घेतलेला स्वार्जितधनाचा कायदा, एकत्र कुटुंबांतील विधवांनाही पुरुष सहभागिदारांना न विचारितां किंवा त्यांचे मताचे विरुद्धही दत्तक घेतां येतो हा प्रिव्ही कौन्सिलचा निर्णय, त्याचप्रमाणें एकत्र कुटुंबांतील विधवांना नवऱ्याचे मृत्यूनंतर नुसतें अन्नवस्त्र न मिळतां

मिळकतींत हिस्सा मिळावा असा होऊं घातलेला कायदा, यांमुळें प्राचीन अविभक्त कुटुंबपद्धतीवर मोठा आघात झाला आहे. त्या पद्धतीचें वैशिष्ट्य बहुतेक जाऊन तिचें फक्त नांव व त्यांतील जबाबदाऱ्या मात्र शिल्लक राहिल्या आहेत. त्यापेक्षां अविभक्त कुटुम्बपद्धति नष्ट झाली आहे असें एखाद्या कायद्यानें स्पष्ट जाहीर करणें हें जास्त न्याय्य व सरळ होईल. स्त्रियांना जास्त हक्क देऊं नये या मताचा मी नाहीं. परंतु तसे हक्क देणें तर एकंदर हिंदु कायद्याचा विचार करून देण्यांत यावे. अविभक्त कुटुंबपद्धतीचे बारीक बारीक लचके तोडून देण्यांत येऊं नयेत असें माझें मत आहे. यापेक्षां विस्तृत विवेचन याठिकाणीं करण्याला सवड नाहीं. उलट पक्षीं कांहीं सनातनमताभिमानी म्हणतात की द्रव्यार्जन ही जबाबदारी पुरुषांवर व मुलांना जन्म देणें व शिशुसंगोपन ही जबाबदारी स्त्रियाची म्हणून स्त्रियांना मिळकतीचें स्वातन्त्र्य नसावें. † हें मतही बरोबर नाहीं. प्राचीन स्मृतिकारांनी 'न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति' असें म्हटलें आहे ही गोष्ट खरी पण मिताक्षराकार विज्ञानेश्वर (११ वें शतक) यानें स्त्रीधनाची व्याख्या करितांना स्त्रीला वारसा, वांटप वगैरे कारणांनीं मिळणारें धनही स्त्रीधन होतें असें सांगितलें आहे. आधुनिक न्यायाच्या कोर्टांनीं मिताक्षराकाराच्या मताचा संकोच केला ही गोष्ट निराळी. परंतु मुख्य सांगावयाचें तें हें कीं स्त्रियांना धनाविषयीं हक्क नसावे किंवा अगदी थोडे असावे ही कल्पना सुध्दा आमच्याच प्राचीन निबन्धकारांना मान्य नव्हती. शिवाय स्त्रियाच्या हक्कांचा प्रश्न फार त्रासदायक होते तो मुख्यत्वेंकरून पति मृत झाल्यावर. एखाद्या स्त्रीचा पति हजारों रुपये मिळवीत असला पण एकत्र कुटुंब असलें तर त्याच्या विधवेला पतिमरणोत्तर अन्नवस्त्राची मालकीण व्हावें लागतें व तेंही अन्नवस्त्र देण्याचे बाबतींत मागें राहिलेली मंडळी किती त्रास देतात याची कल्पना या सनातनी लोकांना नसावी असें वाटतें. मुलगे विभक्त होत असतां विधवा आईला मुलांच्या बरोबरीनें हिस्सा द्यावा असें दोन हजार वर्षांपूर्वी याज्ञवल्क्यानें सांगितलें ( पितुरूर्ध्वं विभजतां माताप्यंशं समं हरेत् ); परंतु किती सत्पुत्र आपल्या आईला किंवा आजीला वेळचे वेळीं ठरलेलें अन्नवस्त्रहि देतात ( हिस्सा तर शेंकडा नव्याण्णव वांटपांत आईला कोणी देतच नाहींत) तें सनातन्यांनीं शोधून पहावें म्हणजे कळेल. याशिवाय पतीविरुद्धहि पत्नीला संरक्षण कायद्यानें पाहिजे. चालू कायद्याप्रमाणें हिंदु पतीला पहिली पत्नी जिवंत असतां, पत्नीचा काही अपराध नसतांहि दुसरी बायको करितां येते. अशी उदाहरणें सुशिक्षित समाजांत थोडीं होतात ही गोष्ट खरी, पण जीं होतात त्यांत स्त्रिया असहाय होऊन त्यांना अन्नवस्त्रहि मिळत नाहीं. कोर्टाचा आश्रय करावा तर स्वतंत्र अन्नवस्त्र मिळेलच असें नाही. कारण नवरा म्हणतो कीं, सवती बरोबर ती घरांत राहिली तर मी तिला पोसण्याला तयार आहें. तेव्हां या बाबतींतही स्त्रीला कायद्यानें मिळकतींत हक्क मिळणें न्याय्य आहे. पूर्वी स्त्रियांना आर्थिक स्वातंत्र्य नव्हतें असें मानलें तरीहि हल्लींच्या परिस्थितींत तें मिळूं नये हें म्हणणें आता विचारी माणसांस पटणार नाहीं. आणखीही या विषयावर पुष्कळ सांगतां येईल पण कालभावास्तव येथेंच थांबलें पाहिजे.

† रा. गो. म. जोशी यांचें ' हिंदूंचें समाजरचनाशास्त्र ' पृष्ठ ३२१.

# पाप, प्रायश्चित्त आणि पतितपरावर्तन

## पाप म्हणजे काय ?

पाप, प्रायश्चित्त आणि पतितोद्धार या तीन गोष्टींची सागड असून सुसंबद्ध विचार करावयाचा तर तिन्हींचें विवेचन एकत्र झालें पाहिजे. पाप म्हणजे काय ? हा प्रश्न धर्म व तत्त्वज्ञान यांतील एक मुख्य विषय आहे. धर्म व तत्त्वज्ञान यांच्या विचारात तीन प्रश्न येतात; ज्ञेय काय म्हणजे जाणतां येण्याजोगें काय आहे ? काय केलें पाहिजे आणि ध्येय काय किंवा आपलें व जगाचें पुढें काय होणार ? असे ते तीन प्रश्न होत. पहिल्या प्रश्नाचा संबंध शास्त्राशीं [ Science ] येतो, दुसऱ्याचा नीतिशास्त्राशीं व तिसऱ्याचा तत्त्वज्ञानाशीं आहे. यांपैकीं नीतिशास्त्राचा विचार किंवा नैतिक भाग याचा आजच्या विषयाशीं संबंध आहे. काय करावें व काय न करावें या विचारात पापपुण्याच्या कल्पनेचा उगम आहे. ऋग्वेदांत ऋत, व्रत व सत्य हे शब्द आपण काय करावें या विषयींच्या विचारांत योजिलेले आढळतात. ऋत व व्रत हे ईश्वरानें लावून दिलेले मार्ग दर्शवितात आणि सत्य म्हणजे खरें, अर्थात् ऋत व सत्य यात भेद आहे. ' ऋतं च सत्यं चाभीद्धात् ' इत्यादि ऋग्मंत्रात तीं दोन्ही वेगळीं म्हणूनच सांगितलीं आहेत. काय करावें या प्रश्नाच्या उत्तरात ऋत, सत्य व व्रत या गोष्टी येतात आणि काय करूं नये यांत पाप शब्दानें सूचित केलेल्या गोष्टी येतात.

## पापाच्या कल्पनेचा इतिहास

पाप म्हणजे जें करूं नये तें ही कल्पना व्यक्त करण्यासाठी ऋग्वेदांत अंहस्, अघ, अनृत, आगस्, एनस्, दुरित, पाप्मन, वृजिन हे शब्द येतात. पाप हा शब्दहि ऋग्वेदात येतो, पण त्याचा अर्थ पापी किंवा दुराचरणी मनुष्य असा असतो. ' दामेव वत्साद्विमुमुग्ध्यंहो न हि त्वदारे निमिषश्च नेशे ' [ऋ. २,२८,६] यात अंहस् शब्द आला असून त्यात ' दाव्यापासून वासराची मुक्तता करावी, त्याप्रमाणें माझी अंहापासून मुक्तता कर, कारण तुझ्याशिवाय डोळ्याची पापणीहि हालत नाहीं ' अशी वरुणाची प्रार्थना केलेली आहे. ' न तमंहो न दुरितं देवासो अष्ट मर्त्यम् । सजोषसो यमर्यमा मित्रो नयन्ति वरुणो अति द्विषः ' । [ऋ. १०,१२६,१]. यात अंहस् व दुरित असे दोन्ही शब्द आले असून त्याचा अर्थ एकच आहे. असे जोड शब्द कायद्याच्या भाषेंत आजहि योजतात (उदा. Right, Title, Interest). ज्या मनुष्याला मदत करून अर्यमा मित्र, वरुण इत्यादि देव शत्रूंच्या पलीकडे नेतात, त्याना अंहस् किंवा दुरित यांची

बाधा होत नाहीं. एका ठिकाणीं [ ऋ. ८,१९,६ ] देवकृत अंहस् व मर्त्यकृत् अंहस् सांगितलें आहे. अंहस् पासून पापी मनुष्य या अर्थी अंहुर शब्द झाला असून ' सप्त मर्यादाः कवयस्ततक्षुस्तासामेकामिदभ्यंहुरोऽगात् ' । [ ऋ. १०,५,६ ] यांत तो आढळतो. कवींनीं सात मर्यादा घालून दिल्या असून त्यांतील एकीचेंहि उल्लंघन केल्यास मनुष्य अंहुर किंवा पापी होतो. यांत मर्यादेचें म्हणजे नियमाचें उल्लंघन असा अंहस्चा अर्थ आहे.

ऋग्वेदाच्या पहिल्या मंडळांतील ९७ व्या सूक्तांत प्रत्येक मंत्राच्या शेवटीं 'अप नः शोशुचदघम् ' हें पालुपद आलें आहे. त्यांत आमचें ' अघ अगदीं समूळ धुवून टाक ' अशी अग्नीची विनवणी केलेली आहे. ऋ. ७, ४९, ३ यांत तसाच ७,८६, ६ यांत अनृत हा पापवाचक शब्द आला आहे. ' यासां राजा वरुणो याति मध्ये सत्यानृते अवपश्यन् जनानाम् , ' यात उदकाचा राजा जो वरुण तो लोकांचें पापपुण्य पहात जात असतो असें म्हटलें असून ' अस्ति ज्यायान्कनीयस उपारे स्वप्नश्च नेदनृतस्य प्रयोता । ' यात ल्हानाच्या हातून जवळच्या मोठ्याच्या प्रेरणेमुळें किंवा स्वप्नामुळें पाप घडतें असें सांगितलें आहे. आगस् म्हणजे अपराध हा शब्द ' किमाग आस वरुण ज्येष्ठं यत्स्तोतारं जिघांससि सखायम् ' [ ऋ. ७, ८६, ४ ] यांत आला असून ' हे वरुणा, असा माझा काय मोठा अपराध झाला कीं त्यामुळें तुझी स्तुति करणाऱ्या मज मित्राला तूं मारूं इच्छितोस ' असा प्रश्न त्यात वरुणाला केला आहे. आधुनिक कवि मोरोपंत यानें केकावलींत जशी सलगी केलेली आढळते, तशीच या मंत्रात ऋषीनें वरुणाशीं केलेली दिसते. ' हे शूर इन्द्रा, मी एक, दोन किंवा तीन किंवा अधिकहि जरी अपराध केले तरी तूं मला मारूं नको ' अशी इन्द्राची प्रार्थना एका ठिकाणीं केलेली आढळते ( मा न एकस्मिन्नागसि मा द्वयोरुत त्रिषु । वधीर्मा शूर भूरिषु । ऋ. ८, ४५, ३४ ). ' देवाविरुद्ध, मित्राविरुद्ध किंवा जास्पति [ जामात ? ] विरुद्ध जी आगळीक आम्हीं केली असेल तिची निष्कृति या स्तोत्रानें होवो' असें म्हणून 'देवान्वा यच्चकृमा कच्चिदागः सखायं वा सदमिज्जास्पतिं वा ' इत्यादि मंत्रांत [ १, १८५, ८ ] द्यावापृथिवींची ' आमचें रक्षण करा ' अशी प्रार्थना केलेली आहे.

एनस् शब्द ' त्राता न इन्द्रो एनसो महाश्चित् ' [ऋ. ७, २०, १ ] म्हणजे इंद्र आमचें मोठ्याहि पापापासून तारण करणारा आहे, इत्यादि ऋग्मंत्रांत आढळतो. तैत्तिरीय संहिता [ १, ८, ३, ११ ], वाजसनेय संहिता [ ३, ४५ ] इत्यादींतहि तो आढळतो. करंभ पात्राला उद्देशून तैत्तिरीय संहितेंत ' गाव, अरण्य, सभा इत्यादि ठिकाणीं आमच्या हातून जें जें पाप घडेल त्या त्या पापाचा या करंभानें निरास होवो ' असें म्हणून अग्नींत आहुति देतात असें दर्शविलें आहे ( यद् ग्रामे यदरण्ये यत्सभायां यदिंद्रिये । यच्छूद्रे यदर्य एनश्चकृमा वयं यदेकस्यापि धर्मणि तस्यावयजनमसि स्वाहा ।). ' पापमाहुर्यः स्वसारं निगच्छात् ' [ बहिणीशीं गमन करतो त्याला पापी म्हणतात । ऋ.१०,१०,२], 'न पापासो मनामहे नारायासो न जळ्हवः' [ऋ.८,६१,११ आम्हीं पापी, निर्धन किंवा अनग्नि होणार नाहीं, कारण आम्ही वर्षाव करणाऱ्या इंद्राला सोमअर्पण

करून मित्र करून घेतों ), 'पापासः सन्तो अनृता असत्या इदं पदमजनता गभीरम् ।' ( ऋ. ४, ५, ४ आम्हीं पापी, अनृत बोलणारे असल्यामुळें आम्हांला हें खोल स्थान प्राप्त + झालें ) इत्यादि मंत्रांत पाप शब्द आला आहे. काठकसंहितेंत ( १२, १२ ) 'पापाचा संसर्ग होऊं नये, या हेतूनें ब्राह्मण सुरा पीत नाहीं' ( तस्माद् ब्राह्मणः सुरां न पिबति पाप्मना नेत्संसृज्या इति ) या वचनात पाप्मन् शब्द आढळतो. 'अन्तः पश्यन्ति वृजिनोत ( वृजिना उत ) साधु सर्वं राजभ्यो परमा चिदन्ति ।' ( ऋ. २, २७, ३ हे आदित्य राजे पाप किंवा पुण्य सारें अन्तर्ज्ञानानें पहातात; जवळचें असो कीं दूरचें असो सर्व त्याना समजतें ). यांत वृजिन शब्द आला आहे. इतरहि अनेक ठिकाणीं हे शब्द येतात. उदा. 'न लिप्यति कर्मणा पापकेन' ( बृ. उ. ४, ४, २३ ), 'पातामवद्यात् दुरितादभीके' ( ऋ. १, १८५, १० ), 'न तमंहो दुरितानि मर्त्यमिंद्रावरुणा न तपः कुतश्चन ।' ( ऋ. ७, ८२, ७ ), 'नो मुंचत्वंहसः', 'मुंचतमागसः' अशा अर्थाचें पालुपद तैत्तिरीय संहितेंत ( ४, ७, १५ ) अनेक ठिकाणीं येतें. या सर्व ठिकाणीं पापाविषयींच्या सर्व साधारण कल्पना दिसून येतात.

पुढें स्मृतींत जो पापाचा अर्थ आहे तसा श्रुतींतहि कित्येक ठिकाणीं आहे. 'जो अश्वमेध करतो तो सर्व पापें तरून जातो, ब्रह्महत्याहि तरतो' असें वचन तैत्तिरीय संहितेंत असून ( ५, ३, १२, १–२ अपि वैतेन ब्रह्महत्यामतरन् सर्वं पाप्मानं तरति तरति ब्रह्महत्यां योश्वमेधन यजते ). त्यात पापापापात तारतम्यभाव सांगितलेला दिसतो; ब्रह्महत्या हें सर्व पापात मोठें पाप होय. शतपथ ब्राह्मणातहि असेंच म्हटलें आहे. तैत्तिरीय संहितेंत इन्द्रकृत ब्रह्महत्येची कथा आली असून तींत ब्रह्महत्येचें पातक निरनिराळ्या वस्तूंत विभागून दिल्याचें सांगितलें आहे. त्वष्ट्याचा पुत्र विश्वरूप हा ब्राह्मण होता, त्याचा इन्द्रानें वध केला, तेव्हा त्या ब्रह्मवधाचें पातक इन्द्राच्या मागें लागलें. तेव्हां त्यांतून सुटण्यासाठीं तें थोडें थोडें निरनिराळया ठिकाणीं वांटून देण्यांत आलें अशी कथा आहे ( तै. सं. २, ५, १, १–१७ ). तैत्तिरीय ब्राह्मणात ( ३, २, ८–११ ) अनेक पापांच्या पायऱ्या सांगून ब्रह्महत्येपलीकडे कांही नाहीं ( तद् ब्रह्महणं नात्यच्यवत ) असें सांगितलें आहे. याप्रमाणें पापाचें तारतम्य दाखविण्यांत येऊं लागलें व तसें होता होतां महापापें, उपपापें असें त्यांचें वर्गीकरणहि झालें. छांदोग्योपनिषदांत ( ५, ११, ५ ) अश्वपति राजा अभिमानानें म्हणतो, 'माझ्या राज्यांत चोर नाहीं, कृपण माणूस नाहीं, मद्यपी नाहीं, अग्निहोत्र घेतलें नाहीं असा गृहस्थ नाहीं, कोणी अविद्वान् नाहीं, स्वैर आचरण करणारा पुरुष नाहीं, मग स्त्रीची गोष्ट कशाला' ( न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपः ।

+ या मंत्रांत नरकाची कल्पना बीजरूपानें आहे असें सायणाचार्य म्हणतात.

नानाहिताग्निर्नाविद्वान्न स्वैरी स्वैरिणी कुतः) यांत अनेक पातकें असून त्या पूर्वी (५, १०, ९) मनुष्याला पतित करणारीं पांच पापें एकत्र सांगितलीं आहेत. 'स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबंश्च गुरोस्तल्पमावसन् ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः पञ्चमश्चरंस्तैरिति' यात सोनें चोरणें हें मोठें पाप म्हटलें आहे. पण त्या पूर्वी साधी चोरीहि महापाप होती. पण पुढें क्रमशः त्या कल्पनेचा संकोच होऊन सोन्याची चोरी, व नंतर ब्राह्मणाच्या सोन्याची चोरी महापापात जाऊन साधी चोरी * सामान्य पातकांत गाहिली. कोणी पांचाच्या जागी सात महापातकें सागतात. ऐहोळेच्या प्राचीन लेखांत 'द्यूतं मांसं सुरा वेश्याऽऽखेटचौर्यपरांगनाः। महापापानि सप्तैव व्यसनानि त्यजेद् बुधः।' अशीं सात व्यसनें सांगून त्यांना महापाप म्हटलें आहे (आखेटः=शिकार). सामान्यतः चोरी, परस्त्रीसंबंध व वध या तिहींचा महापापांत समावेश होतो.

या पापातून मुक्तता होते कीं नाहीं व झाल्यास ती कशी होते असा प्रश्न पुढें येतो. पापी किंवा पतित म्हणजे कोण याची नामावली देऊन स्मृत्यादि ग्रंथांत त्यांच्या निष्कृतीचा उपाय सांगितलेला असतो. अलीकडे या प्रकाराला पतितपरावर्तन असें म्हणतात, पण तो शब्द तितकासा बरोबर नाहीं. पतितप्रत्युद्धार हा शब्द अधिक योग्य दिसतो. पण पतितपरावर्तन हा शब्द आता रूढ झाला आहे, म्हणून तोच आपणहि घेऊन चालूं. पापांचें वर्गीकरण निरनिराळ्या प्रकारांनीं धर्मसूत्रें व स्मृतिग्रंथ यात केलेलें आढळतें. गौतमानें (२१, १-३) पापाची नामावळी दिली आहे; ती अशी: 'ब्रह्महसुरापगुरुतल्पगमातृपितृयोनिसंबंधागःस्तेननास्तिकनिन्दितकर्माभ्यासिपतितात्याग्यपतितत्यागिनः पतिताः। पातकसंयोजकाश्च। तैश्चाब्दं समाचरन्।' यातील पहिल्या तीन पापाना प्रायश्चित्त नाहीं. + यांत पुढें कौटसाक्ष्य (खोटी साक्ष), राजगामिपैशुन (राजाकडे चहाडी करणें), गुरूशीं खोटें बोलणें यांची गौतमानें भर घालून (२१,१०) त्याना महापातकासमान म्हटलें आहे. गौतमानें (१५,१५,-१८) एकावन अपंक्त्य गृहस्थांची यादी दिली असून त्यातील 'दुर्वालात् प्राक्' म्हणजे दुर्वालाच्या पूर्वीचे आणि गोहन्तृ, ब्रह्मघ्न, त्यांना मसलत देणारे, ब्रह्मचारिव्रत सोडणारे (अवकीर्णि), व वेद एकदां शिकल्यावर विसरून जाणारे [ पतितसावित्रीक ] यांना उपपातकांत गणलें आहे.

यांत पुनः मतभेद आहेतच. पतितांशीं व अपंक्तांशीं व्यवहार करूं नये (न पतितैः संव्यवहारो विद्यते। तथाऽपपात्रैः।) असें सागून जेणें करून पतन होतें त्या

---

* न विप्रं विप्रमित्याहुर्ब्रह्मस्वं विप्रमुच्यते। विप्रमेकाकिनं हन्ति ब्रह्मस्वं पुत्रपौत्रकम्॥ वसिष्ठधर्मसूत्र १७,८६, व बौ. ध. सूत्र १.५.१०२.

+ त्रीणि प्रथमानि अनिर्देश्यानि मनुः। (२१, ७).

गोष्टी ' स्तेयमाभिशस्यं ( ब्रह्महत्या ) पुरुषवधो ( यांतच स्त्रीवध येतो ) ब्रह्मोज्झं गर्भशातनं मातुः पितुरिति योनिसंबंधे सहापत्ये स्त्रीगमनं सुरापानमसंयोग-संयोगः' अशा आपस्तम्बानें सांगितल्या आहेत. आपस्तंब याशिवाय 'अशुचिकराणि ' म्हणजे अपवित्र करणाऱ्या गोष्टी सांगतो. त्या अशाः—' शूद्रगमनमार्यस्त्रीणाम्। प्रतिषिद्धानां मांसभक्षणम्। शुनो मनुष्यस्य च कुक्कुटसूकराणां ग्राम्याणां क्रव्यादसाम्। मनुष्याणां मूत्रपुरीषप्राशनम्। शूद्रोच्छिष्टमपपात्रगमनमार्याणाम्। ' [ आप. ध. सू. १, ७, २१, ८–११ ]. वसिष्ठानेंहि असेंच पातकाचें वर्गीकरण करून ब्राह्मणसुवर्णापहरण, पतितसंयोग इत्यादि महापातकांत व अग्नि सोडणारा, गुरूची अवज्ञा करणारा, नास्तिक, सोम विकणारा, यांना उपपातकांत घातलें आहे [ १, २०, २३ ]. या बाबतींत विष्णु तर मोठा बहादूर आहे. पापांच्या त्याच्या वर्गीकरणांत अतिपातक, महापातक, अनुपातक, उपपातक, जातिभ्रंशकर, संकरीकरण, अपात्रीकरण आणि प्रकीर्णक असे वर्ग केलेले आहेत. मातृगमन, दुहितृगमन, व स्नुषागमन ही त्याची अतिपातकें असून त्यांची निष्कृति केवळ अग्निप्रवेशानं म्हणजे मरणानेंच होते [ वि. ध. सू. ३४, १ ]. महापातकासमान म्हणून जीं पूर्वी सांगितलीं तीं विष्णुधर्मसूत्रांतील अनुपातकें होत. उपपातकांत तो गोवधादि घालतो. संकरीकरण म्हणजे ग्राम्य व आरण्य पशूंची हिंसा. अपात्रीकरणांत ' निन्दितेभ्यो धनादानं वाणिज्यं कुसीदं ( व्याजबट्टा ) असत्यभाषणं शूद्रसेवनं ' इत्यादिकांचा समावेश होतो, म्हणजे या गोष्टी करणारा अपंक्त होतो.

## स्वर्ग व नरक

या विवेचनावरून पापाची कल्पना काय होती हें समजून येईल. पातकें पांच, सात किंवा बाराहि सांगितलीं आहेत, त्यावरून असें दिसून येतें कीं त्या त्या वेळचें जें कांहीं उच्च ध्येय होतें, त्याच्या दृष्टीनें जें कांहीं निंद्य तें करणें म्हणजे पाप. तें केल्यानें काय होतें व न केल्यानें काय होतें तें आतां पहावयाचें. ध्येयाला पोषक होईल असें वर्तन करणें ह्मणजे पुण्य व तें केल्यानें स्वर्गप्राप्ति होते, आणि त्या ध्येयाला विसंगत तें पाप व त्यामुळें नरकप्राप्ति होते, असें सांगितलें आहे. स्वर्ग व नरक यांच्या कल्पना काय आहेत तें आतां पाहूं.

## स्वर्गाची कल्पना

स्वर्ग ह्मणजे कोणता तरी एक विशिष्ट देश असें आपण समजतों. त्यांत देव रहातात. ते चालत असतां त्यांचे पाय जमिनीला लागत नाहींत. त्यांच्या पापण्या कधीं मिटत नाहींत. स्वर्गांत अप्सरा असतात व इतरहि अनेक भोग असतात. अशा स्वर्गाविषयीं सामान्य कल्पना असून मनुष्याला त्या लोभनीय अशा आहेत. मुसलमानी धर्मात स्वर्गाची अशीच कल्पना आहे. पण मीमांसक मात्र

असें समजत नाहींत. त्यांच्या मतें ' प्रीतिः स्वर्गः ', प्रीति म्हणजे आत्मसंतोष हाच स्वर्ग होय. त्यांच्यात एक पूर्वपक्ष असा आहे कीं, वाटेल तितकें द्रव्य आहे, नित्य चमचमीत जेवण मिळतें, सुंदर वस्तु सहज प्राप्त असतात, अशी स्थिती म्हणजे स्वर्ग. यावर सिद्धांत असा कीं, या गोष्टी म्हणजे स्वर्ग नव्हत, स्वर्ग म्हणजे संतोष. प्रीतौ स्वर्गशब्दो वर्तते । शाबर भाष्य (जै.सू.४,३, १५). या सर्वांचा निष्कर्ष कुमारिलभट्टानें असा सांगितला आहे कीं एकाचा स्वर्ग म्हणजे आत्मसंतोष व दुसऱ्याचा स्वर्ग म्हणजे संतोष देणारी वस्तु (एकस्य प्रीतिः स्वर्गशब्दवाच्या अपरस्य प्रीतिमद् द्रव्यम्) असे दोन पक्ष असले तरी स्वर्ग म्हणजे कोणता तरी एक विशिष्ट देश अशी कल्पना मात्र कोणाचीच नाही. ×

## नरकाची कल्पना

नरक म्हणजे कांहीं तरी विशिष्ट स्थल या कल्पनेचें बीज वेदांत आढळतें. ' वैवस्वतं संगमनं जनानां यमं राजानं हविषा दुवस्य ' असा मंत्र ऋग्वेदांत (१०,१४,१) असून त्यांत ' सर्व लोकांना शेवटीं एकत्र जमविणारा जो वैवस्वत यमराजा त्याला हवि देऊन संतुष्ट कर ' असें म्हटलें आहे. यमाचा स्वतंत्र लोक आहे, त्याच्यावर पहारा करणारे व माणसांवर नजर ठेवणारे असे दोन कुत्रे आहेत ( यौ ते श्वानौ यम रक्षितारौ चतुरक्षी पथिरक्षी नृचक्षसौ । ऋ. १०, १४, ११ ) असें वर्णन आढळतें. पारशी लोकांतहि अशीच कल्पना असून यमाला त्यांचा शद्ध यिम असा आहे. तैत्तिरीय संहितेंत मृत्यूच्या पाशांची कल्पना आढळते. ' ग्रीवबद्धमेनं अमुष्मिल्लोके नेनीयेरन् ' ' मानेला फांस घालून त्याला त्या लोकीं वारंवार नेण्यांत येतें ' (३, ३, ८, ४) असें एका ठिकाणीं म्हटलें असून ' जे मुक्त न होतां जन्ममृत्यूच्या फेऱ्यांत सांपडलेले असतात, त्यांच्यावर यमाचें आधिपत्य असतें ' ( यावन्तो वै मृत्युबंधवस्तेषां यम आधिपत्यं परीयाय । ५, १, ८, २ ) असें अन्यत्र सांगितलें आहे. ऐतरेय ब्राह्मणांत (१२, ३) यमपाशांचा उल्लेख असून मैत्रायणी संहितेंत यमलोकाचा आहे. ' परलोक नाहीं असें मानणारा अज्ञानी पुरुष वित्ताच्या मोहानें चुकत जातो व पुढील गति पाहूं शकत नाहीं, म्हणून तो ( यम म्हणतो ) माझ्या हातांत वारंवार सांपडतो ' ( न सांपरायः प्रतिभाति बालं प्रमाद्यन्तं वित्तमोहेन मूढम । अयं लोको नास्ति पर इति मानी पुनः पुनर्वशमापद्यते मे ) असें कठोपनिषदांत म्हटलें आहे (१, २, ६). वेदान्तसूत्रांतहि यमलोकाचा उल्लेख आढळतो. ' संयमने त्वनुभूय इतरेषामारोहावरोहौ तद्गतिदर्शनात् । ' (३, १, १३) या सूत्रांत संयमनांत म्हणजे यमाच्या लोकांत जाऊन यातना भोगल्यानंतर अनिष्ट कर्म करणारे लोकांना या लोकीं परत यावें लागतें

× विशिष्टो देश उभयोरप्यवाच्यः ।

असा सिद्धांत मांडून त्याला ( न सांपरायः इ० व वैवस्वतं संगमनं इ० ) श्रुतींचा आधार दिला + आहे. पण याविषयीं वाद असून गौतमधर्मसूत्रांत ( २१, ४–६) तो दिलेला आढळतो. पतित होणें म्हणजे काय ? तर द्विजानां विहित अशा कर्माविषयीं अनधिकार ( द्विजातिकर्मभ्यो हानिः पतनम् । तथा परत्र चासिद्धिः । तमेके नरकम् ) आणि परलोकी त्यामुळें कांही प्राप्ति नाहीं याला कित्येक नरक म्हणतात, असें सांगून गौतम स्वतःचें मत म्हणून म्हणतो कीं नरक म्हणून एक स्वतंत्र देशच आहे ( विशिष्टे देशे दुःखैकतानस्य वासः ) तथापि त्याच्या पूर्वींच्या आचार्यांचें मत तसें नव्हतें. कर्माला अनाधिकारी होणें म्हणजेच पतन असेंच पुष्कळांचें मत आहे.

पुण्याचें फल स्वर्ग व पापाचें नरक ही कल्पना धर्मसूत्रांत आढळून येते. गौतम म्हणतो, ‘ स्वर्गः सत्यवचने विपर्यये नरकः । हरणे ( भूमेः ) नरकः । ’ सत्य भाषणानें स्वर्ग मिळतो, उलट केल्यानें नरक; जमीन बळकावल्यानें नरक प्राप्ति होते [ १३,७ व १७ ]. मातुलसुतापरिणयनादिकांच्या प्रेममूलक आचरणामुळें नरक मिळतो असें सांगून आपस्तंबानें त्याचा क्रम ‘ हृष्टो दर्पति दृप्तो धर्ममतिक्रामति धर्मातिक्रमे पुनर्नरकः ’ विषयानंद झाला कीं गर्विष्ठ होतो, गर्वामुळें धर्मातिक्रम करतो आणि धर्मातिक्रम झाला कीं नरक ठेवलेलाच ! [ १,४,१३,४ ].

नरक पूर्वीं एकच होता. पण पापसंख्या वाढत गेली तशी नरकाची संख्याहि वाढली ! ब्रह्मसूत्रात [ ३,१,१५ ] ‘ अपि च सप्त ’ या सूत्रांत रौरवप्रमुख सात नरक सांगितले आहेत. विष्णुधर्मसूत्रांत [ ४३ ], मनु [ ४,८८–९० ], याज्ञवल्क्य [३,२२२–२४], मार्कंडेय पुराण, गरुड पुराण, इत्यादिकांत रौरव, महारौरव, अवीचि इत्यादि एकवीस नरक सांगितले (नरकान् एकविंशतिम्). त्यात वर्णिलेली स्थिति इतकी भयंकर असते, तरी माणसें पाप करतातच. तेव्हां दंडधारण करणारा धर्मरक्षक असल्याशिवाय पापी पापनिवृत्त होत नाहीं, असें जे स्मृतिकारांनीं सांगितलें आहे तें खरें आहे.

## समाजनियंत्रणविषयक दोन पक्ष

पण या विषयींहि दोन पक्ष आहेत. समाज नियंत्रणाला धर्म व ईश्वर अवश्य पाहिजेत असें एक पक्ष म्हणतो. पण रशियांतील सोवियट सरकार धर्म व ईश्वर मानीत नाहीं. त्यांच्यामतें मनुष्य हा जात्या साधु वृत्तीचा ( inherently good ) असून अनिष्ट वस्तूंच्या संसर्गानें तो वाईट वाटतो. मनुष्याची जन्मतः निरपराधवृत्ति प्रस्तुतच्या कायद्यानेंहि मान्य केलेली आहे व तदनुसार पाच, सात किंवा विशिष्ट किमान

---

+ ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोके विशंति । एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ।। या गीतावचनांत ( ९, २१ ) हाच आशय दर्शविला आहे.

मर्यादेच्या आंतील वयाच्या मुलानें खून केल्यास त्याला पाप समजत नाहींत, अर्थात् तो शिक्षार्ह होत नाहीं. बहुजन समाज एकंदरींत चांगला व नीतिप्रवृत्त असतो व अगदीं थोडेच लोक वाईट असतात. पण या बाबतींत अडचण येते ती एवढीच कीं, हे थोडे वाईट लोक ओळखावयाचे कसे? या अडचणीमुळें सर्व लोकच वाईट आहेत असें धरून समाजनियंत्रणाची व्यवस्था करावी लागेल. दुसरा पक्ष मनुष्यप्राण्याला जात्या पापवृत्ति ( inherently sinful ) समजतो. असे दोन पक्ष पाश्चात्य देशांत आहेत. पण या विषयीं आपल्या कल्पना थोड्या निराळ्या आहेत. आपलें तत्त्व आत्म्याच्या अस्तित्वावर व त्याला अनुसरून पुनर्जन्म व कर्मविपाक या कल्पनांवर उभारलेलें आहे. ईश्वर एकवार नसला तरी आम्हांला चालेल, पण आत्म्यावांचून चालत नाहीं. आत्मा मानतो तो आस्तिक ( अस्ति आत्मा इति मतिर्यस्य स आस्तिकः ). आमच्या कांही मीमांसकांना ईश्वराची आवश्यकता भासली नाहीं, पण आत्मा त्यांना अवश्य वाटला. आत्मा स्वतः चांगला किंवा वाईट कांही नाही. तेव्हां मनुष्यप्राणी स्वभावतः पापी कीं चांगला तें सांगणें कठीण आहे. पण मनुष्यांत जें मन आहे त्याची प्रवृत्ति दुराचरणाकडे असते. गीतेंत 'चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम्। तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम्।' ( ६, ३४ ) असें मनाचें वर्णन केलें आहे त्या मनाला अभ्यासानें व वैराग्यानें आवरावें लागतें असा सिद्धांत आहे. धर्मशास्त्र व वेदान्तशास्त्र यांचें असें म्हणणें आहे कीं, मनुष्याला या मनःप्रवृत्तींच्या परिणामांतून सुटण्यासाठीं अनेक जन्म घेणें भाग आहे. कारण अनेक पूर्व जन्माचें संचित कर्म प्रारब्धरूपानें परिणत होऊन जन्म मिळतो व त्या जन्मांत होणारें कर्म ( क्रियमाण कर्म ) संचित होऊन प्रारब्ध होण्याच्या तयारींत असतें. असा कर्मविपाकाचा सिद्धान्त आहे. या सिद्धान्तानुसार वेदान्ती हा उद्योगवादी असला पाहिजे; पण आजचा अनुभव मात्र उलटा आहे. 'तोंडानें नर करणी करे सो नरका नारायण हो जाय' असें आपण सर्व म्हणतों. पण आपल्यापेक्षां इतर धर्माचे लोकच सांप्रत चिकाटीचे उद्योगी दिसतात. आणि आम्ही 'असेल आमचा हरी तर देईल खाटल्यावरी' असें म्हणत स्वस्थ बसूं लागलों आहोंत. कर्मविपाकाचा सिद्धांत आपल्या शास्त्रांत फार महत्त्वाचा असून त्यांचें स्वतंत्र विवेचनहि त्यांत केलेलें आहे.

या कर्मविपाकानुसार विविध पापांचें फळ विविध रूपानें दृष्टीस पडतें, अशी कल्पना होऊन अमुक केलें असतां तमुक होतें असें सांगण्यांत येऊं लागलें. वसिष्ठ-धर्मसूत्र म्हणतें. ( २०, ४४ ) 'स्तेनः कुनखी भवति', चोरी करतो त्याचीं नखें वाईट होतात, 'श्वित्री भवति ब्रह्महा' ब्रह्महत्या करणारा कुष्ठी होतो, 'सुरापः श्यावदन्तस्तु' मद्य पिणाराचे दांत वाईट होतात, 'दुश्चर्मा गुरुतल्पगः' गुरुपत्नी-

गमन करणाराची कातडी घाणेरडी होते. शंखलिखितांत ही यादी बरीच लांब दिली आहे. ' ब्रह्महा कुष्ठी गोघ्नश्चान्धो नैकरोगिणश्च सुवर्णस्तेयी कुनखी ' इ०. विष्णुधर्म-सूत्रांत पापी माणसांना त्यांच्या पापाप्रमाणें प्राणियोनींत जन्म घ्यावा लागतो असें आणखी सांगितलें असून ( ४४ ) तसेंच याज्ञवल्क्याहि म्हणतो. परस्त्रीचें हरण करणारा व ब्राह्मणाचें द्रव्य चोरणारा अरण्यांतील निर्जल देशांत ब्रह्मराक्षस होऊन पडतो ( याज्ञ. ३, २१२ ), धान्य चोरणारा उंदराच्या जन्मास जातो, सोनें चोरणारा कृमि कीटक पतंग या योनींत जातो ( याज्ञ. ३, २०७–२०८,२१३–२१५ ). कित्येक पापांचा परिणाम म्हणून वृक्षवेलींचाहि जन्म येतो असें सांगितलें आहे.

कर्मविपाकाची ही कल्पना बौद्ध वाङ्मयांतहि आढळते. नागार्जुन हा प्रसिद्ध बौद्ध ग्रथंकार आपल्या रत्नावली नामक ग्रथांत म्हणतो ' हिंसा केल्यानें मनुष्य अल्पायुषी होतो ' ( हिंसया जायतेऽल्पायुर्बह्वाबाधो विहिंसया। चौर्येण भोगव्यसनी सशत्रुः परदारिकः ॥ रॉ. एशिआटिक सोसायटीचें १९३४ सालचें जर्नल पान ३०७ ). कर्मविपाकाचा असा सिद्धान्त आपल्याकडे चालत आलेला असून पापाच्या निष्कृतीचा एक मार्ग त्यांत सांगितला आहे.

## प्रायश्चित्त

कित्येक पापांची निष्कृति कांहीं उपायांनीं करतां येते अशी कल्पना आहे. हे उपाय म्हणजे प्रायश्चित्त होय. याज्ञवल्क्य म्हणतो ' विहित कर्म न करणें, निन्दित कर्म करणें, इंद्रियांचें दमन न करणें या कारणांमुळें मनुष्य पतन पावतो ' ( विहितस्याननुष्ठानान्निन्दितस्य च सेवनात्। अनिग्रहाच्चेन्द्रियाणां नरः पतनमृच्छति ॥ ३,२१९), म्हणून त्यांतून शुद्ध होण्यासाठीं प्रायश्चित्त करावें म्हणजे आपल्या अंतरात्म्याला प्रसन्नता वाटते आणि लोकहि संतुष्ट होतात ( तस्मात्तेनेह कर्तव्यं प्रायश्चित्तं विशुद्धये। एवमस्यान्तरात्मा च लोकश्चैव प्रसीदति ॥ या. ३, २२७ ). पण प्रायश्चित्त न करतां मनुष्य पापांतच दंग होऊन राहील तर तो भयंकर अशा नरकास जाईल ( प्रायश्चित्तमकुर्वाणाः पापेषु निरता नराः। अपश्चात्तापिनः कष्टान्नरकान्याति दारुणान् ॥ या. ३, २२१ ). मनूनेंहि ' अकुर्वन् विहितं कर्म निन्दितं च समाचरन्। प्रसक्तश्चेन्द्रियार्थेषु प्रायश्चित्तीयते नरः ॥ ' ( ११, ४४ ) असेंच म्हटलें असून प्रायश्चित्त करावें म्हणजे पापापासून मनुष्य मुक्त होतो ( चरितव्यमतो नित्यं प्रायश्चित्तं विशुद्धये। निन्द्यैर्हि लक्षणैर्युक्ता जायन्तेऽनिष्कृतैनसः ॥ ११, ५३ ) असें सांगितलें आहे.

प्रायश्चित्त कोणत्या गोष्टींबद्दल आणि कोणत्या हेतूनें करावयाचें याचा थोडा विचार केला पाहिजे. उदाहरण म्हणून प्रथम व्यावहारिक गुन्हे घेऊं. मला कोणी मारलें तर मला नुकसान भरपाईबद्दल दिवाणी दावा करतां येतोच, पण सरकारहि स्वतः मारणारावर खटला करून त्याला शिक्षा करतें. कोणी कोणाची बेअब्रू केल्यासहि असा दुहेरी

प्रकार शक्य असतो. सरकार असें कां करतें ? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं तसें करण्यांत समाजाचें हित आहे. प्रजांचें नियंत्रण करून दंड समाजाचें धारण करतो (दंडो धारयते प्रजाः). गौतम म्हणतो 'दण्डो दमनादित्याहुः' दमन करतो म्हणून दंडाला दंड ह्मणतात, म्हणून दाडग्या लोकांचें दंड करून दमन करावें (तेनादान्तान्दमयेत् । ११, २८). दंडानेंच मनुष्याचें नियंत्रण होऊं शकतें. स्वभावत च शुद्ध असा माणूस विरळा (सर्वो दंडजितो लोके दुर्लभो हि शुचिर्नरः) असें मनुहि सांगतो (७, २२).राजसत्ता अपराध्याला जो दंड करते, त्याचे तीन चार उद्देश असतात. एक उद्देश सुडाचा; दुसरा प्रतिबंधाचा; तिसरा पवित्रीकरणाचा. पहिल्या उद्देशांतील दंड खुनास खून या स्वरूपाचा (eye for an eye, tooth for a tooth) किंवा बायबलांत ह्मटल्याप्रमाणें डोळ्यास डोळा, दातास दात अशा प्रकारचा असतो (retributive punishment); दुसऱ्या प्रकारचा दंड एकाचें उदाहरण पाहून दुसऱ्यानें त्यापासून धडा घ्यावा, त्यानें हि पुनः तसें करूं नये अशा प्रकारचा (preventive or deterrent) असतो. तिसऱ्या प्रकाराचा दंड अपराध्याला दोषापासून मुक्त करण्यासाठीं दिलेला असतो. एखाद्यानें चोरी केली असतां तो रीतसर शिक्षा भोगून परत आल्यावर शुद्ध होतो; मग जर त्याला कोणी चोर म्हणेल तर ती त्याची बेअदबी केल्यासारखें होईल. मनूनें हे सर्व प्रकार आठव्या अध्यायांत निरूपिले आहेत. चोर ज्या ज्या अंगानें चोरी करीत असेल, ते तें राजानें हरण करावें (८, ३३४); अधार्मिकाचें अडथळा करून, बन्धनानें किंवा अवश्य तर शेवटीं वधानेंहि नियंत्रण करावें (८, ३१०) असें मनु ह्मणतो. राजानें दंड केल्यामुळें निर्मळ झालेले पुरुष पुण्यवंतांप्रमाणेंच स्वर्गास जातात (राजभिः कृतदंडास्तु कृत्वा पापानि मानवाः । निर्मलाः स्वर्गमायान्ति सन्तः सुकृतिनो यथा ॥ मनु ८, ३१८) असेंहि त्यानें सांगितलें आहे.

राजानें करावयाच्या दंडांत जो पवित्रीकरणाचा उद्देश आहे, तोच पापाचें प्रायश्चित्त करण्यांत आहे. प्रायः आणि चित्त हे दोन शब्द मिळून प्रायश्चित्त शब्द झाला आहे. प्रायः ह्मणजे तप आणि चित्त ह्मणजे निश्चय; तप करून पापापासून शुद्ध होण्याचा निश्चय म्हणजे × प्रायश्चित्त. प्रायश्चित्त विधीचें मूळ यज्ञकर्माच्या अनुष्ठानांत जर कांहीं चूक झाली तर तिची निष्कृति करण्याच्या प्रकारांत आहे. वेदांत हा शब्द प्रायश्चित्ति या रूपांत आढळतो. स्वर्भानु असुरानें सूर्याला तमानें वेधिलें, त्यासाठीं देवांनीं प्रायश्चित्ति केली (सुवर्भानुरासुरः सूर्यं तमसाऽविध्यत् । तस्मै देवाः प्रायश्चित्तिमैच्छन् ।) असें तैत्तिरीयसंहितेंत म्हटलें आहे

---

× प्रायो नाम तपः प्रोक्तं चित्तं निश्चय उच्यते । तपोनिश्चयसंयोगात् प्रायश्चित्तमिति स्मृतम् ॥

(२, १, २, २). प्रायश्चित्ति योऽध्येति येन जाया न रिष्याति (अथर्ववेद १४,१,३०) असें अथर्ववेदांत वचन आहे. हा सूर्य प्रकाशला नाहीं, ह्मणून देवांनीं प्रायश्चित्ति केली व सोमारुद्रचरु अर्पण केला ( तै. सं. २, २, १० ) या तैत्तिरीय संहितेंतील वचनांत आलेल्या प्रायश्चित्ति शद्वाचा अर्थ सायणाचार्यांनीं प्रतिकार असा केला आहे. प्रायश्चित्ति शद्वाचें पुढें प्रायश्चित्त असें रूप झालें व यज्ञांत आपत्ति आल्यास त्याच्या निराकरणार्थ करावयाच्या कृत्यांना तो शद्व लावण्यांत येऊं लागला.

उख्य अग्नि विझला तर यजमानाला तम घेरतें, त्यासाठीं कृष्णवस्त्र किंवा कृष्ण-धेनु द्यावी, म्हणजे काळ्यानें काळ्याचा परिहार होतो अशा आशयाचें तैत्तिरीय संहि-तेंत वचन आहे (तमो वा एतं गृह्णाति यस्याग्निरुख्य उद्वायति मृत्युस्तमः कृष्णं वासः कृष्णा धेनुर्दक्षिणा तमसैव तमो मृत्युमपहते। ५, ७, ५, १–२) व त्यांत अग्नि विझल्याबद्दल प्रायश्चित्त सांगितलें आहे. तसेंच ‘ हविः देण्यासाठीं तांदुळ काढले पण त्या रात्रीं चंद्र उगवलेला दिसला ( म्हणजे चुकीनें तो अमावास्या समजला ) तर त्यानें तादुळांचे तीन वर्ग वेगळे करावे व त्यांचा चरु द्यावा ’ असें दुसऱ्या ठिकाणीं आढळतें ( यस्य हविर्निरुप्तं चंद्रमा अभ्युदियात् स त्रेधा तण्डुलान् विभजेत्। तै. सं. २, ५, ४, १–२ ). असें प्रायश्चित्ताचें मूळ होतें. पण कोणतीहि गोष्ट वाढवीत जाण्याची जी स्वाभाविक प्रवृत्ति असते तिला अनुसरून यज्ञाशिवाय इतरत्रहि न घडावें तें घडलें तर त्याच्या निराकरणार्थहि प्रायश्चित्तें चालू झालीं. अशीं हीं प्रायश्चित्तें सूत्रग्रंथांत शेंकडों सांगितलीं आहेत; कोणी तीं करीत नाहींत ती गोष्ट वेगळी. हीं प्रायश्चित्तें प्रथम अकामतः घडलेल्या गोष्टींबद्दल सांगितलीं होतीं; पण जाणूनबुजून केलेल्या दोषांबद्दलहि तीं आहेत असें पुढें सांगण्यांत येऊं लागलें. मनु म्हणतो, ‘ अकामतः कृते पापे प्रायश्चित्तं विदुर्बुधाः। कामकारकृतेऽप्याहुरेके श्रुतिनिदर्श-नात् ’ ( ११, ४५ ). यांतील अनिच्छेनें घडलेला दोष वेदाभ्यासानें जातो, मोहानें पण जाणून घडलेल्या पापांची निष्कृति निरनिराळ्या प्रायश्चित्तांनीं होते असेंहि मनु सांगतो ( ११, ४६ ) व याज्ञवल्क्यानेंहि असेंच मत या विषयावर दिलें आहे ( ३, २२६ ). उपवास, तप, दान, जप, होम या गोष्टी प्रायश्चित्त म्हणून सामा-न्यतः + सांगितल्या असून पापाची निष्कृति प्राणायाम केल्यानें होतें असेंहि याज्ञ-वल्क्य म्हणतो ( प्राणायामशतं कार्यं सर्वपापापनुत्तये। ३, ३०६ ). जपांत उपनिषदें वेदान्त, वेदसंहिता, अघमर्षण ( ऋतं च सत्यं चाभीद्धात् इत्यादि सूक्त ), मधु, रुद्र, पुरुषसूक्त, इत्यादिकांचा पाठ गौतम सांगतो ( १९, १२ ). तपांत ब्रह्मचर्य, सत्य-

+ तस्य निष्क्रयणानि जपस्तपो होम उपवासो दानम्। गौ. ध. सू. १९, ११; मनु, ११, २२७.

वचन, उदकस्पर्श, इत्यादिकांचा समावेश त्यानें केला असून (१९. १५) दानांत गाय, वस्त्र, घोडा, भूमि, तीळ, तूप, अन्न यांचें दान सांगितलें आहे. अशा रीतीनें पापाचें प्रायश्चित्त दानावर येऊन बसलें. राजाच्या सर्व पापांचा नाश ब्राह्मणांना दान दिल्यानें होतो असें वनपर्वांत स्पष्टच सांगितलेलें आढळतें ( यदेनः कुरुते किंचिद् राजा भूमिमवाप्नुवन् । सर्वं तन्नुदते पश्चाद्यज्ञैर्विपुलदक्षिणैः ॥ ३३, ७८ ब्राह्मणेभ्यो ददद् ग्रामान् गाश्च राजन् सहस्रशः । मुच्यते सर्व पापेभ्यस्तमोभ्य इव चंद्रमाः ॥ ७९ ) राज्य प्राप्त करून घेतांना काहींहि पाप झालेलें असलें तरी नन्तर यज्ञ करून ब्राह्मणांना दक्षणा म्हणून गांव, हजारों गाई अशी दक्षणा दिल्यानें तें सर्व नाहींसें होतें !

## पतितपरावर्तन

पतितांमध्यें सर्व प्रकारचीं पापें करणारांचा समावेश होतो. पतितसावित्रीक ह्मणजे गायत्री मंत्राचा जप ज्यांनीं सोडून दिला असे जे असतात त्यांना व्रात्य म्हणतात. या पापी लोकांना पवित्र करून घेण्यासाठीं व्रात्यस्तोम नांवाचा विधि सांगितला आहे ( कात्यायन श्रौतसूत्र २२,४,१–२८ ).पण त्याबरोबर उद्दालक व्रत करावें किंवा कोठे यज्ञ झाला असेल तेथें अवभृथ स्नान करावें असेंहि सांगितलें आहे. पतितसावित्रीक हे मोठे पातकी असें मानीत व त्यांचें उपनयन करूं नये, त्यांना वेद शिकवूं नयेत, त्यांच्याकडून यज्ञ करवूं नयेत व त्यांच्याशीं विवाह संबंध करूं नये, असें वासिष्ठ म्हणतो ( ११,७८–७९ ). व्रात्य शब्द वर्णसंकरानें झालेल्यांनाहि लावतात असें बोधायन धर्मसूत्रात ( १,९,१५, वर्णसंकरादुत्पन्नान् व्रात्यानाहुर्मनीषिणः । ) म्हटलें आहे. व्रात्यांची शुद्धि तीन पिढयापर्यंत चालेल असें पारस्करगृह्यसूत्र सांगतें [ २,५ ). व्रात्याच्या मुलांना संस्कार करावयाचे नाहींत, वेद शिकवावयाचा नाहीं; पण त्यांचे संस्कार करूं इच्छिणाऱ्यानें व्रात्यस्तोम करून मग शिकवावें, तसें केल्यानें ते व्यवहार्य होतात ( कालातिक्रमे नियतवत्त्रिपुरुषं पतितसावित्रीकाणामपत्येऽसंस्कारोऽनाध्यापनं च । तेषां संस्कारेप्सुर्व्रात्यस्तोमनेष्ट्वा व काममधीयीरन् व्यवहार्या भवंति इति वचनात् । पारस्कर ).

यावरून असें दिसून येईल कीं संस्कारहीन होऊन जे बाहेर गेले त्यांना तीन पिढ्या-पर्यंत परत आंत घेण्याची रीत यांत सांगितली आहे. त्यावेळीं अशा पतितांना पुनः ब्राह्मण करून घेण्याचें सामर्थ्य धर्मशास्त्रकारांना होते.कच्छकडील खोजे पूर्वी हिंदु असून आजहि मत्स्यापासून नऊ अवतार मानतात व त्या पुढील अवतार आगाखान हा होय असें समजतात. ते जर आज पुनः परत येऊं म्हणतील तर त्यांना व्रात्यस्तोम करून शुद्ध करून घेण्यास हरकत नाहीं. आपली पूर्वीची रीत 'कृण्वन्तो विश्वमार्यम्' ह्मणजे साऱ्यांना आर्य करून घेण्याची होती. आपण जर ही आपली पूर्व वहिवाट पुनः चालू केली नाहीं, तर पुढें परिणाम दुर्धर होणार आहेत. यापुढें धर्माचा राजकारणाशीं अधिक

संबंध येणार. लोकशाही कोणत्या तरी स्वरूपांत आपल्यावर लादली जाणार व तीत संख्येचें तत्त्वहि येणार. तेव्हां त्या दृष्टीनें आपला कार्यक्रम आंखला पाहिजे. ईश्वर एक आहे व महंमद त्याचा पैगंबर आहे असें म्हणून कोणी मुसलमान झाला म्हणजे तो बादशहाशीं धर्मदृष्ट्या समान होतो. अशा रीतीनें इतर समाज संघटित होऊं शकतात. या करितां आपल्यालाहि संख्याबल टिकविणें व वाढविणें अवश्य आहे. खिस्ती मिशनऱ्यांचे अनेकविध प्रयत्न हिंदूंना खिश्चन करण्यासाठीं चालले असतां कूपमंडूक न्यायानें संकुचित दृष्टि ठेवून मी एकटा सनातनधर्मी म्हणून राहिलों तरी पुरे अशी वृत्ति बाळगून आपलें यापुढें चालणार नाहीं. तीन पिढयांपर्यंत शुद्धि होते असें आपल्या कांही शास्त्रकारांनीं सांगितल्याचें पूर्वी दाखविलें आहेच. त्याचा अतिदेश करून म्हणजे ती सवलत परिस्थितीकडे पाहून वाढवून आपल्याला पांचशें वर्षांपूर्वीचे आपले बंधु आज परत आपल्यांत घेण्याला अडचण नसावी. असें करण्याला कोणत्याहि धर्मशास्त्रकाराचा स्पष्ट आधार नाहीं हें मात्र सागणें अवश्य आहे. देवल स्मृतींत म्लेच्छांनीं दास केलेल्या व अभक्ष्यभक्षण वगैरे करावें लागलेल्या पतितांना परत घेण्याची योजना दिलेली आहे. पण तींतहि चार वर्षांची मर्यादा आहे. त्याच देवल स्मृतींत म्लेच्छांशीं सहवास पांच वर्षांपासून वीस वर्षेंपर्यंत करणाराला दोन चांद्रायणानीं शुद्ध करून घेतां येतें असें सांगितलें आहे ( म्लेच्छैः सहोषितो यस्तु पञ्चप्रभृति विंशतिः । वर्षाणि शुद्धिरेषोक्ता तस्य चाद्रायणद्वयम् ॥ ५६ ). पण यापेक्षा जास्त वर्षें झाल्यास काय करावें तें सांगितलें नाहीं. हा श्लोक फक्त म्लेच्छदेशांत रहावें लागलेल्या मनुष्याबद्दल असावा असें वाटतें.

या देवलस्मृतीसंबंधानें येथें थोडेसें सांगितलें पाहिजे. आठव्या शतकांत कासिम नांवाच्या मुसलमान सरदारानें सिंधवर स्वारी केली व अनेक लोकांना बाटवून कित्येकांना पकडून आपल्याबरोबर नेलें. त्यावेळीं बाटाविलेल्या लोकाचें काय करावें असा प्रश्न विचारी लोकांपुढें उपस्थित झाला असतां ही स्मृति तयार झाली. देवलमुनि सिंधुतीरावर स्वस्थ बसले असतां त्यांना म्लेच्छांनीं बाटाविलेल्या लोकांची शुद्धि कशी होईल असा प्रश्न विचारण्यांत आला व त्यांचीं उत्तरें देवलांनीं दिलीं असा तिचा आरंभ झालेला आहे. देवलमुनि म्हणाले ‘ म्लेच्छांनीं पकडून नेल्यामुळें ज्या ब्राह्मणाला अपेयपान, अभक्ष्यभक्षण व अगम्यागमन घडलें त्याची शुद्धि वर्षाच्या आंतील अवधींत कशी करावी हें सांगतो. ब्राह्मणानें चांद्रायण व्रत करावें म्हणजे अमावास्येला उपवास करून पुढें चंद्राच्या कलांबरोबर एकेक घांस रोज वाढवीत पौर्णिमेपर्यंत जावें. व मग एक कमी करीत यावें. क्षत्रियानें याच्या पाऊणपट, वैश्यानें अर्धें व शूद्रानें केवळ पाचच दिवस हें व्रत करावें. पतनाला एक वर्ष होऊन गेलें असेल तर या चांद्रायण प्रायश्चित्तानंतर आणखी गंगास्नान करावें म्हणजे तो शुद्ध होईल. पण याहून जर अधिक मोठीं पापें पकडून नेलेल्यांकडून करविलीं असतील म्हणजे त्यांच्याकडून गोवध करविला

असेल, उष्टें खावविलें असेल, गाढव, उंट, ग्रामडुकर यांचें मांस खावयास घातलें असेल, त्यांच्या स्त्रियांशीं संग करविला असेल तर प्राजापत्य प्रायश्चित्त करावें म्हणजे त्यांची शुद्धि होईल. देवलांची याविषयींचीं वचनें अशीं:—

अपेयं येन संपीतमभक्ष्यं चापि भक्षितम् ।
म्लेच्छैर्नीतेन विप्रेण अगम्यागमनं कृतम् ॥ ७
तस्य शुद्धिं प्रवक्ष्यामि यावदेकं तु वत्सरम् ।
चांद्रायणं तु विप्रस्य सपराकं प्रकीर्तितम् ॥ ८ ॥
पराकमेकं क्षत्रस्य पादकृच्छ्रेण संयुतम् ।
पराकार्धं तु वैश्यस्य शूद्रस्य दिनपंचकम् ॥ ९ ॥
अथ संवत्सरादूर्ध्वं म्लेच्छैर्नीतो यदा भवेत् ।
प्रायश्चित्ते तु संचीर्णे गंगास्नानेन शुध्यति ॥ १५ ॥
बलाद्दासीकृता ये च म्लेच्छचांडालदस्युभिः ।
अशुभं कारिताः कर्म गवादिप्राणिहिंसनम् ॥ १७ ॥
उच्छिष्टमार्जनं चैव तथा तस्यैव भोजनम् ।
खरोष्ट्रविड्वराहाणामामिषस्यैव भोजनम् ॥ १८ ॥
तत्स्त्रीणां च तथा संगं ताभिश्च सह भोजनम् ।
मासोषिते द्विजातौ तु प्राजापत्यं विशोधनम् ॥ १९ ॥
चांद्रायणं त्वाहिताग्नेः पराकस्त्वथवा भवेत् ।
चांद्रायणं पराकं च चरेत्संवत्सरोषितः ॥ २० ॥
संवत्सरोषितः शूद्रो मासार्धं यावकं पिबेत् ॥
मासमात्रोषितः शूद्रः कृच्छ्रपादेन शुध्यति ॥ २१ ॥
ऊर्ध्वं संवत्सरात्कल्प्यं प्रायश्चित्तं द्विजोत्तमैः ॥
संवत्सरैश्चतुर्भिश्च तद्भावमधिगच्छति ॥ २२ ॥
न्हासो न विद्यते तस्य प्रायश्चित्तैर्दुरात्मनः ।

चांद्रायण, पराक, कृच्छ्र, प्राजापत्य या व्रतांनीं प्रायश्चित्त केल्यास एक वर्षाच्या आंत पतितांची शुद्धि देवलांच्या मतें होते. त्या नंतरच्या पतनावधीला सन्मान्य द्विजांनीं प्रायश्चित्त ठरवून द्यावें, पण चार वर्षांच्या पतनानंतर तो मनुष्य म्लेच्छच होतो व मग त्या म्लेच्छत्वाचा न्हास प्रायश्चित्तानें होत नाहीं असें मात्र देवलानें म्हटलें आहे.

देवलस्मृति अप्रामाणिक आहे असें कित्येक म्हणतात. परन्तु हेच श्लोक शूलपाणीच्या प्रायश्चित्तविवेकांतहि ( पान ४५५–५६ ) आलेले आहेत व शेवटीं 'तदूर्ध्वं [ त्यानंतर म्हणजे चार वर्षांनंतर ] तत्समत्वे पतितत्वात्प्रायश्चित्ताभावात् मरणम्' म्हणजे म्लेंच्छत्व येऊन पतित झाल्यामुळें त्याला प्रायश्चित्त नाहीं, त्यानें मरावें असा

शेरा मारलेला आहे. अपरार्कानेंहि हे श्लोक आपस्तंबाचे म्हणून उद्धृत केले असून ‘ संवत्सरैश्चतुर्भिः ’ बद्दल ‘ त्रिभिः संवत्सरैश्चापि ’ असा पाठ दिला आहे. शूलपाणीनें आणखीहि कित्येक श्लोक दिले असून त्यांत स्त्रिया भ्रष्ट केल्या असतील तरी त्यांची रजोदर्शनानें शुद्धि होते, मात्र त्या गर्भवती असतील तर गर्भ मात्र देऊन तो आपल्या जातींत घेऊं नये असें सांगितलें आहे. तेव्हां देवलस्मृति अप्रामाणिक मानण्याचें कारण कांही दिसत नाहीं.

स्वधर्मभ्रष्ट होऊन परधर्मांत गेलेल्यांना पुनः शुद्ध करून घेण्याचा वैयक्तिक उपक्रम शिवाजी महाराजांनीं करून नेताजी पालकर आणि बजाबा निंबाळकर यांना शुद्ध करून घेतल्याचें इतिहासप्रसिद्धच आहे. हा उपक्रम शिवाजी महाराजांनीं त्यावेळीं सार्वत्रिक केला असता तर आज पतितपरावर्तनाचा प्रश्न पूर्णपणें सुटला असता. त्यांना तसें करणें शक्यहि होतें. गागाभट्टांसारखी विद्वान् मंडळी त्यांना अनुकूल होती. पण काय झालें असेल तें असो, तो उपक्रम सार्वत्रिक झाला नाहीं खरा. आज पतितपरावर्तनाला विरोध करणारे सनातनी विद्यारण्यपंडितांहून विद्वान् आहेत असें कांहीं नाहीं. आद्यशंकराचार्यांनंतर आपल्या देशांत विद्यारण्याइतका मोठा माणूस दुसरा झाला नाहीं असें म्हणावयास कांहीच हरकत नाहीं. पण त्या विद्यारण्यांनीं सुद्धां पंचदशींत पतितपरावर्तनाला मान्यता दिलेली आहे. आत्मा उपाधींतून ज्ञानानें मुक्त होतो, त्याला बाटलेला ब्राह्मण जसा प्रायश्चित्तानें शुद्ध होतो अशी उपमा त्यांनीं दिली असून तींत ती मान्यता स्पष्ट दिसून येते. पण आजचे कित्येक पंडित ‘ देवो दुर्बलघातकः ’ या वर्गांतील होऊन बसले आहेत !

स्वधर्मभ्रष्ट झालेल्यांविषयींचा हा प्रकार झाला. त्यांना शुद्ध करणें खरोखर तितकेंसें कठीण नाहीं. ‘ पतितानां तु चरितव्रतानां प्रत्युद्धारः ’ पतित झालेलेहि जर व्रताचरण करतील तर त्यांचा प्रत्युद्धार म्हणजे आजच्या भाषेंत शुद्धीकरण होतें असें वसिष्ठधर्मसूत्रांत ( १५, १७–२१ ) सांगितलें आहे. इतर धर्मांतील मूळ लोकांना आपल्यांत घेण्याचा प्रश्न जरा बिकट आहे. आमचा समाज आज जातिप्रधान असल्यामुळें परधर्मांतून आपल्यांत येणारांना जात कोणती द्यावयाची असा प्रश्न येतो. ते कोणत्याहि विद्यमान जातींत बहुधा बसूं शकणार नाहींत. त्यांची स्वतंत्र जात होईल. पण आज जेथें हजारों जाति आहेतच त्यांत आणखी एक झाली म्हणून कांही बिघडणार नाहीं. कालान्तरानें जाति कमी होतील तेव्हां तिचाहि कोठेंतरी समावेश होईल. तेव्हां अगदीं परकीय अशा भारतीय नसलेल्यांनाही सनातन धर्मांत घेण्याला हरकत नाहीं. असे प्रकार पूर्वीं झालेले असून मिश्र जातींचा विचार करतांना पूर्वीं बौद्ध व यवन शकहूण इत्यादिक लोक सनातनी समाजांत कसे मिसळून जात हें ऐतिहासिक उदाहरणें घेऊन दाखविलें आहे. ‘ शूद्राणामनिरवसितानाम् ’ या सूत्रावरील पतञ्जलीच्या

भाष्यावरून शकयवनांचा सुद्धां शूद्रांत तो व पाणिनि अन्तर्भाव करीत होते असें दिसतें.

परकीयाना सनातनी करून घेतलें म्हणजे त्यांना समाजांत सर्वांच्या बरोबरीचें स्थान मिळालें पाहिजे हें तत्त्वतः खरें असलें तरी त्याचा निष्कारण बाऊ करण्याचें कारण नाहीं. समानतेचा डांगोरा पिटणाऱ्यांच्याहि बोलण्यात व कृतींत फरक असतो. तसें म्हटलें तर साम्य आज कोठेंहि नाहीं. मदर इंडिया पुस्तकाच्या कर्त्रीच्या नादीं लागून मनुस्मृति जाळणें युक्त होणार नाहीं. शक, पुण्ड्र, चिनी लोकांनाहि कर्माभाव व ब्राह्मणांपासून दूर रहाणें यामुळें वृषलत्व आलें, अर्थात् व्रात्यस्तोम करून त्यांना शुद्ध करून घेतां येईल असें दर्शविण्याइतका मनु उदार होता हें लक्षांत ठेविलें पाहिजे. थोडक्यांत सांगावयाचें तर पतितप्रत्युद्धाराचा व शुद्धीकरणाचा प्रश्न सांप्रत अगदीं जिव्हाळ्याचा झाला असून तो उदारपणानें सोडविणें अवश्य आहे. तेव्हां तो तसा सोडवूं पहाणाराना निदान विरोध तरी कोणी सनातनीयांनीं करूं नये. एवढें त्यानीं केलें तरी पुष्कळ होईल.

---

# धर्मशास्त्र
## आणि
# पूर्वमीमांसादि शास्त्रें

हा विषय फार गंभीर व तसाच कठीणहि आहे. त्याचें थोडक्यांत आणि सर्वांना समजेल असें विवेचन करणें अवघड आहे. तथापि तसें करण्याचा शक्य तितका प्रयत्न मी करणार आहे. हिंदुधर्मशास्त्राची चर्चा करतांना हा विषय घेण्याचें कारण असें कीं, या चर्चेत भाग घेणारा एक पक्ष 'मीमांसापद्धतीनें' वाद करावा असें आग्रहानें म्हणत असतो. ही चर्चा सांप्रत पंडितांमध्यें अनेक ठिकाणीं चालत असते. तेव्हां सामान्य लोकांना त्यांतलें कांहींच रहस्य न समजल्यामुळें पंडित पंडित जमले आणि भांडून निघून गेले, एवढाच परिणाम त्यांच्या मनावर न होतां कांही तरी त्यांतलें तात्पर्य समजावें, म्हणून मीमांसाशास्त्र म्हणजे काय प्रकार आहे हें थोडेंतरी धर्मशास्त्राची आस्था असणाऱ्या सामान्य माणसाला समजलें पाहिजे. यास्तव फार खोलांत न जातां मीमांसशास्त्राचें सामान्य स्वरूप काय आहे हें पहावयाचें आहे. धर्मशास्त्राच्या विचारांत पूर्वमीमांसेचा तसाच वेदांत, न्याय इत्यादि शास्त्रांचा संबंध कसा येतो, त्यापैकीं धर्मशास्त्राच्या दृष्टीनें खरोखर ग्राह्य काय आणि अग्राह्य काय, इत्यादि गोष्टी समजणें अगदीं अवश्य आहे.

याज्ञवल्क्य स्मृतींत विद्यांचीं व धर्मनिर्णयाचीं स्थानें चौदा सांगितलीं आहेत, तीं अशीं:—पुराणन्यायमीमांसाधर्मशास्त्रांगमिश्रिताः । वेदाः स्थानानि विद्याना धर्मस्य च चतुर्दश ॥ (१, ३). पुराण, तर्कशास्त्र, वेदवचनांचा ऊहापोह करणारें मीमांसाशास्त्र, मन्वादि स्मृति व गौतमादिधर्मसूत्रें, शिक्षा कल्प व्याकरण निरुक्त छंद व ज्योतिष हीं वेदाचीं सहा अंगें, आणि चार वेद मिळून चवदा स्थानें होतात. हीं शास्त्रें एकमेकांशीं संबद्ध एकमेकांवर अवलंबून आहेत अशी कल्पना असल्यामुळें धर्मशास्त्राचें सम्यग्ज्ञान होण्यास या चवदा स्थानांचा किंवा साधनांचा अभ्यास अवश्य आहे. त्या काळीं विद्येचा पसारा सारा या स्थानांत समाविष्ट झालेला होता. विष्णु पुराणादि कित्येक ठिकाणीं विद्यास्थानें अठरा सांगितलीं आहेत. पुराणादि चवदांत आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद आणि अर्थशास्त्र हे चार उपवेद धरून अठरा ही संख्या केलेली आहे. या विद्यासाधनांपैकीं मीमांसाशास्त्राचें स्वरूप आपल्याला पहावयाचें आहे.

मीमांसाशास्त्राचा उद्देश किंवा प्रयोजन काय? कोणत्याहि विषयाचें प्रयोजन ठरल्याशिवाय तिला कोणी हातच घालीत नाहीं. 'प्रयोजनमनुद्दिश्य न मन्दोऽपि

प्रवर्तते ' ।. मीमांसाशास्त्रावर कुमारिलभट्टासारख्या पंडितांचे अनेक ग्रंथ झालेले आहेत. परंतु त्या शास्त्राचें प्रयोजन समजल्याशिवाय ते वाचणार कोण आणि मानणार कोण ? × या कारणास्तव आमच्या ग्रंथकारांची ग्रंथाचें प्रयोजन देण्याची सामान्यतः वहिवाट आहे. पाणिनीनें मात्र ' वृद्धिरादैच् ' या सूत्रानेंच आपल्या अष्टाध्यायीला आरंभ केला व प्रयोजन सांगितलें नाहीं; मात्र वृद्धि हा मंगलवाचक शब्द आरंभीं घातला. पण त्याचा भाष्यकार पतंजलि यानें ग्रंथ-विषयाचें प्रयोजन सांगितलें § आहे. असो. मीमांसाशास्त्र हें धर्मशास्त्राला अत्यंत उपयुक्त आहे. ' अथातो धर्मजिज्ञासा ' हें त्याचें पहिलें सूत्र असून त्यांत त्याचें प्रयोजन सांगितलें आहे. * अथ म्हणजे वेदाध्ययनानंतर, अतः म्हणजे वेदाध्ययन हें धर्म जाणण्याचें साधन असल्यामुळें धर्मजिज्ञासा म्हणजे धर्म म्हणजे काय हें जाणण्याची इच्छा, असा त्याचा पदशः अर्थ असून वेदाध्ययनानंतर हें शास्त्र शिकल्यास पुरुषार्थीभूत जो धर्म तो काय आहे हें कळेल, असा त्याचा तात्पर्यार्थ आहे.

मीमांसाशब्द फार प्राचीन आहे. तैत्तिरीय संहितेंत (७,५,७,१) ' उत्सृज्यां ३ नोत्सृज्या ३ मिति मीमांसन्ते ब्रह्मवादिनः तद्वाहुरुत्सृज्यमेवेति ' असें वचन आहेः ' ( एक दिवस ) गाळावा कीं न गाळावा असा ऊहापोह ब्रह्मवादी करतात आणि ठरवितात कीं सोडावाच.' यांत मीमांसन्ते शब्दाचा अर्थ संशयित विषयाची चर्चा करून निर्णय देणें असा आहे. ' ब्राह्मणं पात्रे न मीमांसेत ' या तांड्य ब्राह्मणांतील वचनांत ( ६, ५, ९ ) ब्राह्मणाच्या पात्रतेची चर्चा करूं नये असें म्हटलें आहे. त्याच ब्राह्मणातील ' य.स्तल्पे वोदके वा विवाहे वा मीमांसेरंस्त एता उपेयुः ' यांत मीमांसेरन् असें पद आलें आहे ( २३, ४, २ ). काठक संहितेंत ' आधेयोऽग्निर्नाधेय इति मीमांसन्ते ' ( ८, १२ ), कौषीतकि ब्राह्मणांत ' उदिते होतव्य ३ मनुदिते इति मीमांसन्ते ' । ( २, ९ ) इत्यादि दुसऱ्याहि ठिकाणीं या क्रियापदाचा उपयोग केलेला आढळतो. ' मीमांस् ' हा धातु न वापरतांहि कित्येक ठिकाणीं ' ब्रह्मवादिनो वदन्ति ' असें म्हणूनच संशयित प्रश्नांची चर्चा केलेली आढळते ( तै. सं. २,५,३, ७; ३,२,९,२; ६,१,४,५ इ० ). मीमांसा हा शब्दहि कित्येक ठिकाणीं आढळतो. तै. ब्रा. ३, १०, ९, २ यांत ' सैषा मीमांसा अग्निहोत्र एव संपन्ना ' अग्निहोत्रांत ही मीमांसा पूर्ण झाली आहे, असें म्हटलें असून छांदोग्योपनिषदांत ' महाश्रो-

---

× सर्वस्यैव हि शास्त्रस्य कर्मणो वाऽपि कस्यचित् । यावत्प्रयोजनं नोक्तं तावत् तत् केन गृह्यते ॥ श्लोकवार्तिक १२.

§ रक्षोहागमलघ्वसंदेहाः प्रयोजनम् ।

* अथातो धर्मजिज्ञासा सूत्रमाद्यमिदं कृतम् । धर्माख्यं विषयं वक्तुं मीमांसायाः प्रयोजनम् ॥ श्लो. वा. ११.

त्रियाः समेत्य मीमांसांचक्रुः को नु आत्मा किं ब्रह्मेति '। ( ५, ११, १ ) आत्मा म्हणजे काय, ब्रह्म म्हणजे काय, अशी चर्चा मोठे श्रोत्रिय एकत्र जमून करते झाले असें वचन आहे. या सर्व ठिकाणी मीमास् धातूचा अर्थ संशय उत्पन्न झाला असतां ऊहापोह करून निर्णय देणें असा आहे. पाणिनीनें ' मान्–बध्–दान्–शान्भ्यो दीर्घश्चाभ्यासस्य' या सूत्रांत मान् पासून मीमांस् रूप कसें साधतें तें सांगितलें असून त्यावरील वार्तिकांत ' मानेर्जिज्ञासायाम् ' असें त्याचें स्पष्टीकरण केलें आहे. जाणण्याच्या इच्छेनें चर्चा करणें या अर्थी मान् धातूला स् प्रत्यय लागतांना त्याच्या आद्य अक्षराचा द्विरुक्ति होऊन द्विरुक्त अक्षर दीर्घ होतें व मीमांस्, बीभत्स् इत्यादि रूपें सिद्ध होतात. तात्पर्य मीमांसा म्हणजे चर्चापूर्वक जाणण्याची इच्छा. असो.

वाक्याचा अर्थ कसा करावा हें सांगण्याचा मीमांसा शास्त्राचा उद्देश आहे या संबंधीचे नियम सारे एकदम झाले असें नाही. पुष्कळ काळ चर्चा होत होत त्यांची निष्पत्ति झाली. ज्यांचा अर्थ करावयाचा तीं हि वाक्य वाटेल तेथलीं नसून वेदांतीलच होत. या वाक्यांतील एखाद्यांत एक विधि असून दुसऱ्यांत त्याच्या अगदीं विरुद्ध असेल, तर ते दोन्ही अर्थ विकल्पानें मानावे. विकल्पांत आठ प्रकारचे दोष असल्यामुळें जेथें दुसरा उपाय नसेल तेथेंच तो मानवा असें सांगितलें आहे. अशा प्रकारचे वाक्यार्थ मीमांसेचे नियम या शास्त्रात दिलेले असतात व त्यांतील कित्येक धर्मसूत्रातहि आढळतात. उदाहरणार्थ ' तुल्यबलविरोधे विकल्पः ' असें गौतमसूत्रातहि ( १,५ ) म्हटलें आहे. आपस्तंब म्हणतो प्रत्यक्ष श्रुतिवचन हें आनुमानिक आचाराहून बलवत्तर होय, म्हणजे एखाद्या आचाराला नष्ट श्रुतीचा आधार आहे असें अनुमान करण्यापेक्षां तद्विषयक प्रत्यक्ष श्रुतिवचन असेल तेंच प्रमाण होय ( श्रुतिर्हि बलीयसी आनुमानिकादाचारात् । आप. १.१.४.८.). हा सूत्रनियम 'विरोधे त्वनपेक्षं स्यादसति ह्यनुमानम्' या जैमिनीयमीमांसासूत्राला [ १.३.३.] धरून आहे. श्रुतिवचन व आचार यांत विरोध असेल तर तो आचार त्याज्य, पण विरोधिश्रुतिवचन नसेल तर त्या आचाराला नष्टश्रुति प्रमाण अनुमानानें मानावें. अशा रीतीनें मीमांसानियम धर्मशास्त्रात अर्थनिर्णयार्थ लावण्यांत येतात.

आज उपलब्ध असलेलीं मीमांसासूत्रें जैमिनीचीं असून तींच या विषयांवरील पहिला ग्रंथ होत असें मात्र नाहीं. व्याकरणमहाभाष्यकार पतञ्जलीनें ' काशकृत्स्नी ' नांवाची दुसरी मीमांसा सांगितली असून तिचें अध्ययन करणाऱ्या ब्राह्मणस्त्रीचा वाचक ' काशकृत्स्ना ' हा शब्द दिला आहे ( काशकृत्स्निना प्रोक्ता मीमांसा काशकृत्स्नी, काशकृत्स्नीमधीते काशकृत्स्ना ब्राह्मणी ।). काशकृत्स्नानें सांगितलेली मीमांसा ती काशकृत्स्नी, तिचें अध्ययन करणारी ती काशकृत्स्ना ब्राह्मणी. ही मीमांसा आतां लुप्त झाली आहे व तिच्या सारख्या आणखीहि कित्येक मीमांसा लुप्त झाल्या. जैमिनीचीं सूत्रें म्हणजे या विषयांवरील शेवटचा सूत्र ग्रंथ होय. स्वतः जैमिनीनें आत्रेय, आलेखन, आश्म-

रथ्य, ऐतिशायन, कामुकायन, कार्ष्णाजिनि, बादरायण, बादरि, लाबुकायन, आणि आपण स्वतः असे मीमांसाकार सांगितले आहेत. × जैमिनीच्या स्वतःच्या उल्लेखावरून प्रस्तुतचीं मीमांसासूत्रें जैमिनीच्या कोणा शिष्याचीं असावींत असें कांहीं जण म्हणतात. पण तें बरोबर नाहीं. कारण स्वतःचा उल्लेख तृतीय पुरुषीं करण्याचा आमच्या ग्रंथकाराचा पुष्कळ प्रघात आहे. प्रथम पुरुषीं 'मीं किंवा आम्हीं असें म्हणतो,' या शब्दांत जो अहंकार व्यक्त होतो, तो न व्हावा व इतर ग्रंथकारांबरोबरच आपण एक आहों, असें दाखवावें म्हणून ते स्वतःचा उल्लेख तृतीय पुरुषीं करीत.

मीमांसेचे पूर्व व उत्तर असे दोन भाग असून पहिलींत वेदांतील कर्मकाण्डात्मक किंवा यज्ञविषयक वचनांचा विचार केलेला आहे व दुसरींत ज्ञानकाण्डात्मक औपनिषद वचनांचा विचार आहे. बादरायणाचीं मीमांसासूत्रें जीं ब्रह्मसूत्रें ह्मणून प्रसिद्ध आहेत, तीं दुसऱ्या प्रकारचीं होत. बादरायणाच्या ब्रह्ममीमांसासूत्रांत जैमिनीचें नांव आढळतें व जैमिनि बादरायणाचें नांव प्रमाण म्हणून देतो. उदाहरण–' साक्षादप्यविरोधं जैमिनिः' । (ब्रह्मसूत्र १, २, २८), ' 'संपत्तेरिति जैमिनिस्तथा हि दर्शयति' ( १, २, ३१ ), ' धर्मं जैमिनिरत एव (३, २, ४०), 'परं जैमिनिर्मुख्यत्वात्' ( ४, ३, १२ ) इत्यादि ब्रह्मसूत्रांत जैमिनीचीं मतें सांगितलीं असून, पूर्व मीमांसेच्या १, १, ५; ५, २ १९; ६, १, १८; ११, १, ६४ इत्यादि सूत्रांत बादरायणाचें मत दिलें आहे. हे परस्पर उल्लेख कित्येक ठिकाणीं प्रमाण म्हणून तर कित्येक ठिकाणीं विरोधी म्हणूनहि आले आहेत. या वरून असें अनुमान होतें कीं जैमिनि व बादरायण या दोघानींहि दोन्ही प्रकारच्या वेदवचनांवर ग्रंथ लिहिले होते. मीमांसेचे वीस अध्याय ह्मणतात, त्यांतील बारा पूर्वमीमांसाविषयक जैमिनीचे, चार उत्तर मीमांसाविषयक बादरायणाचे आणि चार देवताकांडाचे अशी वांटणी सर्वसिद्धान्तसंग्रहांत केलेली आहे. ' नैष्कर्म्यसिद्धि ' ( बॉम्बे संस्कृत सीरीज पान ५४ ) नांवाच्या ग्रंथांत सुरेश्वराचार्यांनीं ' अथातो ब्रह्मजिज्ञास'इत्यादि सूत्रें जैमिनीचीं होत असें म्हटलें आहे.

प्रस्तुत जैमिनीच्या नांवावर प्रसिद्ध असलेल्या पूर्वमीमांसासूत्रांचे बारा अध्याय असून त्यांतील तीन, सहा व दहा हे वगळतां, प्रत्येक अध्यायांत चार पाद आहेत. त्या तीन अध्यायांत मात्र प्रत्येकीं आठ पाद आहेत. बादरायणाच्या ब्रह्मसूत्रांचे चार अध्याय व प्रत्येक अध्यायाचे चार पाद अशी रचना आहे. या सर्व सूत्रांचे विषय अधिकरणांत विभागले असून प्रत्येक अधिकरणांतील प्रतिपाद्य विषयाला न्याय म्हणतात. पूर्वमीमांसासूत्रें

× जैमिनीचा ग्रंथ उत्तम असल्यामुळें पूर्वींचे त्या विषयावरील ग्रंथ लुप्त झाले. पाणिनीनें सुद्धां पूर्वींचे अनेक व्याकरणकार सांगितले आहेत. पण त्याच्या ग्रंथापुढें जुने ग्रंथ टिकले नाहींत.

सुमारें २७०० असून त्यांची विभागणी सुमारें एक सहस्र अधिकरणांत केलेली आहे. हे सर्वच न्याय किंवा सिद्धान्त धर्मशास्त्रांत येत नसून त्यांतील शेंदोनशें मात्र येतात. एकेका प्रतिपाद्य न्यायाचें विवेचन करणारें जें अधिकरण तें पांच अंगांनीं युक्त असतें. ' विषयो विशयश्चैव पूर्वपक्षस्तथोत्तरम् । निर्णयश्चेति पंचांगं शास्त्रे ऽधिकरणं स्मृतम् । ' अशीं तीं पांच अंगें होत. विषय म्हणजे विचाराकरितां घेतलेलें वाक्य किंवा मुद्दा, विशय म्हणजे त्या विषयींचा संशय, पूर्वपक्ष म्हणजे त्या संबंधानें सकृद्दर्शनीं होणारें मत, उत्तर म्हणजे तें मत योग्य नसून वास्तविक अर्थ निराळा आहे असें दाखवून देणारें प्रतिपादन आणि निर्णय म्हणजे या सर्व ऊहापोहांतून काढिलेला निष्कर्ष किंवा सिद्धान्त. अधिकरणांत येणाऱ्या या सर्व गोष्टी सूत्रांत स्पष्ट असतात असें नाहीं. भाष्यकार त्या स्पष्ट करून सांगतात. उदाहरणार्थ ' तदनन्यत्वमारम्भणशब्दादिभ्यः ' हें बादरायणाच्या ब्रह्मसूत्रांतील एक सूत्र ( २, १, १४ ) घेऊं. कारणरूप ब्रह्म आणि कार्यरूप जगत् यांत भिन्नत्व नसून अनन्यत्वच आहे असें यांत प्रतिपादिलें असून त्यापासून चालू झालेल्या अधिकरणाला आरंभणाधिकरण म्हटलें आहे. यात जगत् व ब्रह्म यांचा संबंध हा विषय, जगत् व ब्रह्म हीं अगदीं पृथक् कीं अनन्य हा संशय, पण एकच समजल्यास विधिप्रतिषेधरूप शास्त्र व्यर्थ ठरेल म्हणून तीं भिन्न होत असा पूर्वपक्ष; ' वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यं ' इत्यादि उपनिषदांतील सुवर्ण व अलंकार, किंवा मृत्तिका व घट यांतील ऐक्यांच्या दृष्टान्तांनीं ब्रह्म व जगत् हीं एकरूपच होत असें उत्तर व तीं अनन्य आहेत हा सिद्धान्त. याच प्रमाणें पूर्वमीमांसेच्या न्यायांतहि क्रम असतो.

जैमिनीचीं हीं पूर्व मीमांसासूत्रें इ. स. पूर्वी ३०० पासून इ. स. १०० पर्यंतच्या काळात झालेलीं दिसतात. त्या सूत्रावर कोणी स्पष्टीकरणार्थ वृत्ति केली होती असें भाष्यकार शबरानें आपल्या भाष्यांत केलेल्या त्याविषयींच्या उल्लेखावरून दिसतें. पण त्या वृत्तिकाराचें नांव सांगतां येत नाहीं. उपवर्ष हा त्या सूत्रांवरील पहिला टीकाकार होय. बौधायन आदिकरून दुसरेहि वृत्तिकार होते असें कांहींचें मत आहे. शबरस्वामीचें या सूत्रांवरील भाष्य इ. स. ४००च्या सुमारास झालेलें आहे. त्यावर प्रभाकर भट्टाच्या बृहती म्हणजे मोठी व लघ्वी म्हणजे लहान अशा दोन टीका आहेत. प्रभाकराला गुरु असेंहि म्हणत. प्रभाकराचा शिष्य शालिकनाथ याच्या ' ऋजुविमला व ' दीपशिखा ' नांवाच्या टीका त्या टीकेवर असून तींत प्रभाकराला कित्येक ठिकाणीं गुरु व पुष्कळ ठिकाणीं प्रभाकरगुरु म्हणून उल्लेखिलेलें आहे. प्रभाकराच्या मीमांसापक्षाला प्राभाकर पक्ष म्हणतात. त्याच्या विरुद्ध कुमारिल भट्टाचा भाट्ट पक्ष असून दोघे जवळ जवळ समकालीनच होते. प्रभाकर थोडा आधींचा असण्याचा संभव आहे. त्याचा शिष्य शालिकनाथ यानें कुमारिलभट्टांच्या मतांचा उल्लेख करून त्यांचें खंडन करण्याचा प्रयत्न केलेला आहे. या दोन पक्षांमध्यें सामान्य विषयासंबं-

धानें एकमत असलें, तरी बारीक बाबतींत पुष्कच भेद आहेत. प्राभाकर पक्ष पांच प्रमाणें मानतो तर कुमारिल सहा मानतो. अर्थापत्ति प्रमाणासंबंधानें दोघांत मतभेद असून अनेक अधिकरणाच्या बाबतींतहि तो व्यक्त झालेला आहे. कुमारिलभट्टाचे श्लोकवार्तिक, तंत्रवार्तिक व टुप् टीका असें जैमिनिसूत्रांवर तीन टीकारूप ग्रंथ आहेत. श्लोकवार्तिक पहिल्या अध्यायाच्या पहिल्या पादावर, तंत्रवार्तिक पहिल्या अध्यायाच्या दुसरा पादापासून तिसरा अध्यायाच्या समाप्तिपर्यंत आणि टुप्टीका इतर भागांतील निवडक सूत्रांवर. या टीकांवर उपटीका आहेत. कुमारिलभट्टाला भट्टपाद असेंहि म्हणत व त्यावरून त्याच्या अनुयायांना भाट्ट म्हणतात. कुमारिलाच्या श्लोकवार्तिकावर 'न्यायरत्नाकर' नांवाची पार्थसारथि मिश्राची टीका असून, जैमिनिसूत्रांवरीहि 'शास्त्रदीपिका' नांवाची त्याची टीका आहे. दोन्ही मीमांसापक्षांचे दुसरेहि आणखी ग्रंथ पुढें होत गेले. दुसरा कांही उद्योग नाहींसा झाल्यामुळें कीं काय पंडित लोक नुसत्या टीका करीत सुटले ! या टीकोपटीकांत पांडित्यप्रकर्ष अत्यंत दाखविला असून बुद्धीची पराकाष्ठा केली आहे; पण स्वतंत्र विचारशक्ति मात्र दाखविलेली नसून सारेजण ठरींव चाकोरींतून फिरत असलेले दिसतात. असो.

मीमांसाशास्त्राचें प्रयोजन धर्मजिज्ञासा हें पहिल्या सूत्रांत सांगितल्यावर दुसऱ्या 'चोदनालक्षणोऽर्थो धर्मः' या सूत्रांत धर्माचें स्वरूप व साधन हीं जैमिनीनें सांगितलीं. चोदना म्हणजे 'क्रियायाः प्रवर्तकं वचनम्'. कोणत्यातरी क्रियेला मनुष्याला प्रवृत्त करणारें वचन म्हणजे चोदना. हें वचन दुसरें कोठलें नसून वेदांतीलच होय. म्हणजे चोदना शब्दावरून कर्मानुष्ठानाला मनुष्याला प्रवृत्त करणारें वेदांतील वचन असा बोध होतो. त्या वेदवचनानें दाखविलेला तो धर्म. पण वेदवचनानें दाखविलेली गोष्ट अर्थ म्हणजे श्रेयस्कर चांगली असली तरच ती धर्म होते. ती अनर्थ असेल तर अधर्म समजावी. उदाहरण 'श्येनेनाभिचरन् यजेत्' असें म्हणून श्येनयाग नांवाचा जारण मारण प्रकार वेदांत सांगितला आहे, पण तो अर्थ म्हणजे श्रेयस्कर नसल्यामुळें धर्म नव्हे. 'ज्योतिष्टोमेन स्वर्गकामो यजेत' यांत स्वर्ग हा पुरुषार्थ असल्यामुळे ज्योतिष्टोम हा धर्म होय. वेदांतील हा धर्म म्हणजे यज्ञ; कारण स्वर्गाची इच्छा करणाऱ्यानें तो करावा असें वेदांत सांगितलें आहे. 'यज्ञेन यज्ञमयजंत देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन्' या ऋग्मंत्रांत यज्ञालाच धर्म म्हटलें आहे.

यज्ञ म्हणजेच धर्म असें पूर्वमीमांसेला अनुसरून ठरलें, पण त्याला प्रमाण काय? यज्ञानें ज्या स्वर्गाची प्राप्ति व्हावयाची तो कांहीं प्रत्यक्ष दिसत नाहीं. त्याचें अनुमानहि करतां येत नाहीं. अमुक अमुक गोष्टीसारखा तो आहे अशा उपमेनेंहि त्याचें ज्ञान होणें अशक्य. कांही झालें तरी अनुमान व उपमान हीं प्रमाणें प्रत्यक्षावरच अवलंबून असणार. धूर पर्वतावर दिसला म्हणजेच त्यावरून अग्नीचें अनुमान करता येतें. 'गोस-

दृशः गवयः ' बैलासारखा गवा असतो, यांतहि बैल प्रत्यक्ष पहाण्यांत येईल तेव्हांच त्यावरून गव्याची ओळख पटेल. अर्थापत्ति प्रमाणहि स्वर्गाच्या बाबतींत लागू पडत नाहीं. ' पीनो देवदत्तो दिवा न भुंक्ते ' म्हणजे देवदत्त चांगला गलेलठ्ठ आहे, पण दिवसा कांही खात नाही, असें आढळल्यावर तो ' रात्रौ भुंक्ते ' म्हणजे रात्रीस भोजन करतो असें सहजच ठरतें. अशा कांहीं प्रकारानें स्वर्गाचें ज्ञान होत नाहीं. अभाव प्रमाणहि येथें निरुपयोगीच. घटांत पट नाहीं असें म्हणतों तेव्हां दोन्ही प्रत्यक्ष दिसणारे पदार्थ असतात. तसें स्वर्गाचें नाहीं. हीं सारीं प्रमाणें प्रत्यक्षावरच अवलंबून असतात. पण स्वर्ग प्रत्यक्षाचा विषयच नाहीं. चोदनेनें म्हणजे वेदवाक्याच्या प्रमाणावरून तो जाणावयाचा असतो.

धर्माचें ज्ञान वेदवाक्यावरूनच होतें व तो वेद शब्द आणि अर्थ मिळून झालेला असून शब्द व अर्थ याचा संबंध नित्य आहे ( औत्पत्तिकस्तु शब्दस्यार्थेन संबंधः । पू. मी. सू. १, १, ५ ). शब्द उत्पन्न झाला तेव्हांच त्याचा अर्थहि उत्पन्न झाला. शब्द व अर्थ हे दोन्ही नित्य आहेत. हें नित्यत्व कसें तें शब्दनित्यत्वाधिकरणांत ( सू. १, १, ६–२३ ) दाखविलें आहे. पूर्वमीमांसेच्या मतें वेद हे नित्य व अपौरुषेय होत. हा सिद्धान्त स्वतंत्र अधिकरणांत ( १, १, २७–३२ ) प्रतिपादिलेला आहे. "वेद केव्हां झाले हें सांगतां येण्यासारखें असून ते पुरुष कृतच होत,कारण त्याचे कांही भाग काठक, कांहीं कालापक, कांही पैप्पलाद अशा नांवांनीं प्रसिद्ध आहेत. हीं नांवें त्यांना त्यांच्या कर्त्यांच्या नांवांवरून पडलेली होत; तसें त्यांत कित्येक अनित्य गोष्टींचाहि निर्देश आढळतो,उदाहरण, ' प्रवहणाचा पुत्र बबर हा इच्छा करता झाला, ' ' कुसुरविन्द नांवाचा उद्दालकपुत्र इच्छा करता झाला, ' अशा आशयाचीं वाक्यें त्यांत आहेत, अर्थात् बबराच्या त्याचप्रमाणें उद्दालकपुत्र कुसुरविन्दाच्या नंतर वेद झाले, त्यांच्यापूर्वी ते ग्रंथ नव्हते असें उघड होतें " अशा आशयाचा पूर्व पक्ष + करून त्याला उत्तर दिलें आहे कीं, " वेद कोणी केले याचें ज्ञान कोणालाच नाहीं, एक दुसऱ्यापासून शिकला, दुसरा तिसऱ्यापासून, अशा रीतीनें कितीहि मागें मागें गेलें तरी वेदांचा कर्ता शेवटीं कोणालाच ठाऊक नाहीं, अर्थात् ते पुरुषकृत नव्हेतच, म्हणजे ते अपौरुषेय होत. कठ, कलापक, पिप्पलाद इत्यादिकांनीं ज्या भागांचा विशेष अभ्यास केला, त्या भागांना लौकिकांत त्यांच्या अभ्यासकांचीं नांवें मिळालीं

---

+ वेदांश्चैके संनिकर्षं पुरुषाख्याः । १, १, २७ । अनित्यदर्शनाच्च । २८ (शबर-संनिकृष्टकाला कृतका वेदा यतः पुरुषाख्याः काठकं कालापकं पैप्पलादमिति । जननमरणवन्तश्च वेदार्थाः श्रूयन्ते । बबरः प्रावाहणिरकामयत औद्दालकिरकामयतेत्येवमादयः । उद्दालकस्यापत्यं गम्यते औद्दालकिः । यद्येवं प्रागौद्दालकिजन्मनो नायं ग्रंथो भूतपूर्वः । एवमप्यानित्यता । )

एवढेंच. * ते त्या वेदभागांचे कर्ते नव्हत. तसेंच बबर प्रावाहणि हें कोणा मनुष्याचें नांव नसून प्रावाहणि म्हणजे नित्य वहाणारी वायुदेवता व बबर हा त्या वायूचा शब्द होय. अर्थात् वायुदेवता नित्य, तसाच वेदहि नित्य होय. आतां ' वनस्पतयः सत्रमासत ', ' सर्पाः सत्रमासत ' म्हणजे वनस्पति सत्रानुष्ठानाला बसल्या, सर्प अनुष्ठानाला बसले, अशीं जीं निरर्थक दिसणारीं वाक्यें वेदांत आहेत, तीं सत्रांच्या स्तुतीसाठीं आहेत, वनस्पति अचेतन असूनहि त्यांनीं सत्र आरंभिलें, मग विद्वान् ब्राह्मण आरंभतील यांत नवल काय, असा त्यांचा भावार्थ आहे. " हा मीमांसा सिद्धान्त ' परं तु श्रुतिसामान्यमात्रम् ' ( १, १, ३१ ) व ' कृते वा विनियोगः स्यात् कर्मणः संबंधात् । ' ( १, १, ३२ ) या सूत्रांवरील टीकेंत स्पष्ट केला आहे.

वेद हे नित्य व अपौरुषेय असल्यामुळें प्रमाण आहेत असें ठरलें तरी त्यांचा अर्थ अमुकच आहे असें कसें म्हणावें ? त्यांत कोणी एक अर्थ म्हणतो, तर दुसरे दुसरा कांही म्हणतात; अशा वेळीं वेदवाक्याचा अर्थ कसा करावा हें सांगण्यासाठीं मीमांसा शास्त्र प्रवृत्त झालें आहे. श्लोकवार्तिकांत ( १२७–१२८ ) म्हटलें आहे ' स्थिते वेदप्रमाणत्वे पुनर्वाक्यार्थनिर्णये । मतिर्बहुविदां पुसां संशयान्नोपजायते ॥ केचिदाहुरसावर्थः केचिन्नासावयं त्विति । तन्निर्णयार्थमप्येतत् परं शास्त्रं प्रणीयते ॥. '

वेदांत जीं अनेक वाक्यें आहेत, त्यांतील सर्वच कांहीं अमुक कर्म करावें असें सांगणारीं म्हणजे यज्ञवाचक नाहींत. पण वेद हे यज्ञार्थ आहेत, म्हणून यज्ञार्थ किंवा क्रियार्थ अशीं जीं नाहींत, तीं वाक्यें निरर्थक होत असें कोणी म्हणेल, तर मीमांसक म्हणतात, तसें नाहीं. वेदांचा उद्देश कर्माचें म्हणजे यज्ञाचें ज्ञान करून देण्याचा आहे. शबरस्वामी सांगतात 'दृष्टो हि तस्यार्थः कर्मावबोधनं नाम'; म्हणून जीं वाक्यें क्रियार्थ नाहींत असें वाटतें, तीं विधिवाक्याशीं जुळतीं अशीच असल्यामुळें तीं विधींची स्तुति करणारीं आहेत निरर्थक नाहींत असें समजावें. या विषयींचा हा पूर्वपक्ष व उत्तरपक्ष ' आम्नायस्य क्रियार्थत्वादानर्थक्यमतदर्थानाम् । ' ' शास्त्रदृष्टविरोधाच्च । ' १, २, १–२ आणि ' विधिना त्वेकवाक्यत्वात्स्तुत्यर्थेन विधीनां स्युः । ' १, २, ७ या सूत्रांत सांगितला आहे. ' वायव्यं श्वेतमालभेत भूतिकामः । वायुर्वै क्षेपिष्ठा देवता ' ( तै. सं. २, १, १ ), ' अग्निर्हिमस्य भेषजम् ' अशीं जीं वाक्यें आहेत त्यांत ' वायु ही अति वेगवती देवता होय ' किंवा ' अग्नि म्हणजे थंडीवरील औषध ' असल्या वाक्यांत क्रिया सांगितलेली नसली, तरी क्रियार्थ वाक्यांचेच ते भाग असल्यामुळें, ते स्वतंत्र नसून क्रियांची स्तुति करणारे होत. यांत पूर्वपक्षाच्या मतें कांहीं वेदवाक्यें कर्मो-

---

* उक्तं तु शब्दपूर्वत्वम् । १, १, २९ ( कर्तृस्मरणाभावात् अपौरुषेया वेदाः । शब्दशब्देनात्रशब्दजन्यमध्ययनं विवक्षितम् । ). आख्या प्रवचनात् । १, १, ३० ( प्रकर्षेण वचनं अनन्यसाधारणं कठादिभिरनुष्ठितम् । ).

पदेशपर नसलीं तरी एकंदरींत उभयतांना आम्नायाचें म्हणजे वेदांचें क्रियार्थत्व मान्य आहे. एक म्हणतो तसलीं वाक्यें निरर्थक, तर दुसरा तीं सार्थ म्हणतो. पण या मतभेदाचा पुढें मोठा परिणाम झालेला दिसतो, तो असा.

कर्म म्हणजे याग किंवा यज्ञ त्यासंबंधाचीं वाक्यें तेवढीं मुख्य, बाकीचीं गौण, त्या कर्मांची स्तुति करणारीं असें मीमांसकांनीं ठरविलें. पण वेदाचेच भाग जीं उपनिषदें त्यांत 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः' अशीं वाक्यें असून तीं विधि सांगणारीं दिसतात, पण तो विधि यज्ञ तर नाहीं; कारण यज्ञ म्हणजे देवतेला उद्देशून द्रव्य अर्पण करणें (देवतोद्देशेन द्रव्यत्यागो यागः). आत्मा वा अरे द्रष्टव्यः, यांत असा द्रव्यत्याग नाहीं, अर्थात् यागहि नाहीं. मग या वाक्यांचें (म्हणजे उपनिषद्वाक्यांचें) काय करावयाचें, असा प्रश्न येतो. यावर पूर्वमीमांसकाचें उत्तर असें आहे कीं, 'आत्मा वा अरे द्रष्टव्यः' असलीं वाक्यें विधि सांगतच नाहींत, तर यज्ञकर्मानें स्वर्गप्राप्ति ज्या आत्म्याला व्हावयाची, त्या आत्म्याचें स्वरूप काय एवढेंच तीं सांगतात; अर्थात् हीं उपनिषद्वाक्यें अप्रधान होत. पण उत्तरमीमांसकांचें मत याच्या उलट असून उपनिषद् वाक्यें जीं आत्म्याचें स्वरूप सांगतात तींच प्रधान होत, व कर्मोपदेश करणारीं व तत्संबद्ध इतर वाक्यें हीं गौण असून आत्मज्ञानाला अवश्य असलेली चित्तशुद्धीची भूमिका सिद्ध करणारी केवळ होत, असें ते म्हणतात. पूर्वमीमांसकांनीं वेदवाक्यांचे विधि, प्रतिषेध, अर्थवाद, मंत्र आणि नामधेय असे पांच वर्ग केले आहेत. इतर कोणत्याहि रीतीनें न समजणारी अशा हितकारक गोष्ट सांगणारीं तीं विधिवाक्यें; + उदाहरण 'ज्योतिष्टोमेन यजेत स्वर्गकामः' किंवा 'अग्निहोत्रं जुहुयात्स्वर्गकामः' हीं विधिवाक्यें होत. 'नानृतं वदेत्', 'न कलञ्जं भक्षयेत्', 'न हिंस्यात् सर्वा भूतानि' इत्यादि एकाद्या गोष्टीपासून पुरुषाला परावृत्त करणारीं ती प्रतिषेध वाक्यें होत. अशीं प्रतिषेधवाक्यें वेदात अगदीं थोडीं आहेत. पण अर्थवाद मात्र त्यांत फार आहेत. अर्थवाद म्हणजे करावयास सांगितलेल्या कर्माची स्तुति अथवा निषिद्ध गोष्टीची निंदा. याचीं उदाहरणें पूर्वी आलीच आहेत. देवतोद्देशानें द्रव्यत्याग करतांना म्हणावयाचे शब्द ते मंत्र. × या मंत्रासंबंधानें पूर्व मीमांसा शास्त्रांत मोठा पूर्वपक्ष उत्तरपक्ष केलेला आहे ( पू. मी. सू. १,२,३१–४५ ). मंत्रांना काही अर्थ ( प्रयोजन ) नाहीं, म्हणजे ते निरर्थक होत; कारण त्यांतील ठराविक शब्द ठराविक क्रमानेंच आले पाहिजेत, 'अग्निमीळे' बद्दल 'ईळे अग्निम्' म्हटलें तर चालणार नाहीं, अर्थात् मंत्राचा अर्थाशीं संबंध नाहीं. मंत्रात परस्पर विरोध

---

+ विधिः प्रवर्तमानो हि श्रेयःसिद्ध्यै प्रवर्तते । प्रतिषेधः पुनः पापात् निवर्तयति भेदतः ॥ तंत्रवार्तिक ३,४,१३.

× या दृष्टीनें सर्व वेदांचे, मंत्र आणि ब्राह्मण असे दोन वर्ग केलेले आहेत. ( मंत्रब्राह्मणयोर्वेदनामधेयम् । )

आल्यामुळेंहि ते निरर्थक होत. कारण एका मंत्रांत ‘ एक एव रुद्रो ’ म्हटलें आहे, तर दुसऱ्यांत रुद्र असंख्यात सांगितलेले आहेत. तसेंच कित्येक मंत्रांत ‘ कीकटेषु गावः ’ अशा सारख्या अनित्य वस्तूंचा संबंध, तर कित्येकांत ‘ सृण्येव जर्भरी तुर्फरीतू ’ असे आशीष्ट शब्द असल्यामुळेंहि ते निरर्थक होत. पण पूर्वमीमांसाकार हें म्हणणें अर्थातच मान्य करीत नाहींत. मंत्रांचा उद्देश अर्थप्रकाशन हा आहे. ज्या देवतेच्या उद्देशानें द्रव्यत्याग करावयाचा तिचें स्मरण मंत्र करून देतो. आजच्याप्रमाणें त्यावेळीं देवतांच्या मूर्ति किंवा प्रतिमा नव्हत्या. तेव्हां देवतांचें ज्ञान करून द्यावें असा मंत्रांचा उद्देश असतो. वेदवाक्यांचा पांचवा वर्ग जो नामधेय त्यांत यागाचें नांव सांगितलें असतें. उदाहरण—‘ उद्भिदा यजेता ’, ‘ चित्रया यजेत पशुकामः ’ इत्यादि वाक्यांत उद्भिद् , चित्रा हीं यागाचीं नांवें होत.

वेदवाक्यांच्या या पांच वर्गात ‘ विधि ’ मुख्य होय. प्रतिषेध किंवा निषेध हे विधींतूनच उत्पन्न होतात. उदाहरण ‘ नानृतं वदेत् ’ हा निषेध ‘ ऋतं वदेत् ’ या विधींतूनच निघतो. या विधीचे तीनचार मुख्य प्रकार आणि त्या प्रकारांचे कित्येक उपप्रकार पूर्वमीमांसाशास्त्रांत सांगितले आहेत. पहिला प्रकार, केवल किंवा अपूर्व विधि, नियमविधि व परिसंख्या विधि यांचा. दुसऱ्या प्रकारांत क्रत्वर्थ विधि व पुरुषार्थ विधि येतात. तिसऱ्यांत उत्पत्तीविधि, विनियोगाविधि, प्रयोगाविधि व अधिकारविधि यांचा समावेश होतो आणि चवथ्यांत नित्य, नैमित्तिक आणि काम्य यांचा अंतर्भाव केलेला आहे.

पहिल्या प्रकारांतील केवल किंवा अपूर्व विधि म्हणजे अन्य प्रमाणांनीं जें माहित होणें शक्य नाहीं तें सांगणारा. × हाच खरा विधि. कुर्यात्, क्रियेत, कर्तव्यं, भवेत्, स्यात् या पांचांपैकीं एखादा शब्द योजलेला असेल तर तें विधिवाक्य होतें. ‘ कुर्यात् क्रियेत कर्तव्यं भवेत्स्यादिति पञ्चकम् । एतत्स्यात्सर्ववेदेषु नियतं विधिलक्षणम् । ’ असें वचन शबरानें मीमांसासूत्रभाष्यांत ( ४,३,३ ) उद्धृत केलें आहे. असल्या एखाद्या क्रियापदाशिवाय विधि होत नाहीं असें तो म्हणतो, ‘ नहि आख्यातमंतरेण कृत्यं वा नामशब्दार्थव्यापारो विधीयते । ’. असो. नियमविधीचा संबंध दोन पक्ष संभवत असतील तेव्हां + येतो. ‘ समे देशे यजेत ’, ‘ व्रीहीनवहन्ति’ इत्यादि नियमविधि होत. यजन करावें असें म्हटलें कीं तें समभूमीवर किंवा विषमभूमीवरहि होऊं शकतें. तेव्हां समभूमीवर तें करावें असें सांगणारा नियमविधि होय. भाताचें तूस काढून तांदूळ करावयाचे ते कांडून करतां येतील किंवा नखांनीं तूस कुरतुडून करतां येतील. तेव्हां ‘ अवहन्ति ’ उखळांत मुसळानें कांडून तांदूळ करावे, असा नियम सांगितला. पूर्वेस तोंड

× विधिरत्यंतमप्राप्ते । तंत्रवार्तिक. अविदितवेदनं च विधिरित्युच्यते । शबर.
+ नियमः पाक्षिके सति । तंत्रवार्तिक.

करून जेवावें ( प्राङ्मुखः अन्नानि भुञ्जीत ) याचाहि हाच प्रकार; कारण कोणत्याहि दिशेस तोंड करून जेवतां येतें, पण पूर्वेस तोंड करूनच जेवावें असा नियम केला. परिसंख्या हा एक चमत्कारिक विधिप्रकार आहे. ' पंच पंचनखा भक्ष्याः ' हें त्याचें प्रसिद्ध उदाहरण सर्वजण देतात. पांच नखांचे पांच प्रकारचे प्राणी खावे, असा त्यांत वाच्यार्थ आहे. पण त्यांत हे प्राणी खावेच असें सांगितलें नसून पंच-नख प्राणी खावयाचे झालेच तर या विधींत सांगितलेले तेवढेच खावे, इतर खावूं नयेत असा अर्थ आहे. परि हा उपसर्ग या शद्बांत वर्जनार्थी आहे. परिसंख्याविधि म्हणजे तदितरवर्जन विधि. ' तत्र चान्यत्र च प्राप्ते परिसंख्येति कीर्त्यते ' । असें त्याचें लक्षण कुमारिलभट्ट देतो ( तन्त्रवार्तिक ); पण हा विधि स्वार्थहानि, परार्थकल्पना व प्राप्तबाध या तीन दोषांनीं युक्त असल्यानें फार गौण मानिलेला आहे. त्यांत सरळ अर्थ टाकून नसलेला अर्थ घ्यावा लागतो. या कारणास्तव याचीं उदाहरणें देतांना धर्मशास्त्रकारांत पुष्कळ मतभेद आढळतो. ' ऋतौ भार्यामुपेयात् ' हा परिसंख्या-विधिच होय व कांहींच्या मतें हा नियमविधि होय.

क्रत्वर्थविधि म्हणजे यज्ञाच्या सांगतेसाठीं सांगितलेला विधि. याचें उल्लंघन झाल्यास यज्ञांत वैगुण्य झालें असें होतें. पुरुषार्थविधि म्हणजे कर्मानुष्ठानांत कर्त्याला उद्देशून सांगितलेला विधि. याचें अतिक्रमण झाल्यास कर्त्याला व्यक्तिशः दोष लागतो, पण कर्मांत खोड रहात नाहीं. या विधीचीं धर्मशास्त्रातील उदाहरणें द्यावयाचीं तर ' अरो-गिणीं भ्रातृमतीमसमानर्षिगोत्रजाम् । ( स्त्रियमुद्वहेत् ) ' हें याज्ञवल्क्यवचन ( १,५३ ), 'माता पिता वा दद्यातां यमाद्भिः पुत्रमापदि ' हें मनुवचन ( ९, १६८ ) अशीं देतां येतील. अरोगी व भाऊ असलेली स्त्री करावी हा पुरुषार्थ विधि होय; कारण तशी स्त्री न केल्यास त्या पुरुषालाच त्रास होईल, पण तिच्याशीं केलेला विवाह लग्न नव्हे असें होत नाहीं. पण त्या वचनाचा दुसरा भाग मात्र क्रत्वर्थ आहे, कारण समान गोत्र व प्रवर असलेल्या कन्येशीं लग्न केलें तर तें लग्नच होत नाहीं. दत्तक पुत्रासंबंधाचें मनुवचन पुरुषार्थ आहे, आपत्तींतच मुलगा दत्तक देणें याचा दोष व्यक्तीशीं आहे, तेवढयानें दत्तविधान अशास्त्र होत नाहीं. ' नानृतं वदेत् ', ' नोद्यन्तमादित्य-मीक्षेत ' इत्यादि पुरुषार्थ विधि होत. पण ' समिधो यजति ', ' तनूनपातं यजति ' इत्यादि क्रत्वर्थ होत.

उत्पत्तिविधि, विनियोगविधि, अधिकारीविधि, प्रयोगविधि यांत फार खोल जाण्याचें कारण नाहीं. पूर्वमीमांसासूत्रांचा सुमारें नऊ दशांश भाग त्यांच्या चर्चेनें व्यापला आहे. कर्माचें केवळ स्वरूप सांगणारा तो उत्पत्तिविधि, उदाहरण ' अग्निहोत्रं जुहोति'. ' दध्ना जुहोति' हा विनियोग विधि; यांत मुख्य कर्म व त्याचे अंश यांचा संबंध सांगितलेला असतो. प्रयोगविधींत मुख्य कर्माचीं विविध अंगें कोणत्या क्रमानें घ्यावयाचीं तें सांगितलें असतें; तसा क्रम ठेवला तरच कर्म सांग होतें. राजसूय याग राजानें करावा,

'राजा राजसूयेन यजेत' हें अधिकारविधीचें उदाहरण होय. राजसूयाचा अधिकार कोणाला हें त्यांत सांगितलें आहे.

नित्य, नैमित्तिक आणि काम्य विधि प्रसिद्धच आहेत. 'अहरहः स्नात्वा संध्यामुपासीत' प्रत्यहीं स्नान करून संध्योपासना करावी, हा नित्य विधि. हा न केल्यानें दोष घडतो. 'मुलगा झाला असतां जातेष्टि करावी' हा नैमित्तिक विधि. निमित्त घडेल तेव्हांच तो करावयाचा असतो, एरवीं नाहीं. 'चित्रया यजेत पशुकामः' हा काम्य विधि होय. ज्याला पशु पाहिजे असतील त्यानेंच तो करावा, इतरांनीं करण्याचें कारण नाहीं.

## पूर्वमीमांसेचे कांहीं सिद्धान्त.

आतां या शास्त्रातील कांहीं मुख्य सिद्धान्तांचा विचार करूं. पूर्वमीमांसेचे सिद्धांत वेदांतील यज्ञविषयक वाक्यांची व्यवस्था लावण्यासाठीं असल्यामुळें, ते जसेच्या तसे घेऊन धर्मशास्त्राला लावूं नयेत व लावतांहीं येत नाहींत असें आमचें ह्मणजे परिवर्तन वाद्यांचें किंवा तत्त्ववाद्यांचें म्हणणें आहे. हें म्हणणें रूढिवादि पक्षाला पटत नाहीं. असो. पूर्वमीमांसेचा असा एक सिद्धांत आहे कीं वेदांत सांगितलेले विधि सामान्यतः सगळे स्वर्गप्राप्तीसाठीं आहेत. 'स स्वर्गः स्यात्सर्वान्प्रत्याविशिष्टत्वात् ।' ( जै. सू. ४. ३, १५ ). जेथें कांहीं विशिष्ट फळ सांगितलें नसेल तेथें तें स्वर्गप्राप्ति समजावें. मीमांसेचे कित्येक सिद्धान्त धर्मशास्त्राला तसेच वेदान्त न्याय इत्यादि शास्त्रांना संमत नाहींत. पुण्यपापाचें फळ देणारा कोण व तें केव्हा मिळतें या विषयीं पूर्वमीमांसा म्हणते, ईश्वर किंवा यज्ञदेवता यज्ञाचें फळ देत नाहीं; त्या यज्ञकर्मापासून अदृष्ट किंवा अपूर्व अशी शक्ति निर्माण होते व ती फळ देते. यज्ञांत देवता प्रधान नसून गौण आहे. जैमिनि म्हणतो 'अपि वा शब्दपूर्वत्वात् यज्ञकर्म प्रधानं स्यात् गुणत्वे देवताश्रुतिः'. यज्ञकर्मालाच प्राधान्य आहे देवतेला नाहीं कारण 'अग्नये स्वाहा' म्हणून द्यावयाची आहुति 'वह्नये स्वाहा' असें म्हणून दिल्यास चालणार नाहीं. देवता फलदात्री असून कर्मानें ती संतुष्ट होते व कर्म करणाराची फलाशीं गांठ घालून देते असें मानावयाला कांहीं प्रमाण नाहीं; कारण वेदांत 'स्वर्गकामो यजेत' असें म्हटलें असून 'देवताराधनाय यजेत' असें म्हटलेलें नाहीं, असें मीमांसकांचें सांगणें आहे. + यज्ञ थोड्याशा वेळांत संपतो तेव्हां त्याच्यापासूनहि साक्षात् फळ मिळत नाहीं.

---

+ ननु देवता फलदानसमर्था कर्मभिराराध्यते सा आराधिता प्रसन्ना भवति प्रसन्ना च कर्तॄन् कालान्तरेऽपि फलेन योजयत्येव इति । नैतदेवम् । यागादीनां देवताराधनहेतुत्वे प्रमाणाभावात् । अतो देवतोद्देशेन द्रव्यत्यागो याग इति गौणं देवतापूजात्मकत्वमवगमयितव्यम् । प्रभाकरभट्टशिष्यशालिकनाथकृत प्रकरण पञ्चिका.

त्या यज्ञापासून उत्पन्न होणारें अपूर्वच अर्थात् फळ देतें असा मीमांसासिद्धान्त आहे. × पूर्व मीमांसाशास्त्र नास्तिक म्हणजे आत्मा न मानणारें झाले होतें. कुमारिलभट्ट म्हणतो,* मीमांसा शास्त्र हें लोकायत मताचें ह्मणजे नास्तिक होतें, त्याला आस्तिक मार्गावर आणण्याचा मीं हा प्रयत्न केला आहे. पण प्राभाकरपक्ष झाला किंवा भाट्टपक्ष झाला तरी परमेश्वर हा जगन्निर्माता आहे असें कोणीच मीमांसक मानीत नाहीं. ' न चेश्वरस्य सर्वज्ञानमपि सिध्यति । ' ईश्वराचें सर्वज्ञत्व सिद्ध होत नाहीं, असें प्रकरणपञ्चिकेंत शालिकनाथानें म्हटलें असून स्वतः कुमारिल श्लोकवार्तिकांत म्हणतो ' सर्वज्ञवन्निषेध्या च स्रष्टुः सद्भावकल्पना ' । परमेश्वर सर्वज्ञ आहे ही कल्पना जशी निषेध्य तशी तो सृष्टीचा कर्ता आहे ही कल्पनासुद्धां निषेध्यच. पण हा मीमांसकांचा सिद्धान्त धर्मशास्त्राला मान्य नाहीं. मीमांसक जग अनादि मानतात; त्यांच्या मतें वेद हे स्वयंभू अतएव अपौरुषेय आहेत. कुमारिल श्लोकवार्तिकांत म्हणतो ' तस्मात्प्रागपि सर्वेऽमी स्रष्टुरासन्ः पदादयः ' ईश्वराच्या पूर्वींहि पदादि ( शब्द, अर्थ इत्यादि ) होते. पण वेदान्तांत ' जन्माद्यस्य यतः ' या सूत्रानें (ब्रह्मसू. १, १, २ ) या जगाची उत्पत्ति परमेश्वरापासून झाली असें म्हटलें आहे. भागवताच्या आद्य श्लोकांतहि हेच शब्द योजून हाच अर्थ प्रतिपादिलेला आहे.

पूर्वमीमांसेचा समावेश षड्दर्शनांत होतो व षड्दर्शनें मोक्षमार्ग दाखविण्यासाठीं आहेत. पण त्यांची मोक्षाची कल्पना मात्र निरनिराळी आहे. पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा यांचे मोक्ष भिन्न होत. स्वर्गप्राप्ति हाच पूर्व मीमांसेचा मोक्ष.‡ पण वेदान्ताचा मोक्ष म्हणजे अज्ञाननिवृत्ति किंवा आत्मज्ञान. मीमांसकांना वेदवाक्य हें एकच प्रमाण आहे, वेदा पलीकडे ते दुसरें कोणतेंहि प्रमाण मानीत नाहींत. शबर ह्मणतो, ' शब्दप्रमाणका वयम् । यच्छब्द आह तदस्माकं प्रमाणम् । ' ( मी. सू. भाष्य, ४, २, ३६ ) वेद सांगतो तें आम्हाला प्रमाण. रथकार

---

× चोदना पुनरारम्भः । या सूत्रावर ( २, १, ५ ) शबर म्हणतो, ' चोदनेति अपूर्वं ब्रूमः। अपूर्वं पुनरस्ति यत आरंभः शिष्यते स्वर्गकामो यजेतेति । इतरथाहि विधानं अनर्थकं स्यात् भंगित्वात् यागस्य । यदि अन्यदनुत्पाद्य यागो विनश्येत, फलमसति निमित्ते न स्यात् । तस्मादुत्पादयतीति ।

* प्रायेणैव हि मीमांसा लोके लोकायतीकृता । तामास्तिकपथे कर्तुमयं यत्नः कृतो मया ।। श्लोकवार्तिक १, १०.

‡ कुमारिल ह्मणतो ' आत्मा वा अरे द्रष्टव्यः ' इत्यादि वेदवाक्यें मोक्षार्थ नसून कर्मप्रवर्तकच होत. आत्मज्ञानाचें फल मोक्ष असें जे म्हटलें आहे, तो केवळ अर्थवाद होय; कारण स्वर्गाशिवाय दुसरें फळच नाहीं ( साऽर्थवादो भवेदेव न स्वर्गादेः फलान्तरम् । श्लोकवार्तिक संबन्धाक्षेपपरिहार १११ ).

हा त्रैवर्णिक नाहीं, अर्थात् त्याला अग्न्याधान नसावें पण ' वर्षासु रथकार आदधीत' रथकारानें पावसाळ्यांत अन्याधान करावें, अशी श्रुति आहे व 'वचनाद्रथकारस्य ' असें सूत्रहि आहे. तेव्हां त्या संबंधानें शबर ह्मणतो 'वेदवचनाला अशक्य काय आहे? वचनाला कसलाच भार होत नाहीं.' (किमिव हि वचनं न कुर्यात् । नास्ति वचनस्य अतिभारः । मी. सू. भा. २, २, २७; न हि वचनस्य किंचिदलभ्यं नाम । शाबरभाष्य ६, १, ४४ ). ' वचनात्प्रवृत्तिर्वचनान्निवृत्तिः ' हा मीमांसकांचा प्रसिद्ध न्याय किंवा सिद्धांत असून धर्मशास्त्रांत त्याचा पुष्कळ उपयोग करतात. उदाहरण, ब्राह्मविवाहापासून झालेला पुत्र मागच्या पुढच्या मिळून एकवीस पिढयांचा उद्धार करतो, असें याज्ञवल्क्य स्मृतींत ( १, ५८ ) ह्मटलें आहे. आतां यावर शंका अशी येते कीं ज्यानें करावें, त्यानें भरावें, असा वेदान्ताचा कर्मसिद्धान्त आहे, एकाच्या कर्माचें फळ दुसऱ्याला मिळत नाहीं; तर मग एका पुरुषाच्या कर्मानें एकवीस पुरुष कसे पवित्र होतील ? यावर टीकाकार विश्वरूपानें असें उत्तर दिलें आहे कीं, ' एकवीस पिढया पवित्र होतील ' ही ब्राह्मविवाहाची केवळ स्तुति समजावी ( स्तुतिमात्रमेतत् ), कारण तसा वास्तविक प्रकार मानल्यास कृतनाश व अकृताभ्यागम हे दोष येतात. पण पुनः तो म्हणतो ' कदाचित् ती विशिष्ट फलश्रुति असेल ( अस्तु फलविधिः ), कारण ' वचनाला मोठा भार असा कांहींच नाहीं, ' वेदानुसारि वचनाला कांहींच अशक्य नाहीं. याज्ञवल्क्य स्मृति वेदानुसारि आहे हें सांगावयास नकोच. यावर प्रश्न एवढाच आहे कीं प्रत्येक गोष्टीला वचन कसें मिळणार ? तिच्या सारख्या दुसऱ्या गोष्टींविषयींचें वचन पुढें केलें तर भागेल असें कोणाला वाटेल. पण ५, ३, १२ या मीमांसासूत्राच्या भाष्यांत शबर स्पष्ट म्हणतो कीं, वचन हे सदृश वस्तूला लावून चालणार नाहीं ( यावद्वचनं वाचानिकं न सदृशमुपसंक्रामति । ) ! पण हा सिद्धांत कितीतरी गोष्टींचा अतिदेश म्हणजे सदृश बाबतींत विस्तार करून स्वतः धर्मशास्त्रानें बाजूला सारला आहे. त्याचप्रमाणें वचनाला अवास्तव महत्व दिलें गेलें. ब्राह्मविवाहानें २१ पिढया उद्धरतात हा सिद्धान्त कर्म आणि पुनर्जन्म यांच्या सिद्धान्ताला अत्यंत विरुद्ध असतांहि विश्वरूपाचार्यांसारख्या महापण्डितांनीं तें स्मृतींतील वचन म्हणून त्याला मान तुकवावी व आपलीं वेदान्तांतील मतें बाजूला ठेवावीं, याचें नवल वाटतें. शंकराचार्यांनींहि ब्रह्मसूत्रावरील भाष्यांत ( ३–४–३२ विहितत्वाच्चाश्रमकर्मापि ) ' नहि वचनस्यातिभारोस्ति ' या शबरवचनाचा उल्लेख केला आहे व त्याला अनुसरूनच निर्णय दिला आहे.

वेद हे दुसऱ्या कशावर अवलंबून नसून स्वतःप्रमाण आहेत. सूर्य किंवा डोळा याना ज्याप्रमाणें रंगाच्या बाबतींत स्वतःचेंच प्रमाण पुरतें, दुसरें कांहीं लागत नाहीं, तसाच वेदांचा प्रकार मीमांसकांच्या मतें आहे. अर्थात् वेद जें कांहीं सांगतो, तें दुसऱ्या कोणत्याहि अनुमानादि प्रमाणानें गम्य होणारें नाहीं, असाहि मीमांसकांचा सिद्धांत आहे.

## अर्थनिर्णयाचे नियम

पूर्वमीमांसेंत सांगितलेले वाक्यार्थनिर्णयाचे अनेक नियम चांगले आहेत यांत संशय नाहीं. पण त्यांच्या आधारावर आधुनिक सनातनी म्हणविणारे जी ओढाताण करतात ती मात्र योग्य नाहीं. वाक्यार्थनिर्णयाचे मीमांसा नियम साधारण व विशेष असे दोन प्रकारचे आहेत. विधि व अर्थवाद, विधि नियम व परिसंख्या, प्रतिषेध व पर्युदास, क्रत्वर्थ व पुरुषार्थ इत्यादि विषयांचे या शास्त्रातील नियम आदरणीय असून ग्रंथ लावतांना त्यांचा उपयोग करणें अवश्य आहे. कायद्याच्या बाबतींत किंवा उभय पक्षांना मान्य असलेल्या लेखांचा अर्थनिर्णय करतांना ( Interpretation of Statutes or documents ) आजहि तसेच नियम लावण्यात येतात.

शब्दांचा जो सामान्यतः लोकप्रसिद्ध अर्थ असेल तोच शक्य तर घेतला पाहिजे असा एक नियम आहे. शबर म्हणतो ' लोके येषु अर्थेषु प्रसिद्धानि पदानि तानि सति संभवे तदर्थान्येव सूत्रेषु इति अवगंतव्यम् ', सूत्रात शब्दाचा अर्थ लोकांत जो रूढ असेल तोच बहुधा असतो. दुसरा एक नियम असा आहे कीं, आनर्थक्य टाळावें. त्याचप्रमाणें शब्दांचा रूढार्थ घेऊन जी वाक्यार्थनिष्पत्ति होते, ती जर असंभवनीय असेल तर ती विधिरूप न मानतां अर्थवाद मानावी. एखाद्या वाक्याच्या अर्थाविषयी संशय आल्यास बाकी सर्व वाक्यें वाचून जो अर्थ जुळणारा दिसेल तोच घ्यावा. याला वाक्यशेष असा पारिभाषिक शब्द असून ' संदिग्धेषु वाक्यशेषात् ' या जैमिनिसूत्रांत ( १, ४, २९ ) तो सांगितला आहे. आणखी असा एक नियम आहे कीं, होता होईल तों दोन वाक्यातील विरोध टाळून त्याची एकवाक्यता करावी म्हणजे विषय-व्यवस्था करावी, कारण विरोध आहे असें मानल्यास विकल्प मानावा लागतो व विकल्प हा आठ दोषांनीं युक्त असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. तांदूळ किंवा यव यांनीं यजन करावें ( व्रीहिभिर्वा यवैर्वा यजेत ), अशा वाक्यांत दुसरी गति नाहीं म्हणून विकल्प मानावा परन्तु शक्य तोंवर विकल्प मानूं नये. जागोजाग मानल्यास अनेक ठिकाणीं अनवस्था होईल.

अशा प्रकारचे सर्वसामान्य नियम मीमांसकांनीं प्रवृत्त केले ते वाक्यतात्पर्य निर्णयासाठीं धर्मशास्त्रात व हल्लींही मानण्यास मुळींच हरकत नाहीं. तसेच नियम आधुनिक ( Interpretation of statutes ) कायद्यांच्या अर्थाचा निर्णय करितांना लावण्यांत येतात.

* * * *

## धर्मशास्त्र आणि मीमांसादि इतर शास्त्रें

पूर्वमीमांसेच्या नियमांचा धर्मशास्त्राशीं संबंध कसा येतो तें पूर्वी सांगितलें. ते नियम चांगले असून यूरोपांत अनेकांच्या दीर्घकालीन अनुभवानें ठरलेले जे वाक्यार्थ निर्णयाचे नियम मॅक्वेल सारख्यांनीं आपल्या ग्रंथांत दिले आहेत ( Maxwell's

Interpretation of statutes ) त्याच्याशीं अगदीं जुळते आहेत हेंहि सांगि-तलें. पूर्वमीमांसेंत वेदवचनांचाच अर्थनिर्णय केला असून त्यांत कांहीं कल्पना गृहीत-कृत्यें म्हणून धरलेल्या आहेत. वेद हे स्वयंभू, स्वतःप्रमाण आणि अनादि असून नित्य आहेत, ही भूमिका त्या नियमांच्या बुडाशीं आहे. अशा या वेदांच्या अर्थाचें शास्त्र म्हणजे मीमांसा होय. याच्या उलट स्मृति या पौरुषेय म्हणजे कोणी विद्वान् ऋषींनीं लिहिलेल्या असल्यामुळें नित्य नव्हत; अर्थात् त्यांचें प्रामाण्य वेदांप्रमाणें निर-पेक्ष नसून सापेक्ष आहे. श्रुति आणि स्मृति यांचें स्वरूपहि निराळें आहे. वेद हे यज्ञार्थ असून स्मृति आचारधर्मासाठीं होत. दोघांचीं फलेंहि निराळीं. वेदांतील कर्में साक्षात् स्वर्गप्राप्तीसाठीं, तर स्मृतींतील कर्में वर्ण, आश्रम, व्यवहार, निमित्त यांना अनुसरून सांगितलेलीं आहेत व त्या कर्मांचीं फलें विविध आहेत. वेदांचा उद्देश अदृष्ट फल देणाऱ्या कर्मांचें ज्ञान करून देण्याचा उघड दिसतो ( दृष्टो हि तस्यार्थः कर्मावबोधनम् ). अशा रीतीनें श्रुति व स्मृति यांत मूलतःच भिन्नत्व असल्यामुळें श्रुतींच्या वाक्यार्थ-निर्णयाला जे नियम लावावयाचे तेच जसेच्या तसेच स्मृतींना लावणें योग्य नाहीं. धर्म-शास्त्रांतील विषयांचें साक्षात् विधान श्रुति क्वचितच करितात हें प्रारंभीं सांगितलेंच आहे. धर्मशास्त्राचा मुख्य भर स्मृतींवर आहे व त्या स्मृति अनेक असून त्यांत पर-स्परविरोधहि पुष्कळ आढळतो. असें असल्यामुळें श्रुतिवचनांच्या मीमांसेची सर्व परिभाषा आणि त्यांतील सर्व न्याय धर्मशास्त्रनिर्णयांत लावतां येणें शक्य व योग्य नाहीं. पण असें असतांहि स्मृतीनंतर शेंकडो वर्षांनीं झालेले निबंधकार स्मृतिवचनांना बहुतेक श्रुतिवचनांसारखींच मानून त्यांचा कीस काढीत बसले. उदाहरण, ब्राह्मविवाहापासून झालेला पुरुष मागच्या व पुढच्या मिळून एकवीस पिढ्यांना उद्धार करतो असें याज्ञवल्क्य ( १, ५८ ) सांगतो व त्यावर टीका करणारा विश्वरूप प्रथम म्हणतो कीं हें वचन ब्राह्मविवाहाच्या स्तुतिपर आहे. पण पुढें तसें म्हणणें बरें न वाटून तो सांगतो कीं, याज्ञवल्क्यऋषिवचन वेदाप्रमाणेंच प्रमाण मानिलें पाहिजे मग तें युक्ति-सिद्ध नसलें तरी हरकत नाहीं, कारण वचनाला कांहींच कठीण नाहीं ( न हि वचनस्य अतिभारोऽस्ति ). अशा रीतीनें निबंधकारांची बुद्धि परावलंबी झाली व नुसतें वचन स्मृतींतील पाहिलें तरी ते मान वाकवूं लागले. पण स्मृतींत अशी परावलंबी बुद्धि दिसत नाहीं. स्मृतिकार स्वतः एकमेकांना प्रमाण न मानतां आपले मतभेद अगदीं स्पष्टपणें सांगतात. उदाहरण, औरस पुत्र तेवढा मानवा असें औपजङ्घनि आचार्यांचें मत बौधायन धर्म-सूत्रांत ( २, २, २३, ) दिलें आहे; त्याला इतर प्रकारचे पुत्र किंवा पुत्रप्रतिनिधि मान्य नव्हते. पण मन्वादि इतर स्मृतिकारांनीं बारा प्रकारचे पुत्र मानिल्याचें पूर्वीं सांगि-तलेंच आहे. तसेंच आपस्तंबानें ( १, ६, १९, २–८ ) कोणाकडचें अन्न खावें ( क आश्यान्नः ) असा प्रश्न विचारून निरनिराळ्या आचार्यांचीं मतें प्रथम दिलीं आणि शेवटीं ( १, ६, १९, ९–११ ) आपलें मत त्यांतील बऱ्याच जणांपासून

भिन्न आहे असें सांगितलें. शूद्र पाक करणारा असून त्यावर देखरेख करणारा जर आर्य असेल तर त्याचें अन्न खाण्यास अडचण नाहीं असें त्यानें आपलें स्वतःचें मतहि दिलें ( आप. ध. सू. २. २. ३. ४ ). स्मृतिप्रामाण्याचा स्वतः स्मृतींमधील हा प्रकार झाला.

मीमांसासूत्रांतहि स्मृतींना प्रामाण्य पूर्णपणें दिलेलें नाहीं. आधीं मीमांसासूत्रांत स्मृतींचा फारसा संबंधच नाहीं. साऱ्या जैमिनिसूत्रांत मिळून पंचवीस तीस सूत्रांत मात्र स्मृतींचा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष थोडासा संबंध आहे. ‘ धर्मस्य शब्दमूलत्वादशब्दमनपेक्षं स्यात् । अपि वा कर्तसामान्यात् प्रमाणमनुमानम् ’। धर्म हा वेदमूलक असल्यामुळें वेदांत नाहींत (पण स्मृतींत आहेत) अशा गोष्टी अप्रमाण होत असा पूर्वपक्ष. पण स्मृतिकार प्राचीन ऋषींसारखेच मान्य असल्यामुळें त्यांना कांही ठिकाणीं प्रमाण मानावें; ह्मणजे प्रत्यक्ष अर्थ ( दृष्टफल ) सांगणारी स्मृति प्रत्यक्षतः प्रमाण आहे, व अदृष्ट अर्थ ज्यांचा आहे अशा गोष्टी सांगणाऱ्या अशा स्मृति असतील तर त्यांना अनुकूल अशीं वेदवचनें होतीं असें अनुमान करावें, असें शबर ह्मणतो ( १, ३, १–२ ). उदाहरण, ‘ अष्टकाः कर्तव्याः, गुरुरनुगन्तव्यः, तडागं खनितव्यम् ’ इत्यादि गोष्टी वेदांत आढळत नसल्या तरी त्या वेदविरुद्ध नसल्यामुळें त्या प्रमाण मानाव्या. पण श्रुतिस्मृतींत विरोध असेल तर स्मृति त्याज्य होय ( विरोधे त्वनपेक्ष्यं स्यादसति ह्यनुमानम् । १, ३, ३ ). उदाहरण ‘ अष्टाचत्वारिंशद्वर्षाणि वेदब्रह्मचर्यंचरणम् । ’ ह्मणजे अठ्ठेचाळीस वर्षे वेदाध्ययनासाठीं ब्रह्मचर्य पाळावें हें स्मृतिवचन ‘ जातपुत्रः कृष्णकेशोऽग्नीनादधीत ’ ह्मणजे, पुरुषाचे केस काळे आहेत व त्याला पुत्र झाला आहे अशा स्थितींत ह्मणजे मध्यम वयांत अग्न्याधान करावें, या श्रुतिवचनाशीं विरुद्ध आहे. कारण आठव्या वर्षी आरंभ करून अठ्ठेचाळीस वर्षे वेदाध्ययन केल्यास तो पुरुष छप्पन्न वर्षांचा तरी होतो, अर्थात् त्या वेळीं त्याचे केस पांढरे होऊं लागतात. तेव्हां असें सांगणारे स्मृतिकार अप्रमाण होत; कारण आपलें अपुंस्त्व ( नपुंसकत्व ) झांकण्यासाठीं त्यांनीं वृद्धपणापर्यंत वेदाध्ययन चालू ठेऊन तसा नियम सांगितला असावा, असेंहि शबरानें ह्मटलें आहे ( अपुंस्त्वं प्रच्छादयन्तश्च अष्टाचत्वारिंशद्वर्षाणि वेदब्रह्मचर्यं चरितवन्तः । ).

स्मृतींतील सर्व गोष्टींना ज्याप्रमाणें मीमांसा प्रामाण्य देत नाहीं, त्याप्रमाणें सदाचारालाहि देत नाहीं. सदाचाराविषयींचें मीमांसेचें धोरण ‘ शिष्टाकोपेऽविरुद्धमिति चेत् न शास्त्रपरिमाणत्वात् । अपि वा कारणाग्रहणे प्रयुक्तानि प्रतीयेरन् ।’ इत्यादि सूत्रांत ( १,३,५–७ ) दिसून येतें. सदाचाराचें कारण दृष्ट असेल तर तो प्रमाण मानण्याचें कारण नाहीं, पण तें अदृष्ट असेल तर प्रमाण मानावा एवढेंच जैमिनि म्हणतो. उदाहरण, ‘ आचान्तेन कर्तव्यम्, उपवीतिना कर्तव्यं, दक्षिणाचारेण कर्तव्यम् ’ ( १,३, ७ ) यांत आचमन उपवीतित्व इत्यादि आचार जरि श्रुतिप्रतिपादित नसले तरी ते

मानावे [ तस्मादाचमनादीनां प्रामाण्यम् । शबर भाष्य ]. ' गुरुरनुगन्तव्योऽभिवादयितव्यश्च प्रत्युत्थेयः संगन्तव्यश्च ' इत्यादि गोष्टी वेदतुल्य ऋषींनीं सांगितल्या असल्यामुळें मानाव्या असें एका ठिकाणीं जैमिनि म्हणतो [ पूर्वमीमांसा ६.१.२१–२२ ]. विश्वजित् यज्ञांत सर्वस्व द्यावयाचें असलें तरी वर्णकर्तव्य म्हणून परिचारक झालेल्या शूद्राचें दान करूं नये असें मीमांसा म्हणते ( शूद्रश्च धर्मशास्त्रत्वात् । ६,७,६), कारण तो धर्मशास्त्रांत सांगितलेला धर्म पाळण्यासाठीं परिचारक झाला पण त्यावर ( शूद्रावर ) त्रैवर्णिकांची मालकी नाहीं. उपनयनादि दैव कर्म केव्हां करावीं असा प्रश्न पडला असतां वाटेल तेव्हां तीं न करतां उदगयनांत पुण्यादिवशीं करावीं असें जें स्मृतींत सांगितलें आहे ( एवं स्मरंति । तेषु कालेषु दैवानीति ) त्याप्रमाणें करावें [ पूर्वमीमांसा ६.८.२३ ].ऋत्विजाचें काम कोणीहि करावें असा पूर्वपक्ष आहे पण स्मृति म्हणतात ब्राह्मणांनींच ते करावें ( प्रभुत्वादार्त्विज्यं सर्ववर्णनाम् । स्मृतेर्वा स्याद् ब्राह्मणानाम् । जै. सू. १२,४,४२–४३ ). अशा प्रकारें सुमारें पंचवीस तीस मीमांसासूत्रांत मात्र स्मृतींचा उल्लेख आढळतो. पण मीमांसेंतील न्याय स्मृतींना लावावे असें त्यांत कोठेंहि. सांगितलेलें नाहीं. उलट श्रुतीशीं त्या विरोधी असतील तर त्या अमान्य होत असें स्पष्ट सांगितलें आहे. त्याचप्रमाणेंच जैमिनि ७.१.१०–११ यांत स्मृतीचा उल्लेख आहे व जैमिनि ८.४.२–३ व १२.२.१यात 'लौकिक' शब्दाचा अर्थ स्मार्त कर्म असा आहे. असें जर आहे धर्मशास्त्रावर निबंधग्रंथ लिहिणाऱ्यांनीं श्रुतिवचनांचाच निर्णय करणारी मीमांसापद्धति स्मृतींना कां लाविली असा प्रश्न येतो. स्मृतींची रचना इ. स. पूर्वी ६–७ शतकापासून तो इ.स.च्या ८–९ शतकापर्यंत जवळ जवळ पंधराशें वर्षें होत होतीं.अर्थात त्या सर्वांत सर्व विषयांवर एकवाक्यता दिसून येणें अशक्यच. त्यांत परस्परविरोध कसा दिसून येतो हें जागोजाग पूर्वी दाखविलेंच आहे. असा विरोध दिसला असतां, त्याचा परिहार होऊन आपलें मत प्रस्थापित करितां येईल, अशी ही मीमांसापद्धति निबंधकारांना आयतीच तयार मिळाली व ती त्यांनीं घेतली, यांत कांहीं अयोग्य झालें असें नाहीं. पण पुढें तिचा अतिरेक करण्यांत आला, तो मात्र अनिष्ट होय. येथें एक गोष्ट लक्ष्यांत ठेवणें अवश्य आहे ती अशी कीं, स्वतः मीमांसाशास्त्रांत जरी शद्बाशिवाय म्हणजे वेदवचनांशिवाय दुसरें प्रमाण कांही मानिलेलें नाहीं, तरी वेदवचनांचें जें विधि, अर्थवाद असें वर्गीकरण त्या शास्त्रांत केलेलें आहे तें वेदांत केलेलें नसून पुरुषबुद्धीनेंच केलेलें आहे. अमुक वचन म्हणजे विधि, तमुक म्हणजे अर्थवाद असें कांही वेद स्वतः सांगत नाही; तें मीमांसाग्रंथकारांनींच ठरविलें आहे. तेव्हां ती मीमांसापद्धति स्मृतिवचनांना लावतांना पुरुषबुद्धीला धर्मशास्त्रनिर्णयांत वाव नाहीं असें जें सांगण्यांत येतें, त्याची योग्यता किती याचा विचार सर्वांनीं केला पाहिजे.

सनातनी म्हणविणारे लोक श्रुतिस्मृतींतील विरोधी वचनांचा समन्वय केला पाहिजे असें म्हणून त्यालाहि मीमांसाशास्त्राचा आधार देतात. स्मृतींत परस्परविरोध फारच आहेत, तेव्हां त्यांचा समन्वय किंवा एकवाक्यता करावयाची कशी ? स्मृतींतील परस्पर विरोधांचीं उदाहरणें पूर्वी कांहीं दिलींच आहेत. आतां आणखी थोडीशीं पाहूं. शूद्राच्या हातचें कांहीं परिस्थितींत खाण्यास हरकत नाहीं अशा आशयाचें आपस्तंबाचें वचन पूर्वी सांगितलेंच आहे. पण नागेशभट्टाच्या वेळीं तसें करणें म्हणजे अब्रह्मण्य वाटल्यामुळें त्यानें तें वचन कलिवर्ज्यांत टाकिलें ! विरोधी स्मृतिवचनाचा समन्वय करतांना येणारी मोठीच अडचण या कलिवर्ज्यप्रकरणानें टाळण्याचा यत्न केला आहे. पण त्याचा परिणाम कसा होतो पहा. आपस्तंब हा वस्तुतः कलियुगांतलाच पण त्यानें सांगितलेल्या कांहीं गोष्टी मात्र कलिवर्ज्यांतल्या ! गौतम, मनु हे धर्मशास्त्रकार आपण अमक्या युगांतले असें सांगत नाहींत. पण पराशरानें ‘ कृते तु मानवा धर्मास्त्रेतायां गौतमाः स्मृताः । द्वापरे शंखलिखिताः कलौ पाराशराः स्मृताः । ’ अशी स्मृतिधर्मांची युगायुगानुसार वांटणी करून स्वतःला कलियुगीन म्हटलें आहे. असें असतांहि त्यानें सांगितलेले कित्येक आचार पुढील निबंधकारांनीं कलिवर्ज्यांत ढकलिलेच. असो. स्वतः स्मृतिकार आपसांत समन्वय न करतां आपले मतभेद स्पष्ट सांगतात. ब्राह्मणादि तीन वर्णांनीं शूद्रा भार्या करण्यास हरकत नाहीं असें पूर्वस्मृतींत सांगितलें आहे. पण याज्ञवल्क्यानें माझें असें मत नाहीं असें बजावून सांगितलें आहे. तो म्हणतो ‘यदुच्यते द्विजातीनां शूद्राद्दारोपसंग्रहः । नैतन्मम मतं यस्मात्तत्रायं जायते स्वयम् । ’ ( १, ५६ ). ‘आत्मा वै पुत्रनामासि ’ या श्रुतीप्रमाणें द्विजहि भार्येच्या पोटीं स्वतःच पुत्ररूपानें जन्म घेत असल्यामुळें त्यानें शूद्राभार्या करूं नये असें याज्ञवल्क्यानें आपलें पूर्वीच्या स्मृतींशीं विरुद्ध मत दिलें आहे. मनूहि आपलें भिन्न मत असल्यास स्पष्ट सांगतो चार पुरुषार्थांपैकीं श्रेष्ठ कोण, असा प्रश्न करून त्यानें प्रथम चार धर्मशास्त्रकारांचीं भिन्न भिन्न मतें देऊन शेवटीं आपलें स्वतःचें मत त्यानें सांगितलें आहे. कोणी धर्म व अर्थ श्रेष्ठ होत असें म्हणतात, कोणी काम व अर्थ यांना उत्तम समजतात, कोणी धर्मालाच वरिष्ठ समजतात, तर कोणी अर्थाला तसा मानितात, पण तिन्ही एकमेकांच्या अनुषंगानें असावे हेंच योग्य असें मनु म्हणतो. ‘ धर्मार्थावुच्यते श्रेयः कामार्थौ धर्म एव च । अर्थ एवेह वा श्रेयः त्रिवर्ग इति तु स्थितिः ’ । ( २, २२४ ). इतरांचें म्हणणें कांहीं असो, माझें मत हें आहे असें या ठिकाणीं मनु स्पष्ट सांगतो. स्मृतिकारांमध्येंच अशी जेथें लाथाळी दिसते किंवा प्रत्यक्ष विरोध दिसतो तेथें इतरांनीं समन्वय तो कसा काय करावयाचा व समन्वय करावा म्हणून तरी आग्रह कां धरण्यांत यावा.

समन्वयपद्धति ही आहे तरी काय ? स्वतः मीमांसासूत्रांचा विचार केला तरी त्यांत सगळ्या वेदवचनांचा समन्वय करावा असें कोठेंहि सांगितलेलें नाहीं. श्रुतींत निर-

राळीं कर्में सांगितलीं आहेत. अग्निहोत्र सामवेदाच्या एका शाखेंत सांगितलेलें नाहीं. तेव्हां एखाद्या विशिष्ट कर्माविषयीं निरनिराळ्या वेदशाखांत जीं वचनें आलीं असतील, तीं एकत्र करून त्याचा एकंदर अर्थ लावावा असें फार तर मीमांसा सांगते. समन्वय हा शब्द 'तत्तु समन्वयात्' या बादरायणाच्या शारीरकमीमांसासूत्रांत म्हणजे ब्रह्मसूत्रांत (१, १, ४) आला असून तेथें तो उपनिषदांतील आत्मविषयक वचनांच्या एकवाक्यतेला लाविलेला आहे. तत् म्हणजे तें ब्रह्म सर्वज्ञ, सर्वशक्ति व जगाच्या उत्पत्तिस्थितिलयाचें कारण आहे, ही गोष्ट वेदान्तशास्त्रावरून समजते; कारण सर्व वेदान्तात जीं जीं वाक्यें आहेत तीं ब्रह्माशीं समन्वित आहेत म्हणजे तात्पर्यानें ब्रह्मप्रतिपादनपरच आहेत असा त्या सूत्राचा अर्थ आहे. 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' 'एकमेवाद्वितीयम्' 'आत्मा वा इममेक एवाग्र आसीत् ।', 'यतो वा इमानि भूतानि जायन्ते' इत्यादि सर्व वेदान्तवाक्यें तात्पर्यार्थानें ब्रह्मप्रतिपादनपरच आहेत. ब्रह्म ही वस्तु सिद्ध किंवा भूत म्हणजे आधीच झालेली व एकच असल्यामुळें उपनिषदांत ज्या ज्या वचनांत त्याचें वर्णन आलें आहे, त्या सर्वांचा अर्थ अशा रीतीनें लाविला पाहिजे कीं त्यावरून साक्षात् किंवा परंपरेनें ब्रह्मस्वरूपाचाच बोध होईल, असा सिद्धान्त करणें भागच आहे. ही समन्वयपद्धति होय.

पण पूर्वमीमांसेचा प्रकार अगदीं वेगळा आहे. तींत सांगितलेलीं जीं निरनिराळीं कर्में त्यांचें अपूर्व किंवा अदृष्ट व फळें निरनिराळीं असल्यामुळें तत्संबंधीं श्रुतिवचनांत समन्वय संभवतच नाहीं. उत्तरमीमांसेंत एका ब्रह्माचाच विचार असल्यामुळें सर्व वचनें ब्रह्मपर लावणें अवश्य आहे. पण पूर्वमीमांसेंत अनेक कर्में व अनेक फलें असल्यामुळें सर्व वचनांची एकवाक्यता करण्याचें कारणच नाहीं व शक्यहि नाहीं. औपनिषद वाक्यांत मात्र असें नाहीं. त्यांत वरकरणी विरोध आल्यास त्याचा परिहार करून एकवाक्यता केली पाहिजे. 'अणोरणीयान् महतो महीयान् आत्माऽस्य जन्तोर्निहितो गुहायाम्' (कठोपनिषद् २.२०), 'अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुःस शृणोत्यकर्णः' म्हणजे आत्मा अणूहुन लहान आणि मोठयाहूनहि मोठा, अशीं आपाततः परस्परविरोधी वचनें आहेत तीं सारीं ब्रह्माकडेच अविरोधानें लाविलीं पाहिजेत.

पूर्वमीमांसेंतील विवेचनांत श्रुतिवचनांपैकीं कित्येकांना विधि, कित्येकांना अर्थवाद अशीं नांवें दिलेलीं आहेत. पण तीं पूर्वी सांगितल्याप्रमाणे वेदांनीं स्वतः दिलेलीं नसून पुरुषबुद्धीनें दिलेलीं असल्यामुळें त्यांत सगळ्या शास्त्रकारांचें मतैक्य नाहीं; पुष्कळ ठिकाणीं मतभेद आढळतो. तात्पर्य पूर्वमीमांसाविषयक साऱ्या

श्रुतिवचनांच्या संबंधानें समन्वयाचा प्रश्नच उद्भवत नाहीं. कांहीं मीमांसक ह्मणतात. जीं गृह्यकृत्यें आपल्या स्वतःच्या वेदशाखेंत सांगितलेलीं असतील त्यांचीं आपल्या गृह्य-सूत्रांत सांगितलीं असतील तेवढींच अंगें करावीं; आपलें जें असेल, तें बहु असो की अल्प असो, तेंच करावें; इतरांकडून घेण्याचें कांही कारण नाहीं.* दुसरे कित्येक ह्मणतात कीं, एखाद्या कर्मासंबंधीं सर्वशाखांत जीं वचनें असतील, त्यांचा उपसंहार करावा ह्मणजे तीं एकत्र करून त्यांचें स्वरूप ठरवावें. शबरस्वामी याविषयीं ह्मणतात, ' सर्वशाखाप्रत्ययमेकं कर्म ' (पू. मी सू. २, ४, ९–१९ व २३ यावरील भाष्य). पूर्वमीमांसेंत ह्या विषय शाखान्तराधिकरणनामक अधिकरणांत आला असून (पू. मीं. सू. २, ४, ८–३३) त्याच्याच आधारानें बादरायणाच्या ब्रह्मसूत्रांत (३, ३, १) ' सर्ववेदान्तप्रत्ययं चोदनाद्यविशेषात् ' असा सिद्धांत सांगितलेला आहे. पंचाग्निविद्या, वैश्वानरविद्या किंवा प्राणाद्युपासना उपनिषदांत भिन्न भिन्न स्थळीं आलेल्या आहेत, त्या परस्परभिन्न न समजतां सर्व उपनिषदांमिळून एकच उपासना सांगितली आहे असें समजावें, असा तो सिद्धान्त आहे. कुमारिलभट्ट ह्मणतो ' कथं पुनस्तत्र वेदान्तराणि नोदाह्रियन्ते । केचिदाहुः शाखान्तरशब्देन तान्यपि उदाहृतानीति । न त्वेतदयुक्तम् ।......तस्माच्छाखान्तराण्येवोदाहरणम् । ' (तंत्र-वार्तिक, मी. सू. २, ४, ८) " एखाद्या अग्निहोत्रादिकर्मासंबंधानें निर्णय करतांना तत्संबंधीं सर्व वेदांतील वचनें घ्यावीं असें कित्येक ह्मणतात व शाखान्तर ह्मणजे सर्व वेदांच्या सर्व शाखा असें ते समजतात पण तें बरोबर नाहीं; एकाच वेदाच्या भिन्न भिन्न शाखांतील वाक्यांचें किंवा एकाच शाखेंतील भिन्न भिन्न ब्राह्मणवाक्यांचें मात्र त्या कर्माचीं अंगें समजून घेण्यासाठीं एकीकरण करावें. "

याप्रमाणें पूर्वमीमांसाशास्त्रांत श्रुतिवचनांचा समन्वय ह्मणजे काय त्याची कथा आहे. पण धर्मशास्त्रावरील निबंधकारांनीं मीमांसकांच्या या सिद्धान्ताची अशी व्यवस्था लाविली कीं, जें एखाद्या स्मृतींत मुळींच सांगितलें नसेल आणि ज्याचा त्या स्मृतीशीं विरोध नसेल तें अन्यस्मृतींतून घ्यावें. × उदाहरण, गौतम व मनु यांनीं गौडी, पैष्टी व माध्वी अशीं मद्यें पिऊं नयेत असें सांगितलें, पण इतर प्यावीं असें कांहीं सांगितलें नाहीं; ह्मणून मानवगृह्यसूत्र (१, ८), तसेंच आपस्तंबधर्मसूत्र (१, ५, १६, २; १, ५, १७, २१) यांवरील टीकेंत अष्टावक्र किंवा हरदत्त यांनीं ' सर्वं मद्यमपेयम् ' असें सांगितल्याप्रमाणें सर्व प्रकारचें मद्य ब्राह्मणांना अपेय समजावें.

---

* प्रयोगशास्त्रं गृह्यादि न समुच्चीयते परैः । बह्वल्पं वा स्वगृह्योक्तं यस्य कर्म प्रकीर्तितम् । तस्य तावति शास्त्रार्थे कृते सर्वः कृतो भवेत् ।। गृह्यपरिशिष्ट (बह्वल्पं ह्या श्लोक कात्यायनाचा ह्मणून अपरार्कानें पान ८ वर दिला आहे).

× यन्नाम्नातं स्वशाखायां पारक्यमविरोधि यत् । विद्वद्भिस्तदनुष्ठेयमग्निहोत्रादि-कर्मवत् ।। कात्यायनाचें अपरार्कानें उद्धृत केलेलें वचन (पान ८).

पण याहूनहि पुढें जाऊन निबंध ग्रंथकार वारंवार सांगतात कीं, सर्व स्मृतींचा अविरोध किंवा एकवाक्यता करावी. उदाहरण, विवाहाच्या विवेचनांत सपिण्ड कन्या करूं नये असें सांगतांना ' पंचमात् सप्तमादूर्ध्वं मातृतः पितृतस्तथा ' असें जें याज्ञवल्क्यानें ( १,५३ ) म्हटलें आहे, त्यावर मिताक्षराकार म्हणतात, ' यदपि वासिष्ठेन उक्तं पंचमीं सप्तमीं चैव मातृतः पितृतस्तथेति । त्रीन अतीत्य मातृतः पंचातीत्य च पितृत इति च पैठीनसिना तदपि अर्वाङ्निषेधार्थं न पुनस्तत्प्राप्त्यर्थम् इति सर्व स्मृतीनामविरोधः । ' वसिष्ठानें आईकडून पांच पिढ्या व बापाकडून सात पिढ्या सापिंड्य पहावें असें सांगितलें व पैठीनसीनें त्यांच्या जागीं तीन आणि पांच अशा पिढ्या अनुक्रमें सांगितल्या खऱ्या पण त्याचा अर्थ तीन किंवा पांच यांच्या खालीं घेऊंच नयेत असा निषेधक समजावा, तितक्या पिढ्यांचे पुढें विवाह करावा असा विधायक समजूं नये; अशा रीतीनें सर्व स्मृतींचा अविरोध किंवा एकवाक्यता होते ! सर्व स्मृतींचा समन्वय करतांना अशा कल्पना निबंधकारांनीं योजिल्या आहेत. या कल्पना योजतांना त्यांनीं वचनांचा कीस काढण्याची पराकाष्ठा केली आहे, आणि एका वाक्याचे चार निबंधकारांनीं चार अर्थ केले आहेत. आणि एवढें करून साधावयाचें काय तर ज्या काळीं ज्या देशांत जें मान्य व जें करण्यांत येतें त्याचें समर्थन. पण असें चालू वहिवाटीचें समर्थन स्मृतिवाक्यांच्या समन्वयानें करण्याच्या प्रवृत्तीमुळें फारच घोटाळे उत्पन्न झाले आहेत. ज्या त्या निबंधकारानें आपआपल्या मताप्रमाणें स्मृतींचा संकोच किंवा विकास केला असून सर्वत्र मतभेदांचा सुळसुळाट दिसून येतो. वचनांची ओढाताण करणें, एकानें एका स्मृतीला प्रामाण्य व प्रामुख्य देणें, तर दुसऱ्यानें दुसरीला प्रमाण व प्रमुख मानणें, आणि कसेंहि करून आपआपल्या काळापर्यंत चालत आलेल्या आचाराचें समर्थन करणें याचें नांव समन्वयपद्धति पडलें आहे. दोन तीन उदाहरणें घेऊन या म्हणण्याचें स्पष्टीकरण करूं.

निपुत्रिक स्थितींत मरण पावणाऱ्या पुरुषाचें धन प्रथम त्याच्या सद्वर्तनी स्त्रीला मिळालें पाहिजे, असें कांहीं धर्मशास्त्रकार म्हणतात. वृद्धमनु म्हणतो, ' अपुत्रा शयनं भर्तुः पालयंती व्रते स्थिता । पत्न्येव दद्यात्तत्पिंडं कृत्स्नमंशं लभेत च ' ॥ अपुत्रा स्त्रीनेंच भर्त्याला पिंड द्यावे व त्याचें सर्व धन घ्यावें. विष्णुधर्मसूत्रांत ' अपुत्रधनं पत्न्यभिगामि ' अपुत्र पुरुषाचें धन त्याच्या पश्चात त्याच्या पत्नीचें होय, असें सांगितलें आहे. कात्यायन तसेंच म्हणतो, ' पत्नी पत्युर्धनहरी या स्यादव्यभिचारिणी । '. याज्ञवल्क्याचें या विषयींचें वचन पूर्वीं सांगितलेंच आहे ( पत्नी दुहितरश्चैव इ० ). आतां उलट स्मृति पहा. नारद, मनु, शंख, आपस्तंब, गौतम, यांचें प्रतिपादन वृद्धमन्वादिकांच्या विरुद्ध आहे. नारद म्हणतो, ' भ्रातृणामप्रजाः प्रेयात्कश्चिच्चेत्प्रव्रजेत वा । विभजेरन्धनं तस्य शेषास्ते स्त्रीधनं विना । ' अनेक भावांतील एखादा निपुत्रिक मरण

पावला, किंवा संन्यस्त झाला, तर त्याचें धन इतर भावांनीं वांटून घ्यावें, मात्र त्याच्या पत्नीच्या स्त्रीधनाला हात लावूं नये. अपुत्र पुरुषाचें द्रव्य त्याच्या पित्यानें व त्याच्या अभावीं भावांनीं घ्यावें '( पिता हरेदपुत्रस्य रिक्थं भ्रातर एव वा । मनु. ९,१८५ ) असें मनु सांगतो. शंखानें यांत थोडा फरक करून 'अपुत्र पुरुषाचें धन प्रथम भावांनीं घ्यावें, ते नसतील तर मातापित्यानीं घ्यावें आणि तीं देखील नसतील तर ज्येष्ठ पत्नीनें घ्यावें, असें सांगितलें आहे. सपिंड नातेवाईक, गोत्रज, सप्रवर संबंधी आणि तसा कोणी नाहींच तर शेवटीं स्त्री ( ती जर नियोग करील तर ) असे निपुत्रिकाच्या धनाचे वारसदार गौतम देतो (२८. १९ पिंडगोत्रर्षिसंबंधा रिक्थं भजेरन् स्त्री वा अनपत्यस्य बीजं वा लिप्सेत). आपस्तंबानें अपुत्राच्या धनाचा वारस अगदीं जवळचा सपिंड सांगितला आहे ( २,६,१३,२. पुत्राभावे यः प्रत्यासन्नः सपिंडः । ). पत्नी केवळ पोटगीची धनी. इतर वारसांच्या अभावीं स्त्रीनें पतिधन घ्यावें असें जें कांहीं स्मृतिकारांनीं सांगितलें आहे, त्यांतहि श्लेष काढून धारेश्वर म्हणतो, 'हीं सारीं वचनें विभक्त झालेल्या भावाच्या स्त्रीलाच लागू असून ती नियोगाला कबूल असेल तरच पतिधन तिला मिळेल, नियोगाच्या अभावीं नारदानें सांगितल्याप्रमाणें तिला पोटगी मात्र मिळावी ' ( पत्नी गृह्णीयादित्येतद्वचनजातं विभक्तभ्रातृस्त्रीविषयम् । सा च यदि नियोगार्थिनी भवति । नियोगाभावे तु पत्न्या भरणमेव नारदवचनात् ' भरणं चास्य कुर्वीरन् स्त्रीणामाजीवनक्षयात् । ' ). पण याज्ञवल्क्याचा एक टीकाकार विज्ञानेश्वर यानें धारेश्वराच्या उलट प्रतिपादलें आहे; तो म्हणतो, " धारेश्वराचें म्हणणें योग्य नाहीं, कारण 'पत्नी दुहितरः' इत्यादि श्लोकात नियोगाचा कांहीं संबंधच नाहीं. उलट पत्नी संयम करून राहील तरच तिला पतीचें धन मिळणें युक्त आहे; नियोग करील तर नाहीं, कारण नियोग करणाऱ्या स्त्रीची स्मृतींनीं व लोकांतहि निंदाच केलेली आहे. " + श्रीकर म्हणतो ' निपुत्रिकाचें धन थोडेंच असेल, तर ते त्याच्या स्त्रीला मिळावें, पुष्कळ असेल तर भावांना मिळावें. ' पण थोडें ह्मणजे किती, असा प्रश्न येतो. तेव्हां असें ठरविण्यांत आलें कीं दोन हजार रुपये पर्यंतची संपत्ति स्त्रीनें घ्यावी, पण त्याहून अधिक असल्यास भावांनीं घ्यावी. आज दोन हजार रुपये ह्मणजे कांहींच नाहीं असें झालें आहे. पण पूर्वीं त्याची योग्यता फार होती. अकबराच्या वेळीं सैन्यांतील शिपायाला सव्वा रुपया पगार होता व चार आण्यांना मणभर गहूं मिळत होते, हें ऐनी अकबरीवरून दिसतें. असो. स्त्रियांच्या वारसाच्या अधिकारासंबंधानें असा मतभेद धर्मशास्त्रग्रंथांत दिसून

+ तदनुपपन्नम् । पत्नी दुहितर इत्यत्र नियोगस्याऽतीतेरप्रस्तुतत्वाच्च । ...... अपि च संयताया एव धनग्रहणं युक्तं न नियुक्तायाः स्मृतिलोकनिंदितायाः ।. विज्ञानेश्वर हा स्त्रियांच्या अधिकाराचा कैवारी होता. त्याच्या मिताक्षरा टीकेवर बालंभट्टी नांवाची टीका असून तींतहि स्त्रियांची बाजू मोठ्या जोरानें मांडिली असल्याचें पूर्वीं सांगितलें आहेच.

येतो. प्रथमचे ग्रंथ स्त्रियांना तसें अधिकार देत नव्हते. पण ' शरीरार्धं स्मृता जाया ' पत्नी ह्मणजे पुरुषाचें अर्ध होय, अशा आशयाचीं वचनें असतां स्त्रीला टाकून इतरांना वारस कसें करावें असा प्रश्न पुढील ग्रंथकारांनीं करून विभक्त असलेल्या पतीचें धन पत्नीला मिळावें असें प्रतिपादिलें.

दुसरें उदाहरण स्त्रियांच्या दत्तकाधिकाराचें. ' न स्त्री पुत्रं दद्यात् प्रतिगृह्णीयाद्वान्यत्रानुज्ञानाद्भर्तुः । ' ह्मणजे ' स्त्रीनें पतीच्या अनुज्ञेशिवाय पुत्र देऊं नये किंवा घेऊं नये ' असें वसिष्ठाचें वचन आहे. हें वचन सुमारे पंचवीसशें वर्षांपूर्वीचें आहे. आतां त्याचे निरनिराळे चार अर्थ करण्यांत आले आहेत. मिथिला देशांतील पंडितांनीं त्याचा अर्थ असा केला आहे कीं ' विधवांना मुळीं दत्तक घेण्याचा अधिकारच नाहीं; कारण पति मृत झाल्यावर तो तशी अनुज्ञा देणार कशी ? ' बंगाली पंडित यावर ह्मणतात कीं, दत्तक घेतांनाच पतीची अनुज्ञा पाहिजे असें कोठें त्या वचनांत सांगितलें आहे, केव्हां तरी ती घेतलेली असली ह्मणजे झालें. या क्लृप्तीला अनुसरून तिकडे एका स्त्रीनें पतीच्या मृत्यूनंतर सत्तर वर्षांनीं दत्तक घेतल्याचें उदाहरण घडलें आहे. आधीं दत्तक घेतला असतां तो द्रव्याचें काय करील कोणास ठाऊक, अशा भीतीनें तिनें जन्मभर पतिधनाचा उपयोग करून शेवटीं थोडाकाळ दत्तक घेतला असावा. असो. मद्रासी धर्मशास्त्रपंडितांनीं असें ठरविलें कीं ' अनुज्ञानाद् भर्तुः ' यांतील भर्तुः शब्द केवळ उपलक्षण होय, तेव्हां पतीच्या नातेवाइकांची अनुज्ञा असली तरी पुरे, या मतामुळें मद्रासकडे पतीच्या नातेवाईकांची अनुज्ञा दत्तक घेण्यास स्त्रीला चालते. आमच्या पैठणकर धर्मशास्त्रज्ञांनीं तर असा अर्थ केला कीं, ' पतीच्या अनुज्ञेची अट सधवा स्त्रीला मात्र आहे, विधवेला दत्तक घेण्याला कोणाचीच अनुज्ञा अवश्य नाहीं. ' आतां या चार भिन्न भिन्न अर्थांमध्यें खरा कोणता ? वसिष्ठाला कांहीं तरी एकच अर्थ विवक्षित होता हें उघड आहे. अर्थात् एकच अर्थ खरा व इतर खोटे हें तर खरें; पण तो खरा अर्थ कोणता हें प्रत्येकाच्या मतावरच आतां अवलंबून रहाणार ! हे निराळे अर्थ करणारे पंडित सारे मीमांसकच होते किंवा ते आपल्याला तसे म्हणवीत होते हें लक्षांत ठेविलें पाहिजे. तेव्हां अशी ही साऱ्या स्मृतिवचनांचा समन्वय करणारी पद्धति पंडितांसाठीं नसून आमच्या सारख्या अडाण्यांना वाटेल लावण्यासाठीं आहे, असें जें पराशरस्मृतीवरील टीकेंत माधवाचार्यांनीं सांगितलें आहे तेंच खरें ह्मणावें लागतें. माधवाचार्य ह्मणतात, ' स्मृतिव्याख्यातृभिः सर्वैर्वचनानां व्यवस्थितिम् । कुर्वाणैर्मन्दमतयो व्युत्पाद्यन्ते हि केवलम् ' ॥.

मीमांसेच्या नांवानें कोणत्याहि स्मृतिवचनांतून साधारपणें कोणतेंहि अनुमान काढण्याची शक्कल पंडितांना मोठी गमतीची सांपडली आहे यांत शंका नाहीं. एखादें वचन एकानें विधि ह्मणावें, दुसऱ्यानें अर्थवाद ह्मणावें, एकानें एक स्मृति प्रमाण मानून दुसऱ्या अप्रमाण मानाव्या, दुसऱ्यानें दुसरी प्रमाण मानून इतर अप्रमाण मानाव्या,

शब्दांचे अर्थ मन मानेल तसे करावे असे प्रकार अनेक आढळतात. आपल्या धर्मशास्त्रवाङ्मयाचा इतिहास पंचवीसशें वर्षांवर पसरला आहे व स्मृति लिहिण्याचें काम १५०० वर्षें चाललें होतें इतक्या दीर्घ काळांतील भिन्नभिन्न प्रसंगीं झालेल्या वचनांचा समन्वय कसा करावयाचा? भ्रूणहत्या शब्दांत भ्रूण म्हणजे ' विद्वान् ' असा अर्थ करतात, कोणी ' गर्भ ' असा करतात. ' गृंजन ' शब्दाची तीच कहाणी. कोणी गृंजन म्हणजे कांदा लसुणी सारखा उग्र गंधी पदार्थ असें म्हणतात, तर कोणी गाजर असा त्याचा अर्थ समजतात, कोणी एक प्रकारचा पालाच म्हणतात. तात्पर्य, ' जेथें पाउल टाकतांना देवानाहि भीति वाटावी तेथें मूर्ख दौडत जातात ' अशा आशयाची जी इंग्रजी म्हण आहे ( Fools rush in where angels fear to tread ) तिचा प्रत्यय हा घोटाळा पाहिला कीं येऊं लागतो. थोडक्यांत सांगावयाचें तर असला समन्वय म्हणजे मीमांसापद्धति नव्हेच. मीमांसेची इतर सर्वमान्य व प्रसिद्ध अशी परिभाषा व त्यांतील प्रमुख न्याय धर्मशास्त्रनिर्णयांत मान्य करण्यास मुळींच हरकत नाहीं. पण मुख्यतः स्मृतींचा विचार करावयाचा तो ऐतिहासिक दृष्टीनेंच केला पाहिजे. मीमांसेंत समन्वयपद्धतीच मुळीं सांगितली नसल्यामुळें ती धर्मशास्त्रनिर्णयांत अवलंबावी असें मुळीं ह्मणताच येत नाहीं. सनातन पक्षाभिमानी जेव्हा धर्मनिर्णय पूर्वमीमांसेच्या समन्वय पद्धतीला धरून करा असें प्रतिपादन करितात तेव्हा तें प्रतिपादन अनेकहेत्वाभासयुक्त असतें. प्रथय पूर्वमीमांसेंत समन्वय पद्धति मुळीं सांगितलीच नाहीं हें वर दाखविलेंच आहे. दुसरी गोष्ट स्मृतींतही या पद्धतीचा अवलंब केलेला नाहीं. धर्मशास्त्र निबन्धांत समन्वयपद्धतीचा अंगिकार करण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे; पण निबन्धकारांचे ग्रंथ यांना स्मृतींइतकेंही प्रामाण्य नाहीं, ते नुसते विद्वानांचे ग्रंथ ह्मणून विचारांत घ्यावयाचे असतात, त्या ग्रंथांचा तर समन्वयच करावयाचा नसतो, विद्वानांच्या मताला जितका मान द्यावयाचा तितकाच त्यांना द्यावयाचा यापेक्षां त्या निबन्ध ग्रंथांचें महत्व नाहीं व निबन्धग्रंथांचें आपसांतही अनेक विषयांत ऐकमत्य नाहीं. यामुळें निबन्धग्रथांचा समन्वय अशक्यच आहे. स्मृतींचाही समन्वय सरळ पणें अशक्य आहे. त्यासाठीं कलिवर्ज्य इत्यादि अनेक क्लृप्त्या योजाव्या लागतात हें वर दाखविलेंच आहे व पुढेंही दाखविण्यांत येईल. ह्मणून स्मृतिवचनांचा विचार करितांना ऐतिहासिक दृष्टी ठेवावी. याचा इतकाच अर्थ कीं स्मृति या प्रमाण आहेत पण त्यांना निरपेक्ष प्रामाण्य कधींच नव्हतें व नाहीं. त्या देशकालादिभिन्नतेमुळें भिन्नभिन्न गोष्टींचें प्रतिपादन करितात. ही गोष्ट धर्मनिर्णयांत नेहमीं डोळ्यापुढें ठेविली पाहिजे. भिन्न भिन्न देशकाल परिस्थितीप्रमाणें स्मृतिकारांनीं आचाराचे नियम बदलिले, तसे नियम बदलून घेण्याचा हल्लींच्या विद्वानांना अधिकार आहे. आचारधर्म हा प्राचीन कालपासून अशा रीतीनें परिवर्तित होत आला आहे व विद्वत्परिषदेनें देशकालपरिस्थित्यनुरूप त्यांत परिवर्तन करणें आवश्यक आहे असें मानणें ह्मणजे ऐतिहासिक पद्धति. असा या दोन पद्धतींत थोडक्यांत फरक आहे.

# धर्मशास्त्र आणि वेदान्त

पूर्वमीमांसाशास्त्राचा संबंध धर्मशास्त्राशीं कसा येतो, तें येथवर थोडक्यांत पाहिलें. आतां उत्तरमीमांसा किंवा वेदांत याचा धर्मशास्त्राशीं काय संबंध आहे तें पाहूं. उत्तर मीमांसा किंवा वेदान्त शास्त्र हें सर्व शास्त्रांचा मुकुटमणि आहे, ही गोष्ट सर्व स्मृतींनीं मान्य केलेली आहे. एकच परमेश्वर सर्वांच्या ठायीं आहे, धर्माचरणानें उभय लोक मिळतात, आत्मलाभापेक्षां दुसरें कांहींच श्रेष्ठ नाहीं, इत्यादि सिद्धांत सर्व स्मृतिग्रथांना संमत आहेत. आपस्तंब ह्मणतो ( धर्मसूत्र १, ८, २२, २ ) 'आत्मलाभान्न परं विद्यते । आत्मन् पश्यन् सर्वभूतानि न मुह्येत् चिन्तयन् कविः । आत्मानं चैव सर्वत्र यः पश्येत्स वै ब्रह्मा नाकपृष्ठे विराजति । '—सर्वत्र आत्माच आहे असें पहाणारा ब्रह्मीभूत होऊन स्वर्गांत विराजमान होतो. वसिष्ठानेंहि तसेंच ह्मटलें आहे ( २, ३ ). गौतम ह्मणतो, 'ज्याच्या जवळ आठ आत्मगुण आहेत, तो जरी इतर संस्कारांच्या बाबतींत कमी असला, तरी त्याला ब्रह्मसायुज्य प्राप्त होतें [ अथ स ब्रह्मणः सायुज्यं सालोक्यं च गच्छति । ८, ५]. अशारीतीनें आत्मलाभाची थोरवी सर्व स्मृति गातात.

वेदान्तांतील कर्म व पुनर्जन्म यां गोष्टींहि धर्मशास्त्र मान्य करतें. कर्म कधीं नष्ट होत नाहीं ( न हि कर्म क्षीयते ), सम्यग्ज्ञानानें मात्र कर्मबंध तुटतो, जसें करावें तसें भरावें या सिद्धान्तांचा अनुवाद स्मृति करतात. 'यथा धेनुसहस्रेषु वत्सो विन्दति मातरम् । तथा पूर्वकृतं कर्म कर्तारं विन्दते ध्रुवम् । ' असें विष्णुधर्मसूत्रांत (२०,४७) ह्मटलें आहे. हजारों गाईंतून आपल्या आईला ज्याप्रमाणें वासरूं नेमकें हुडकून काढितें, त्याप्रमाणें पूर्व जन्मीचें कर्म याजन्मीं कर्त्याला निश्चितपणें शोधून काढून त्याच्या मागें लागतें. महाभारतांतहि असेंच सांगितलें आहे [ शां. प. ]. गौतम ह्मणतो 'आपआपल्या वर्णाश्रमधर्माप्रमाणें वागणारे पुरुष मृत्यूनंतर आपल्या कर्माचें फळ भोगून उरलेल्या कर्मानुसार विशिष्ट देश, विशिष्ट जाति, कुल, रूप, आयुर्मान, विद्वत्ता, शील, धन, सुख व बुद्धि यांनीं युक्त होऊन जन्म घेतात; तसें न करणारे सर्वच भटकत नाश पावतात ' [ ११, २९-३० ]. आपस्तंबहि [ धर्मसूत्र २, १, २, २-३ ] तसेंच ह्मणतो, 'स्वधर्माच्या अनुष्ठानानें अपरिमित सुख प्राप्त होतें; पुढें उत्तम जन्म येतो प्राणी सुखांत रहातो.' गीता व मनु यांतहि 'स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः । ', 'श्रेयान् स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् । ', 'वेदोदितं स्वकं कर्म नित्यं कुर्यादतंद्रितः । तद्धि कुर्वन् यथाशक्त्या प्राप्नोति परमां गतिम् । ' ( मनु. ४,१४; वसिष्ठ २७,८ ) असा त्याच सिद्धान्ताचा अनुवाद केलेला आढळतो. अशा रीतीनें वेदान्ताचे सिद्धान्त गृहीत करून धर्मशास्त्रांत वर्ण, आश्रम इत्यादि व्यवस्था केलेली आहे. पण आत्मज्ञानी हा सर्वांत श्रेष्ठ होय, अशा विषयींचे मनूचें वचन ( १, ९६-९७ ) पूर्वीं दिलें आहेच ( भूतानां प्राणिनः श्रेष्ठाः कर्तृषु ब्रह्मवादिनः ). याज्ञवल्क्यानेंहि धर्मनिर्णयपरिषदेची घटना सांगतांना आत्मज्ञान्याचें महत्त्व

सा ब्रूते यं स धर्मः स्यादेको वाऽध्यात्मवित्तमः '। ( १, ९ ) असें म्हटलें आहे. विद्वत्परिषद् सांगेल तो धर्म किंवा श्रेष्ठ अध्यात्मज्ञानी सांगेल तो धर्म, अशी अध्यात्मज्ञानाची थोरवी धर्मशास्त्रकारांनीं गायिलेली आहे.

## धर्मशास्त्र आणि तर्क

तत्वविचार करणारीं शास्त्रें अथवा दर्शनें सहा असून त्यांतील पूर्वमीमांसा आणि उत्तरमीमांसा म्हणजे वेदान्त यांचा धर्मशास्त्रांशीं संबंध काय आहे तें येथवर पाहिलें. आतां इतर शास्त्रांचा त्या दृष्टीनें थोडा विचार करूं. या सहा शास्त्रांत किंवा षड्दर्शनांत तीन जोड्या आहेत. त्यांतील मीमांसेच्या जोडीचा विचार झाला. उरलेल्या शास्त्रांत सांख्य आणि योग व वैशेषिक आणि न्याय अशा दोन जोड्या आहेत. सांख्यशास्त्र कपिलप्रणीत आणि योग पतञ्जलिप्रणीत अशीं असून तत्वज्ञानदृष्ट्या त्यांत बरेंच साम्य असल्यामुळें त्यांचा संयोग करतात. तसाच प्रकार वैशेषिक व न्याय यांचा आहे. पहिलें कणादप्रणीत असून दुसरें गौतमप्रणीत आहे. कणादाला कणभुक् म्हणजे कण खाणारा ( atom-eater ) असेंहि म्हणतात; कारण हें विश्व सारें कण किंवा अणु यांनीं बनलेलें असून तें ईश्वरापासून निराळें स्वतः सिद्ध होतें असें त्याचें मत होतें. न्यायशास्त्राचें तत्वज्ञान वैशेषिकांशीं मिळतें असल्यामुळें पुढें पुढें त्यांचा सामायिक उल्लेख न्याय या नांवानेंच होऊं लागला. असो, धर्मशास्त्रांत न्यायाला स्थान असून याज्ञवल्क्यानें ' पुराणन्यायमीमांसाधर्मशास्त्रांगमिश्रिताः ' इत्यादि श्लोकात ( १, ३ ) सांगितलेल्या चौदा धर्मस्थानांत त्याचा अन्तर्भाव केला आहे. गौतमधर्मसूत्रांत ' न्यायाधिगमे तर्कोऽभ्युपायः । ' ( ११,२–३ ) न्यायाचें ज्ञान करून घेण्यासाठीं तर्काचा अवलंब केला पाहिजे असें सांगितलें आहे. पण या तर्काला आळा घालण्यांत आला, तो असा कीं तो श्रुति व स्मृति यांच्याविरुद्ध नसावा. शंख म्हणतो ' श्रौतं स्मार्तं क्रियावाक्यं हेतुभिर्यो विघातयेत् । असच्छास्त्रमुपाश्रित्य स ज्ञेयः शिष्टनिन्दितः ॥ ' तर्काच्या योगानें जो श्रुतिस्मृतिवचनांना बाध आणूं पाहील तो खोटया शास्त्राच्या मार्गें लागलेला समजावा, त्याची शिष्ट निंदा करतात. मनूनें प्रत्यक्ष व शब्द या प्रमाणांबरोबर अनुमानालाहि धर्मतत्त्वजिज्ञासेंत स्थान दिलें आहे. ( प्रत्यक्षं चानुमानं च शास्त्रं च विविधागमम् । त्रयं सुविदितं कार्यं धर्मशुद्धिमभीप्सता । १२, १०५ ), पण तें अनुमान वेद व ऋषिप्रणीत धर्म यांना विरोधी नसावें ( आर्षं धर्मोपदेशं च वेदशास्त्राऽविरोधिना । यस्तर्केणानुसंधत्ते स धर्मं वेद नेतरः । १२, १०६ ). तसाच धर्मनिर्णय करणाऱ्या परिषदेच्या सभासदांत ' हैतुकः ' ह्मणजे न्यायशास्त्रवेत्ता व तर्की ह्मणजे तर्कशास्त्रवेत्ता यांचा समावेश मनूनें केला आहे ( त्रैविद्यो हैतुकस्तर्की नैरुक्तो धर्मपाठकः । त्रयश्चाश्रमिणः पूर्वे परिषत्स्याद्दशावरा । १२, १११ ).

याप्रमाणें श्रुतिस्मृतींबरोबर तर्काचा उपयोग धर्मनिर्णयांत सांगितला व तो तर्क श्रुति व स्मृति यांना विरोधी नसावा असेंहि तर्काला आळा घालण्यासाठीं सांगितलें.

पण यांतील श्रुति सुप्रसिद्ध असली, तरी स्मृति तशी नाहीं. कोणत्या स्मृतीला अवि रोधी तो असावा ? मनूच्या कीं कपिलाच्या ? नुसतें स्मृति म्हटल्यानें भागत नाहीं. तसें झालें तर बौद्ध, जैन हेहि आपापल्या स्मृति पुढें करतील. बादरायणाच्या ब्रह्मसू-त्रांत द्वितीयाध्यायांतील स्मृत्याधिकरणांत ( २, १, १–२ ) हा प्रश्न चर्चेस घेऊन ' स्मृत्यनवकाशदोषप्रसंग इति चेन्नान्यस्मृत्यनवकाशदोषप्रसंगात् ' या सूत्रांत श्रुतीला अनुसरणाऱ्या स्मृति तेवढ्या प्रमाण, इतर अप्रमाण, असा निर्णय दिला आहे. ' या वेदबाह्याः स्मृतयः याश्च काश्चित्कुदृष्टयः। ता निष्फलाः ' असा निर्णय मनूनें दिल्यामुळें बौद्धादि स्मृति अप्रमाण ठरल्या, नाहीं तर वेद, यज्ञ व ब्राह्मण यांचा निषेध करणाऱ्या त्या स्मृतींनाहि स्मृति शब्दानें वाव मिळाला असता. बौद्ध लोक बुद्धाला फार थोर मानतात. त्यानें जगाचें पाप स्वतःवर घेऊन त्याला दुःखमुक्त केलें, असें ते म्हणतात. जैनामध्यें वर्धमान ऋषभ इत्यादि थोर पुरुष होऊन गेले असून त्यांनीं किंवा पंडितांनीं त्यांचे नांवावर ज्योतिष व्याकरण इत्यादि विषयांवर उत्तमोत्तम ग्रंथ लिहिले आहेत. तेव्हां त्यांच्याहि स्मृतींना विरोधी असा तर्क करतां कामा नये असें होईल म्हणून त्यांना दूर करण्यासाठीं त्या वेदविरुद्ध होत अशी युक्ति काढण्यांत आली. अशा रीतीनें तर्काला पायबंद घालण्याचा जरी धर्मशास्त्रकारांनीं यत्न केला तरी तर्का-शिवाय कोणाला पाऊलहि टाकतां येत नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. एखादें वेदवचन विधि आहे कीं अर्थवाद आहे, प्रतिषेध आहे कीं पर्युदास म्हणजे अपवाद आहे हें तरी तर्कानेंच ठरवावयाचें असतें. अर्थात् त्यांत मतभेद झाल्यास एकवाक्यता होऊं शकत नाहीं. तर्काला घातलेल्या कुंपणाचा उपयोग एवढाच कीं ' वेदांविरुद्ध मी बोलत नाहीं, ' असें प्रत्येकानें तोंडानें म्हणावें आणि वाटेल तें लिहावें असा प्रकार होऊं लागला. ' तत्त्वमसि ' हें जें उपनिषदांतील सुप्रसिद्ध महावाक्य त्याचा अर्थ ' तत् त्वम् असि ' म्हणजे तें ब्रह्मच तूं आहेस, असा शंकराचार्य करतात; आणि मध्वाचार्य ' तस्य त्वम् असि ' म्हणजे त्या परमेश्वराचा तूं दास आहेस असा करून द्वैत-सिद्धि करतात. पण हे दोन्ही अर्थ खरे असें असणें कांहीं शक्य नाहीं. तत्त्वमसि हें वेदवाक्य म्हणून द्वैती व अद्वैती या दोघांनाहि मान्य. पण अशा परस्परविरोधी मतामुळें त्या मान्यतेचा उपयोग काय ? तात्पर्य शेवटीं तर्क व मनुष्यबुद्धि यांशिवाय चालतच नाहीं. पण तर्काची नुसती नांवाची कुचंबणा केल्यानें अप्रामाणिकपणा मात्र उत्पन्न झाला, म्हणजे स्वतःला वाटेल तें म्हणावें व त्याला कोणत्या तरी वेदवचनाचा किंवा ओढून ताणून अर्थ केलेल्या स्मृतीचा आधार द्यावा, असें होऊन बसलें.

## धर्मशास्त्र आणि योग

' योगश्चित्तवृत्तिनिरोधः ' अशी पतंजलीनें योगाची व्याख्या केली आहे. योगांची आठ अंगें ' यम नियम आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान धारणा आणि

समाधि ' अशी दिलीं असून त्यांतील यम, नियम आणि प्राणायाम यांचा धर्मशास्त्राशीं पुष्कळ संबंध आहे. सर्व कर्मांना प्राणायामानेंच आरंभ होत असून पापांच्या प्रायश्चित्ताचा विचार करतांना प्राणायामानें सर्व पापांचा नाश होतो ( प्राणायामैन शुध्यति । ) असें म्हटलें आहे. यम म्हणजे मनःप्रवृत्तीचें नियमन करणें. हे यम ' अहिंसा–सत्या-स्तेय–ब्रह्मचर्यापरिग्रहाः ' असे सांगितले असून ' तप.संतोष–शौच–स्वाध्यायेश्वरप्राणि-धानानि ' यांना नियम म्हटलें आहे. या नियमांचा धर्मशास्त्रांत उपयोग केलेला आहे. मनु म्हणतो ' नियमांपेक्षांहि यमाचें पालन नित्य करावें. कारण केवळ नियमांचें आचरण करून जर यमाकडे म्हणजे अहिंसा, सत्य, इत्यादिकांकडे दुर्लक्ष होईल, तर मनुष्य पतित होतो ' ( यमान् सेवेत सततं न नित्यं नियमान्बुधः । यमान्पतत्यकुर्वाणो नियमान् केवलान् भजन् । ४,२०४ ). याज्ञवल्क्यानेंहि दहा यम आणि दहा नियम सांगितले असून ' योगसाधनानें आत्मदर्शन करून घेणें हा परम धर्म होय ' ( अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् । १,८ ) असें म्हटलें आहे.

## धर्मशास्त्र आणि व्याकरण

धर्मशास्त्रांत व्याकरणाचा संबंध काय, असा प्रश्न सहज उत्पन्न होतो. पण कित्येक ठिकाणीं वाक्यांचे अर्थ व्याकरणाचे बारीक नियम लावून निबंधकारांनी केले आहेत असें आढळून येतें. उदाहरण देऊन याचें स्पष्टीकरण करूं. समुद्रयान करणाऱ्या द्विजांचें प्रायश्चित्तानेंहि व्यवहार्यत्व होत नाही अशा आशयाचें 'द्विजस्याब्धौ तु नौयातुः शोधितस्याप्यसंग्रहः ' हें वचन आहे. याचा सरळ दिसणारा अर्थ घेतला, तर नावेंतून एकदांहि समुद्रांत जवळची फेरी करून येणारा द्विज पतित झाला असें होईल. म्हणून त्या ठिकाणीं व्याकरणाचा नियम लावून अर्थ करावा असें सांगितलें आहे. यातुः शब्द या धातूपासून तृच् किंवा तृन् प्रत्यय लागून झालेल्या यातृ शब्दाची षष्ठी आहे व त्याचा नौ शब्दाशीं समास झाला आहे. आतां व्याकरणाचा नियम पाणिनीनें असा सांगितला आहे कीं तृच् आणि अक हे कर्तरि प्रत्यय लागून झालेल्या कर्तृवाचक नामांचा कर्मपदाशीं समास होत नाहीं.'धान्यपाचकः'असें न म्हणता'धान्यस्य पाचकः'म्हटलें पाहिजे. त्याप्रमाणें नौयातुः असें न म्हणतां 'नावा यातुः' असें म्हटलें तर नावेनें एकदांहि जाणारा असा अर्थ होईल. पण तृन् प्रत्ययानें होणाऱ्या कर्तृवाचक नामाचा कर्मपदाशीं समास होतो व तशा नामांचा नित्य करणारा (ताच्छील्य) असा अर्थ होतो. म्हणून 'नौयातुः'असा समास ज्या अर्थी आहे, त्या अर्थी एखादे वेळीं कामानिमित्त नावेंत बसणाराला हें वचन लागू नसून नावेशीं नित्य जखडलेल्याला म्हणजे नावाड्याला तें लागू आहे असें समजावें. अर्थात् द्विज नित्य नावाड्याचें काम करील तर तो प्रायश्चित्तानेंहि व्यवहार्य होणार नाहीं, असा त्याचा अर्थ आहे. अशा रीतीनें वचनांचा अर्थ लावतांना धर्म-शास्त्रांत व्याकरणाचा संबंध आणण्यांत येतो.

# धर्मशास्त्रांतील काल्पनिक सिद्धान्त

कित्येक गोष्टी वास्तविक नसून त्यांना खऱ्या मानण्याची प्रवृत्ति धर्मशास्त्रकारात दिसून येते. अशा काल्पनिक सिद्धान्तांवर ( fictions ) धर्मशास्त्रांतील कित्येक मतांची उभारणी झालेली आहे. पहिला असला सिद्धांत म्हणजे सांप्रत कलियुग चालू असून पूर्वी सत्ययुग किंवा कृतयुग होतें व तेव्हां सर्वच परिस्थिति आजच्याहून वेगळी होती, हा होय. मौज अशी की अगदी पूर्वीपासून ग्रंथकार असें म्हणत आलेले आढळतात. गौतम धर्मसूत्रात म्हणतो ( १, ३–४—दृष्टो धर्मव्यतिक्रमः साहसं च महताम्। अवरदौर्बल्यात्। ) मोठ्या लोकांनीं धर्माचा आतिक्रम केलेला पूर्वी आढळतो, पण आपण दुर्बळ असल्यामुळें तसें करूं नये. प्राचीन ऋषींचें सामर्थ्य मोठें होतें, आपल्याला त्यांच्या तोडीस बसतां यावयाचें नाहीं. आपस्तंबाचें हि असेंच मत होतें व तें त्यानें 'दृष्टो धर्मव्यतिक्रमः साहसं च पूर्वेषाम्। तेषां तेजोविशेषेण प्रत्यवायो न विद्यते। तदन्वीक्ष्य प्रयुंजानः सीदत्यवरः' ( २, ६, १३, ७–९) या सूत्रांत सांगितलें आहे. पूर्वीच्या सामर्थ्यवान् लोकांचें करणें पाहून आपण तसें केलें, तर दौर्बल्यामुळें आपला घात होईल. 'तस्मादृषयोऽवरेषु न जायन्ते नियमातिक्रमात्' ( आप. ध. सू. १.२.५.४ ) असे दुसऱ्या एका ठिकाणीं त्यानें म्हटलें आहे. 'अलीकडच्या लोकात ऋषि उत्पन्न होत नाहींत' असें तो ह्मणतो. आपस्तंबानें पूर्वीचे व अलीकडचे एवढेच शब्द घातले आहेत, पण आपण कोणत्या युगातील हें सांगितलेलें नाहीं. पण इतरांनी त्याला कलियुगापूर्वी ढकलिलेलें आहे. कृतादि शब्द ऐतरेय ब्राह्मणात आले आहेत. 'कलिः शयानो भवति संजिहानस्तु द्वापरः। उत्तिष्ठंस्त्रेता भवति कृतं संपद्यते चरन्॥' या वचनांत त्यांचा अर्थ युगवाचक नसून त्याचा अनुवाद मनूनें 'कलिः प्रसुप्तो भवति स जाग्रद् द्वापरं युगम्। कर्मस्वभ्युद्यतस्त्रेता विचरंस्तु कृतं युगम्।' असा केला आहे (९,३०२).धर्म कृतयुगांत चतुष्पाद म्हणजे पूर्ण होता, पण युगऱ्हासाबरोबर त्याचा एकेक पाद नाहींसा होऊन कलियुगांत एकच रहातो, अशी जी कल्पना आढळते ती सुद्धां प्राचीन धर्मसूत्रांत नव्हती, पुढें हळुहळू ती आली. मनु म्हणतो, 'चतुष्पात् सकलो धर्मः सत्यं चैव कृते युगे। नाधर्मेणागमः कश्चिन्मनुष्यान् प्रति वर्तते॥ १,८१। कृतयुगांत धर्म पूर्ण होता, तेव्हांचें सत्ययुगच होतें. त्यावेळीं अधर्मानें कसलीहि प्राप्ति माणसें करून घेत नसत. पण पुढें युगायुगांत त्याचा एकेक पाद कमी झाला ( इतरेष्वागमाद्धर्मः पादशस्त्ववरोपितः।' १,८२ ). तात्पर्य कृतादि युगांत मनुष्यांचे धर्म युगऱ्हासानुरूप निरनिराळे असतात ( अन्ये कृतयुगे धर्मास्त्रेतायां द्वापरे परे। अन्ये कलियुगे नृणां युगऱ्हासानुरूपतः॥ १,८५ ). महाभारत शांतिपर्व, पराशर स्मृति यांतहि ही कल्पना सांगितली आहे. या कल्पनेमुळें

धर्मशास्त्रग्रंथांत जें जें वचन आपल्या चालू कल्पनेला गैरसोईचें दिसेल तें तें कालिवर्ज्य म्हणजे तें पूर्व युगांत लागू होतें आतां नाहीं, असें म्हणण्याची प्रवृत्ति निबंधकारांत व पुराणांत उत्पन्न झाली, आणि किती तरी गोष्टी कलिवर्ज्यांत ढकलण्यांत आल्या. त्याविषयीं विवेचन पूर्वी झालेलें आहे. आर्यांच्या देखरेखीखालीं शूद्रांना अन्नसंस्कार ( म्हणजे पाक ) करण्यास हरकत नाहीं ( आर्याधिष्ठिता वा शूद्राः संस्कर्तारः स्युः । ) असें आपस्तंबानें म्हटलें आहे ( २,२,३,४ ). पण नागेशभट्ट सांगतात, हें वचन कलियुगाला लागू नाहीं. पण स्वतः आपस्तंब तसें म्हणत नाहीं, आणि आपस्तंब हा कोणत्या युगांतला समजावयाचा ?

होऊन गेलें तें सुवर्णयुग ( Golden age ) आणि चालू आहे तें लोहयुग ( Iron age ) ही कल्पना इतरत्रहि आढळते. ग्रीक लोकांत ही कल्पना होती. ॲरिस्टॉटल, प्लेटो हे ग्रीक तत्त्ववेत्ते ७२००० वर्षांचें कालचक्र मानीत. आमचे ग्रंथकार ४३२०००० वर्षांचें युगचक्र मानतात, त्यांत कलियुगाच्या वांट्याला ४३२००० वर्षें दिलेलीं आहेत. पण ही कल्पना मनुस्मृतीपूर्वी आढळत नाहीं. त्यानंतर दिसून येते. कांही अनपेक्षित गोष्ट घडली कीं, 'आतां कलियुग आलें, आतां असें व्हावयाचें' असें म्हणण्यांत येऊं लागलें ( प्राप्तं कलियुगं विद्धि ). या कल्पनेवर असें उत्तर देतां येईल कीं, कलियुगांत अमुक अमुक होणार असें जर भविष्य त्रिकालज्ञानी ऋषींनीं निश्चित ठरविलें आहे, तर तें टाळणें कसें शक्य होणार, आणि मग त्यावर एवढी मोठी चर्चा तरी कशाला ? ' कलौ पाराशराः ( धर्माः ) स्मृताः । ' म्हणजे पराशरानें सांगितलेले धर्म कलियुगासाठीं होत असें पराशर स्मृतिच म्हणते. पण ' दास गोपाल व नापित' यांच्या हातचें अन्न खाण्यास पराशर परवानगी देतो, हें पाहून नागेशभट्टांना तें रुचलें नाहीं ( व्रात्यताप्रायश्चित्तनिर्णय ) व त्यांनीं तें वचन कलिवर्ज्य प्रकरणांत टाकून दिलें ! तात्पर्य एवढेंच कीं प्राचीन काळ चांगला होता, आजचा काळ वाईट आहे ही कल्पना या साऱ्याच्या बुडाशीं आहे. दूरून डोंगर साजरे दिसतात व त्यांच्यावर जाऊन चालूं लागलें कीं कांटे व दगड बोचतात. ' दूरस्था भूधरा रम्याः ' असें माणसाला नेहमींच वाटत असतें ( Distance lends enchantment to the view ) एवढाच त्याचा अर्थ. कलियुग सुरु होऊन फक्त पांच हजार वर्षें झालीं, अजून ४२७००० वर्षे तर कलियुगाचीं जावयाचीं आहेत. ऐतिहासिक दृष्टीनें पाहिल्यास सर्व स्मृतिकार कलियुगांतील आहेत पण निबन्धकारांच्या मतानें बहुतेक स्मृतिकार कलियुगाच्या पूर्वींचे धर्म सांगत आहेत. निदान त्यांनीं सांगितलेले महत्वाचे धर्म ( म्हणजे अनुलोम विवाह भक्ष्याभक्ष्य वगैरे ) कलियुगांत अधर्मच आहेत ! ! !

कलिमाहात्म्याची कल्पना अशा रीतीनें उद्भूत झाल्यावर पुराणांनीं ती अगदीं टोकाला नेली. त्यातील भविष्यार्थक वचनें प्रमाण धरून कलियुगांत क्षत्रिय व वैश्य नाहींतच असें पुराणें म्हणूं लागलीं ( कलावाद्यन्तयोः स्थितिः ). कलींत क्षत्रिय व

वैश्य नाहींसें झाले, मग ब्राह्मण तरी कसे राहिले ? महाभारतांत ' ब्राह्मणाः क्षत्रिया वैश्या न शिष्यन्ति जनाधिप । एकवर्णस्तदा लोको भविष्यति युगक्षये ॥ ' ( वनपर्व ) असें सांगितलें आहे. कलियुगांत ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य असे सगळेच नाहींसे होऊन सर्वत्र एक शूद्र वर्ण राहील, असें जर आहे तर ब्राह्मणहि रहाणार नाहींतच. पण यावर नागेशभट्ट म्हणतात, ' तत्र क्षत्रियवैश्यनाशो मात्स्यवैष्णवयोः स्पष्टमेवोक्तः सर्वथोच्छेदरूपः । ब्राह्मणनाशस्तु स्वधर्महान्येति बोध्यम् । विप्राणामपि शूद्राचारत्वादेकवर्ण इति बोध्यम् ॥ ' क्षत्रिय व वैश्य हे सर्वथैव नष्ट होतील असें भविष्य मत्स्य व विष्णु या पुराणांत स्पष्ट सांगितलें असल्यामुळें महाभारतांत सांगितलेला ब्राह्मणनाश धर्महानिरूप समजला पाहिजे, व विप्र हे शूद्रांसारखे आचार करूं लागल्यामुळें एकवर्ण होईल एवढाच अर्थ ! पण असें म्हणून नागोजीभट्टांनीं ' सकृदुच्चरितः शब्दस्तमेवार्थं गमयति ' या मीमांसान्यायाचा खून केला असें म्हणावयास नको काय ? एकाच वाक्यांत ' उरणार नाहींत ' ( न शिष्यन्ति ) या पदाचे भिन्न अर्थ घेणें युक्त आहे काय ? क्षत्रिय व वैश्य यांचा समूळ उच्छेद झाला म्हणजे काय ते सगळे मरून गेले ? ब्राह्मणनाश जसा धर्महानिरूप समजावयाचा तसा क्षत्रिय व वैश्य यांचाहि कां समजूं नये ? आधीं पुराणांना धर्माचीं मुळें कोणी समजत नव्हते. याज्ञवल्क्यानें ' पुराण...चतुर्दश ' या श्लोकांत पुराण व धर्मशास्त्र यांत फरक केला आहे. पुराणें ही विद्येचें व धर्माचें स्थान असतील पण श्रुति व स्मृति हेच ग्रंथ फक्त धर्ममूल असें मनु व याज्ञवल्क्य म्हणतात. शिवाय पुराणांतलीं वचनेंही भविष्यकथनात्मक आहेत. त्यांवर विश्वास ठेऊन वस्तुस्थिति संबन्धानें अनुमानें काढणें चुकीचें आहे. पुराणांत स्मृतिविरुद्ध अनेक आचार आहेत असें महामिमांसक नीळकंठभट्ट म्हणतात.

भागवतांत द्वादशस्कंधांत ' महापद्मपतिः कश्चिनन्दः क्षत्रविनाशकृत् । ततो नृपा भविष्यन्ति शूद्रप्रायास्त्वधार्मिकाः । ' असें म्हटलें आहे व त्याला अनुसरून ' नन्दान्तं क्षत्रियकुलम् ' अशी म्हण पडली. नन्द हा मगधाचा राजा असल्यामुळें हा क्षत्रियनाश मगधा पुरता समजावा ( मागधा एव क्षत्रियाः नाशिता न देशान्तरस्थाः ) असें कांहींचें म्हणणें आहे. पण नागेशभट्ट म्हणतात ' सामान्यप्रवृत्तवाक्यस्य संकोचे मानाभावात् ' म्हणजे 'सामान्य गोष्ट सांगण्यासाठीं प्रवृत्त झालेल्या वाक्याचा संकोच करण्याला कांहीं प्रमाण नसल्यामुळें तसें समजण्याचें कारण नाहीं. ' संकोच करण्याला प्रमाण नाहीं, तसें विस्तार करावयास तरी काय प्रमाण ? पण तसा मात्र ते करतात. परशुरामानें एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय केली असें तींच पुराणें सांगतात. मग राम, कृष्ण हे क्षत्रिय कोठून आले ? आणि ते जर आले तर नन्दांनंतरहि पुनः का येऊं नयेत ? पण एका कल्पनेनें घेरल्यामुळें इतर साऱ्या विचारांना नागेशभट्टासारखा महाविद्वानहि फांटा देऊं शकला. नागेशभट्टांच्या समकालीन पण्डितांनींच त्यांच्याच प्रमाणभूत वाक्यांवरून व मीमांसापद्धतीनें कलींत क्षत्रिय आहेत असें सिद्ध

केलें. नागोजीभट्टापूर्वी पन्नास वर्षें महामीमांसक गागाभट्ट यांनीं शिवाजी महाराजांचें ४८ व्या वर्षी उपनयन करून त्यांना वैदिक महाभिषेक केला.

सगळ्या स्मृति वेदमूलक होत अशी आणखी एक महत्त्वाची कल्पना धर्मशास्त्र विवेचनांत निबंधकारांनीं योजलेली आहे. ही कल्पना बरीच प्राचीन आहे. आपस्तंब धर्मसूत्रांत ( १,४,१२,१० ) ' ब्राह्मणोक्ता विधयस्तेषामुत्सन्नाः पाठाः प्रयोगादनुमीयन्ते ' असें एक वचन आहे. ब्राह्मणग्रंथांत सांगितलेल्या विधींचे पाठ आतां नष्ट झाले, पण प्रत्यक्ष प्रयोगांत ते विधि असल्यामुळें पाठांचें अनुमान होतें. हा उत्सन्न श्रुतिवाद होय. या विषयीं तीन चार भिन्न मतें आढळून येतात. कांहीं जण म्हणतात ' कित्येक वेदवाक्यें नित्य अनुमितच करावयाचीं असून त्यांचा उच्चार कधीं होत नाहीं ' ( नित्यानुमेयास्ताश्चोदनाः न कदाचिदुच्चार्यन्ते ). पण हें म्हणणें केवळ अंधपरंपरेचें होय व या मतांत मोठी अडचण ही कीं बौद्धादिग्रंथकार आमच्या ग्रंथांना उपोद्बलक वेदवचनें होतीं, असें अनुमान करा असा आग्रह धरतील व मग बौद्धमतहि प्रमाण मानावें लागेल. म्हणून त्यांत सुधारणा करून असें मत प्रचलित झालें कीं, पुरुषांचे प्रमाद, आळस, ज्ञात्या पुरुषांचा मृत्यु, इत्यादि कारणांमुळें कांहीं श्रुति नष्ट झाल्या, अर्थात् स्मृतींत सांगितलेल्या आचारांना त्या प्रलीन श्रुति प्रमाण होत असें अनुमान केलें पाहिजे ' ( तेन वरं प्रलीनश्रुत्यनुमानमेव प्रमादालस्यादिभिः पुरुषक्षयाच्चाल्पविषयत्वम् । तंत्रवार्तिक) हा उच्छिन्नवाद होय. पण यावरहि आक्षेप आल्यामुळें तिसरें मत निघालें कीं, ' स्मृतींना विद्यमान श्रुतींचाच आधार आहे. ' पण मग त्या कोठें आढळत नाहींत कशा ? असा प्रश्न येईल, त्याला उत्तर असें कीं ' वेदशाखा अनंत असून त्या सर्वत्र पसरल्या आहेत, त्यांत प्रकरणेंहि अनेक असतात, आणि माणसें तर स्खलनशील, त्यामुळें साऱ्या स्मृतींचें मूळ हुडकून काढणें कठीण जातें, पण खरोखर त्यांना (स्मृतींना) श्रुतींचें मूळ आहे' (विद्यमानशाखागतश्रुतिमूलत्वमेवास्तु। कथमनुपलब्धिरिति चेत् । शाखानां विप्रकीर्णत्वात्पुरुषाणां प्रमादतः । नानाप्रकरणस्थत्वात् स्मृतेर्मूलं न दृश्यते । तंत्रवार्तिक ). पण यावरहि अशी शंका कोणी काढिली कीं स्मृतिकारांनीं आपले शब्दच कां तींत घातले, प्रत्यक्ष वेदवाक्येंच कां नाहीं त्यांत गोविलीं ? तेव्हां याला उत्तर म्हणून चवथें मत प्रसृत करण्यांत आलें, तें असें कीं, ' तशी वेदवाक्येंच स्मृतींत उतरून घेतलीं असतीं तर संप्रदाय नष्ट होण्याची भीति होती ( संप्रदायविनाशभीतेः । ' ). मन्वादिक स्मृतिकार झाले तरी ते कांहीं सगळ्या शास्त्रांचें अध्ययन करणारे नव्हते; त्यांनीं अन्यशाखांचें अध्ययन करणाऱ्यांकडून प्रयत्नानें त्या ऐकून त्यांतील अर्थ घेतला आणि तो विसरूं नये म्हणून आपल्या स्वतःच्या शब्दांनीं ग्रथित करून ठेविला ! ( न चावश्यं मन्वादयः सर्व शाखाध्यायिनः । ते हि प्रयत्नेन शाखान्तराध्यायिभ्य' श्रुत्वा अर्थमात्र स्ववाक्यैरविस्मरणार्थे निबध्नीयुः । तंत्रवार्तिक ). पण स्वतः मनु मात्र स्वतःला सर्वज्ञानी म्हणवितो व त्यानें सांगितलेल्या सर्व गोष्टी

वेदांत सांगितल्या आहेत असें म्हणतो ( यः कश्चित्कस्यचिद्धर्मो मनुना परिकीर्तितः। स सर्वोऽभिहितो वेदे सर्वज्ञानमयो हि सः॥ मनु २,७ ). हेंहि कुमारिलभट्टांचें मत सर्वांना कबूल नाहीं. विद्यमान शाखांतच स्मृतींचीं मुळें दडलेलीं आहेत असें म्हणणाऱ्यांना असा प्रश्न विचारण्यांत येईल कीं आतां हजारों वर्षें झालीं व हजारों ग्रंथकार झाले तरी तीं मूलभूत श्रुतिवचनें सांपडत कां नाहींत. याशिवाय, भार्या ही मनुष्याचें अर्ध होय ( अर्धं भार्या मनुष्यस्य ), पुत्र हा स्वतःसारखाच होय [ आत्मा वै पुत्रनामासि ], कन्या ही पुत्रासारखीच आहे ( यथा पुत्रस्तथा हि सा ) इत्यादि दुसऱ्याहि अनेक कल्पना धर्मशास्त्रांत सांगितलेल्या गोष्टींच्या बुडाशीं आहेत. पण त्या सर्वांचा विचार करण्याचें प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें कारण नाहीं व तितकी सवडही नाहीं.

आतां मुख्य विषय संपला. व्याख्यानमाला चालू करतांना जी विषययोजना आंखली होती, ती पुरी झाली. धर्मशास्त्राचा हा इतिहास पाहतां या पुढें पांच पन्नास वर्षांत काय केलें पाहिजे हें जागोजाग सांगितलें आहे, पण परिस्थिति काय उत्पन्न झाली आहे आणि मूळतत्त्व न सोडतां आचार व विचार यांत काय परिवर्तन करावें या गोष्टींचा सामान्यपणें थोडा गंभीर विचार करणें अवश्य आहे. तो आतां पुढील दोन व्याख्यानांत करून एकंदर विषयाचा व व्याख्यानमालेचा उपसंहार करूं.

# व्याख्यानमालेचा समारोप

आरंभीं संकल्प केल्याप्रमाणें येथपर्यंत धर्म म्हणजे काय, धर्माचें मूळ कोणतें, श्रुति स्मृति सदाचार यांचा संबंध, जातिसंस्थेचा इतिहास, संस्कार, विवाह, मिश्रजाति व जातिव्यवस्था, अस्पृश्यता, आश्रम, पतितपरावर्तन वगैरे धर्मशास्त्रांतील महत्वाच्या विषयांचें निरूपण केलें. त्या त्या विषयांचें विवेचन करीत असतांना आधुनिक परिस्थितीला अनुसरून पुढील जवळच्या काळांत आचारांचें परिवर्तन कसें झालें पाहिजे याबद्दलची माझीं मतें वेळोवेळीं प्रदर्शित केलीं आहेत ( पृष्ठें ३४, ३६, ५०, ८५, ९८, ९९, १४०, १५५–५६, १७३, १९०, २०८–२०९ )

आतां आपल्या समाजाच्या धार्मिक आचारांची व मतांची पुनर्घटना करितांना सर्व सामान्य धोरण काय राखलें पाहिजे आणि आपल्या धर्माला कोणकोणत्या परिस्थितीशीं झगडावयाचें आहे व त्यांतून आपलें स्वत्व आणि आपल्या संस्कृतीचीं मुख्य तत्वें न गमावतां कशा रीतीनें मार्ग आक्रमण केला पाहिजे याचें सामान्य विवेचन करावयाचें आहे. पण तें करण्यापूर्वी आपला समाज व आपले धार्मिक आचार याबद्दल माझी काय भूमिका आहे हें प्रथम सांगितलें पाहिजे.

## आमची भूमिका

आपल्या समाजाची जी हल्लींची स्थिति आहे ती सुधारण्यासाठीं क्रांति किंवा बंड करणें आवश्यक आहे अशी भाषा आपणांला ऐकूं येते व तशी भाषा कोणालाही आणि मलाही उपयोगांत आणतां येईल. परन्तु ती भाषा आम्हांला वापरावयाची नाहीं. समाजांतून फुटून निघून आपला स्वतंत्र सुभा स्थापून इष्ट परिणाम घडवून आणतां येईल असें माझें मत नाहीं. त्याचप्रमाणें एखाद्या हिटलर किंवा मुसोलिनीप्रमाणें धार्मिक व सामाजिक चालीरीतींचें व मतांचें परिवर्तन करण्याकरितां अनियन्त्रित सत्ता कोणा व्यक्तीला किंवा पक्षाला जवळच्या काळांत तरी प्राप्त होईल असें वाटत नाहीं. तेव्हां ह्या परिस्थितींत समाजांतच राहून समाजांतील शिक्षित व विचारी मनुष्यांच्या सदसद्विवेकबुद्धीला पटेल असा युक्तिवाद करणें एवढाच मार्ग उरतो व त्याचाच अवलंब पुढील विवेचनांत करावयाचा आहे. अर्थात् या विचाराला क्रान्तिवादी (रा. तात्याराव सावरकरांसारखे ) अधवट लोकांची विचारसरणी म्हणतील हें मी जाणून आहें.

## सनातनपक्षाची भूमिका

व्याख्यानमालेच्या प्रारंभीं ( पान २ ) सनातन म्हणविणारा एकपक्ष सांगितला. वेद हे अपौरुषेय आहेत, स्मृति या वेदतुल्य आहेत, आपल्या आचारविचारांत परिवर्तन झालें नाहीं, हल्लींची जातिसंस्था, अस्पृश्यता, स्त्रियांची स्थिति, बालविवाह वगैरे जे

आधुनिक शिक्षितांनीं विवादास्पद म्हणून विषय उपस्थित केले आहेत त्यांसंबंधानें आमच्या प्राचीन ऋषींनीं व निबन्धकारांनीं घालून दिलेलेच नियम रूढि म्हणून पाळण्यांत येत आहेत, त्यांत बदल करण्याचा कोणाला अधिकार नाहीं असें सनातनपक्षाचें म्हणणें आहे. आचारांत परिवर्तन कसें झालें हें जागोजाग पूर्वींच्या व्याख्यानांत ( पृष्ठे ३२, ३४, ३७–३८, १५२ इत्यादि ) मी दाखविलें आहे. आचारांत परिवर्तन झालें नाहीं हें या पक्षाचें म्हणणें अभिमानाचें असून ऐतिहासिक दृष्ट्या सत्य नाहीं असें माझें मत आहे व तें जागोजाग दाखविलें आहे. म्हणून येथें पुनरुक्ति करीत नाहीं. आतां आचारांत परिवर्तन करण्याचा आधुनिकांना अधिकार नाहीं याचा विचार करावयाचा. मला हें मान्य आहे कीं, एका व्यक्तीला किंवा पांच दहा व्यक्तींना एखादी गोष्ट मान्य नाहीं म्हणून त्यांनीं पाहिजे तसें वर्तन करावें, इतरांनीं त्यांना दोष देऊं नये व इतरांना दोष देण्याचा अधिकार नाहीं हेंहि मत मला मान्य नाहीं. आचाराचें परिवर्तन एखाद्या किंवा पांच दहा व्यक्तींच्या सोयीसाठीं किंवा सुखासाठीं करावयाचें नाहीं. समाजातील बऱ्याच मोठ्या भागाला एखादा आचार नापसंत झाला व तो आचार पाळणें बहुतेक अशक्य झालें तरी तो आचार धर्म्य व तादितर नित्य आचरण्यांत येणारा आचार अधर्म्य ही कल्पना नष्ट झाली पाहिजे. धर्म्य म्हणून एक म्हणावयाचें व ज्यांनी तसें म्हणावयाचें त्यांनीं त्याचें मुळींच आचरण करावयाचें नाहीं किंवा त्याच्या उलटच आचरण करावयाचें अशी दांभिकपणाची स्थिति होऊं नये म्हणून देशकालपरिस्थित्यनुरूप करण्यात येत असलेलें बहुजनसमाजाच्या आचाराचें परिवर्तन हें अधर्म्य नाहीं असें तरी स्पष्ट म्हणा असा सनातन म्हणविणाऱ्या पक्षाशीं आमचा आग्रह आहे. असें म्हणण्याचा त्या त्या काळच्या विद्वानाना व विद्वत्परिषदेला अधिकार आहे व तो त्यांनीं प्राचीनकाळीं बजाविला आहे. कोणीहे झाले तरी ध्येय व तें ध्येय धारण करणाऱ्या लोकांचें आचरण यांत अंतर असतें हें कबूल आहे. परन्तु ध्येय ( विशेषतः व्यक्तीनें मानलेलें ध्येय ) व त्याची कृति यांत दोन ध्रुवांइतकें अन्तर असतां कामा नये. तर व्यक्तीची कृति त्याच्या ध्येयाला साजेल अशी किंवा निदान त्याच्याजवळ जवळ तरी येत असली पाहिजे तरच ध्येय म्हणून एखाद्या गोष्टीचा उपदेश त्या व्यक्तीनें करावा असें विवेकवादी पक्षाला वाटतें. उदाहरणार्थ, काशीच्या विद्वत्परिषदेनें ऋतुप्राप्तीनंतर कन्येचा विवाह झाला तर ती वृषली होते, तिला व तिच्या नवऱ्याला दोष आहे व तो प्रायश्चित्ताशिवाय दूर होत नाहीं असा ठराव केला; पण ह्या ठरावाचे विरुद्ध ठराव करणारापैकीं बहुतेक प्रत्येकाचे घरांत स्थिति उत्पन्न झाली आहे. तेव्हां या ठरावाची किंमत काय तें कळत नाही. सबब आमच्या मतें विद्वत्परिषदेनें असा ठराव करावयास पाहिजे होता कीं कन्येचा विवाह अमुकच वर्षी करावा अशी श्रुतिस्मृतींची आज्ञा नाहीं, गुणवान वर मिळेल तरच विवाह करावा अशीच स्मृतींची आज्ञा आहे म्हणून ऋतुप्राप्तीनंतरहि झालेले विवाह अधर्म्य

नाहींत व तशा विवाहामुळें कोणासच दोष लागत नाहीं. सनातनी पक्षांत पुनः दोन प्रकारचे लोक आहेत. एका वर्गाचा भर वेद, प्राचीन स्मृति, निबन्धकार व मीमांसा-पद्धति यांवर आहे. त्यांचें म्हणणें मनु, याज्ञवल्क्य, मिताक्षरा, धर्मसिन्धु इत्यादि-कांनीं अमुक आचार सांगितले म्हणून आम्ही ते पाळतों व मीमांसापद्धतीनें मिताक्षरा-धर्मसिन्धुकारादिकांचीं मतेंच बरोबर आहेत असें आम्हांला वाटतें. या वर्गाच्या लोकांना वरील व्याख्यानांत वेळोवेळीं उत्तरें दिलीं आहेत. मनु याज्ञवल्क्यांचीं मतें ( अनु-लोम विवाह, भिन्न भिन्न जातींचे एकमेकांकडे भोजन ) हे सनातनी मानीत नाहींत हें स्पष्ट केलेंच आहे. त्याचप्रमाणें मीमांसापद्धति म्हणजे काय याचेंही दिग्दर्शन केलें आहे.

## वेदप्रामाण्याची चर्चा

सनातनी ह्मणविणारे लोक वेद अपौरुषेय आहेत व स्मृति वेदतुल्य आहेत इत्यादि विधानें करितात तेव्हां त्यासंबंधानेंही चार शब्द सांगणें आवश्यक आहे. वेद अपौरुषेय आहेत असें ह्मटल्यानें हल्लींच्या विवादास्पद झालेल्या प्रश्नांचा निकाल लागत नाहींत. ‘ अस्य महतो भूतस्य निःश्वसितमेतद्यदृग्वेदो यजुर्वेदः ’ असें जरी बृहदारण्यकोपनिषदांत ( २·४·१० व ५·५·११ ) ह्मटलें असलें तरी मुण्डकोपनिष-दांत ऋग्वेद यजुर्वेद इत्यादि वेदांना गौणपद देण्यांत आलें व त्यांना अपरा ( कनिष्ठ ) विद्या असें म्हणून जिच्यामुळें अक्षराचें ज्ञान होतें ती परा विद्या असें स्पष्ट सांगण्यांत आलें (तत्रापरा ऋग्वेदो यजुर्वेदः...ज्योतिषमिति अथ परा यया तदक्षरमधिगम्यते। मुण्डक १. १·५ ). म्हणजे अपौरुषेय मानलेल्या वेदांतच श्रेष्ठ कनिष्ठ भाग आहेत. इतकेंच नव्हे तर ज्या मीमांसकांनी वेदाचा कोणी स्वतन्त्र कर्ता आहे अशी माहिती नसल्यामुळें व इतर कारणांनीं वेदाला नित्य व अपौरुषेय म्हटलें त्यांनींच आपल्या बुद्धिसामर्थ्यानें व तर्कानें वेदांतच विधि व अर्थवाद असे भाग काल्पून वेदांतील अत्यंत मोठया भागाला बहुतेक निरुपयोगी ठरवून टाकलें. अपौरुषेय व नित्य अशा वेदांत परस्पर विरोधी वचनें मिळालीं तर क्वचित् विकल्प मानीत किंवा एक ग्राह्य धरून दुसरें मानी-तच नाहींत अशीं उदाहरणें अनेक आहेत. उदाहरणार्थ, तैत्तिरीय संहितेंत ‘ मनूनें आपल्या पुत्रांना दाय वाटून दिला ’ ( मनुः पुत्रेभ्यो दायं व्यभजत् ) असें सांगितलें आहे व त्याच संहितेंत ( २·५·२·७ ) ‘ म्हणून ज्येष्ठ पुत्राला धन देऊन त्याला (इतर पुत्रांहून ) पृथक् रीतीनें वागवतात ’ असेंही म्हटलें आहे (तस्मात् जेष्ठ पुत्रं धनेन निर-वसाययन्ति ).हीं दोन्ही वाक्यें अर्थवाद आहेत. यापैकीं पहिलें वाक्य बरोबर आहे असें धरून ज्येष्ठ पुत्राला सर्व द्रव्य देणें शास्त्रविरुद्ध आहे असें आपस्तम्बधर्मसूत्रांत प्रति-पादन केलेलें आहे ( ज्येष्ठो दायाद इत्येके तच्छास्त्रैर्विप्रातिषिद्धम् । मनुः पुत्रेभ्यो दायं व्यभजदित्यविशेषेण श्रूयते । अथापि तस्माज्जेष्ठं पुत्रं धनेन निरवसायन्तीत्येकव-

च्छ्रूयते । आप. ध. सू. २·६·१४.६ व १०-१२ ). म्हणजे आपस्तम्बानें एक श्रुति-वचन झुगारून देऊन दुसरें ग्राह्य धरिलें. महाभारत काळीं सुद्धां वेदवचनें प्रमाण धरून धर्मनिर्णय करणें कठीण झालें होतें, हे यक्षप्रश्नांत युधिष्ठिरानें स्पष्ट सांगितलें आहे. ‘ तर्क हा निश्चित नाहीं, वेद हे भिन्न भिन्न धर्म सांगतात, असा कोणताही एक मुनि नाहीं कीं ज्याचें मत प्रमाण आहे; धर्माचें तत्व हें अत्यंत गूढ आहे म्हणून कोणता तरी मोठा पुरुष जो मार्ग सांगेल तोच अनुसरण्यास योग्य असा समजावा ( तर्कोऽप्रतिष्ठः श्रुतयो विभिन्ना नैको मुनिर्यस्य मतं प्रमाणम् । धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पन्थाः ॥ वनपर्व ३१३·११७ ). वेदाचें नित्यत्व व अपौरुषेयत्व प्राचीनकाळीं सुद्धां सर्व आचार्यांना मान्य नव्हतें. पतञ्जलीनें आपल्या व्याकरणमहाभाष्यांत ( कीलहॉर्न प्रत व्हा. २ पान ३१५—‘ तेन प्रोक्तम् ’ या सूत्रावरील वार्तिक ‘ छन्दोर्थमिति चेनुल्यम् ’ ) स्पष्ट सांगितलें आहे कीं, ‘ जरी वेदांचा अर्थ नित्य असला तरी जी वर्णानुपूर्वी ( म्हणजे वेदांतील शब्दांचा विशिष्ट क्रम) ती अनित्य आहे ( यद्यप्यर्थो नित्यो या त्वसौ वर्णानुपूर्वी सा त्वनित्या ). उदयनाचार्यासारख्या तार्किकांनीं वेद अपौरुषेय नाहींत व नित्यही नाहींत असें प्रतिपादन केलें आहे. याप्रमाणें प्राचीनकालीं सुद्धां जें मत सर्वसंमत नव्हतें तें आजचे शिक्षितांनीं मानावें असा आग्रह कोणी धरिला तरी त्याचा उपयोग होणार नाहीं. मीमांसकांनीं दिलेल्या वेदाच्या अपौरुषेयत्वाच्या व नित्यत्वाच्या कारणांनीं मीमांसकांनीं आपलें समाधान करून घेतलें असेल, पण तें जसें इतर लोकांना त्यावेळीं पटलें नव्हतें त्याचप्रमाणें आजहि आम्हांला तें पटत नाहीं. तोंडानें वेद अपौरुषेय म्हणून आपल्या बुद्धीनें आपल्याला सोयस्कर असेल असा त्यांचा अर्थ लावणें किंवा सोयस्कर नसेल तेव्हां त्यांतील वचनें सोडून देणें, यांत दाम्भिकपणा असून त्यांत वेदांची शोभा रहात नाहीं, अप्रामाणिकपणा वाढतो; त्यापेक्षां वेद हें अत्यंत प्राचीन आहेत, सामर्थ्यवान् ऋषींनीं केलेले आहेत म्हणून पूज्य आहेत, पण अपौरुषेय नाहींत असें स्पष्ट म्हणण्यांत प्रामाणिकपणा आहे असें वाटतें. एका विद्वान् वक्त्यांनीं नुकतेंच सांगितलें कीं, वेद पौरुषेय आहेत असें म्हणण्यासाठीं कांहीं मोठया अकलेची जरूर नाहीं, तें कोणीही म्हणूं शकेल. पण ते अपौरुषेय म्हणणेंच जास्त योग्य व तसें म्हणणारांचा आशय असा असतो कीं, बौद्ध, खिस्ती, महंमदी ह्या धर्माप्रमाणें वेद हे एकाच मनुष्याच्या डोक्यांतून निघालेले नाहींत, तर ते अनेक ऋषींना स्फुरले. याच अर्थानें जर वेदांना अपौरुषेय म्हणावयाचें असेल तर महाभारतासारखे प्रचण्ड ग्रंथही अपौरुषेय कां ह्मणूं नये तें समजत नाहीं; किंवा स्फुरणमात्रेंकरून जर ग्रंथाला अपौरुषेयत्व येत असेल तर कालिदासादिकवींचीं काव्येंहि अपौरुषेय कां म्हणूं नयेत ? वेदाला अपौरुषेय म्हणून पुनः त्याचे वाभाडे ग्रंथकारांनीं आपल्या बुद्धीनें कसे काढिले आहेत याचीं उदाहरणें पूर्वीच्या व्याख्यानांत आली आहेत. पुनः एक उदाहरण घेऊन हें स्पष्ट

करितो. मामेबहिणीशीं लग्न करणें ह्या असदाचार आहे असें आपस्तम्बधर्मसूत्र ( १·७·२१·८ ), बौधायन धर्मसूत्र ( १·१·२४ ), मनुस्मृति ( ११,१७१–१७२ ) इत्यादि धर्म ग्रंथांनीं सांगितलें आहे. पण तो आचार रूढ व मान्य असल्या-मुळें कांहीं ग्रन्थकारांनीं ' आयाहीन्द्र पथिभिरीळितेभिर्यज्ञमिमं नो भागधेयं जुषस्व । तृप्तां जहुर्मातुलस्येव योषा भागस्ते पैतृष्वसयी वपामिव ॥ ' ह्या खिलसूक्तांतील मंत्र आधारासाठीं घेतला. ( ह्या मंत्र मॅक्समूलराच्या ऋग्वेदाच्या चार व्हाल्यूम प्रतींत शेवटच्या व्हाल्यूमच्या शेवटीं १४ व्या खिलसूक्तांतील ६ वा आहे ). या मंत्रावरून मातुलसुतापरिणयन सदाचार आहे असें पराशर स्मृतीवरील टीकेंत माधवाचार्यांनीं ह्मटलें आहे. × पण त्याच माधवाचार्यांच्या नांवावर मोडणाऱ्या जैमिनीयन्यायमालाविस्तार या ग्रंथांत तो अनाचार ठरविला आहे. अपरार्कानें तर तोच मंत्र जरा निराळ्या रीतीनें पठित करून त्यांतून मातुलसुतापरिणयनाचा निषेधच निष्कर्ष ह्मणून काढला आहे ( अपरार्क पान ८३ ). ह्मणून वेदासंबन्धानें आमची भावना अशी कीं वेद हे पौरुषेय आहेत, ते हल्लींच्या सर्व जगांतील उपलब्ध वाङ्मयांत अत्यंत प्राचीन आहेत, त्याच्यापासून सर्व वेदांगें, सर्व स्मृति, सर्व शास्त्रें प्रसृत झालीं. आपल्या समाजाची आचारविचारादि बाबतींतील स्थित्यन्तरें पहाण्याचें वेद हें एक अत्यन्त उपयुक्त साधन म्हणून ते पूज्य आहेत. परन्तु आज जे विवादास्पद किंवा संशय उत्पन्न करणारे प्रश्न निघाले आहेत त्यांचा निर्णय करण्याचे कामीं त्यांचा तादृश उपयोग नाहीं. प्राचीन स्मृतिकारांनीं वेदांतील आचार गुंडाळून ठेऊन परिस्थित्यनुरूप नवीन आचार प्रवृत्त केले. तीच प्रणाली जरूर पडल्यास आम्हाला चालविणें भाग आहे.

---

× पराशरमाधवीय

' मातुलसुताविवाहस्यानुग्राहकाः श्रुत्यादयः । तत्र मन्त्रवर्गः आयाहीन्द्र॰'. या मंत्राचा अर्थः—

हे इन्द्रा, स्तुत्य अशा मार्गांनीं आमच्या ह्या यज्ञाप्रत ये, आम्ही जो हविर्भाग देतों तो सेवन कर, तुझ्यासाठीं आज्यानें संस्कृत केलेली वपा हवि म्हणून दिलेली आहे, ज्या प्रमाणें मातुलाची कन्या ही ( विवाहांत ) भाग होते किंवा बापाच्या बहिणीची कन्या ( विवाहांत भाग होते ) त्याप्रमाणें ( ती वपा तुझा भाग ) आहे.

जैमिनीयन्यायमालाविस्तार ( आनन्दाश्रम प्रत पान ३२ पूर्वमीमांसा १·३·८–९ या सूत्रांवर ). या ठिकाणीं इतकें म्हणतां येईल कीं माधवाचार्यांनीं तें स्वतःचें मत म्हणून दिलें नाहीं तर कुमारिलभट्टांचे मताप्रमाणें या दोन सूत्रांचा विषय काय ते सांगून त्यांचेंच मत सिद्धान्त म्हणून दिलें आहे. माधवाचार्यांच्या मतानें या दोन सूत्रांचा विषय भिन्न म्हणजे यववराहादि शब्दांच्या अर्थाबद्दल आहे.

आतां स्मृतीकारांविषयीं म्हटलें तर त्यांच्या ग्रंथांना वेदांइतकेंही प्रामाण्य नाहीं. स्मृति ऐतिहासिक काळांत भिन्न भिन्न आचार्यांनीं लिहिल्या, त्यांची संख्या फार मोठी आहे, त्यांच्या वचनांचा नुसता कीस काढून आजच्या स्थितींत आम्हांला हिंदु म्हणून जगून जयिष्णु व वर्धिष्णु व्हावयाचें असेल तर भागणार नाहीं. ज्या मनूची आपण ' सर्वज्ञानमयो हि सः ' अशी स्तुति एका तोंडानें करणार त्यानेंच अनुमत केलेले अनुलोमविवाह, त्रैवर्णिकान्नव्यवहार आपण आज अधर्म ठरवीत आहों. तरी मग अन्य बाबतींत आपल्या बुद्धीचा उपयोग करून आपण योग्य तें कां ठरवूं नये याचीं कारणें सनातनी म्हणविणारे देत नाहींत. जी स्मृतींची स्थिति तीच पुराणांची. पुराणें तर स्मृतींहूनहि कमी प्रमाण निबन्धकारांनींच मानलीं आहेत. निबन्धग्रन्थ ( मिताक्षरा, निर्णयसिन्धु, धर्मसिन्धु इत्यादि ) हे तर निवळ विद्वानांचे ग्रन्थ. त्याना स्वतंत्र प्रामाण्य नाहीं. त्यांचें प्रामाण्य फार तर ' विचारविधया ' ( विद्वानांचे ग्रंथ विचारांत घ्यावे ) इतक्यापुरतेंच आहे. म्हणून आजच्या धर्मशास्त्राचा अभ्यास केलेल्या, परिस्थिति जाणणाऱ्या व परिस्थित्यनुरूप सार्वजनिक आचारात ( एका व्यक्तीच्या सोयीसाठीं नव्हे ) काय परिवर्तन केलें पाहिजे हें समजणाऱ्या विद्वानाना नवीन आचार प्रवृत्त करणें किंवा प्रवृत्त झालेले अधर्म्य नाहींत असें सांगणें या दोन्ही बाबतींत अधिकार आहे असें विवेकवादी किंवा तत्ववादी पक्षाचें म्हणणें आहे. ह्या पक्षाचें असें म्हणणें नाहीं कीं श्रुतिस्मृतिसदाचार पार झुगारून देऊन प्रत्येक व्यक्तीनें आपल्या बुद्धीला वाटेल तसें आचरण करावें. असें झाल्यास अनवस्था माजेल. व्यक्तिमात्राला प्रत्येक बाबतींत साधक बाधक गोष्टी पाहून निश्चित मत ठरविण्याची बुद्धि नसते व वेळहि नसतो आणि अनुकूलताहि नसते. म्हणून वर सांगितल्याप्रमाणें प्राचीन धर्मशास्त्रांचा अभ्यास ज्यांनीं केला आहे, ज्यांना आपल्या संस्कृतीचा अभिमान असेल, ज्यांना केवळ वैयक्तिक फायद्यासाठीं किंवा सुखासाठींच एखाद्या विशिष्ट आचाराची तरफदारी करावयाची नाहीं तर समाजाचें धारण व कल्याण व्हावें याच केवळ इच्छेनें जे प्रवृत्त झाले असतील अशा सद्वृत्त विद्वांनांनीं उपदेशिलेला व आचरिलेला जो तो धर्म असें सर्वसाधारण लोकांनीं समजावें. ज्या मनूला रूढ्यभिमानी वारंवार आपला सर्व आधार म्हणून पुढें करितात त्यानें तरी हेंच सांगितलें आहे ( विद्वद्भिः सेवितः सद्भिर्नित्यमद्वेषरागिभिः । हृदयेनाभ्यनुज्ञातो यो धर्मस्तं निबोधत ॥ मनु. २ १ ). हजारों वर्षे अनेक प्रकारच्या युक्त्या करून व क्लेश सोसून जें वैदिक वाङ्मय आमच्या पूर्वजांनीं जतन केलें, ज्या वाङ्मयाच्या अभ्यासानें पाश्चात्य पंडितांनीं तुलनात्मक भाषाशास्त्र, तौलनिक धर्म व तत्वज्ञान इत्यादि शास्त्रांचा पाया घातला ते ग्रंथ टाकून सर्वच नवी विटी नवें राज्य स्थापा असें म्हणणाऱ्यांपैकीं आम्हीं नाहीं. आमच्या परंपरेचा 'Tradition ' जरूर अभ्यास केला पाहिजे, तिच्याच पायावर आह्मांला पुढील इमारत बांधावयाची आहे; परंतु आमचें म्हणणें इतकेंच आहे कीं आपली परंपरा व संस्कृति यांतील आत्मभूत

तत्वें ( essentials ) कोणतीं व यांच्यावर बांडगुळाप्रमाणें वाढलेल्या गोष्टी कोणत्या यांचा अभ्यास करा, वैदिकवाङ्मय व धर्मशास्त्र यांचा डोळे उघडे ठेऊन विचार करा, नुसतें सनातन सनातन धर्म म्हणून आत्मविरहित किंवा मुमुर्षु अशा शरीराला कवटाळून बसूं नका.

## आपल्यापुढील प्रश्न

आपल्या धर्माचीं प्रमुख किंवा आवश्यक तत्वें कोणतीं, हल्लींच्या पारीस्थितींत त्यांतील कोणतीं तत्वें आचारांत आणणें शक्य व आवश्यक आणि कोणत्या विचारांत व आचारांत परिवर्तन करणें आवश्यक हें ठरवितांना पुढील एकदोन पिढयांत राजकीय, सामाजिक व इतर मतामतांचा आपल्या धर्मावर, आपल्या हिंदुसमाजावर काय परिणाम होईल हेंहि धर्मनिर्णय करणारांस पहाणें अत्यंत जरूर आहे. कांहीं सनातनी म्हणविणारांचें तोंडून ऐकिलें आहे व लेखांतही दिसून येतें कीं आपल्या देशांत स्वराज्य झालें नाहीं तरी त्यांना चालेल! परंतु त्यांच्या मतानें जे सनातन म्हणून आचार व मतें आहेत त्यांत यत्किंचितहि फरक करण्याची भाषा त्यांना खपत नाहीं. तेव्हां या संबन्धानेंहि माझें मत थोडक्यांत दर्शीत करणें आवश्यक आहे असें वाटतें

## लोकशाही स्वराज्यच पाहिजे.

आपल्या भरतखण्डांत लोकशाही स्वराज्य प्राप्त व्हावें असें मला मनापासून वाटतें. मग काँग्रेसनें ठरविल्याप्रमाणें तें पूर्ण स्वातन्त्र्याच्या स्वरूपाचें असो किंवा आपल्याला ‘ लिबरल ’ म्हणविणाऱ्या पक्षाच्या ब्रीद वाक्याप्रमाणें ब्रिटिश साम्राज्यान्तर्गत वसाहतीचें स्वराज्य ( dominion status ) असो. हिंदुस्थानांत आज असलेल्या कोणत्याही संस्थानिकांच्या किंवा त्यांच्या वंशजांच्या अमलाखालीं जाण्याला किंवा रहाण्याला ब्रिटीश हिंदुस्थानांतील लोक कबूल होणार नाहींत. त्याचप्रमाणें इंग्रजांच्या अनियंत्रित सत्तेखालीं अनंतकाळपर्यंत राहाण्याचें कोणासही मान्य नाहीं. मग या आपल्या देशांत जें स्वायत्त राज्य स्थापन होईल किंवा व्हावें असें आपल्याला वाटतें त्याचें स्वरूप लोकशाही ( democracy ) हेंच असलें पाहिजे. अर्थात् ही लोकशाही कोणत्या वळणावर जाईल, हें सांगणें आज बहुतेक अशक्य आहे. एखाद्या विवक्षितवर्गाचें किंवा जातीचें हित हें लोकशाहीचें तत्त्व नाहीं. सर्व राष्ट्राचें कल्याण हेंच लोकशाहीचें ध्येय. लोकशाहींत लोकनायक एखाद्या विवक्षित वर्गालाच जबाबदार नसून सर्व राष्ट्राला जबाबदार असले पाहिजेत, लोकनायकांनीं ( leaders ) लोकमतानुवर्ती न होतां राष्ट्राला योग्यमार्गानुवर्ती केलें पाहिजे, हीं लोकशाहीचीं मुख्य तत्त्वें आहेत. लोकशाहींत सर्व राष्ट्राचें सुख पहावयाचें असतें, व अशा राष्ट्रांत लोकशाही नको म्हणणारेहि असण्याचा संभव आहे. तर त्यांचेंहि सुख व हक्क यांना जपण्याची जबाबदारी लोकशाहीवर असते. लोकशाहीचा समतेवर विश्वास असतो. याचा अर्थ असा नव्हे कीं सर्व मनुष्यां-

च्या शक्ती सम असतात किंवा सर्व माणसें सर्वच बाबतींत सारख्याच योग्यतेचीं असलीं पाहिजेत. समतेचा अर्थ इतकाच कीं राष्ट्रांतील प्रत्येक माणसाला आपल्या अंगच्या गुणांचा उत्कर्ष करण्याची योग्य सन्धि मिळाली पाहिजे, आपणांवर कोणत्या कायद्यांचा अंमल चालावा हें ठरविण्याचा अधिकार असला पाहिजे व कोणताही कायदा किंवा निर्बन्ध बदलावा असें वाटेल तर त्याप्रमाणें मत देण्याचा हक्क पाहिजे. लोकशाहींतील समता याचा अर्थ कांहीं राजकीय बाबतींत व कांहीं सामाजिक बाबतींत (शिक्षणाच्या सोयी, रस्ते, सार्वजनिक इमारती वगैरे ) राष्ट्रांतील प्रत्येक व्यक्तीला समान सन्धि व हक्क असावे. लोकशाही हें एक ध्येय आहे. अजून पूर्ण लोकशाहीचें ध्येय जगांतील कोणत्याही राष्ट्राला प्राप्त झालें नाहीं. अमेरिकेनें इंग्लडशीं लढून स्वातन्त्र्य मिळविल्यावर मानवी हक्कांची ( Rights of man ) घोषणा केली पण त्याच घोषणेबरोबर गुलामगिरीही कायम ठेविली होती व गुलामगिरी नष्ट होण्यासाठीं नंतर सुमारें पाऊणशें वर्षांनीं आपसांत मोठी लढाई व्हावी लागली. इंग्लंड हें पार्लमेंटरी संस्थेचें व स्वातन्त्र्याचें माहेरघर आपण आहों असा टेंभा मिरवितें. परन्तु इंग्लिश जनतेला प्रत्येक हक्क राजसत्तेकडून झगडत झगडत मिळवावा लागला. जॉन सारख्या अरेरावी राजाकडून त्यावेळच्या सरंजामी सरदारांना मॅग्नाचार्टाहि मिळवावा लागला. पुढें राजसत्तेविरुद्ध व सरंजामी सत्तेविरुद्ध झगडून मध्यमवर्ग व व्यापारी वगैरे यांना हेबियस कॉर्पस ॲक्ट, बिल आफ राइट्स् वगैरे मध्यें ग्रथित केलेले हक्क मिळवावे लागले व पुढें १८३२ सालीं रिफॉर्म बिल येऊन आणखी मोठया जनतेला मतदानाचे हक्क मिळाले. इंग्लड आपल्या पुरतें स्वातन्त्र्याचें भोक्तें होतें याचा प्रत्यय गुलामाचा व्यापार अनेक वर्षे व अत्यंत वाईट रीतीनें चालवून त्यानें आणून दिलाच होता. असें असलें तरी लोकशाही शिवाय हिंदुस्थानला तरणोपाय नाहीं व लोकशाही हेंच आमचे ध्येय आहे, व असलें पाहिजे. लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांचा असा विश्वास असतो कीं, प्रत्येकानें आपआपलीं मतें वाद्कुशलतेनें, जोरानें व वारंवार जनतेपुढें प्रतिपादिलीं म्हणजे जर तीं मतें योग्य असतील तर अंतीं त्या मतांचा विजय होईल. म्हणजे खरा लोकशाहीचा जो पुरस्कर्ता असतो, त्याचा मनुष्यमात्राच्या सदसद्विवेकबुद्धीवर विश्वास असतो. विचारस्वातन्त्र्य, विवादस्वातन्त्र्य आणि कृतिस्वातन्त्र्य हीं लोकशाहींत सर्वांना मिळालीं पाहिजेत.

## लोकशाहीवरील आक्षेप

यावर कित्येक आक्षेप घेण्यासारखे आहेत. हल्लीं युरोपमध्येंच लोकशाहीचा अस्त झाल्यासारखा दिसतो. रशिया, इटली, जर्मनी वगैरे बलाढय व तुर्कस्थान, बल्गेरिया, झेकोस्लोवाकिया वगैरे मध्यम देशांतही लोकशाही लयास जाऊन डिक्टेटरशिप सुरू झाली आहे. लोकशाहीच्या विरुद्ध अनेक लोक अनेक आक्षेप घेतात. एक आक्षेप

असा कीं, आधुनिक काळीं राज्यतन्त्र इतकें बिकट व गुंतागुंतीचें झालें आहे कीं, सर्व साधारण लोकांना त्यांत कांहींच समजत नाहीं, सामान्य जनता अडाणी आहे, व त्यांना राजकीय बाबतींत विशेष उत्साहहि नाहीं. यामुळें लोकशाहीनें हल्लीं राज्य-शकट हांकणें अशक्य आहे. राज्यशकट हांकण्यासाठीं तज्ज्ञच (Experts) पाहिजेत. दुसरा आक्षेप असा कीं, असे तज्ज्ञ लोकशाहींत निवडणुकीसाठीं पुढें येत नाहींत, व त्यामुळें राज्यकारभार हांकणारांत अतज्ज्ञांचीच बहुतेक गर्दी होते. तिसरा आक्षेप असा कीं, लोकांच्या मतांमुळें निवडून आलेल्या लोकांना दूरदृष्टीनें खऱ्या लोकहिताच्या असणाऱ्या गोष्टी करितां येत नाहींत; कारण सामान्य लोक तात्पुरतें हित पहाणारे असतात, त्यांच्यामध्यें दूर दृष्टि नसते, आणि सामान्य लोकांच्या ( म्हणजे मतदारांच्या ) मताविरुद्ध निवडून आलेले लोक जाऊं लागल्यास त्यांना कोणी निवडून देणार नाहीं ही भीति असते म्हणून दूरवरच्या परिणामांकडे किंवा खऱ्या हिताकडे लक्ष न देतां मतदारांना आवडेल अशीं मतें प्रतिपादण्याकडे लोक-प्रतिनिधींची साहजिक प्रवृत्ति होते. या दोषामुळें लोकशाहीपेक्षा डिक्टेटरशिप जास्त चांगली असें प्रतिपादन हल्लीं होत आहे. डिक्टेटरमुळे देशात उत्साह व जोम वाढतो, ठरविलेला कार्यक्रम झपाट्यानें अमलांत येतो, सर्वाधिकारी ठरवील त्याप्रमाणें प्रगति होते इत्यादि कारणें देऊन सर्वाधिकाऱ्याचें समर्थन करण्यात येतें. लोकशाही विरुद्ध घेण्यात असलेले आक्षेप कांहीं अशीं खरे आहेत. परंतु ते दूर करण्याचा उपाय म्हणजे सर्वाधिकारी सुलतान निर्माण करणें हा नसून जनता सुबुद्ध व शिक्षित कशी होईल ते उपाय योजणें हाच आहे. सर्वाधिकारी असलेल्या देशांत कोणालाहि विवादस्वातंत्र्य नाहीं, सर्वाधिकाऱ्याविरुद्ध मत प्रदर्शित करणें म्हणजेच देशद्रोह अशी स्थिति आहे इतकेंच नव्हे तर सर्वाधिकाऱ्याच्या मताप्रमाणें सर्वांचीं एक जिनशी मतें तयार व्हावीं यासाठीं शिक्षण, वर्तमानपत्रें, सिनेमा इत्यादि अनेक द्वारानीं लोकमताला इष्ट तऱ्हेनें वांकविण्याचे प्रयत्न सारखे चाललेले आहेत. अशा सर्वाधिकारी असलेल्या राष्ट्राची स्थिति दीर्घ काळपर्यंत टिकण्यासारखी सुधारली आहे याला कांहीं पुरावा नाहीं. मनुष्यमात्राला अनि-यंत्रित सत्ता जितकी बिघडविते इतकें दुसरे कांहींच बिघडवीत नाहीं असें आजपर्यंतचा इतिहास सांगतो. ज्युलियस सीझर, क्रॉमवेल, नेपोलियन वगैरे सर्वाधिकारी पुरुष पुढें जनतेलाच नकोसे झाले. रशियन राज्यक्रान्तींत लेनिनच्या बरोबरीनें काम करणारा मोठा माणूस ट्रॉटस्की याला स्टालिन या सर्वाधिकाऱ्याशीं विरोध आल्यामुळें देशत्याग करून तोंड छपवून रहावें लागत आहे. मुसोलिनीचे हातांत सात प्रधानांचे अधिकार (Portfolio ) आहेत असें नुकतेंच प्रसिद्ध झालें आहे. विरुद्ध मत प्रतिपादन सर्वाधि-काऱ्यांना असह्य होतें, राष्ट्रांतील स्वतंत्र विचारशक्ति लुप्त होते, किंवा राष्ट्रांतच बंडाळी माजून सर्वाधिकाऱ्या मागून सर्वाधिकारी अशी परंपरा सुरू होते. यापेक्षां जास्त विवेचन करावें तर विषयान्तर होईल. सारांश आमचें राजकीय ध्येय लोकशाही हेंच आहे व असलें पाहिजे इतकेंच पुनः सांगावयाचें आहे.

# लोकशाही आणि धर्म

एकदां हें लोकशाहीचें तत्त्व मान्य केल्यावर त्या ध्येयाचें व तें साध्य करीत असतांना कराव्या लागणाऱ्या प्रयत्नांचे परिणाम आपल्या धार्मिक आचारांवर व विचारांवर झाल्याशिवाय रहाणें शक्य नाहीं. प्रत्येक वयांत आलेल्या मनुष्यास एक मत हें लोकशाहीचें अन्तिम तत्त्व आहे. त्याची पुरी अंमलबजावणी होण्यास जरी आपल्या देशांत फार काळ असला तरी नवीन होऊं घातलेल्या सुधारणांत सुद्धां अस्पृश्य म्हणून मानलेल्या जातींना पुणें करारप्रमाणें प्रतिनिधि निवडण्याचे हक्क प्राप्त होणार आहेत. यांचे प्रतिनिधि इतर सर्व प्रतिनिधींचे खांद्याला खांदा लावून कायदेमंडळांत बसणार. येथें तुम्ही अस्पृश्यजातीय आहा, आम्हांला स्पर्श करूं नका असें म्हणणें आतां शक्य नाहीं. इतकेंच नव्हे तर सर्वप्रकारच्या अधिकाराच्या जागा, प्राथमिक व दुय्यम शिक्षकांच्या जागा वगैरे अस्पृश्य मानलेल्या जातींतील लोकांना यथाप्रमाण मिळतीलच. याप्रमाणें ब्राह्मणेतर जातींचेही अनेक लोक शिक्षक म्हणून जिकडे तिकडे होणार. ब्राह्मण किंवा पांढरपेशा वर्गांतील लोकांचें वेदाध्ययन व वेदाध्यापन कोणी कदाचित काढून घेणार नाहीं. परंतु त्या अध्यापनापासून किती ब्राह्मणांचें पोट भरणार? त्याप्रमाणें याजन व प्रतिग्रह हीं केव्हांच संपुष्टांत आलीं आहेत. ब्राह्मण म्हणविणारांना व्यापार, शेती, शारीरिक श्रमाचे स्वतंत्र धंदे यांजकडे जास्त जास्त वळलें पाहिजे. पूर्वी क्षत्रिय लोक राजे सेनापति, सरदार, शिपाई वगैरे प्रजा रक्षणाचीं कामें करीत. परन्तु आता लष्करांत सर्व प्रकारच्या लोकांची भरती होत आहे व आणखी होत जाईल. तेव्हां पूर्वीच्या स्मृतिकारांनीं घालून दिलेलीं ब्राह्मणांचीं व क्षत्रियांचीं कर्मे त्या त्या काळीं सुद्धां जीं सर्व त्या त्या वर्णाच्या लोकांकडून होत नव्हतीं तीं यांचे पुढें जास्त जास्त प्रमाणांत सुटत जाणार. पूर्वी वर्णाश्रमधर्माचा व जातिधर्माचा अभिमान बाळगणारे राजे होते. आतांच्या होऊं घातलेल्या राज्यसत्तेंत वर्णाश्रमधर्माबद्दल व जातिधर्माबद्दल सत्ताधिकाऱ्यात प्रत्यक्ष विरोध नसला तरी उपेक्षाबुद्धि तरी असणारच. राजदण्डाशिवाय वर्णाश्रमधर्मांचें व जातिधर्मांचें प्रजेकडून यथास्थित परिपालन होत नाहीं असें मनूनेंच ( ७. १७, २४, ३५ ) सांगितलें आहे. अशा राजसत्तेच्या साहाय्याच्या अभावीं जातिनियमाचें परिपालन होणें अशक्यप्राय आहे. अलीकडच्या जातिसंस्थेंत चार पांच प्रमुख गोष्टी आहेत. जन्मानें जाति प्राप्त होते, कांहीं जातींचे लोक अस्पृश्य मानण्यांत येतात, प्रत्येक जातीनें करावयाचा कांहीं विशिष्ट धंदा किंवा धंदे होते, प्रत्येक जातीच्या मनुष्यानें कोणाच्या हातचें खावें प्यावें याबद्दल निर्बन्ध आहेत आणि प्रत्येक जातींतील किंवा उपजातींतीलहि मनुष्यानें विवाह कोणत्या स्त्रीशीं करावा याबद्दल अत्यंत कडक अशी मर्यादा आहे. यापैकीं अस्पृश्यता सार्वजनिक ठिकाणीं तरी आजहि बरीच गेली आहे व पुढच्या पिढींत बहुतेक साफ नाहींशी होणार. अत्यंत गलिच्छ मानलेल्या कांही धंद्यां खेरीज बाकीचा कोणताही धंदा कोणत्याही जातीचा

मनुष्य आजही बहुतेक करूं शकतो व यापुढें जितकी यांत्रिक व औद्योगीक वाढ होईल त्या मानानें करीत जाणार. भक्ष्याभक्ष्याचे नियमहि बरेच शिथिल झाले आहेत. जातिसंस्थेचा शेवटचा बाले किल्ला विवाहनिर्बंध हा आहे. जातिसंस्था कमी फार कडक-पणानें हजारों वर्षे आपल्या देशांत आहे. ती एकदम नाहींशी व्हावी असें जरी उतावळ्या लोकांना वाटलें तरी ती तशी एकदम नाहींशी होणें म्हणजे गुरुत्वाकर्ष-णासारख्या एखाद्या फार व्यापक अशा सृष्टिनियमांत फरक झाला तर जी स्थिति होईल त्यासारखी आपल्या समाजाची स्थिति होईल असें वाटणारे कोट्यवधि लोक आहेत. तेव्हां या बाबतींत तरी जरा दमानें घेतलें पाहिजे. विवाह ही संस्था त्यांत निगडित होणाऱ्या व्यक्तींच्या सुखासाठीं व समाजाचे धारणासाठीं आहे. परंपरागत संवई व मनावर झालेले परिणाम, शिक्षण, संस्कृति, देशविशेष व भाषाविशेष यांतील भिन्नता यामुळें कोणत्याही माणसानें उठावें, व कोणत्याही स्त्रीशीं लग्न करावें, त्यांत कांहीं हरकत नाहीं असें प्रतिपादन करणें आज तरी अव्य-वहार्य आहे असें मला वाटतें. विवाहाचे बाबतींत तरी पोटजाती नाहींशा करून विवाह-योग्य वर्गाचें क्षेत्र हळूहळू वाढविणें याखेरीज दुसऱ्या उपायाचा उपदेश आज तरी करण्याला आम्हीं तयार नाहीं, हें स्पष्ट सांगणें जरूर आहे. सनातनी म्हणविणारे कांहींच फरक नको, आमचें आहे तें सर्व उत्तम आहे, आम्हांला स्वराज्य मिळालें नाहीं तरी चालेल, पण आमच्या मतें जें सनातन आहे तें टिकलें पाहिजे असें एक बाजूला म्हणतात, तर याचे उलट दुसऱ्या टोंकाचे कांहीं नवमतवादी म्हणतात प्राचीनधर्म, सम-जुती, कल्पना सर्व टाकून द्या, प्रगतीसाठीं सर्व सोडलें पाहिजे. या दोन मतांचे मध्यें आम्हीं आहों. आम्हांला परिवर्तन पाहिजे आहे, परंतु आमचें चांगलें म्हणून असेल तेंही टाकून एकदम यक्षिणीच्या कांडीनें सर्व संस्थांची, विचारांची व आचारांची उलथापालथ करावी, असे आम्हीं उतावळे नाहीं. जसा अपरिवर्तनवाद्यांशीं आमचा विरोध आहे तसा उतावळ्या लोकांशींही विशेषतः शक्तीनें, बंडखोरीनें एकदम सर्व बदलून घ्यावें असें ज्यांचें म्हणणें आहे, त्यांच्याशींहि आमचा विरोध आहे. आमच्या समाजाचे व मताचें परिवर्तन होत असतां आमचें स्वत्वच स्वत्व गमावून आमची आम्हांस ओळखही राहूं नये असें व्हावें हें आम्हाला मान्य नाहीं. सध्यां आपले प्रयत्न अस्पृश्यता नाहींशीं करणें, आपल्या संस्कृतींतील शाश्वत स्वरूपाच्या अंगांचें ज्ञान सर्व समाजाला करून देऊन त्याबद्दल आदर सर्व समाजांत वाढविणें, पतितपरावर्तन, समुद्र-संयान, वेदोक्त इत्यादि बाबतींतील कडवी मतें सोडून वादाचीं बीजें होतील तितकीं कमी करणें, अनंत पोटजाति झाल्या आहेत त्या शक्य तितक्या लवकर नाहींशा करून निदान मोठमोठया जाती तेवढया रहातील इतकें तरी करणें हा आपणांपुढें पुढील पांच-पन्नास वर्षांचा कार्यक्रम असला पाहिजे. सनातनधर्माभिमानी म्हणविणारे हल्लींच्या

हजारों जाति, उपजाति, पोटजाति आहेत तशाच रहाव्या, अस्पृश्य मानलेले वर्गहि नेहमीं अस्पृश्य रहावे, उपजाति किंवा पोटजाति यांतहि विवाह होऊं नयेत, असें रूढीचें समर्थन व्याख्यानांतून व लेखांतून करितांना आढळतात. त्यांच्या पद्धतीची चर्चा अन्यत्र थोडक्यांत करणार आहें. परंतु नवीन पिढी अगदींच वहकून जाऊं नये, त्यांना आपल्या धर्माबद्दल, समाजाबद्दल, परंपरेबद्दल व संस्कृतीबद्दल आपलेपणा व आदर वाटावा, व सनातन म्हणविला जाणारा धर्म फक्त बोलण्यांतच ( व तोहि मोजक्या माणसांच्या ) अभिमानाचा विषय राहूं नये अशी जर इच्छा असेल तर सनातन म्हणविणारांनीं आपली ऐकान्तिक मतें सोडून देऊन, व्यवहारांत उतरलें पाहिजे. धर्म हा नुसता बोलण्याचा विषय नाहीं, मुख्यत्वें आचरण्याचा विषय आहे हें त्यांना उमजणें अवश्य आहे.

## समाजसत्तावाद आणि धर्म

ज्याप्रमाणें राजकीय परिस्थितीच्या परिणाम भविष्यकाळीं आमच्या धार्मिक व सामाजिक विचारांवर व आचारांवर होणें अपरिहार्य आहे त्याचप्रमाणें हल्लीं जिकडे तिकडे समाजसत्तावादाचीं मतें ऐकूं येतात, त्यांचाही परिणाम झाल्या शिवाय रहाणार नाही. याकरितां समाजाच्या सुरक्षिततेविषयीं किंवा पुनर्घटनेविषयीं विचार करणारांनीं समाजसत्तावाद्यांची भूमिका समजून घेऊन त्यासंबधानें आपलीं मतें व वागण्याची दिशा ठरविली पाहिजे.

## समाजसत्तावादाचें स्वरूप

आधुनिक समाजसत्तावादाचा मुख्य संस्थापक मार्क्स हा आहे व त्याचे ' कम्यु-निस्ट मॅनिफेस्टो' व ' कॅपिटल ' हे दोन ग्रंथ समाजसत्तावाद्यांचें बायबल आहेत. त्याचे मुख्य सिद्धान्त पुढें सांगितल्याप्रमाणें आहेत. जगांतील जी सर्व प्रकारची संपत्ति आहे ती निर्माण करण्याचे कामीं दोनच गोष्टी लागतात, एक जमीन व दुसरी मनु-ष्याची मेहनत. कोणत्याही जिनसेची जी किंमत ह्मणून असते ती त्या जिनसेवर खर्च झालेल्या मेहेनतीवर अवलंबून असते. जिनसा निर्माण करण्याला भांडवल हें जमीन किंवा मेहेनत यांप्रमाणें आवश्यक नाहीं. याकरितां भांडवलवाले ह्मणून जो स्वतन्त्र वर्ग आहे तो जो नफा तयार झालेल्या जिनसा विकून मिळवितो तो खरोखरच मेहनत करणाऱ्या वर्गाच्या न्याय्य मिळकतीचा अपहार करून मिळवितो. हल्लीं समा-जामध्यें भांडवलवाले व मजूर वर्ग असे दोन मुख्य वर्ग आहेत. या दोहोंच्या मध्यें एक मध्यम वर्ग आहे पण त्याचें जीवन बहुतांशीं भांडवलवाल्यांवर अवलंबून असल्यामुळें तो वर्ग मजूर वर्गाशीं सहानुभूति दाखवून सहकार्य करणार नाहीं. भांडवलशाहीनें मुळींच उपयुक्त कार्य केलें नाहीं असें नाहीं. निसर्गाजवळून शक्य तितकें धनार्जन संघटित रीतीनें करणें व मनुष्याच्या सुखसोई वाढविणें हें काम

भांडवल शाहीनें केलें; परन्तु आतां भांडवलशाहीपासून अकल्याणच होत आहे व तिचा अंत जवळ आला आहे किंवा आणला पाहिजे. भांडवलशाहीच्या हातांत सर्व राज्यतंत्र असतें, सर्व कायदे वगैरे भांडवलशाहीला अनुकूल असेच असतात, यामुळें मनुष्यांनी मनुष्यांवर जुलूम करून त्यांच्या मेहेनतीचा उपयोग स्वार्थासाठीं करणें व अन्यायानें दुसऱ्याच्या मेहेनतीचा अपहार करणें हें सुशक्य होतें. हेंच तर आजच्या समाजव्यवस्थेंतील मोठें व्यंग व शल्य आहे. तें नाहींसें करावयाचें हें समाजसत्तावाद्यांपुढें मोठें कार्य आहे. ही स्थिति नाहींशी करण्याचा उपाय म्हणजे संपत्ति निर्माण करणें, ती माणसांत वांटून देणें व तिचा विनिमय करणें हीं सर्व कामें राष्ट्राच्या हातीं आलीं पाहिजेत म्हणजे संपत्ति निर्माण करण्याच्या साधनांवरील खाजगी मालमत्ता नाहींशी करून त्यांवर सर्व समाजाची म्हणजे स्टेटची मालकी स्थापित केली पाहिजे. परंतु भांडवलवाल्याच्या हातांत राजतंत्र असल्यामुळें मजूर वर्गाला हें ध्येय साध्य करावयाचें तर भांडवलवाल्या वर्गाशीं कलह केला पाहिजे. याप्रमाणें भांडवलवालावर्ग व मजूरवर्ग यांचे संबंध अत्यंत विरोधी असल्यामुळें वर्गकलह हा अपरिहार्य आहे. मजूर वर्गाला आपल्या हातांत सत्ता यावयास पाहिजे असेल तर ती शांततेच्या मार्गानें मिळणार नाहीं. त्यासाठीं मजूर वर्गानें आपलें संघटन करून प्रचंड शक्ति निर्माण करून भांडवलवाल्यांशीं लढाई करून मजूर वर्गाचें सर्वाधिकारित्व स्थापन केलें पाहिजे. वर्गरहित समाजपद्धति निर्माण करणें हें जें ध्येय तें साध्य करावयाचें तर प्रथम असा तीव्र वर्गकलह करून भांडवलवाल्यांची सर्व संपत्ति हस्तगत केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. संधिकालांत (Transitional period) म्हणजे वर्गयुक्त समाजरचना नाहींशी होऊन वर्गरहित समाजरचना स्थापन करून ती दृढमूल होत असतांना मजूर वर्गाचेंच (Proletariat) सर्वाधिकारित्व असणार व त्यावेळीं बऱ्याच लोकांच्या विशेषतः पूर्वी भांडवलवाले असलेले लोक व त्यांचेवर अवलंबून असणारे मध्यम वर्ग ( जॉईन्ट स्टॉक कंपन्यांचे मॅनेजर, भौतिक शास्त्रज्ञ, वकील, डॉक्टर, वगैरे ) यांच्या स्वातन्त्र्याचा अपहार करावा लागेल, पण त्याला इलाज नाहीं. एकदां सर्व जगांत वर्गरहित समाजरचना झाली म्हणजे मग राज्ययन्त्राचीहि विशेषशी जरूर रहाणार नाहीं. जगामध्यें आजपर्यंत ज्या प्रचण्ड उलथापालथी व कलह झाले त्यांची वरवर दिसणारीं कारणें कांहीं असलीं तरी ऐतिहासिक दृष्टीनें सर्व कारणांचें पृथक्करण केल्यास त्या सर्वांचीं मूळ कारणें आर्थिक होतीं असें दिसून येईल. सर्व संपत्ति व ती उत्पन्न करण्याचीं साधनें सर्व समाजाच्या मालकीचीं झालीं म्हणजे प्रत्येक मनुष्याला त्याच्या गरजेप्रमाणें सर्वांच्या मेहेनतीनें उत्पन्न झालेल्या संपत्तीचा भाग मिळावयाचा आणि प्रत्येकानें आपल्या शक्तीप्रमाणें संपत्ति निर्माण करण्यासाठीं मेहनत करावयाची हें समाजसत्तावादाचें एक तत्व आहे. समाजसत्तावादाप्रमाणें धर्म ही महत्वाची गोष्ट नाहीं व धर्म केवळ प्रत्येक व्यक्तीची खाजगी गोष्ट आहे. त्याच्याशीं इतर व्यक्तींचा किंवा समा-

जाचा कांहीं संबंध नाहीं. आध्यात्मिक कल्पनांना समाजसत्तावादी महत्त्व देत नाहींत, त्याचप्रमाणें प्राचीन काळाकडे विशेष नजर न देतां वर्तमान व भविष्यकाळाकडे आपण दृष्टि वळविली पाहिजे, असें त्यांचें म्हणणें आहे. त्याचप्रमाणें अतीन्द्रिय वस्तूंचा विचार न करितां मानवी इन्द्रियांना गोचर किंवा अनुभवविषय होणाऱ्या गोष्टींवरच समाजसत्तावाद्यांचा भर आहे.

## समाजसत्तावादावरील आक्षेप

याप्रमाणें समाजसत्तावाद्यांचे सिद्धान्त थोडक्यांत सांगितले. हे सिद्धान्त हल्लींच्या जागतिक मंदीच्या व त्यामुळें उत्पन्न झालेल्या बेरोजगारीच्या काळांत समाजांतील बऱ्याच मोठया वर्गाला चित्ताकर्षक वाटल्यास त्यांत नवल नाहीं. त्यांचें आपल्याला थोडक्यांत परीक्षण करावयाचें आहे. प्रथम हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, मार्क्सनें जे उपरिनिर्दिष्ट सिद्धान्त सांगितले, व जी विचारपद्धति प्रचलित केली, तिचा पाया युरोपांतील विशेषतः इंग्लंडातील औद्योगिक क्रान्तीवर घातला होता. शिवाय त्याचा 'मॅनिफेस्टो' प्रसिद्ध झाल्याला सुमारें ८५ वर्षें झालीं आहेत. ज्या प्रकारच्या सामाजिक परिस्थितीवरून त्यानें सिद्धान्त बांधिले, तशी स्थिति हिंदुस्थानांत नाहीं. येथें पसतीस कोटी लोकांपैकीं औद्योगिक मजुरी ( workers ) करणारे लोक शेंकडा पांचदहा इतकेहि नाहींत. लोकसंख्या मुख्यत्वें कृषीवरच अवलंबून आहे. हिंदुस्थानांतील बऱ्याच मोठया भागांत जमीनदारी पद्धति आहे ही गोष्ट खरी, परंतु मुंबई मद्रास वगैरे ठिकाणीं लहान लहान शेतें वैयक्तिक मालकीचीं असून त्यांच्या पिकांवर उदरनिर्वाह करणारे रयत, त्याचप्रमाणें पंजाबासारख्या ठिकाणीं संबंध गांवाच्या किंवा गांवांतील मोठया समूहाच्या मालकीच्या जमिनीवर संबंध गांवांतील लोकांची उपजीविका होते असेहि प्रांत आहेत. अशा प्रांतांत खपणारे शेतकरी हे स्वतांच मालक आहेत. अर्थात् त्यांना कर्ज असल्यामुळें ते सावकारांच्या कह्यात जातात, परंतु पाश्चात्य भांडवलशाही ह्या प्रांतांत चालू आहे असें म्हणणें अशक्य आहे. शेतकरी झाला तरी त्याला वर्षभर आपण मेहेनत केलेल्या शेतांतील पीक आपल्यालाच मिळावें, तें सरकारांत जाऊं नये, व सरकार देईल तेवढयावर आपल्याला रहाण्यास पडूं नये असें वाटतें. 'प्रत्येकाला त्याच्या गरजेइतकें पण प्रत्येकानें आपल्या शक्तीप्रमाणें' हें तत्व दिसावयाला मोठें गोंडस दिसतें, परंतु त्यांत अनेक हेत्वाभास आहेत व तें तत्त्व यशस्वी करून दाखवावयाचें तर आज हजारों वर्षें मनुष्यांना ज्या विचारांची व विकारांची संवय झाली आहे त्यांना झुगारून देण्याची त्यांची तयारी पाहिजे किंवा तयारी नसल्यास बळजबरीनें त्यांचे कडून अंमल करून घेणारी प्रबल सत्ता पाहिजे. समाजसत्तावादांतील हें तत्त्व आमच्या अविभक्त कुटुंब पद्धतींत लहानशा प्रमाणावर आहे. त्यांतही जो मोठा असतो किंवा ज्याला सामर्थ्य असतें तो मुख्य चालक होतो आणि

कुटुंबांतील सर्व माणसें त्यांच्या त्यांच्या गरजे प्रमाणें तो मिळवील किंवा सगळे भागीदार मिळून मिळवितील त्या धनातून आपआपल्यासाठीं घेतात. एखादे वेळीं फार कर्त्या मनुष्याला मुलें थोडीं असलीं व दुसरे कमी मिळविणारे सहभागीदार यांचा परिवार मोठा असला तरी सर्वांना त्यांच्या गरजे प्रमाणेंच मिळतें, परंतु प्रत्येकाच्या उत्पन्नाच्या प्रमाणांत फरक असतो. शिवाय कुटुंबांतील माणसें एकमेकांच्या अत्यंत जवळच्या नात्याचीं एका रक्तामासाचीं असतात. असें असूनहि अविभक्तकुटुंबपद्धतीचा लोप आपल्यांत होत आहे व तो व्हावा अशाबद्दल जाणून बुजुन किंवा अजाणतेपणानें प्रयत्न चालू आहेत. वैयक्तिक स्वातंत्र्याच्या कल्पना वाढून मिया आणि बिबी यांचेच स्वतंत्र संसार थाटण्यांत येत आहेत. म्हणून वरील समाजसत्तावादी लोकांचें तत्त्व आपण होऊन गरिबांतील सुद्धां किती लोक मान्य करितील याबद्दल साहाजिक शंका येते. रशिया खेरीज कोणत्याही देशांत वरील तत्त्वाचा अंमल अजून करितां आला नाहीं. इतकेंच नव्हे तर त्या देशांतही या तत्त्वाला मुरड घालून जास्त (efficient) कार्यक्षम माणसाला जास्त सवलती देणें जरूर आहे असें सोविएटच्या मुख्य चालकांना वाटूं लागलें आहे. ज्यानें त्यानें आपल्या शक्तिप्रमाणें काम करावें पण उत्पन्न झालेल्या संपत्तींतील त्याच्या जरूरी प्रमाणें त्याला मिळेल असें ठरलें म्हणजे बऱ्याच्या माणसाची प्रवृत्ति शक्य तितकी कमी मेहेनत करण्याची होईल. आजच्या समाजरचनेंत जो आपल्या श्रमानें जें मिळवील तें त्याचें होईल; ह्मणजे खासगी मालमत्तेचें तत्त्व मान्य असतांही लक्षावधि लोक आळशी आईतखाऊ व अंगचोर आढळतात. मग वरील तत्त्वाचा जारीनें प्रचार झाल्यावर निदान आमच्या देशांत तरी काय होईल तें सांगता येत नाहीं. शिवाय समाजसत्तावादाच्या तत्त्वांत प्रत्येक मनुष्यानें आपल्या प्रयत्नांची स्वतःच्या प्रेरणेनें (जुलुमानें, चाबकाच्या किंवा शिक्षेच्या भीतीनें नव्हे) शिकस्त करावी अशाप्रकारचें आज तरी आकर्षकत्व नाहीं. समाजसत्तावादावर अढळ विश्वास असलेल्यांचें असें ह्मणणें आहे कीं खासगी मालमत्ता व भांडवलशाही यांच्या अनेक शतकें चाललेल्या प्रथेमुळें आज मनुष्ये स्वतांची मालकीची मिळकत होईल ही खात्री असली तरच प्रयत्न करितांना जरी दिसलीं तरी समाजसत्तावादाचीं तत्त्वें रुढून त्याप्रमाणें आईबापाचें व मुलाचें लहानपणापासून शिक्षण झालें ह्मणजे समाजसत्तावादाला आवश्यक अशी मनाची घटना सर्व मानवांची होईल. भविष्यकाळीं काय होईल हें कोणी सांगावें? परन्तु आजपर्यंतच्या अनुभवावरून बोलावयाचें तर हें नुसतें मनोराज्य आहे असें वाटतें. आजच्या समाजरचनेंत जी वसुधैवकुटुंबकत्वाची, त्यागाची मनस्थिति अत्यंत विरळ फक्त साधु पुरुषांत आढळून येते ती सर्व मनुष्यांत आपोआप वागेल अशी समाजसत्तावाद्याची आशा आहे.

मार्क्स व त्याचे अनुयायी यांचें तत्त्वज्ञान लोकशाहीचें तत्त्वाविरुद्ध आहे. लोकशाहीत सर्व समाजाचें हित समाजांतील बहुमताप्रमाणें ठरवून त्याप्रमाणें कारभार चालवावयाचा

असतो. समाजसत्तावाद्यांची तर कबुलीच आहे कीं निदान प्रारंभींतरी वर्गकलह तीव्र ठेवून भांडवलवाल्यांना नेस्तनाबूद करावयाचें म्हणजे एका वर्गानें दुसऱ्या वर्गावर अंमल करावयाचा किंवा जुलूम करावयाचा यांतून सुटका नाहीं. आज भांडवलवाले जुलूम करितात असें म्हणणें आहे. तर उद्यां कामकरी भांडवलवाले व मध्यमवर्ग यांजवर जुलूम करणार. अगदीं समाजसत्तावाद्यांचींच तत्त्वें व भाषा घेऊनहि एका वर्गाचा दुसऱ्या वर्गावर जुलूम हा कायम राहिलाच. कामकऱ्यांची संख्या थोडी असूनहि त्यांचा जुलूम मोठ्या समाजावर चालला असला पाहिजे असा भास रशियांत मधून मधून होणारे खटले व त्यांत कामचुकारपणा, सोविएटद्रोह वगैरे कारणें लावून होणाऱ्या कडक शिक्षा वाचल्या म्हणजे होतो. लोकशाहीचें ध्येय कायदा, शान्तता व विचारआचार स्वातंत्र्य, तर समाजसत्तावादाला व्यक्तीच्या स्वातंत्र्याबद्दल विशेष कांहीं वाटत नसून वर्गविरहित समाज स्थापणें व खासगी मालमत्ता ह्या तत्त्वाचा नायनाट हें त्यांचें ध्येय आहे. समाजसत्तावाद हा आमच्या प्राचीन धर्मशास्त्र व समाजशास्त्र कल्पनांचेहि अत्यन्त विरुद्ध आहे. आमच्या धर्मशास्त्राप्रमाणें धर्म, अर्थ, काम हे तीन पुरुषार्थ सर्वांसाठी सुद्धां आवश्यक मानले आहेत ( मोक्ष हा फार थोड्यांना साध्य होणार म्हणून तूर्त बाजूला ठेऊं ). धर्म हा निवळ थोतांड आहे, अल्पसंख्याकांना बहुसंख्याकांच्या ताब्यात ठेवण्यासाठीं व त्यांच्या श्रमाचें हरण होत असतांहि त्यांनीं बंड करूं नये म्हणून उभें केलेलें एक बुजगावणें आहे असें समाजसत्तावादी मानतात. निदान धर्म ही बाब खाजगी स्वरूपाची आहे, त्याचा सर्व मानवसमाजाशीं कांहीं संबंध नाहीं असें ते स्पष्ट म्हणतात. आमच्या धर्मशास्त्रानें ज्ञानी मनुष्याला सर्वश्रेष्ठ ठरविलें, अध्यात्मवेत्ता किंवा ब्रह्मवादी हा सर्व मानवांत श्रेष्ठ, आणि ज्ञानी मनुष्याचा चरितार्थ चालवून त्याच्या निर्देशाप्रमाणें इतर अज्ञानी मनुष्यांनीं वर्तन करणें हेंच योग्य व ज्ञानी आणि अज्ञानी मिळून झालेल्या समाजाच्या हिताचें आहे असें मन्वादि प्राचीन अर्वाचीन सर्व शास्त्रकारांचें मत आहे व तें बहुजन समाजालहि आजपर्यंत मान्य आहे. कामकरी व फार तर शेतकरी यांनाच मताचा अधिकार, निवळ ज्ञानोपासना करणारे यांना मत नाहीं, त्यांचा दर्जा समाजनियन्त्रणांत कमी प्रकारचा किंवा त्यांत त्यांना मुळींच स्थान नसावें असें समाजसत्तावाद्यांचें म्हणणें व त्याप्रमाणें सोवियट आजपर्यंत रशियांत चालत आहे. अलीकडे या मतांत शैथिल्य आलें आहे असें ऐकतों. प्रथम जरी वर्गकलह करावा लागला तरी पुढें एकदां सर्व स्थिरस्थावर होऊन वर्गरहित समाज दृढमूल झाला म्हणजे मग आचारविचार स्वातंत्र्याचें झालेलें उच्चाटन रद्द करूं आणि मग सोविएटच्या कडक शिस्तीची जरूर रहाणार नाहीं वगैरे मनोराज्यें समाजसत्तावादी ग्रंथांत केलेलीं आहेत. परन्तु अधिकाराची चटक लागली म्हणजे मनुष्याच्या रक्ताला संवकलेला वाघ मग ज्याप्रमाणें मनुष्याशिवाय इतर प्राण्याकडे पहात नाहीं, त्याप्रमाणें समाजसत्तावादी सर्वाधिकाऱ्यांची स्थिति होणार नाहीं असें आजपर्यंतच्या

जगाच्या हजारों वर्षांचा इतिहास पहातां मान्य करवत नाहीं. समाजसत्तावादांत मनुष्याच्या शारीरिक गरजांवरच सर्व भर दिलेला आहे, त्याचें तत्त्वज्ञान हें भुकेचें तत्त्वज्ञान आहे. पण मनुष्य हा केवळ शारीरिक वासनांचा गोळा नाहीं. त्याला आध्यात्मिक असेंहि अंग आहे. आध्यात्मिक आकांक्षा तृप्त करण्याचें या तत्त्वज्ञानांत सामर्थ्य नाहीं. मनुष्य प्राण्याचें संपूर्ण जीवन पोटपाण्याच्या प्रश्नांत समाप्त होत नाहीं. अर्धपोटीं राहूनहि आध्यात्मिक ध्येय बाळगल्यामुळें चोरी न करणारीं कोट्यावधि माणसें आहेत.

## समाजसत्तावादाविषयीं आमची भूमिका

आणखीहि समाजसत्तावादावर पुष्कळ आक्षेप घेतां येतील. परन्तु हात आंखडणें जरूर आहे. आमच्या प्राचीन परंपरेकडे पहातां व आमचें जें लोकशाहीचें राजकीय ध्येय आहे तिकडे लक्ष देतां समाजसत्तावादाचीं आत्यंतिक मतें आम्हांला ग्राह्य वाटत नाहींत हें स्पष्ट सांगणें जरूर आहे. पण त्याबरोबर हेंहि सांगणें आवश्यक आहे कीं समाजसत्तावाद हा पाश्चात्त्य भांडवलशाहीच्या निर्घृणतेमुळें उत्पन्न झाला आहे म्हणून आपल्या देशांत पाश्चात्यांप्रमाणें निव्वळ भांडवलशाही धुडगुस घालणार नाही यासाठीं हि आपल्याला जपलें पाहिजे.भांडवलशाहीचे मूळचे तत्त्ववेत्ते व पाश्चात्य अर्थशास्त्रज्ञ यांना Laissez faire चें तत्त्व मान्य होतें. अर्थशास्त्रज्ञांचें म्हणणें सर्वांना स्पर्धा करण्याला मुभा असावी.भांडवलवाले व मजूर यांनीं, आपसांत करार करून आपलें संबंध ठरवावे, त्यांत पडण्याचें सरकारला कारण नाहीं,असें करण्यांत एकंदर राष्ट्राचें व समाजाचें हित आहे. याचा परिणाम असा झाला कीं, भांडवलवाल्यांना शक्य तितका जास्त नफा मिळवावयाचा म्हणजे मजुराची मजुरी व कारखान्यांतील सोई शक्य तितक्या कमी करून त्यांचे कडून शक्य तितकें जास्त काम त्यांनी काढून घ्यावें.परंतु या तत्त्वज्ञानांत तीन गोष्टी गृहीत केल्या आहेत, व त्या तिन्ही खऱ्या नाहीत. प्रत्येक मनुष्याला व मजुराला आपल्याला काय हितावह आहे हें सारखेंच समजतें, प्रत्येकाला आपल्याला हितावह असेल तें मिळविण्याचें सामर्थ्यहि सारखेंच आहे, आणि समाजांतील व्यक्ति पृथक्पणें आपल्या हिताचें म्हणून जें समजतात व वागतात त्यानें सर्व समाजाचें म्हणून जें हित तें साध्य होत असतें. परंतु ह्या तिन्ही गोष्टी खऱ्या नाहींत. प्रत्येक मनुष्य आपल्याला हितावह म्हणून गोष्ट करितो, पण ती त्याला हितावह असतेच असें नाहीं; व त्याच्या कृतीनें ज्या आर्थिक उलथापालथी होतात, त्या अनपेक्षित असतात. उदाहरणार्थ एका शास्त्रज्ञानें कृत्रिम नीळ शोधून काढली, त्याबरोबर जमिनींत निळीचें पीक करणारे लक्षावधि लोक उपाशी मरण्याची वेळ आली. एखादा भांडवलवाला कांही नवीन यंत्र तयार करवितो. ती गोष्ट त्यानें आपल्या फायद्यासाठीं केली, पण त्याचा परिणाम त्याचे कारखान्यांतील शेंकडो लोकांना रोजगारावरून काढून टाकण्यांत होतो. यासाठीं लोकशाही सरकारचें हें कर्तव्य आहे कीं व्यक्तींच्या स्वार्थामुळें उत्पन्न होणाऱ्या विलक्षण परिस्थिति व आर्थिक विषमता यांचा परिहार करण्याचा प्रयत्न करणें, हा प्रयत्न कसा

करावयाचा हें दाखविण्याचें हें स्थळ नसल्यामुळें हा विषय येथें सोडून देणें भाग आहे. वरील विवेचनाचा उद्देश इतकाच आहे कीं धार्मिक रीत्या समाजाची पुनर्घटना करीत असतांना समाजसत्तावादाचीं मुख्य तत्वें आपल्याला मान्य नाहींत, परन्तु निर्गल भांडवलशाहीहि आपल्याला मान्य नाहीं असें तत्त्ववादी लोकांनीं स्पष्ट सांगितलें पाहिजे.

## आधुनिक सनातनी पक्षाची भूमिका

सनातनी पक्षांतील दुसऱ्या वर्गांत मोडणाऱ्या लोकांची वादपद्धति व विचारसरणी निराळ्या प्रकारची आहे. त्याना प्रचलित अनेकजाति, त्यांतील श्रेष्ठ कनिष्ठ भाव, भोजनादिकाचे निर्बन्ध, अल्पवयात विवाह इत्यादि गोष्टी चालल्या आहेत तशाच चालल्या पाहिजेत व त्या बरोबर आहेत असें म्हणावयाचें आहे. ते आपल्या म्हणण्याला मनु याज्ञवाल्क्यादि यांचा आधार तर घेतातच, पण त्यांचा मुख्य भर आधुनिक विज्ञानशास्त्रावर (physical sciences) व विशेषतः प्राणिजीवनशास्त्र (biology), सुप्रजानिर्माणशास्त्र (eugenics) इत्यादि शास्त्रांवर व त्या शास्त्रांवर ग्रन्थ लिहिणारे डार्विन, मेन्डेल, गाल्टन, नीत्शे, एलिस, हर्स्ट इत्यादि शास्त्रज्ञ याचेवर आहे. त्यांचें म्हणणें कीं आमच्या समाजरचनेंत जे दोष म्हणून दाखविण्यांत येतात ते दोष नसून गुणच आहेत. म्हणून या मतवाद्यांच्या मताची थोडीशी समीक्षा करण्याचें योजिलें आहे.

## आधुनिक सनातनवादाचें परीक्षण

सनातनधर्माभिमानी म्हणविणाऱ्या दुसऱ्या पक्षापैकीं रा. गो. म. जोशी यांनीं 'हिंदूंचें समाजरचनाशास्त्र' या नांवाचा सुमारें साडेचारशें पानाचा ग्रंथ नुकताच प्रसिद्ध केला आहे. हा ग्रंथ परिश्रमपूर्वक लिहिलेला असून ग्रंथकर्त्याचा पाश्चात्त्य विज्ञानशास्त्रीय ग्रंथाचा परिचय जागोजाग प्रकट होतो. याशिवाय ग्रंथकाराची आपल्या समाजाबद्दल असलेली तळमळ आणि आमच्या धर्माचीं तत्त्वें श्रेष्ठ आहेत या बद्दल अभिमान हीं निःसंशय आदरणीय आहेत. हा ग्रंथ सनातन म्हणविणारे, तत्त्ववादी, धर्म मुळींच न मानणारे इत्यादि सर्व प्रकारच्या मतवाद्याना विचार करण्याला प्रवृत्त करील अशा स्वरूपाचा आहे यांत संदेह नाहीं. सनातन म्हणविणाऱ्यापैकीं कांहीं लोकांचा हा ग्रंथ कांहीं काळपर्यंत वेदवाक्यच होईल अशी भीति आहे. या व्याख्यानमालेंत आधुनिक ग्रंथकारांच्या मताचें परीक्षण फारसें मी कोठें केलें नाहीं. आपले धर्मशास्त्राचे ग्रंथ वाचून मला काय वाटलें तितकेंच मी जागोजाग सांगितलें आहे. परंतु रा. जोशी याच्या ग्रंथाच्या बाबतींत अपवाद करणें मला जरूर भासत आहे. आपलें आहे तें सर्व उत्तम आहे, केवळ दैवानें किंवा परिस्थितीनें आमची वाईट स्थिति झाली असें कोणी सांगितल्यानें शेंकडा नव्याण्णव लोकांना बरें वाटतें. आधींच आह्मी लोक सर्व जुनें तितकें सोनें समजणारे, त्यांत रा. जोशी यांच्या सारख्या पाश्चात्यविद्याविभूषित गृहस्थानें पाश्चा-

त्यांच्या मोठमोठ्या ग्रंथांतील सिद्धांतांचा पसारा मांडून आमचें सर्व उत्तम आहे असें सांगितल्यावर सनातनी म्हणविणारांना एक निधानच सांपडलें असें होईल व तत्त्वविचाराचा मार्ग बंद होईल, म्हणून त्यांच्या ग्रंथाचा परामर्श घेणें या व्याख्यानमालेंत अवश्य झालें आहे. या ग्रंथाचें पूर्ण समीक्षण करणें म्हणजे तसाच किंवा त्याहून मोठा ग्रंथ लिहावा लागेल. तें ह्या ठिकाणीं अप्रस्तुत आहे. या विद्वान ग्रंथकारांशीं, विशेषतः त्यांच्या कांहीं सिद्धान्त काढण्याच्या पद्धतींशीं व सिद्धान्तांशीं माझा तीव्र मतभेद आहे. शिवाय या ग्रंथांत अशा विद्वान ग्रंथकाराला न शोभेल अशी प्रतिपक्षीयांविषयीं उपहासात्मक व उद्दाम भाषा जागोजाग योजिलेली आहे. त्यामुळें आणि पाश्चात्य संस्कृति येथून तेथून गचाळ व घाणीनें बुजबुजलेली आणि आमची संस्कृति मात्र सर्वथैव श्रेष्ठ अशा एककल्ली विचारांमुळें या ग्रंथाला मोठेंच गालबोट लागलें आहे. याचे कांहीं मासले देतो. 'आज स्पर्शास्पर्श, भक्ष्याभक्ष्य वगैरे एकूणएक बाबतींत शूद्रांचे अनिर्बंध आचार समाजांत प्रसार होऊं पहात आहेत आणि त्यालाच समाजसुधारणा म्हणावें असें समाजसुधारक नांवाचा प्राणिवर्ग आम्हांला सांगत आहे'(पृष्ठ २९); 'खरोखर आजच्या समाजांत पाहिलें तर कोणत्याहि विषयाचा चार दोन जंगी शब्द वापरण्यापलीकडे फारसा कोणी विचार केलेला दिसत नाहीं' (पृष्ठ ३०); 'युरोपांतील द्विपाद पशूला त्यांतल्यात्यांत मुख्यतः रशियाला ही पोटाची खळगी भरण्यापलीकडे मानव म्हणून कांहीं असतो ही कल्पनाच शिल्लक उरलेली नाहीं' ( पृष्ठ ५७ ); 'पुत्रैषणा, दारैषणा, वित्तैषणा या तिहींच्या तडाक्यांतून सुटलेला प्राणी विरळाच आणि आधुनिक युरोपच्या संस्कृतींत तर नाहींच नाहीं' (पृष्ठ ६९); 'आज सुधारणेच्या जाहिराती घेऊन चारी खण्डांत वांटीत सुटणारा पाश्चात्त्य हा तामसिक पशुस्थितींतून फारसा वर आलेला नाहीं' (पृष्ठ ८० ); 'कारण तो समाज (युरोपियन) जातिहीन आहे आणि त्या पद्धतीचा आमचाहि समाज बनावा अशा तऱ्हेचा सुधारक, दुर्धारक, उद्धारक, संचालक, उपासक ( उपास करणारे ) वगैरे वगैरे सर्व समाजाहितचिंतकांची ( नाटक मंडळींची नव्हे ) मागणी ' ( पृष्ठ १५८ ); 'अशी खरोखर स्थिति असतांना घटपटादि खटपट करून वर्णान्तराला आधार काढून देणारे नागपुरी भटजी, वाईकर भटजी, लोणावळी तर्कतीर्थ, उपवासी महात्मे, कर्मवीर आणि इतर सर्व यच्चयावत् सुशिक्षित, अर्धसुशिक्षित वगैरे वर्ग हे सर्व हिंदु समाजाचे हितकर्ते आहेत असें आम्हाला तरी म्हणवत नाहीं ' ( पृष्ठ १६० ); ' हिंदूंचे एकूण एक आचार चूक आहेत अशा तऱ्हेचा एकच ध्वनि या सर्व सज्जनांनीं [ शङ्खान्दध्मुः पृथक् पृथक् ) काढल्यानंतर ' त्रयाणां धूर्तानाम् ' या न्यायानें हिंदु समाजानें आपल्या धर्मांकडे पाठ फिरविल्यास त्यांत आश्चर्य करण्यासारखें काय आहे ? आतां याच हल्लकल्लोळांत तर्कतीर्थ, वेदान्तवागीश, महामहोपाध्याय वगैरे रत्नांनीं आपला गळा मिळवून दिला आहे ' ( पृष्ठ २५६ ); ' आतां कांहीं काळानें ही व्यवस्था त्यावेळीं तर्कतीर्थ महात्मा समाजसुधारक नांवाच्या प्राणि-

वर्गाला नापसंत होऊन त्यांनीं आंतर जातीय विवाह सुरू केले तर... ' ( पृष्ठ ४११-४१२ ); ' आतां त्याच खानेसुमारीच्या ग्रंथांतील पाळ्यांचें गणित घेऊं म्हणजे या लेखकांची पाजीपणा तावडतोब लक्षांत येईल ' ( पृष्ठ ३६२ ). अशा प्रकारचीं वाक्यें वादाच्या भरांत निघून गेलीं म्हणून तिकडे दुर्लक्ष करून मुख्य मतभेदांकडे वळतों.

पाश्चात्यांच्या विकृत संस्कृतीच्या आगमनानें आमच्यांतील शिक्षित म्हणविणाऱ्या लोकांना मोह पडून त्यांनीं आमच्या समाजांतील जेव्हढें म्हणून श्रेष्ठ व अभिजात आचार मानलेले होते, त्याविरुद्ध मोहीम सुरू केली अशी रा. जोशी यांची मुख्य तक्रार आहे ( पृष्ठ २८–२९ ). माझी त्यांच्या एकंदर विवेचनपद्धतीविरुद्ध प्रथम अशीच तक्रार आहे. त्यांच्या ग्रंथांत इथून तिथून आधुनिक पाश्चात्य वैज्ञानिक ग्रंथकार विशेषतः जीवनशास्त्र (Biology) व सुप्रजाजननशास्त्र (Eugenics) या शास्त्रावरील ग्रंथकार यांच्या नामावल्या आहेत व त्यांत मौज अशी आहे कीं बहुतेक ठिकाणीं ते कोणत्याही पानाचा म्हणून उल्लेख करीत नाहींत. हिंदुधर्मशास्त्राचा विषय जर प्रतिपाद्य आहे तर हिंदुधर्मशास्त्राचे ग्रंथ घेऊन त्यांतूनच मुख्यत्वें आपले सिद्धांत समर्थित केले पाहिजेत. मनूनें ' वर्णानां ब्राह्मणो गुरुः ' म्हटलें तर मनूनें काय कारणें दिलीं, त्याच्या वाक्यांचा अर्थ मनूचे मेधातिथि आदि टीकाकार यांनीं काय केला व आमचा समाज काय मानीत आला तें सांगितलें पाहिजे. त्यानें काढलेले सिद्धांत पाश्चात्त्यांच्या आजच्या जीवनशास्त्रांतील कांहीं ग्रंथकारांच्या विचारांशीं जमतात म्हणून ते ग्राह्य व बरोबरच होते ही विचारसरणी पाश्चात्त्यांच्या वैज्ञानिक ज्ञानाच्या जबरदस्त मगरमिठींतून न सुटल्याची द्योतक आहे. न्यायकोर्टांत सुद्धां जेव्हां दायभाग, वारसा वगैरे बाबतींत प्राचीन स्मृति व निबन्ध लावण्यांत येतात तेव्हां त्यांच्या अर्थां संबंधानें संदेह वाटला तर तो दूर करण्यासाठीं पाश्चात्य न्यायमीमांसेचा अवलंब न करितां धर्मशास्त्रनिबन्धांत सांगितलेल्या पद्धतीचा अवलंब केला पाहिजे असें ठरलें आहे. (Hindu law contains the principles of its own application). पाश्चात्त्यांच्या वैज्ञानिक शास्त्रांतील सिद्धान्त वारंवार बदलत आहेत. जीवनशास्त्र व सुप्रजाजननशास्त्र यांची तर वाढ गेल्या पन्नाससाठ वर्षांतच झालेली आहे. त्यामुळे त्या शास्त्रांतील सिद्धान्त अजून तिकडेहि निर्विवाद म्हणून मानलेले नाहींत. असे सिद्धान्त आधाराला घेऊन आमची प्राचीन समाजपद्धति निर्दोष होती असें दाखविणें म्हणजे कुशकाशावलम्बन होय असें मला वाटतें. एकदोन उदाहरणें देऊन माझें म्हणणें स्पष्ट करितों. आमच्यांतील आर्यभट्टाखेरीज प्राचीन ज्योतिषी व धर्मशास्त्रकार पृथ्वीच्या सभोंवार सूर्यादि ग्रह फिरतात असें मानीत होते. केप्लर, गॅलिलियो, न्यूटन यांचे शोध सर्व मान्य होण्यापूर्वीं युरोपांतहि तसेंच मानीत होते. जर इ. स. १६ व्या शतकांत आमची इंग्रजांशीं राज्यकर्ते म्हणून गांठ पडली असती तर त्यावेळचे जे कोणी रा. जोशांसारखे आमच्यांतील ग्रंथकार असते त्यांनीं सांगितलें असतें कीं आमचे सर्व शास्त्रकार

बरोबर आहेत, हें पाश्चात्य शास्त्रज्ञानांहि मान्य आहे, पण आतां आमचे शास्त्रकार व पाश्चात्यांचेहि शास्त्रकार या बाबतींत चूक करीत होते असें रा. जोशीच म्हणणार. कणादानें सर्व भौतिक सृष्टि कणापासून ( atoms ) निर्माण झाली असें दोनअडीच हजार वर्षांपूर्वी वैशेषिक दर्शनांत सांगितलें. १९ व्या शतकांतहि पाश्चात्य विज्ञानशास्त्रानें तसेंच सांगितलें. तेव्हां आमचा कणाद केव्हढा अजब शोधक असें आम्ही साभिमान म्हणत होतों. पण आतां विज्ञानशास्त्रांनीं कण वगैरे सर्व विरवून इलेक्ट्रॉनची ( electrons ) उपपत्ति काढली आहे तिच्या दृष्टीनें कणादाचा शोध म्हणजे कांहींच नाहीं असें ठरत आहे. म्हणून पाश्चात्यांच्या, रा. जोशी यांच्याच मताप्रमाणें ( पृष्ठ २०–२१ ), कनिष्ठ दर्जाच्या अशा प्राणिशास्त्राचा आधार अत्यंत श्रेष्ठ अशा आमच्या धर्मशास्त्राच्या बाबतींत त्यांनीं घेऊं नये अशी माझी त्यांना विनंति आहे. त्यांच्या ग्रंथांच्या शेवटीं आधारासाठीं घेतलेल्या ग्रंथांच्या यादीची छापील पंधरा पानें जोडलेलीं आहेत, त्यात संस्कृतातील धर्मशास्त्राचे ग्रंथ म्हणून ( वेद वेगळून ) आपस्तम्बधर्मसूत्र, गौतमधर्मसूत्र, बौधायनधर्मसूत्र, वसिष्ठधर्मसूत्र, विष्णुधर्मसूत्र, मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति, महाभारत, नारदस्मृति, कुल्लूकभट्ट, धर्मसिन्धु, स्मृतिसमुच्चय इतक्यांचाच फक्त उल्लेख केलेला आहे. यांतील मनुस्मृति, महाभारत व याज्ञवल्क्य यांचीं अवतरणें बऱ्याच ठिकाणीं आलीं आहेत. बाकीच्यांचीं दोन चार वेळापेक्षां जास्त नाहीत. पुनः या बाबतींत अशी मौज आहे कीं, पहिले चार ग्रंथ ( आपस्तंब वगैरे ) यादींत मधून मधून (पृष्ठ ८, ९, ११, १३ ) देऊन शेवटच्या पानाचे शेवटीं पुनः दिलेले आहेत. ते कशाला कोणाला ठाऊक. नारदस्मृति तर या विद्वान ग्रंथकारांनीं मूळांत वाचलेली दिसत नाहीं. कारण नारदाचें जें अवतरण त्यांनीं घेतलें आहे, तें माझ्या धर्मशास्त्राच्या इतिहासांतूनच घेतलें आहे असें ते लिहितात ( पान ११७ ). बाकीच्या यादींत नलोपाख्यानापासून तों अमरकोश व प्रो. फडके यांच्या अटकेपारपर्यंतचे आमच्या लोकांचे ग्रंथ आहेत. ते सर्व घेतले तरी त्यांच्या सुमारें आठ पट ग्रंथ पाश्चात्यांचे ( विशेषतः biology, sexology, psychology, politics, economics ) आहेत. तेंव्हा रा. जोशी यांना विनंति अशी कीं त्यांनीं पाश्चात्यांचे ग्रंथ तूर्त बाजूला ठेऊन वेदकालापासूनचे आमचें वाङ्मय, निरुक्त, धर्मसूत्रें, मन्वादि सुमारें शंभर दीडशें स्मृति, पुराणें व आगमग्रंथ आणि प्रसिद्ध असे निरनिराळ्या काळचे व भारतवर्षातील निरनिराळ्या देशांतील सुमारे शंभर निबन्धग्रन्थ व टीकाकार यांचे ग्रन्थ अभ्यासून पाहून मग पुनः आपलें 'हिंदूंचें समाजरचनाशास्त्र' लिहावें. रा. जोशी हे बुद्धिमान् आहेत, व्यासंगी आहेत, त्यांना खोचदार भाषा लिहितां येते, व वादविवादाच्या मरख्या त्यांना चांगल्या कळतात. अशा गृहस्थानें वर लिहिल्याप्रमाणें अभ्यास करून मग जर ग्रंथ सत्यान्वेषणासाठीं लिहिला तर तो हल्लींच्या ग्रन्थापेक्षां फार सरस व जास्त आदरणीय होईल अशी माझी खात्री आहे.

# मतभेदाचें स्वरूप

रा. जोशी यांच्या कांहीं सिद्धान्तांची कसून परीक्षा करावय ।।मच्या लोकांचा तेजोभंग करण्याचें कटु कर्तव्य बजावणें भाग होईल. परंतु रा. जोशी व तत्सदृश मतांचे लोक आमच्या संस्कृतींतील भलत्याच भागांबद्दल अभिमान बाळगतात, व त्यामुळें आमच्या लोकांची दिशाभूल होत आहे असें मला वाटतें. प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, आमच्या संस्कृतीबद्दल आम्हाला योग्य तो अभिमान आहे. आमचे लोक बुद्धीच्या क्षेत्रांत आजपर्यंत जगांत होऊन गेलेल्या किंवा आज हयात असलेल्या लोकांपेक्षां कमी नाहींत. त्याचप्रमाणें सर्व जगानें आदरानें मान तुकवावी अशा प्रकारच्या कांहीं गोष्टी आमच्या देशानें घडवून आणल्या आहेत. आमच्या संस्कृतींतील अशा चिरंतन महत्वाच्या बाबींबद्दल मी पुढें थोडक्यांत विवेचन करीन. वर्णव्यवस्था ही उत्पन्न झाली तेव्हां ती आमच्या त्यावेळच्या परिस्थितीला योग्य असलीच पाहिजे. तिच्यापासून कांहींच फायदे झाले नाहींत असें आमचें म्हणणें नाहीं. अशा प्रकारची जगड्व्याळ संस्था तिच्यांत एकहि गुण नसता तर हजारों वर्षे टिकलीच नसती. तिच्यांत त्या परिस्थितींत खरोखर गुण होते, पण आतां तिच्यांत दोष फार भरले आहेत, ती मूळच्या स्वरूपांत नाहीं, अत्यंत विकृत झाली आहे, व ती समाजाच्या संघटनेच्या आड येत आहे. मुख्य मतभेद आहे तो असा. आमच्या मतें हल्लींची जातिसंस्था ही आधीं आमच्या संस्कृतीचें प्रधान अंग नव्हे, व त्याचबद्दल विशेष अभिमान बाळगण्यासारखी ती गोष्ट नाहीं. त्यापेक्षां जास्त महत्वाचीं चिरपरिणामकारक व सर्वांस आदरणीय अशीं आमच्या संस्कृतीचीं अंगें आहेत, त्यावर भर द्या. आजच्या व जवळच्याच भविष्यकाळांत होणाऱ्या परिस्थितींत तीन हजार जाति असलेली संस्था ही अभिमान धरण्यासारखी गोष्ट नाहीं, इतकेंच नव्हे, तर ती आहे याच स्थितींत नाममात्रानें व एकमेकांत तेढ आणण्यापुरती टिकेल, परन्तु राष्ट्रहिताला किंवा समाजाला हितकारक होईल अशा रीतीनें बिल्कुल टिकणार नाहीं, असें माझें मत आहे. उलटपक्षीं सनातनी म्हणविणारे लोक व त्यांचें समर्थन करणारे रा. जोशी यांचें मत हल्लीं असलेलीं जातिसंस्था हें आमच्या संस्कृतीचें प्रधान अंग आहे व तें कांहीं झालें तरी टिकलेंच पाहिजे, असें आहे. स्वतांबद्दल योग्य अभिमान असणें हें रास्त व जरूर आहे. परन्तु ज्या गोष्टी हानिकारक असतील त्यांबद्दल अभिमान धरल्यानें आपलाच नाश होत असतो. आपले खरे दोष काय आहेत व आपले खरे गुण काय आहेत यांचा बोध झाल्याशिवाय आपली स्थिति सुधारण्याच्या योग्य मार्गाचा अवलंब होणें शक्य नाहीं. आमच्या समाजाची आहे हीच स्थिति उत्तम आहे, त्यांत सुधारणा करा असें म्हणणें म्हणजेच मुळीं मूर्खपणा आहे असें जर रा. जोशी याचे म्हणणें असेल तर मग त्यांच्याशीं वाद करण्यांत अर्थ नाहीं.

त्यांचे तसें म्हणणें नसावें असें वाटतें. म्हणून पुढील विवेचन केलें आहे. माझी त्यांच्या मताबद्दलची अटकळ चुकली असल्यास त्यांनीं तसें स्पष्ट जाहीर करावें. 'विकारं खलु परमार्थतोऽज्ञात्वा अनारम्भः प्रतीकारस्य' (शाकुन्तल ३) या कालिदासोक्तींत सांगितल्याप्रमाणें ( रा. जोशी यांनीं पृष्ठ ४१७ वर हें वाक्य विकृत स्वरूपांत अन्य संदर्भांत घेतलें आहे 'कारणं यज्ञात्वा अनारम्भाः प्रतकिारस्य ') आपला दोषच गुण भासूं लागला म्हणजे संपलेंच. म्हणून रा. जोशी यांच्या कांहीं मुख्य अपसिद्धान्तांचें येथें थोडेंतरी परीक्षण करणें अवश्य आहे.

## रा. जोशी यांचे कित्येक अपसिद्धान्त

"ज्या मुसलमानी सत्तेपुढें मध्य आशिया आणि आफ्रिका हीं शंभर वर्षांत मुसलमान झालीं त्या मुसलमानांची पांचशें वर्षें सत्ता असून हिंदु समाजच शिल्लक कसा राहिला या प्रश्नाचें प्रथम उत्तर द्यावयाला पाहिजे. ज्या खिस्ती धर्माच्या झंजावातापुढें सबन्ध युरोप वांकला त्या खिस्ती धर्माचे बाण हिंदुस्थानावर इतके बोथट काय कारणानें झाले तें कळेल तर बरें. ज्या बुद्ध धर्मानें चीन आणि जपान आपल्या अंकित केले त्या बुद्धाला याच जुनाट हिंदुधर्मानें पळावयास लाविलें. या एकामागून एक घडणाऱ्या चमत्कारांचा खुलासा कोणीहि कां करीत नाहींत ? राजसत्ता उघड उघड विरुद्ध असून देखील आज हजारों वर्षें हा धर्म आपलें व्यक्तित्व राखून आहे. या धर्मावर महावीर गौतमादिक पाखंड्यांचे मातबर हल्ले झाले. अशोक औरंगादि सम्राटांनी याचा पाडाव करण्याचा प्रयत्न केला. परंतु या धर्मानें त्या सर्वांना तोंड देऊन त्यांचेंच या भूमींतून उच्चाटन केलें... हें सर्व कार्य ज्याला इंग्रजींत 'ब्राह्मॅनिझम ' म्हणतात त्या हिंदुधर्मानेंच घडवून आणलें आहे. हा धर्म जगांतील सर्व धर्मांत वयोवृद्ध ही गोष्ट त्याच्या शत्रूंनाही कबूल करावी लागेल' ( हिंदूंचें समाजरचनाशास्त्र पृष्ठ २७ ), 'हिंदु आणि चिनी लोकांनी किंचित्काल पर्यंत प्रगति केली व ते तेथें थांबले; ते समाज पृथ्वीच्या पाठीवर जिवंत आहेत. ग्रीक आणि रोमन लोक सारखे प्रगति करीत गेले ते विनाश पावले ' ( पृष्ठ ४२ ). रा. जोशी यांच्या ग्रंथांतील या दोन अवतरणांत इतके अपसिद्धान्त आहेत कीं कोणत्याहि गंभीर विषयावर लिहिलेल्या पुस्तकांतील इतक्या लांबीच्या वाक्यांत तितके मला इतरत्र आढळले नाहींत. रा. जोशी यांनी जें प्रतिपादन या वाक्यांत केलें आहे, तशाच स्वरूपाचें प्रतिपादन सनातनी म्हणविणारां कडून बऱ्याच वेळा करण्यांत येतें. तेव्हां त्याचा फोलपणा दाखविणें अवश्य होत आहे याला नाइलाज आहे. मुसलमान लोकांनीं शंभरवर्षांत आफ्रिका महंमदीय बनविली हें इतिहासाला सोडून आहे. आफ्रिका म्हणजे त्या खंडाच्या उत्तरेची व थोडीशी पूर्वेकडील

अरुंद पट्टी एवढाच भाग नव्हे. सर्व हिंदुस्थानावर मुसलमानांची कधींच सत्ता नव्हती व पांचशें वर्षे तर नव्हतीच नव्हती. इ. स. १३ व्या शतकांत त्यांचे राजसत्तेला सुरवात झाली पण त्यावेळींही हिंदुस्थानाचा अगदींच लहान भाग त्यांचे ताब्यांत होता. उत्तर हिंदुस्थानाच्या बऱ्याच भागावर त्यांच्या सार्वभौम अंमल झाला तरी रजपुताना वगैरे भाग स्वतंत्र होते व मांडलिक राजे तर हिंदूच पुष्कळ होते. पुढें १३३६ ते १५६५ पर्यंत दक्षिण हिंदुस्थानांत तरी विजयनगरचें प्रचण्ड साम्राज्य होतें. औरंगजेबाचे वेळेसही शिवाजीनें स्वातंत्र्याचें निशाण केव्हांच उभारलें होते. ह्मणून पांचशें वर्षे मुसलमानांची सत्ता या देशावर होती याचा अर्थ अत्यंत संकुचित घ्यावा लागेल. आज हिंदुस्थानची लोकसंख्या पसतीस कोटी आहे. जगाच्या पंचमांश किंवा षष्ठांश लोकसंख्या हिंदुस्थानांत आहे असें नेहमीं म्हणण्यांत येते. हें खरें असावें असें वाटतें. हीच स्थिति प्राचीन काळीं सुद्धां असावी असें कलिंग देशाचा राजा खारवेल याच्या इ. स. पूर्वीच्या शिलालेखावरून अनुमान निघतें. आजहि सबंध युरोपची लोकसंख्या ( रशिया वगळून ) हिंदुस्थानापेक्षां फारशी जास्त नाहीं. युरोपांतील लहानशा भागाला मूठभर अरबस्तानांतील महमदीय टोळ्यांनीं शंभर वर्षांत पादाक्रांत केलें व प्रचंड वस्तीच्या हिंदुस्थानाला शंभर वर्षांत पादाक्रांत केलें नाहीं यांत मुसलमानांचा कमीपणा नसून गौरवच आहे. हिंदु धर्माचा यांत मोठेपणा काय तो मला तरी समजत नाहीं. हिंदुस्थानांत एवढी प्रचण्ड लोकसंख्या व अत्यंत शहाणे असे आमचे लोक असूनही मुसलमानांसारख्या मूठभर लोकांनीं आम्हाला जिंकणेंच शक्य कां व्हावें व आमच्यावर पांचशें वर्षे रा. जोशी म्हणतात याप्रमाणें त्यांना सत्ता कां चालवितां यावी याचा रा. जोशी यांनीं विचार करावा. नुसतें आमचा धर्म वृद्ध आहे व आम्ही पडलों तरी आमचें नाक वर आहे या म्हणण्यांत अर्थ नाहीं. रा. जोशी म्हणतात ( पृष्ठ ४१५ ) ' हिंदु समाज असंघटित आहे. कशावरून तर मुसलमान समाज त्या समाजावर आक्रमण करितो. आक्रमण करतो म्हणजे काय तर देवळें फोडतो व स्त्रिया पळवून नेतो. परन्तु नउशें वर्षें मुसलमान समाज हेच सदुद्योग करीत असून हिंदु समाज त्या समाजापुढें वाकला नाहीं हें जर ऐतिहासिक सत्य आहे तर इतका चिवटपणा आणणारें कोणतें तत्त्व हिंदूंच्या समाजरचनेंत आहे तें शोधून काढावयास पाहिजे. ' या वाक्यावर टीका करण्याची जरूरी आहे असें वाटत नाहीं. रा. जोशी म्हणतात तें ऐतिहासिक सत्य नाहीं, एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

आधीं ग्रीक राष्ट्र किती लहान त्याचा राजा अलेक्झांडर यानें ग्रीसपासून हजारों मैलांवर पंजाबांत येऊन तो प्रदेश पादाक्रांत केला ! त्याच्या बरोबर अनेक वर्षे लढाया देत देत कंटाळत आलेले सैनिक कित्येक हजार फार तर असतील; पण अशा चिमुकल्या सैन्याला त्या वेळच्या हिंदु क्षत्रियांनीं एकजूट करून आपल्या प्रचंड सैन्यानें व आपल्या बुद्धिमान ब्राह्मण मंत्र्यांच्या युक्त्यांनीं एका दिवसांत चुरडून टाकण्यास

पाहिजे होतें. त्यावेळची प्रजा तर विपरीत अशा इंग्रजी सुधारणेनें बिघडली नव्हती ना ? प्राचीन ऋषींनीं घालून दिलेल्या क्षुण्ण मार्गानेंच ती चालत होती ना ? बुद्धाला हिंदुधर्मानें पळावयास लाविलें असें रा. जोशी यांनीं पाहिजे तर खुशाल म्हणावें. पण तें वाक्य अत्यंत हास्यास्पद आहे. ब्राह्मणी धर्मानें आपला शत्रु जो बुद्ध त्याला आपला परमदेव जो विष्णु ( अग्निर्वै देवानामवमो विष्णुः परमः । ऐ. ब्रा. ) त्याचा अवतार म्हणून कबूल केलें हें रा. जोशी यानीं विसरूं नये. तेव्हा बुद्ध पळाला कीं त्याच्यापुढें ब्राह्मणी धर्म वाकला हें एखादें पोरही सांगू शकेल. महावीराचा जो जैन धर्म त्याचें हिंदुस्थानांतून उच्चाटन झालें ही एक नवीनच नवल कथा रा. जोशी यांचेकडून कळली. अशोकानें खरोखर ब्राह्मणी धर्माचा पाडाव करण्याचा फारसा प्रयत्न केलेला दिसत नाही. उलट त्याच्या शिलालेखांत ब्राह्मण व श्रमण यांना मान व दान द्या असेंच सर्व लोकांस सांगितलें आहे. + पोर्तुगाल सारख्या आमच्या इलाख्यांतील दोन जिल्ह्यां एवढ्या छोट्याशा राष्ट्रांतील मूठभर लोकांनीं येथें येऊन लाखों लोकांना ख्रिस्ती केलें व अनन्वित जुलूम केले तरी रा. जोशी ह्मणणार कीं ख्रिस्त्यांचा जोर आमचेवर बोथट झाला ! पोर्तुगालच्या पडत्या काळांत एक वसईचा किल्ला घेण्याला मराठ्यांना आपली सर्वसंघटना व शक्ति दीर्घ काल खर्चावी लागली. इंग्लिश लोकांनीं तर प्रारंभीं मुळीं आपल्या राज्य कमावण्याच्या मार्गांत विघ्न येईल ह्मणून दूरदर्शीपणानें ख्रिस्ती मिशनऱ्यांना बिल्कुल हातपाय पसरूं दिले नाहींत, आणि मुसल्मानाप्रमाणें न वागतां राज्यकर्ते म्हणून ख्रिस्ती धर्माचा प्रसार करण्याला आपल्या लष्करी सामर्थ्याचा कधींच उपयोग केला नाहीं. तरी सुद्धां आज हिंदुस्थानांत सुमारें पाऊण कोटी ख्रिस्ती लोक आहेत. आमच्या धर्माच्या विरुद्ध अशी कोणतीहि राजसत्ता दोन हजार वर्षें तर कधींच नव्हती. अशोकाबद्दल वर सांगितलेंच आहे. मौर्यानंतर पुष्यमित्रानें स्थापिलेलें शुंगघराणें तर ब्राह्मणांचेंच होतें. कनिष्क हा बुद्धधर्मीय असला तरी त्या घराण्याचा अंमल उत्तर हिंदुस्थानाच्या सुद्धां फारच थोड्या प्रदेशावर होता. पुढें इ. स. ४ शतकापासून निदान दोनशें वर्षें गुप्तांचें बलाढ्य साम्राज्य होतें व तें तर ब्राह्मणधर्मीय होतें. सातव्या शतकापासून बाराव्या शतकापर्यंत बहुतेक सर्व हिंदुस्थानभर ब्राह्मणी धर्माचे राजे ( उदाहरणार्थ, दक्षिणेंत पल्लव, चालुक्य, राष्ट्रकूट वगैरे ) होते. तेव्हा दोन हजार वर्षें राजसत्ता विरुद्ध धर्माची असूनही ब्राह्मणीधर्म टिकला हें जोशांचें विधानच मुळीं खरें नाहीं. बौद्ध धर्माचें उच्चाटन करितांना बुद्धाला विष्णूचा अवतार म्हणून शरण जावें लागलें व गौतम बुद्धानें ज्या गोष्टींविरुद्ध मुख्य बंड पुकारलें त्यांतील दोन तरी

+ अशोकाचें तिसरें शैलशासन ‘ ब्राह्मणसमणानं साधु दानं ’; आठवें शैलशासन ‘ सा धम्मयाता एतयं होति ब्राह्मणसमनानां दसने च दाने च ’; ११ वें शासन ‘ ब्राह्मणसमण साधुदानं ’.

महत्त्वाच्या गोष्टी सोडून द्याव्या लागल्या. बुद्धाचा वर्णव्यवस्थेविरुद्ध कटाक्ष इतक्यापुरताच होता कीं ती निर्वाणाचे प्राप्तीला काहीं उपयोगी नाहीं. त्यानें जाति तर मोडल्या नव्हत्याच उलट तो आपल्याला क्षत्रिय व ब्राह्मण वर्गाहून श्रेष्ठ इतकेंच म्हणे. त्याचा मुख्य कटाक्ष श्रुतिचोदित यज्ञयागांवर होता. तो देव मानीत नव्हता किंवा त्याची पर्वा करीत नव्हता, आणि सत्य, अहिंसा, दान, दम यांचा उपदेश करीत होता. वैदिक म्हणविणारांनीं यज्ञयाग बंद केले, अहिंसेचा जोरानें पुरस्कार केला ('अहिंसा परमो धर्मः' हें वाक्य महाभारतांत शंभरदां तरी आलें असेल), कलियुगांत यज्ञयाग, तपश्चर्या, ज्ञान वगैरे सर्वांपेक्षां दानधर्मच श्रेष्ठ होय, असें मनूसारखे वैदिक धर्मानुयायीहि म्हणूं लागले तेव्हा बुद्ध पंथाचें उच्चाटन झाल्यासारखें दिसत आहे खरें ! जर बुद्धधर्माचें उच्चाटन झालें असेल तर श्रुतींनीं सांगितलेल्या धर्माचेंही आज आमच्यांत बहुतेक उच्चाटन झाले आहे. ऋग्वेद, यजुर्वेद इत्यादि संहिता, ऐतरेय शतपथ इत्यादि ब्राह्मणें यांचे प्रवर्तक वसिष्ठ वामदेवादि ऋषि जर आज भरतखंडांत एकदम अवतरले तर त्यांना या दोन हजार मैल लांबी रुंदीच्या देशात त्याच्या काळचा वैदिक धर्म व श्रौतयागच दिसतील काय ? ग्रीक व रोमन लोक विनाश पावले, आमचा समाज मात्र अजून जिवंत आहे अशी प्रौढि रा. जोशी यांनीं मारिली आहे (पान ३१३ ' संस्कृतिप्रधान हिंदुधर्मशास्त्र मानवांची सर्व दृष्टीनें व्यवस्था पहात असल्यामुळें हिंदु संस्कृति जगतीतलावरून नष्ट होत नाहीं'), पण हा त्यांचा निव्वळ भ्रम आहे. जितक्या अर्थानें आम्ही जिवंत आहों व आमची संस्कृति जिवंत आहे बहुतेक तितक्याच अर्थानें रोमन लोक व त्यांची संस्कृतीहि जिवंत आहेत. दोघांना सारखें माप लावा म्हणजे खरा प्रकार काय तो दिसेल. रोमन लोकांचें साम्राज्य लयास गेलें तर हिंदूंचेंहि केव्हांच लयास गेलें आहे. रा. जोशीच म्हणतात कीं मुसलमानांची सत्ता या देशावर पाचशें वर्षे होती व आता ब्रिटिशांचीं दीडशें वर्षें आहे. रोमन लोक ज्या इटालींत होते तेथें आता लॅटिन भाषा बोलत नाहींत. पण या भरत खंडांत तरी पाणिनीची दैवी वाक् कितीसे लोक बोलत आहेत ? आमच्यांतील आजच्या हिंदी, बंगाली, गुजराथी, मराठी, इत्यादि संस्कृतसंलग्न भाषा व तामीळ, तेलगू, कानडी इत्यादि द्राविड भाषा बोलणारे सर्व लोकहि जर प्राचीन वैदिक आर्यांचेच वंशज म्हणावयाचे तर इटालियन, फ्रेंच, पोर्तुगीज इत्यादि लॅटिन भाषेशीं अत्यंत जवळ असलेल्या भाषा बोलणारे लोकही रोमन लोकांचे वारस कां नव्हत? इटालियन लोकांनीं ख्रिस्ती धर्म स्वीकारिला. या भरतखंडांत काय हालहवाल आहे ? वसिष्ठ वामदेव जर भरतखंडभर दृष्टि टाकतील तर सुमारें तृतीयांश लोक वैदिक धर्माशीं वितुष्ट असलेले (मुसलमान ख्रिस्ती वगैरे) त्यांना दिसतील आणि रा. जोशांसारख्या सनातन्यांना तरी वैदिकधर्मीय म्हणून ते ओळखतील काय ? इन्द्र, वरुण, अश्विनौ, यांची देवळें त्यांना दिसतील काय? राजसूय, वाजपेय असले श्रौतयाग त्यांना आढळतील काय ? श्रौतयाग जाऊं द्या; परंतु गृह्याग्निपरिचरण सुद्धां साऱ्या त्रैवर्णिकांत राहोच

पण ब्राह्मणांत तरी त्यांना कितीसें दिसेल ? तात्पर्य आह्मी जिवंत आहों, बाकीचे मोठे म्हणविणारे लोक मेले, या रा. जोश्याच्या प्रौढींत मला तरी विशेष अर्थ दिसत नाहीं. आधीं आह्मी जिवंत आहों तें आमच्या जातिसंस्थेमुळेंच आहों आमच्या प्रचण्ड संख्येमुळे किंवा अन्य कारणांनीं नव्हे असें मानावयाला कांहीं प्रमाण नाहीं, पण जातिसंस्थेमुळेंच आम्ही जिवंत आहों असें कबूल केलें तरी त्यामुळें विशेष प्राशस्त्य काय ? नुसतें जिवंत राहून काय उपयोग ? रा. जोशी म्हणतात त्याप्रमाणें शेंकडों वर्षें परसत्तेंत खितपत पडून रहाण्यापेक्षां चारपांचशें वर्षें चमकून मरणें चांगलें असें पुष्कळांस वाटतें. जातिसंस्थेनें आमच्या समाजाला झुरुमुरु असें जिवंत ठेविलें असेल. पण आमचें प्रचण्ड संख्याबल व आमची बुद्धि मोठी असूनही इतरांवर आपली मात करण्याचें राहोच पण आम्हांला परसंस्कृतीचा जयिष्णु रीतीनें नुसता प्रतिकार कां करितां आला नाहीं ? याचें कारण सांगतां आलें पाहिजे. जातिसंस्थेमुळें व आमच्या इतर दोषांमुळें आमची नेहमी विघटना असते, वळकट संघटना होत नाहीं, एकमेकांबद्दल आपलेपणा वाटत नाहीं असें बऱ्याच लोकांस वाटतें त्यांत मुळींच तथ्य नाहीं काय ? फार लांबच्या किंवा प्राचीन गोष्टी कशाला ? नुकत्याच झालेल्या राउण्डटेबल कॉन्फरन्समध्यें आगाखान पासून बडेभाई व जिना पर्यंत सर्व महंमदीयांचें एकमत दिसून येई तर आमचे एकमेवाद्वितीय पुढारी गांधीजी व दुसरे हिंदु पुढारी गेले होते त्यांचें तसें नव्हतें; त्यामुळें हिंदूंची काय वाताहात झाली आहे तें आपण पहातच आहों.

रा. जोशी विचारतात ' पराभूत संस्कृति ही जेत्या संस्कृतीपेक्षां नेहमीच हलकी असते काय '? ( पान ३६ ) व पुढें ते ह्मणतात, ' विजय हा वंशाच्या श्रेष्ठत्वाचा पुरावा होऊं शकत नाहीं. विजयश्री ज्याच्याजवळ संहारक श्रेष्ठ हत्यारें असतील त्यांनाच माळ घालील. परन्तु श्रेष्ठ हत्यारें असणें हें कांहीं वंशाच्या श्रेष्ठत्वाचें लक्षण नव्हे. श्रेष्ठ हत्यारें मिळण्यामध्यें बुद्धि इतकें नशीबाचेंहि अंग असतें '(पान ३७). पराभूत संस्कृति नेहमीच जेत्या संस्कृतीपेक्षां हलकी नसेल, कांही बाबतींत श्रेष्ठहि असेल, त्याचप्रमाणें विजयाचा वंशश्रेष्ठत्वाशीं दृढ संबन्ध नसेल असेंही मानूं. परन्तु कांहीं बाबतींत वंशानें व संस्कृतीनें श्रेष्ठ असलेल्या समाजानें आपल्यांत असलेलें वैगुण्य अनेक वेळां तडाखे खाऊनहि कां दूर करूं नये ? ज्या बाबतींत वैगुण्य असेल त्या बाबतींत तर जित संस्कृति जेत्या लोकांपेक्षां कनिष्ठ होतीच. रा. जोशी म्हणतात त्याप्रमाणें दोन हजार वर्षें विरोधी राजसत्ता वंशानें श्रेष्ठ, संस्कृतीनें श्रेष्ठ व संख्याबलानें फारच श्रेष्ठ अशा आमच्या समाजानें कां सहन केली ? हे नुसतें दैवाचेंच दुर्विलसित काय ? दैवानें एखादेवेळीं खो दिला असेल, पण दोन हजार वर्षें सारखें दैव आमचे पाठीस हात धुवून लागलें आहे काय ? आमच्या लोकांनीं आत्मवंचना करून घेऊं नये म्हणून इतका विस्तार व इतकी स्पष्टता या मुद्याची करावी लागली. चाणक्यानें म्हटल्या-

प्रमाणें ' दैवमविद्वांसः प्रमाणयन्ति ' ( मुद्राराक्षस अंक ३ ). गीतेनें सुद्धां दैव सर्व शक्तिमान् मानलें नाहीं. पांच कारणांत तें एक व शेवटचें (पहिलें नव्हे) कारण आहे.

## रा. जोश्यांची बौद्धिक गुलामगिरी

रा. जोशी यांनीं पाश्चात्त्यांचे ग्रंथांबद्दल आपलें मत पृष्ठ ३५७ वर असें दिलें आहे कीं, ' पाश्चात्य पंडित गोळा करितात तेवढीं माहिती घ्यावी; परंतु त्यावरून त्यांनीं काढलेलीं अनुमानें घेऊं नयेत. याचें कारण असें कीं, स्वतःच गोळा केलेल्या माहितीच्या आधारें जे कांहीं समाजविषयक सिद्धान्त प्रतीत होतील, ते छातीठोक मांडण्याची हिंमत त्यांच्यामध्यें आलेली नसते. ' या वाक्यांत रा. जोशी यांनीं सुरवात ठीक केली आहे; परंतु मला कष्टानें म्हणावें लागतें कीं, तींत त्यांनीं केलेला बहुमोल उपदेश ते स्वतः मात्र अनुसरले नाहींत. त्यांनीं पाश्चात्त्यांचे सिद्धान्त जसेच्या तसेच घेऊन ते ज्या ठिकाणीं लागत नाहींत तेथेंहि लावले आहेत, व ते सिद्धान्त खरे धरून आमच्या प्राचीन ग्रंथांचे अर्थही भलतेच केले आहेत. जीवनशास्त्राच्या संस्थापकांत डार्विन हा अग्रगण्य होय. त्याचा ग्रंथ १८५९ मध्यें प्रसिद्ध झाला म्हणजे पाऊणशेंच वर्षें झालीं. त्यानंतर मेन्डेलनें सिद्धान्त काढले ते वाटाण्याच्या निरनिराळ्या जातींचीं कलमें करून त्याबद्दलच काढले आहेत. ते सिद्धान्त मनुष्यप्राण्यांना लागू करण्यांत अडचणी आहेत. मनुष्यप्राण्याला ईश्वरानें मोठी बुद्धि दिली आहे; आपली स्थिति बदलून आपणांत आपल्या इच्छाशक्तीनें फरक घडवून आणण्याची प्रचंड धडपड करण्याचें मनुष्याला सामर्थ्य आहे, मनुष्यप्राण्याला हजारों वर्षें शिक्षण मिळत आहे, व त्याची परिस्थिति भिन्न होत आहे अशा अनेक कारणांमुळें वाटाण्याचे सिद्धांत मनुष्याला लावतांना फार विचार व शोध करावा लागेल. गाल्टननें मनुष्यांच्या आनुवंशिक बुद्धिमत्तेसंबंधानें अनुमानें काढलीं आहेत तीं आधीं फक्त पाश्चात्य समाजाबद्दल ( व त्याला विशेष परिचित असलेल्या इंग्लिश समाजाबद्दल ) आहेत. पाश्चात्य समाजांत निदान हल्लीं तरी जन्मसिद्ध जाति ( castes ) नाहींत, वर्ग आहेत पण ते आमच्याकडे रोटीबंद व बेटीबंद अशा जातिउपजाती आहेत तसे कडक नव्हते व नाहींत. तेव्हां त्यांनीं काढलेले सिद्धांत आमचेकडे लावतांना फार जपून वागलें पाहिजे. रा. जोशी यांनीं जो शेंकडों पाश्चात्य ग्रंथकारांचा पसारा मांडला आहे त्याचा इत्यर्थ थोडक्यांत असा दिसतो कीं प्रबल म्हणजे जीवनक्षम संघ किंवा गट हेच सृष्टीच्या प्रक्रियेंत शिल्लक राहतात, कांहीं श्रेष्ठ गटांत उत्तम गुण असतात, त्यांच्या स्वतंत्र जाति बनणें हें समाजाच्या दीर्घ जीवनाच्या दृष्टीनें श्रेयस्कर आहे म्हणून जातिसंस्था चांगली, इत्यादि. पण या तत्त्वांनीं आमच्यांतील तीन हजार उपजाती शिल्लकच ठेविल्या पाहिजेत हें कसें सिद्ध होतें तें कळत नाहीं. रा. जोशी यांच्या प्रमाणभूत नामावळींतील एकाहि ग्रंथकारानें आमच्या तीनहजार जातींचें ( किंवा त्यांतील दहा पांच जातींचें सुद्धां ) जीवनशास्त्राच्या दृष्टीनें परीक्षण केलेलें नाहीं, इतकेंच नव्हे तर त्यांतील कोणीहि तान

हजार उपजाति असाव्या असें म्हणत नाहीं. जोशीबोवांचा परात्पर गुरु जो नीत्शे तो तर तीनच जाति वर्णन करितो. तीन जातींना आम्ही हरकत घेतली नसती. पण मूळच्या चार वर्णांच्या चार हजार जाती झाल्या याला पाश्चात्य किंवा पौरस्त्य कोणत्या जीवनशास्त्राचा व सुप्रजाजननशास्त्राचा आधार आहे ? आणि ह्या हजारों जाति जर निसर्गनियमांप्रमाणें झाल्या व होणें फायदेशीर आहे, त्यांनीं त्या त्या उपजातींतील श्रेष्ठ गुणांची जोपासना होत असेल तर चार हजारांच्या चाळीस हजार करणें हें समाजाच्या जास्त फायद्याचें होईल असें प्रतिपादन रा. जोशी यांनीं केलें पाहिजे. रा. जोशी यांना 'मद्रासी ब्राह्मण आणि मराठा ब्राह्मण यांचें विवाहानें एकीकरण होणारहि नाहीं आणि होणें इष्टहि नाहीं' (पृष्ठ ४१८) व 'उपजातींच्या एकीकरणानें समाजाचें हित होईल असें मानण्याला शास्त्रीय दृष्ट्या तरी कांहीं कारण सांगतां येणार नाहीं' (पृष्ठ ४१९) असें वाटतें. त्यांचा हा सिद्धान्त व 'भौगोलिकदृष्ट्या विचार करूं लागलें तर एका अक्षांशांत रहाणाऱ्या व्यक्तींच्या शुक्रबिंदूंतील जीवनगोलकांची निवड ज्या तऱ्हेनें होईल त्याच तऱ्हेनें दुसऱ्या अक्षांशांत रहाणाऱ्या व्यक्तींच्या जीवनगोलकांची निवड होत जाईल असें नव्हे...म्हणून आम्ही म्हणतों कीं भौगोलिक फरक हे विवाहाचा विचार करताना लक्षांत घ्यावयास पाहिजेत, मग आमच्या जंहाल सुधारक बंधूंना कांही वाटो' (पान २२६) हें मत एकत्र करून असा सिद्धान्त प्रस्थापित होऊं लागतो कीं, राजापूरच्या चित्पावनांचे अलिबागच्या किंवा नागपूरच्या चित्पावनांशीं मुळीच विवाह होतां कामा नयेत व चित्पावनांत आणखी पाचदहा पोट जाती जर उत्पन्न होतील तर वंशरक्षणाच्या व गुणोत्कर्षाच्या दृष्टीनें तें श्रेयस्कर होईल ! खरें पाहिलें तर, पाश्चात्य जीवनशास्त्रज्ञांतच मुळीं महत्त्वाच्या बाबतींत एकमत नाहीं; व हें पहावयास जोशीबोवांचे ग्रंथापलीकडेहि जावयास नको. रा. जोशी लिहितात (पृष्ठ ४०२) "पहिल्या मुद्द्यासंबंधीं डॉ. लोट्झी ह्मणतो 'डार्विनच्या मनामध्यें या बाबतीत गोंधळ झालेला दिसतो.'" आतां डार्विनचा गोंधळ झाला आहे कीं लोट्झीचा झाला आहे व या दोघांनीं मिळून रा. जोशी यांचा गोंधळ केला आहे तें परमेश्वर जाणे ! जीवनशास्त्राचे व सुप्रजाजननाचे सिद्धान्त अजून बाल्यावस्थेंत आहेत. पृथ्वीच्या पाठीवरील अनेक वंशांचें व त्यांच्या गुणांचें वगैरे शास्त्रीय परीक्षण अजून व्हावयाचें आहे तेव्हां हल्लींच पाश्चात्यांनीं काढलेल्या सिद्धान्तांना उराशीं धरणाऱ्या रा. जोशांनीं मिल्ल वगैरेंचीं तत्वज्ञानें उराशीं धरणाऱ्या आपल्या सारख्याच पाश्चात्त्य गुरु करणारांना कां हसावें तें कळत नाहीं. रा. जोशी बजावितात, 'यापुढील सर्व चर्चा गणितागत पद्धतीनें (Statistical method) व्हावयास पाहिजे' (पृष्ठ ७९). आमची त्याला ना नाहीं. रा. जोशी यांचें सर्व पुस्तक वाचलें तरी त्यांनीं आपल्या या अफाट देशांतील एखाद्या चिमुकल्या संघाचें किंवा उपजातीचें या पद्धतीनें निरीक्षण केल्याचें दिसत नाहीं, आणि जेथें त्यांनीं कांहीं उदा-

हरणें दिलीं आहेत तेथें गणितागतपद्धति नसून हास्यास्पदपद्धति आहे. श्रीशिवाजी महाराजांच्या घराण्याचा शाहूनंतर निर्वंश झाला, व त्यांच्याच भाऊबंद पण राजे न झालेल्या भोसले शाखांचा झाला नाहीं, याची चर्चा करून रा. जोशी सिद्धान्त सांगतात ( पृष्ठ १६१ ) ' जात्यन्तर न होतां नुसतें एका थरांतून एखादें घराणें दुसऱ्या थरांत प्रविष्ट झाल्यास त्याचा नाश होतो. त्या घराण्याच्या ज्या शाखांनीं वर्गान्तर केलें नसेल, त्या मात्र भरभराटलेल्या दिसतात. ' रा. जोशी यांस काय सिद्ध करावयाचें आहे व तें एकमेव उदाहरणावरून कसें सिद्ध होतें हेंच कळत नाहीं. याच्या पूर्वीचें वाक्य असें आहे ' हिंदुस्थानांत देखील हा वर्णान्तराचा प्रयोग जेथें जेथें झाला. तेथें तेथें हाच परिणाम ( म्हणजे निर्वंश ) झाला. ' रा. जोशी यांस असें म्हणावयाचें आहे काय कीं, शिवाजी हा शूद्र होता, व तो राजा म्हणजे क्षत्रिय झाला ( त्यानें वर्णान्तर केलें ) म्हणून त्या घराण्याचा नाश झाला ? याशिवाय या उदाहरणाची आवश्यकता दिसत नाहीं. राजकीय अधिकार निदान सरदारी तरी मालोजी शहाजीहि बजावीत होते. शिवाजी महाराजांनीं मोंगलांची सरदारी न करितां स्वतंत्र राज्य स्थापल्यामुळें हा परिणाम झाला काय ? बरें या एका उदाहरणानें रा. जोशी यांचा जगड्व्याळ सिद्धान्त गणितागत पद्धतीनेंच येतो काय ? भोंसल्यांच्या घराण्यांत दुसऱ्या कोणत्याच शाखेचा राजेपणा न घेतांहि निर्वंश झाला नाहीं, याला काय पुरावा रा. जोशी यांचे जवळ आहे ? शिवाजी महाराजांच्या पूर्वीच्या पांचदहा पिढ्यांपासून भोसल्यांच्या सर्व शाखांचे वंशवृक्ष आजपर्यंतचे त्यांनीं तपासले काय ? शाहू मोंगलांकडे राहून ऐषआरामी, स्त्रैण, व्यसनी बनला म्हणून तो निपुत्रिक झाला कीं, तीन पिढ्या राज्य भोगल्यामुळेंच झाला, याबद्दल रा. जोशी यांनीं काय चिकित्सा केली आहे ? रा. जोशी यांचें दुसरें उदाहरण भट पेशव्यांचें. ' या घराण्याच्या इतर शाखा अजूनहि कोंकणांत अगर इतरत्र सुखानें नांदत आहेत. परंतु जेवढी शाखा राज्यारूढ झाली तेवढीच शाखा सृष्टींतून नाश पावली. परंतु सृष्टीचे नियम मोडल्यास त्याचें फळही मिळणार ' ( पृष्ठ १६१–१६२ ). असलें अशास्त्रीय विवेचन गणितागत पद्धतीच्या (Statistical method) बढाया मारणारानें करावें याचें आश्चर्य वाटतें. रा. जोशी वर्णान्तरानें घराणीं धुळीस मिळाल्याचें सांगत आहेत. पण भट पेशव्यानें वर्णान्तर केलें म्हणजे काय केलें ? ब्राह्मणाचा दर्भ टाकून तरवार धरिली म्हणजे क्षत्रियाचा धंदा स्वीकारला कीं लागलेंच वर्णान्तर झालें कीं धंदान्तर ( दुसरा धंदा ) झालें ? मनूनें सुद्धां ब्राह्मणांनीं कांहीं प्रसंगीं शस्त्र घेण्याला हरकत नाहीं व आपत्काळीं ब्राह्मणांनीं क्षत्रिय–वैश्यांचे सुद्धां धंदे करावे असें म्हटलें असून गौतमापस्तम्बवसिष्ठादि सर्व स्मृतिकारांनींहि तसेंच सांगितलें आहे.

तेव्हां नुसता धंदा बदलला यांत सृष्टीचा नियम काय मोडला ? रा. जोशी यांची सर्व मदार डार्विन व त्याचे चेले यांवर आहे. पण डार्विननें माकडाचीं माणसें बनलीं

असें सांगितलें आहे. माकडांनीं रानातील पानें व फळें ओरबडण्याचा धंदा सोडून दिल्याबरोबर सृष्टिनियम मोडला गेला तरी त्या माकडांचा निर्वंश न होतां चांगलीं उत्तम समाजरचना करणारी नीत्शेसारखीं व 'हिंदूंच्या समाजरचनाशास्त्रा' सारखे ग्रंथ लिहिणारीं रा. जोशी यांच्यासारखीं माणसें बनूं लागलीं. बाळाजी विश्वनाथाच्या दहा पिढ्या पूर्वीपासून आज तागायत भट घराण्याचा इतिहास रा. जोशी यांस विदित आहे काय ? त्या घराण्यांतील सर्व शाखा विद्यमान आहेत हें कशावरून ? कांहीं भट घराणीं श्रीवर्धन वगैरेकडे आहेत म्हणजे सर्वच आहेत काय ? रा. जोशी नुसते पुस्तकपंडित दिसतात. ते जर खेडेगांवांत जाऊन पिढ्यान्‌पिढ्या एकच धंदा करणाऱ्या एकाच जातींतील दोनशें वर्षांपासून आज पर्यंतच्या पंचवीस घराण्यांचा गणितपद्धतीनें (Statistical method) शोध घेतील तर त्यांना असें दिसून येईल कीं अशा प्रत्येक घराण्यांत अनेक शाखा—उपशाखांचा निर्वंश झाला आहे. अशीं घराणीं कित्येक मला माहीत आहेत व कोणीही घरांत बसून न रहातां माहिती मिळविण्याची खटपट करील तर त्यालाहि आणखी सांपडतील. रा. जोशी यांचें आणखी एक मौजेचें उदाहरण घेऊं. इंग्लंडमध्यें न्यायाधीशाचें काम उत्तम केल्यामुळें राजानें सरदारकी देऊन एकतीस सरदार घराणीं नवीन निर्माण केली, त्यांतील बहुतेक सर्वांचा निपुत्रिक लक्षाधीशांच्या किंवा सरदारांच्या घराण्यांशीं शरीरसम्बन्ध केल्यामुळें दुसऱ्या तिसऱ्या पिढींत निर्वंश झाला असें गाल्टननें सिद्ध केलें आहे असें रा. जोशीबुवा सांगतात ( पृष्ठ १५९–१६० ). पण ह्या उदाहरणानें वर्णान्तर किंवा धंदांतर केल्यानें वंशनाश होतो हें कसें सिद्ध होतें, तें एक रा. जोशीच जाणोत. अल्पप्रज्ञ असणाऱ्या घराण्याशीं विवाह करूं नये इतकें फार तर यावरून अनुमान काढतां येईल. पण यांत वर्णान्तर कसें झालें ? नामधारी सरदार असलेल्या न्यायाधीशांनीं म्हणजे ( मनूचे भाषेंत बोलावयाचें असें रा. जोशी म्हणतील तर ) इंग्लंडांतील ब्राह्मणांनीं खऱ्या सरदारांशीं ( क्षत्रियांशीं ) किंवा लक्षाधीशांशीं ( वैश्यांशीं ) शरीरसम्बन्ध केल्यामुळें त्याचा वंश नाश झाला असें त्यांना म्हणावयाचें आहे काय ? रा. जोशी यांनींच वारंवार एक सुंदर वाक्य सांगितलें आहे कीं, 'दोन गोष्टींचें कधीं कधीं एका ठिकाणीं साहचर्य सांपडलें तर त्यांच्यामध्यें कार्यकारणभाव सिद्ध होतो असें नाहीं' (पृष्ठ ३२२ व ४१७). आम्हांला हें वाक्य अगदीं मान्य आहे. त्याचप्रमाणें रा. जोशी यांनाहि अन्वयपद्धति व व्यतिरेकपद्धति (Method of agreement and method of difference) ते कॉलेजमध्यें पाश्चात्य तर्कशास्त्र (Logic) शिकले असल्यामुळें माहिती आहे ( पृष्ठ३६१ व ४१५).तेव्हां आतां आपण वरील ३१न्यायाधीशांच्या निपुत्रिकत्वाची रा. जोशीबोवांना माहीत असलेल्या वरील दोन पद्धतींनीं परीक्षा करूं. इंग्लंडांत लॉर्ड बनविलेले न्यायाधीश गेल्या दोनशें वर्षांतसुद्धां ( सन १६६० ते १८६५ ) २८६ आहेत नुसते ३१ नाहींत हें गाल्टननेंच आपल्या 'आनुवंशिक बुद्धिमत्ता' ( Hereditary genius)

या ग्रंथांत सांगितलें आहे. त्यांच्या सर्वांचे बाबतींत निर्वंशता किंवा अनिर्वंशता पाहिली पाहिजे. एकतीस जणांत लक्षाधीशांच्या मुलींशीं विवाह केल्यामुळें निर्वंशता आली असें दाखवितांना दुसऱ्या कोणाही बाकीच्या न्यायाधीशांत तसें न केल्यामुळें निर्वंशता आली नाहीं असें व्यतिरेकानें ( Method of difference ) दाखवितां आलें पाहिजे, तरच उपपत्ति संभावि (Probable) होईल, ती निश्चित सिद्ध झाली असें म्हणतांच यावयाचें नाहीं. त्यासाठीं प्रत्येकाचे विवाहसंबंधच नुसते पाहून चालणार नाहींत, तर दुसऱ्या अनेक गोष्टी म्हणजे त्यांची ऐषआरामी रहाणी, त्यांना व्यसनें होतीं काय, त्यांना उपदंशासारखे रोग झाले होते काय वगैरे पहाव्या लागतील. परंतु पाश्चात्य पंडितांच्यावर विश्वसून सुधारणा करूं पहाणाऱ्या आपल्याच पदवीविभूषित बांधवांवर कोरडे ओढणाऱ्या रा. जोशी यांची बौद्धिक गुलामगिरी तसल्या बांधवांपेक्षांही जास्त आहे. वर उद्धृत केल्याप्रमाणें गाल्टनचीं उदाहरणें घेऊन छातीठोकपणें त्याला त्यांनींच सांगावयास पाहिजे होते कीं, तुझा असा सिद्धान्त असेल तर तो व्यतिरेक पद्धतीनें (method of difference ) जुळत नाहीं; पण पाश्चात्य गाल्टन जीवनशास्त्रज्ञ त्याचें अनुमान बरोबर असलेंच पाहिजे, ही बौद्धिक गुलामगिरी रा. जोशी यांनाही सुटली नाहीं ! गाल्टनच्या ग्रंथांत हा सिद्धान्त ( ३१ सरदार न्यायाधीशांचा ) आमचे पहाण्यांत आला नाहीं. रा. जोशी यांनीं तो कोणत्या पानांत गाल्टननें काढला आहे तें सांगावें. आमची नजरचूक असेल तर दाखवावी. त्यानें दिलेल्या कांहीं माहितीवरून रा. जोशी यांनींच तो स्वतां काढला आहे, अशी माझी कल्पना आहे. गाल्टननेंच वरील ग्रंथाच्या ८७ पानावर वरील २८६ न्यायधीशांचे बाप काय धंदे करीत होते तें पाहून असा निर्णय दिला आहे कीं, अमक्या वर्गांतून ( म्हणजे जमीनदार, कायदेपंडित, धर्मोपदेशक, व्यापारी वगैरे ) न्यायाधीश शेंकडा जास्त येतात असें दिसत नाहीं. सर्व वर्गांतून सारखेच उत्तम न्यायाधीश येतात. दोनशें वर्षांत ३० लॉर्ड चॅन्सेलर ( म्हणजे इग्लंडांतील सर्वश्रेष्ठ न्यायाध्यक्ष ) झाले, त्यापैकीं एक न्हाव्याचा मुलगा होता, एक कोळशांत काम करणाराचा होता, एक शेरिफ क्लार्कचा मुलगा होता, एक प्रथम सैन्यांत व आरमारांत स्वतां काम करून मग कायद्याकडे वळला आणि एक स्वतांच प्रथम खलाशाचें काम शिकत होता.

## वडाची साल पिंपळाला !

पाश्चात्त्यांपासून आनुवंशाचे सिद्धान्त घेतल्यावर रा. जोशी यांनीं ते मनूच्या गळ्यांत बांधले आहेत. रा. जोशी यांचें सूत्र असें आहे ‘ चातुर्वर्ण्य हें प्रकृतिविशेष म्हणजे पिंडाचे नैसर्गिक गुणधर्म ( eugenic ) आणि संस्कार म्हणजे सामाजिक संकेतांत उत्पन्न होणारे संस्कार ( Psychological ) ह्या दोहोंच्या यौगपद्यांत सिद्ध होत असतें ’ ( पृष्ठ १७८ ). नंतर जूलियन हक्स्ले, चॅटर्टन हिल वगैरे बड्या पाश्चात्यांची मतें यांची मीमांसा झाल्यावर ते बिचाऱ्या मनूकडे वळतात व म्हणतात, ‘ मनु

म्हणतो—वैशेष्यात् प्रकृतिश्रेष्ठयात् नियमस्य च धारणात्। संस्कारस्य विशेषाच्च वर्णानां ब्राह्मणः प्रभुः ॥ १०. ३. येथें निसर्गगुण व संस्कार या दोहोंचीही महती सांगितली आहे ' ( पृष्ठ १८८ ). मनूच्या शब्दांचे अर्थ करावयाचे तर त्याच्या टीकाकारांनीं ( हे सर्व सनातनधर्माच्या परंपरेंत वाढले असून मीमांसक होते, आणि त्यांना विकृत पाश्चात्य शिक्षणाचा स्पर्शही झाला नव्हता ) त्यांचे अर्थ काय केले आहेत हें प्रथम पाहून नंतर मनूप्रमाणें प्राचीन गौतम आपस्तम्ब इत्यादि धर्मसूत्रकार त्याच विषयावर काय म्हणतात तेंहि पाहिलें पाहिजे, असें मला ( जरी बरेच लोक मला सनातनी म्हणण्याला कबूल नसतील तरी ) वाटतें. जुलियन हक्स्ले, नीत्शे वगैरेंचे अर्थ मग त्याच्यावर लादावयाचे कीं काय तें पाहतां येईल. वर जो श्लोक मनूचा घेतला आहे, त्याचेबरोबर मनूचे आणखी दोन श्लोक पहावे म्हणजे बरें. ' ऊर्ध्वं नाभेर्मेध्यतरः पुरुषः परिकीर्तितः। तस्मान्मेध्यतमं त्वस्य मुखमुक्तं स्वयम्भुवा ॥ उत्तमाङ्गोद्भवाज्ज्यैष्ठयात् ब्रह्मणश्चैव धारणात्। सर्वस्यैवास्य सर्गस्य धर्मतो ब्राह्मणः प्रभुः॥' मनुस्मृति १, ९२–९३. ह्या दोन श्लोकांचा अर्थ : नाभीच्या वरचा पुरुषाचा देह जास्त पवित्र असें ह्मटलेलें आहे. पण त्यापेक्षांही पुरुषाचें मुख जास्त पवित्र असें स्वतः ब्रह्मदेवानें सांगितलें. उत्तमांगापासून जन्म झाल्यामुळें, ज्येष्ठत्वामुळें, वेदविद्येचें धारण करीत असल्यामुळें ह्या सर्व सृष्टीचा धर्मानुशासनाचे विषयांत ब्राह्मण हा प्रभु आहे'. येथें दोन श्रुति लक्षांत ठेविल्या पाहिजेत, त्या अशाः—' ब्राह्मणोस्य मुखमासीत् ' ( पुरुषसूक्त ) व ' ब्रह्म वा इदमग्र आसीत् ' ( ब्राह्मण हा प्रथम उत्पन्न झाला ). पहिल्या श्रुतीप्रमाणें ब्राह्मण हा परमेश्वराच्या उत्तमांगापासून उत्पन्न झाला व दुसऱ्या श्रुतीप्रमाणें ब्रह्मदेवानें चार वर्णांत प्रथम ब्राह्मणाला उत्पन्न केलें व ब्रह्म म्हणजे वेद यांचें धारण ( म्हणजे अध्ययन व अध्यापन किंवा प्रवचन हीं दोन्ही ) तो करीत असल्यामुळें धर्म काय हें ब्राह्मणानें सांगावें व इतरानीं तें ऐकून त्याला मान द्यावा असा मनु १. ९३ चा अर्थ आहे. या श्लोकांत ब्राह्मणाच्या प्रभुत्वाचीं तीन कारणें सांगितलीं आहेत, मनु १०. ३ ह्या श्लोकांत चार कारणें सांगितलीं आहेत; त्यांत ' संस्कारस्य विशेषात् ' हें जास्त आहे. मनु १०. ३ मधील पहिलीं तीन कारणें हीं मनु १. ९३ मधीलच आहेत. मेधातिथीपासून नन्दनापर्यंत मनूच्या छापी सात टीकाकारांनीं ' प्रकृति म्हणजे कारण म्हणजे ईश्वराच्या मुखापासून उत्पत्ति ' व ' संस्कार ' म्हणजे उपनयन ' असा अर्थ दिला आहे × (टीकांतील महत्वाचा भाग टीपेंत दिला आहे ). फक्त एकानें ' संस्कार ' ह्मणजे ' सोमपानाचा व संन्यासाचा अधिकार असणें ' असा अर्थ केला आहे. मनु १. ९३ मध्यें

× मनु १०. ३ वर मेधातिथि म्हणतो 'वैशेष्याद्विशिष्टत्वादित्यर्थः। गुणाधिक्यादिति यावत्। तदिदानीमाधिक्यमाह। प्रकृतिश्रेष्ठयादुत्तमाङ्गोद्भवादिदमुक्तम्। प्रकृतिः कारणम्। नियमस्य च धारणात् मद्यपानप्रतिषेधात्। अयमेव नियमोभिप्रेतः। स्नातकव्रतानि वा वैणवधारणादीनि ब्राह्मणस्यैव। संस्कारस्य च विशेषो हृदयंगमाभिरित्यादेरु-

' उत्तमाङ्गोद्भवात् ' असा स्पष्ट शब्द आहे त्या ऐवजींच ' प्रकृतिश्रेष्ठ्यात् ' असा मनु १०. ३ मध्यें शब्द आहे व असेंच मेधातिथिप्रभृति सर्व टीकाकारांनीं ठरविलें आहे. सर्व त्रैवर्णिकांना उपनयनादि संस्कार साधारणच आहेत पण ब्राह्मणाला आठव्या वर्षींच ( व त्याहूनही आधीं ) उपनयन सांगितलें व क्षत्रियांना आणि वैश्यांना अनुक्रमें ११ व्या व १२ व्या वर्षी सांगितलें ह्मणून ब्राह्मणांत संस्कारवैशिष्ट्य आहे. मनूनेंच ' प्रकृति ' हा शब्द 'उत्तमोङ्गोद्भव' या अर्थी योजिला आहे हें मनु १०. ३ व १. ९३ यांची तुलना करितां स्पष्ट दिसतें. याशिवाय इ. स. ९०० चे सुमारास झालेल्या मेधातीथि भाष्यकारापासून सर्वांनीं तो अर्थ घेतला आहे तेव्हां प्राचीनकाळच्या सर्व सनातन्यांचें मत ब्राह्मण ईश्वराच्या मुखापासून झाला ह्मणून धर्मशासनांत प्रभु असें होतें हें स्पष्ट आहे. ' नैसर्गिक गुणधर्म ' असा भौतिकशास्त्रांच्या भाषेचा वाससुद्धां मनु व त्याच्या टीकाकारांना आला नव्हता. तो रा. जोशी त्यांच्या गळ्यांत आतां नवीनच बांधीत आहेत. रा. जोशी यांनीं 'माझा तसा अर्थ आहे' असें पाहिजे तर खुशाल ह्मणावें.पण तो अर्थ ज्या गटांत ते शिंगें मोडून शिरूं पाहातात त्या सनातनी टीकाकारांना अमान्य होता इतकेंच मला दाखवावयाचें आहे.प्राचीन काळापासून 'प्रकृति ' म्हणजे ' कारण' असा अर्थ आहे. ' जनिकर्तुः प्रकृतिः ' असें पाणिनि म्हणतो, ' प्रकृतिश्च प्रतिज्ञादृष्टान्तानुपरोधात् ' असें ब्रह्मसूत्र म्हणतें, 'प्रकृतिः संस्कृतम् ' असें प्राकृत भाषांचा वैयाकरण वररुचि म्हणतो. रा. जोशी यांचा इंग्रजी ग्रंथांशीं परिचय, त्या मानानें ( सनातनी म्हणवीत असले तरी ) संस्कृत ग्रंथांचा अभ्यास बेताचा तेव्हां त्यांना त्यांचे आचार्य डार्विन, मेन्डेल, नीत्शे वगैरे वगैरे यांत origin of species हे शब्द दिसले व इकडे मनूंत 'प्रकृति' हा शब्द दिसला त्याचाही अर्थ origin आहे तेव्हां त्यांनीं डार्विनादि आपल्या लाडक्या आचार्यांची सर्व प्रक्रिया मनूच्या माथ्यावर मारली

## रा. जोशी यांची हातचलाखी

आपल्या आवडत्या सिद्धान्ताच्या समर्थनार्थ प्रसिद्ध श्लोकांचे अर्थ पालटण्याची हातचलाखी रा.जोशी कशी करितात याचें आणखी एक उदाहरण घेऊं. मनु १.११८हा श्लोक

---

पनयनादेर्बालस्यैव विधानात् । क्षत्रियवैश्ययोस्तु अतीतशैशवयोरेकादशद्वादशतोऽतो हेतोवर्णानां ब्राह्मणः प्रभुः...। '; सर्वज्ञनारायण ' प्रकृतेर्ब्रह्ममुखरूपोपादानस्य श्रेष्ठ्यात् ।...'; कुल्लूक ' जात्युत्कर्षात् प्रकृतिः कारणं हिरण्यगर्भोत्तमाङ्गरूपकारणोत्कर्षात् '; राघवानन्द ' प्रकृतिरुत्पत्तिस्थलम् । ब्राह्मणोऽस्य मुखमासीदिति श्रुतेः । संस्कारस्य सोमपात्वसंन्यासित्वस्य;' गोविन्दराज 'अत्रार्थवाद : । जात्युत्कर्षान्मुखोद्भवत्वेन च श्रेष्ठकारणजन्यत्वात् स्नातकस्य व्रतानां च करणात् संस्कारस्य चोपनयनाख्यस्य बालस्यैव विधानेन विशेषात् '.

असा आहे ' देशधर्मान् जातिधर्मान् कुलधर्मांश्च शाश्वतान् । पाषण्डगणधर्मांश्च शास्त्रेऽस्मिन्नुक्तवान्मनुः ॥ ' याचा सरळ अर्थ ' या शास्त्रांत (ह्मणजे मनुस्मृतीत ) मनूनें देशांचे, जातींचे, कुलांचे, पाखण्डमताच्या लोकांचे (किंवा पाखण्डांशीं वागण्याचे वैदिक धर्मीयांचे), व गणांचे ( वाणी उदमी लोकांचे जे संघ ) त्यांचे शाश्वत धर्म सांगितले. येथें धर्म ह्मणजे आचार व शाश्वत म्हणजे बराच काळ टिकणारे, क्षणोक्षणीं बदलणारे नव्हत, एवढाच अर्थ आहे. आतां रा. जोशी काय ह्मणतात तें पाहूं. ' ह्मणून येथें धर्म शब्दाचा अर्थ नैसर्गिक गुण असा घ्यावयास पाहिजे. पुनः निसर्ग देखील समाजशास्त्राकरितांच पहावयाचा असल्याकारणानें कोणता ( देश ? ) कोणत्या जातीच्या जीवनाला योग्य आहे त्याची विवेचना करणें हाच देशधर्म या पदाचा अर्थ घ्यावयाला पाहिजे; आणि आमच्या या ह्मणण्याला प्रत्यंतर पुरावा मनुस्मृतीमध्येंच ( मनु २.२१-२४ ) आहे ( पृष्ठ ९५ ). नंतर मॉडिसन ग्रॅन्ट, स्टाडर्ड, गेट्स, व्हेथम, मॅकब्राइड वगैरे ग्रंथकारांच्या पलटणीची फैर झडल्यावर रा. जोशी ठांसून सिद्धान्त सांगतात ' धर्मग्रंथांत जेथें धर्मशब्द येईल तेथें त्याचा अर्थ आचार असा नाहीं. एकंदर ग्रंथावरून ग्रंथ लावण्याचें आज जें खूळ माजलें आहे त्या नियमानें तर धर्म शब्दाचा आचार असा अर्थ घेतां येणारच नाहीं'; ( पृष्ठ १०० ) ''आमचे श्री. महादेव शास्त्री दिवेकर, तर्कतीर्थ कोकजे, महामहोपाध्याय गुरुवर्य श्रीधरशास्त्री पाठक हे तर आपणाला रोज सांगत आहेत कीं आचार परिवर्तनीय आहेत. मनु म्हणतो कीं ' जातिधर्म शाश्वत आहे '. आह्मी अज्ञ लोकांनीं सर्व गोंधळाचा अर्थ कसा लावावा ? आह्मांला असें वाटतें कीं धर्म म्हणजे त्या त्या जातीमध्यें दिसून येणारे नैसर्गिक गुणधर्म आणि जाति म्हणजे जन्मानें मनुष्याला प्राप्त होते ती. म्हणजे इंग्रजीमध्यें species. एवढें खरें कीं, मनु वर्णांचे आचार सांगतो तसे जातीचे आचार सांगत नाहीं ! कांहीं ठिकाणीं जातीचे धंदे सांगतो पण धंदे म्हणजे काहीं आचार नव्हेत (पृष्ठ १०६).' रा. जोशी यांच्या सर्व ग्रंथांचा झोक पहावा तर समाजशास्त्राचीं तत्त्वें व मनूचा अर्थ आमच्याकडे कोणाला समजला असेल तर त्यांना, बाकीचे महामहोपाध्याय तर्कतीर्थ वगैरे मंडळी ही काय नुसतीं बापुडीं. येथें विनयानें कां होईना, पण आपण अज्ञ आहों असें त्यांनीं म्हटलें आहे, व तें अगदीं खरें आहे. येथें गोंधळ झाला आहे खरा पण तो रा. जोशी यांच्या अज्ञत्वामुळें. मनूच्या अर्थाबद्दल ते अज्ञ आहेत; पण अज्ञ माणसें स्वतःच कांहींतरी तर्कट न रचितां दुसऱ्याला विचारतात. मनूचे सात टीकाकार छापलेले आहेत, त्यांना प्रथम विचारावयाला पाहिजे. तेव्हां एकंदर ग्रंथांवरून अर्थ लावण्याचें 'खूळ' न करितां फक्त या श्लोकांचा अर्थ टीकाकारांच्या आश्रयानें पाहूं. मेधातिथि इत्यादि सर्व टीकाकारांनीं देशादिकांतील धर्म म्हणजे त्या त्या देशांमध्यें त्या त्या जातीमध्यें व कुळांत आचरणांत येणारे ते असें स्पष्ट सांगितलें आहे. इतकेंच नव्हे तर कांहीं कांहीं टीकाकारांनीं ' होळी ' हा देशधर्म आहे, अध्यापन हा जातिधर्म आहे, सहाव्या

महिन्यांत अन्नप्राशन हा कुलधर्म आहे असें विशेषेंकरून सांगितलें आहे. + 'होळी', इत्यादि नैसर्गिक गुण आहेत काय ? मनु याज्ञवल्क्यांप्रमाणें समाजाची रचना करण्यासाठीं निघालेल्या रा. जोशी यांनीं मेधातीथि, राघवानंद असल्या यःकश्चित् सनातनी टीकाकारांकडे काय म्हणून पहावें ! रा. जोशी सर्वतंत्रस्वतंत्र आहेत. त्यांच्या १५ पानांच्या ग्रंथांच्या यादींत पाश्चात्त्य तिसऱ्या चवथ्या दर्जाच्या ग्रंथकारांच्या नांवाचा बुजबुजाट झाला असला तरी महामीमांसक शंकरभट्ट यांनीं आपल्या द्वैत-निर्णयांत ज्यांना 'सर्वनिबंधकृद्वरिष्ठ' म्हटलें त्या विज्ञानेश्वराचें (मिताक्षराकाराचें) बिचाऱ्याचें नांवसुद्धां त्या एव्हढया अगडबंब यादींत नाहीं मग मेधातिथि, राघवानंद असल्या पामरांची काय कथा ? पण त्यांना कुल्लूकभट्ट माहीत आहे असें दिसतें, कारण त्याचें नांव या यादींत आहे. तेव्हां नुसती कुल्लूकभट्टाची जरी या श्लोका-वरील टीका डोळे उघडून त्यांनीं पाहिली असती तरी धर्म म्हणजे कांहीं तरी 'अनु-ष्ठेय' (आचरणीय) आहे 'नैसर्गिक गुण' नव्हत असें त्यांना कळलें असतें. रा. जोशी यांनीं गौतमधर्मसूत्राचा उल्लेख पंधरापानी यादींत केला आहे. त्यांतील अध्याय ११ सूत्र २० व त्यावरील हरदत्ताची टीका जर त्यांनीं वाचली असती तर त्यांचें अज्ञत्व दूर होऊन गोंधळ माजला नसता × 'देश–जातिकुल–धर्माश्चाम्नायैरविरुद्धाः प्रमाणम्' हें गौतमाचें सूत्र मनूच्या 'देशधर्मान्' याशीं तोलणें अवश्य आहे. हरदत्तानें देश-जातिकुलाचे आचारधर्म म्हणून दिले आहेत व मातुलसुतापरिणयन (हा आचार आहे, पिण्डाचा नैसर्गिक गुण नव्हे) हा धर्म वेदाशीं विरुद्ध असल्यामुळें अप्रमाण असें सांगितलें आहे.पण जेथें मेधातिथि विज्ञानेश्वराची दाद लागत नाहीं, तेथें हरदत्त कोण्या झाडाचा पाला ? गृह्यसूत्रें हीं तर आचार सांगण्यासाठींच आहेत. आश्वलायन गृह्यसूत्र (१.७.१–२) म्हणतें, 'अथ खलूच्चावचा जनपद-

---

+ टीकांतील महत्वाची अवतरणें; मेधातिथि 'प्रतिदेशे **अनुष्ठीयमाना** न सर्वस्यां पृथिव्यां ते देशधर्माः।,' राघवानंद 'प्रतिनियतदेशानुष्ठेयहोलिकादि धर्मा-निति। जातिधर्मान् ब्राह्मणादिजातिनियतनध्यापनादीन्। कुलधर्मादीन् षष्ठेन्नप्राशनं मासीत्यादिकान्।,' कुल्लूक 'प्रतिनियतदेशेनुष्ठीयमाना देशधर्माः.'

× हरदत्त म्हणतो 'देशधर्मेषु जातिधर्मेषु च **प्रतिनियतमनुष्ठीयमानेषु** यद्यपि वेदादि मूलभूतं नोपलभ्यते तथापि यदि वेदादिभिर्विरोधो न भवति तथैव ते परिपालनीया...... इति। तत्र देशधर्माः मेषस्थे सवितरि चौलेषु कुमार्यो...... आदित्यं सपरिवारमालिख्य पूजयंति।...... जातिधर्माः शूद्रविवाहे मध्ये स्थूणां निखाय सहस्रवर्तिकेस्यां स्थाल्यां निधाय प्रतिवर्ति दीपानारोप्य वधूं हस्ते गृहीत्वा प्रदक्षिणयान्ति।......कुलधर्माः केचिन्मध्यशिखाः। केचित्पृष्ठशिखाः।...... ये तु आम्नायविरुद्धा मातुलसुतापरिणयनं......इत्यादयो देशधर्मा नेह प्रमाणम्.'

धर्मा ग्रामधर्मांश्च तान् विवाहे प्रतीयात् । यत्तु समानं तद्वक्ष्यामः ' यांत ग्रामधर्म म्हणजे ग्रामांचे नैसर्गिक गुणच काय ? आपस्तम्बधर्मसूत्रांचें शेवटचें सूत्र असें आहे कीं, ' स्त्रीभ्यः सर्ववर्णेभ्यश्च धर्मशेषान् प्रतीयादित्येके ' यांत स्त्रियांकडून व सर्व वर्णांकडून ( शूद्र हा एक वर्ण आहे ) बाकीचे म्हणजे या सूत्रांत न सांगितलेले धर्म जाणावे, असें कांहीं आचार्यांचें मत आहे, असें सांगितलें आहे. येथें धर्म म्हणजे आचार असा अर्थ नसेल तर स्त्रियांकडून व शूद्रांकडून ' नैसर्गिक गुण ' जाणावे, असा अर्थ करावयाचा कीं काय ? फार लांब कशाला ? मनूचाच दुसरा श्लोक घेऊं. 'जातिजानपदान् धर्मान् श्रेणीधर्मांश्च धर्मवित् । समीक्ष्य कुलधर्मांश्च स्वधर्मं प्रतिपादयेत् ॥ ' ( ८.४१ )- राजानें जातिधर्म,जानपदधर्म (देशधर्म), श्रेणीधर्म (गणधर्म) व कुलधर्म हे योग्य प्रकारें पाहून त्यांच्या त्यांच्याकडून त्या त्या धर्मांचें परिपालन करवावें.येथें धर्म म्हणजे 'पिण्डांचे नैसर्गिक गुण राजानें कसे पहावयाचे व त्यांचेकडून गुणाचें ( आचारांचें नव्हे ) परि- पालन कसें करवून घ्यावयाचें ? इतका विस्तार रा. जोशी यांनीं सर्वंकष सिद्धान्त 'धर्म ग्रंथांत जेथें धर्मशब्द येईल, तेथें आचार असा अर्थ नाहीं ' असा झोंकून दिला म्हणून करावा लागला. रा. जोशी म्हणतात ( पृष्ठ १०५ ) ' मनूच्या मतानें हे सर्व शाश्वत धर्म आहेत. धर्म शब्दाचा आचार अर्थ केल्यास तो शाश्वत कसा होणार ? ' धर्म शब्दाचा आचार हाच अर्थ आहे, हें वरती स्वतंत्ररीत्या प्रस्था- पित झालें. मनूचें वाक्य असें आहेः ' देश-जातिकुल-गणांचे शाश्वत धर्म या शास्त्रांत मनूनें सांगितले '—हे धर्म शाश्वत आहेत व ते मी सांगतों, असें दोन सिद्धान्त नाहींत. क्षणोक्षणीं पालटणारे आचार सांगत नाहीं, बराच काळपर्यंत चालत आलेले व दीर्घ काळ चालावे असें त्या त्या लोकांना वाटणारे आचार मी सांगतों, इतकाच शाश्वत शब्दाचा अर्थ आहे. याशिवाय गण ह्मणजे व्यापारी वगैरे लोकांचे संघ यांचे ' नैस- र्गिक गुण ' मनूनें सांगितले, याचा कांहीं अर्थच होणार नाहीं. तेथें ' संघांचे आचार हाच अर्थ योग्य. एकाच वाक्यांत एकाच शब्दाचे दोन अर्थ घेतां येत नाहींत.

मनूनें मध्यदेश, आर्यावर्त यांच्या व्याख्या दिल्या त्यांवरून, रा. जोशी यांनीं देशधर्म म्हणजे देशाचे नैसर्गिक गुण असा अर्थ केला, त्याला बळकटी येते असें ते ह्मणतात. कशी येते तें कळत नाहीं. मनूनें प्रथम सरस्वती व दृषद्वती या दोन नद्यां- मधील जो प्रदेश तो ब्रह्मावर्त, व त्या देशांतील आचार तो सदाचार असें सांगितलें; नंतर ब्रह्मावर्तापेक्षां थोडा कमी असा ब्रह्मर्षिदेश ( कुरुक्षेत्र, पंचाल, मत्स्य शूरसेन यांचा मिळून ) सांगितला; नंतर हिमवान् व विन्ध्य यांचें मधील व प्रयागाचे पश्चिमेकडील व विनशनाचे ( सरस्वतीनदी अन्तर्धान पावते तो देश ) पूर्वेकडील तो मध्यदेश आणि पूर्वपश्चिम समुद्रांमधील आणि हिमालय व विन्ध्य यांच्या मधील तो आर्यावर्त ( ह्मणजे बहुतेक सर्व उत्तर हिंदुस्थान ) आणि शेवटीं ज्या देशांत कृष्णामृग आपोआप फिर- तांना आढळतो, तो यज्ञियदेश समजावा असें सांगितलें. या वर

सांगितलेल्या सर्व देशांपैकीं कोणत्या तरी देशांत द्विजातींनीं राहावें, पण शूद्रांनीं पोट भरण्याची अडचण पडेल तर पाहिजे त्या देशांत राहावें म्हणून त्यानें सांगितलें. वरील देशच द्विजातींना राहाण्यास जास्त योग्य कां, यांचीं अनेक कारणें देतां येतील. त्यात देशधर्म म्हणजे देशाचे नैसर्गिक गुण हा अर्थच कां अभिप्रेततम आहे, हें रा. जोशी यांनीं जरी या विषयावर पानेंच्या पानें लिहिलीं आहेत, तरी आम्हास पटत नाहीं. दुसरी गोष्ट, नर्मदेच्या दक्षिणेकडचे ( रा. जोशी सुद्धां ) सर्व सनातनी व त्यांचे पूर्वज मनूची आज्ञा मोडून, त्यानें ठरविलेल्या म्लेच्छ देशांत, आपल्या नैसर्गिक गुणांचा ऱ्हास होईल याची पर्वा न करितां, आज दोन हजार वर्षें तरी राहात आहेत, तें वेगळेंच.

## मानवी समतेचा नवीन भयंकर सिद्धान्त

आमच्या समाजांत अस्पृश्य मानल्या गेलेल्या जातींवर दूर ठेवण्याचा ( segregation) प्रयोग कां करण्यांत आला, वगैरे गोष्टींची मीमांसा करितांना रा. जोशी म्हणतात: ' आमच्या मतें श्रेष्ठांची निवड करून, ते विभक्त करून त्यांची संख्या दर पिढीला वाढत जाईल, आणि कनिष्ठ जे उरले, त्यांची संख्या दर पिढीला कमी होत जाईल, ही दुहेरी प्रक्रिया सारखी चालू राहिली पाहिजे ( पृष्ठ १८७ ); ' प्रकृष्टांची निवड कशी करीत जावी, आणि निकृष्टांची घट कशी होईल, या गोष्टीचा समाजशास्त्रज्ञाला अगर समाजनेत्याला विचार करावयास पाहिजे ' ( पान २०५ ); ' ज्यांच्या प्रजेची वाढ होणें इष्ट वाटत असेल, त्या जातींना प्रजापोषक धंदे आणि ज्यांच्या प्रजेची वाढ व्हावयास नको असेल त्यांना घट होण्यासारखे धंदे द्यावयास पाहिजेत. यालाच मानवी समता असें म्हणावयाचें, परंतु त्यालाच हल्लींचे बायबलमय झालेले महात्मे विषमता, अन्याय वगैरे शब्द लावतात' (पृष्ठ २४१). कांग्रेसच्या कांहीं लोकांच्या ह्मणण्याप्रमाणें सहा कोटी अस्पृश्य समाज ह्मणजे एकंदर हिंदूंच्या संख्येच्या चतुर्थांशा-इतके आहेत. ही संख्या फार फुगाविलेली आहे असें मला वाटतें; तथापि सरकारी आंकड्या-प्रमाणें ते सुमारें चार कोटी आहेत. म्हणजे एकंदर हिंदु संख्येच्या ⅙ आहेत. हे सर्व अंत्यज आहेत. याशिवाय सर्व प्रकारचीं शिल्पें, कृषि व व्यापार धंदे करणारे कोट्या-वधि शूद्र आहेत. तेव्हा निकृष्ट वंशाच्या लोकाना निकृष्ट धंदे देऊन, त्यांच्या संख्येची घट करण्याच्या उद्देशानें जर मनूनें समाजरचना केली असेल, तर त्याचा हेतु साध्य झाला नाहीं असें कोणीहि म्हणेल. यापेक्षां या विषयावर ज्यास्त विवेचन करण्याला सवड नाहीं. रा. जोशी यांच्या पुस्तकांतील दुसऱ्या अपसिद्धान्तांसंबन्धानें विवेचन करण्यालाही अवकाश नाहीं.

## आणखी कांहीं सिद्धान्त

रा. जोशी यांनीं पाश्चात्यांचें आनुवंशाचें एकच तत्त्व सारसर्वस्व मानल्यामुळे त्यांचे विचार कसे एककल्ली झाले आहेत, हें आतां त्यांचे कांहीं निवडक सिद्धान्त उतरून घेऊन दाखवितों. त्यांची चर्चा करण्याला अवकाश नाहीं.

( १ ) म्हणूनच आम्ही म्हणत असतों कीं, ब्राह्मण जातीनें आपली संस्कृति रक्षण करण्याचें कार्य टाकून राजकारण समाजसुधारणा वगैरे भानगडींत पडूं नये. पृष्ठ २३६

( २ ) मग जो राजसत्ता मिळवितो तो राजा. ते राजे इतर राजांशी–ते वांशिकदृष्ट्या भिन्न असले तरी–विवाहसंबंध करीत. हा संकर आणि युद्धाचे नैसर्गिक परिणाम, या कारणांनीं क्षत्रिय वर्ण अगर जाति कधींच निर्माण झाली नाहीं ( पृष्ठ २५९ ).

( ३ ) हिंदूनें जातीय आचार आणि नैतिक मूल्यें बरोबर पाळल्यास आध्यात्मिक बाबतींत तो शंकर, रामानुज, मध्व, वल्लभ, येशूख्रिस्त, महंमद, बुद्ध, महावीर, मस्करी गोशाल अगर जरदुष्ट यापैकीं कोणाचाही अनुयायी असेल, तरी तो हिंदूच राहतो ( पृष्ठ ३०६). या ग्रंथाला श्रीमच्छंकराचार्य मठ संकेश्वर यांनीं प्रशस्तिपत्र देऊन रा. जोशी यांनीं उत्तम प्रकारची धर्मसेवा केली आहे, म्हणून समाधान व्यक्त केलें आहे पण त्यांनीं हें वाक्य वाचलें आहे कीं नाहीं, कोणाला माहित ! वाचलें असल्यास त्यांना रा. जोशी याचा हा सिद्धान्त मान्य आहे, असें त्याच्या शिष्यांनीं समजून चाललें पाहिजे.

( ४ ] ' हाच ग्रंथकार ( टेलर ) त्याच ग्रंथांत आर्य हा एक मानववंश नव्हता असें मत देतो; व तेंच मत बरोबर आहे' ( पान ३९२ ); पण ' स्त्रीपुरुषसंबंधाला एखाद्या गटानें नियम लाऊन देणें, म्हणजे विवाहसंस्था उत्पन्न करणें होय. **आर्यांनीं** ही पद्धति, मनुष्य प्राण्याच्या दुर्बल व परावलंबी संततीचा विचार करिता, अत्यंत हितकारक आहे, असें गृहीत धरूनच समाजरचनेला सुरवात केली; आणि विवाहाचे नियम आणि मर्यादा घातल्या ' ( पान ४०७ ). हे आर्य कोण ? आम्हीच ना ? मग आर्य हा एक मानववंशच नव्हता हें बरोबर कीं चूक ? ऋग्वेदकालीन ऋषि आपल्याला आर्य समजत होते, हें वरतीं ( पृष्ठ ५०–५३ ) दाखविलेंच आहे.

( ५ ) राजकीय स्वातंत्र्य समाजरक्षणाला लागणारीं इतर साधनें नसल्यास कितपत हितावह होईल,याचाही पूर्ण विचार व्हावयास पाहिजे. राजकीय स्वातंत्र्य हेंच ध्येय असावें असें देशभक्त लोक देखील म्हणतील असें आम्हाला वाटत नाहीं. राजकीय स्वातन्त्र्य हें दुसऱ्या कोणत्या तरी एकाद्या ध्येयाचें साधन असणार. पारतंत्र्यातही तें ध्येय सिद्ध होत असेल तर ? परंतु हें ध्येय तरी कोणतें ? प्रगति ! छाननी करीत आपण गेलें म्हणजे धर्माचें रक्षण करणें हेंच ध्येय फक्त शिल्लक राहतें ( पृष्ठ ४१५ ). स्वातंत्र्य हें आम्ही साधन मानीत नाहीं. तें ध्येय मानतों. तें ध्येय कां मानावें याचीं कारणें सत्य, शिव सौन्दर्य,हीं ध्येयें कां मानावीं,याचीं जीं आहेत, तींच आहेत. मूल्यातीत अशा ज्या गोष्टी त्यांपैकीं स्वातंत्र्य आहे. तें असतांना त्याची जाणीव होत नाहीं. पण तें नसतांना जिवाची जी तळमळ, अशान्तता व कोंडमारा होतो त्यांमुळे जीवमात्राला बाकी सर्व आपत्ति पुरवतील, परन्तु स्वातन्त्र्य मिळावें असें वाटूं लागून तो धडपड करूं लागतो. पिंजऱ्यांत उत्तम रीतीनें योगक्षेम चाललेला पोपटहि पिंजरा उघडा होण्याची वाट पाहून स्वतंत्र

होतो. त्या स्वतन्त्रतेंत कधीं कधीं तो निर्घृण निसर्गाच्या भक्ष्यस्थानीं पडतो; परंतु त्याची तो तमा बाळगीत नाहीं. त्याच प्रमाणें पारतन्त्र्यांत दीर्घकालपर्यंत खितपत पडलेल्या मानवी समाजांतील प्रत्येकाला स्वातंत्र्य हेंच पाहिलें ध्येय वाटावें. परंतु आमचें व आमच्या देशाचें परम दुर्भाग्य कीं, आमचे देशबांधव रा. जोशी व त्यांच्या विचारांचे दुसरे बरेच लोक यांना मात्र तसें वाटत नाहीं.

## नीत्शेचीं कांहीं मतें

रा. जोशी, नीत्शे या जर्मन पंडिताच्या मताचा उल्लेख वारंवार करितात व ते त्याचे पट्टशिष्य दिसतात. पण त्या पंडिताचे महत्वाचे सर्व सिद्धान्त मात्र ते सांगत नाहींत. ते सर्व सिद्धान्त मान्य करावयाचे झाले, तर सनातन म्हणविणारांचे डोळे पांढरे होतील. नीत्शे हा मरणापूर्वी बारा वर्षे वेडा झाला होता, त्यामुळें आधीं युरोपांतीलच कांहीं तत्वज्ञ त्याच्या मतांचा अव्हेर करितात. तथापि पूर्ण वेडा झाल्यावर त्यानें कोणताच ग्रंथ लिहिला नाहीं, म्हणून तो मुद्दा सोडून देऊन विशेष विस्तार न करितां त्याचे कांहीं प्रमुख सिद्धान्तच, जे. एम्. केनेडी यांनीं नीत्शेचें शुभवर्तमान ( the gospel of Nietche ) म्हणून जें पुस्तक लिहिलें आहे, त्यातून देतों.

( १ ) आपल्या तत्त्वज्ञानात, त्याच प्रमाणें पाश्चात्यांतील प्रमुख तत्त्ववेत्त्यांनींहीं सत्य व शिव ( Truth and Good ) हीं दोन मुख्य मूल्यें मानलीं आहेत. ही दोन तत्त्वें सर्व मूल्यातीत आहेत. पण नीत्शेच्या मतानें हें बरोबर नाहीं. त्याचे म्हणणें सत्य, शिव, सद्गुण हे जर जीवितव्याला हानिकारक आहेत, तर मला सत्य व शिव याशीं कर्तव्य नाहीं ( पृष्ठें ११४ ते ११९ ).

( २ ) नीतिमूल्यें दोन प्रकारचीं आहेत. एक प्रकारचीं आपणांला प्रभु समजणाऱ्या व आपण इतर जणांपेक्षां फार श्रेष्ठ आहों आणि पृथक् आहों असें मानणाऱ्या लोकांनीं ठरविलेलीं, व दुसरीं दास्यांत असलेल्या व कनिष्ठ लोकांच्या घोळक्यानें ठरविलेलीं. पहिल्या प्रकारच्या पुरुषांत परंपरेबद्दल जात्याच अभिमान असतो, त्यांचा समाजाची प्रगति होत आहे यावर विश्वास नसतो, त्याच्यांत प्राचीनकाळाबद्दल आदर व पुढें येणाऱ्या पिढयांबद्दल साशंकवृत्ति असते. त्याना दया हा महत्वाचा गुण आहे असें वाटत नाहीं; तर ते दयाहीन व परमतासहिष्णु असतात. त्यांचा देवही याच गुणांनीं युक्त असा ते कल्पितात (पृष्ठें ११९-१३३); उलटपक्षीं दासांचीं नीतिमूल्यें हीं दुर्बल झालेल्या लोकांचीं, त्यांचा पुढारी म्हणजे धर्मोपदेशक किंवा भटजी. या धर्मोपदेशकांनीं, दुःखी व दुर्बल हेच नीतिदृष्ट्या चांगले असतात, तेच ईश्वराला प्रिय असतात व त्यांनाच ईश्वराच्या राज्यात शाश्वत सुख असतें, असलीं मतें, पाहिल्या प्रकारच्या लोकांबद्दल हेवा वाटून निर्माण केलीं व तींच मूल्यें ज्यू व नंतर ख्रिश्चन लोकांनीं प्रसृत केलीं. हें मत रा.

जोशी यांस मान्य आहे, पृष्ठ ३०७ 'मुळांत खिस्ती धर्म हा जगांतील हलक्या लोकांचा असल्यामुळें खिस्ती देव हा प्रेममय आहे '). मनुष्याला त्याच्या देहापासून भिन्न असा आत्मा आहे व त्या आत्म्याला आपली उन्नति स्वप्रयत्नानें पाहिजे तितकी करून घेण्याचें स्वातन्त्र्य आहे, असें खिस्ती धर्मानें सांगितलें तेंही खोटें आहे. असें नीत्शेचें म्हणणें आहे. शरीरापासून पृथक् राहणारा मुळीं आत्मा म्हणून नाहींच, त्याच प्रमाणें उन्नतिस्वातन्त्र्य किंवा त्याचा अभाव असें कांहीच नाहीं असें त्याचें मत आहे. जगांत तीव्रइच्छाशक्ति व त्यामुळें घडून येणाऱ्या प्रचण्ड गोष्टी व दुर्बल इच्छाशक्ति यांशिवाय कांहीं नाहीं ( पृष्ठ १२३–१२९ ).

हें तत्त्वज्ञान आमच्या औपनिषद सिद्धान्ताशीं कितपत जमतें, याचा सनातनी म्हणविणारांनीं विचार करावा.

( ३ ) मनुष्यप्राणी हा ईश्वर व आपले पूर्वज यांचें देणें असतो. तें देणे म्हणजे पाप. पापामुळें मनुष्य मात्राला दुःखें व संकटें येतात. आपल्या पापांचें क्षालन अशा रीतीनें होत असतें.ईश्वरानेंच तीं आपणांवर पाठविलेलीं असतात. ही जी पापाविषयीं कल्पना धर्मोपदेशकांनीं प्रसृत केली तें एक विष आहे.( पृष्ठ १३१-१३६ ).

हा सिद्धान्त पुनर्जन्म मानणारे जे आम्ही त्यांनीं मनन करण्यासारखा आहे.

( ४ ) लोकशाहीचा उदो करणें हें नाशाचें द्योतक आहे ( पान १४१-१४३ ). लोकशाहीबद्दल मला काय वाटतें तें वर सांगितलें आहे.

( ५ ) पुरुष व स्त्री यांना समान हक्क नसणें हेंच निसर्गाचें खरें तत्त्व आहे. प्रेमाचें स्त्रीला ऐकान्तिक महत्त्व आहे, तसें तें पुरुषाला नाहीं. प्रेम हें पुरुषाच्या अनेकविध उद्योगापैकीं एक आहे. नीत्शेनें आपल्या झरतुस्टाकडून वदविलें आहे कीं ' पुरुषाला कलह व युद्ध यांसाठीं शिक्षण देऊन तरबेज केलें पाहिजे, स्त्रीला अशा योद्धयाच्या विनोदनार्थ शिकवून तयार केली पाहिजे. बाकी सर्व मौर्ख्य आहे' ( पृष्ठ १४२-१४६).

( ६ ) हल्लींची सर्व नैतिकमूल्यें झुगारून दिलीं, खिस्ती ध्येय, लोकशाहीचें ध्येय, संन्यास व त्याग यांचें ध्येय, इत्यादि ध्येयें दूर झालीं ह्मणजे नवीन मूल्यें बनविणारे अतिमानुष ( Supermen ) लोक जन्मास येतील. असे अतिमानुष पुरुष समतावादाच्या विरुद्ध असतील, ते सर्व समाजाचे निरनिराळे गट बनवितील, व प्रत्येक गटाचे हक्क व कर्तव्यें पृथक् ठरवितील ( ही कल्पना रा. जोशी यांनीं पृष्ठ ३१५ येथें उतरून घेतली आहे ' जातिमय समाजघटना असल्यास राखावयास पाहिजे आणि नसल्यास शहाण्यानें तयार करावयास पाहिजे' ). सर्वांत कनिष्ठ गट म्हणजे दुबळे व मध्यम प्रतीचे लोक यांचा, यांत शेतकी करणारे, कारागीर, व्यापारी हे येतील इतकेंच नव्हे तर भौतिकशास्त्रांत काम करणारे खालच्या प्रतीचेही लोक येतील. ह्यांना दासवर्ग

म्हणावें किंवा वरच्या गटांतील वर्गांचें पोषण ते करितात, म्हणून त्यांना लुबाडले जाणारे (exploited) असें पाहिजे तर म्हणावें.(या तत्त्वज्ञानाला रा.जोशी यांनीं पृष्ठ १८८ वर संमति दिली आहे ). याच्या वरच्या वर्गांत समाजांतील कायद्यांचें रक्षण करणारे, सुव्यवस्था व शांतता राखणारे व लढवय्ये येतात. याचेवर आणखी एक मुख्य गट येतो. तो प्रभुवर्ग ( Masters ) होय. ते नैतिकमूल्यें बनवितात व ते सर्व समजाला प्रेरक असतात. त्यांनाच सर्व हक्क, सवलती असावयाच्या. खिस्ती धर्मांत ईश्वराला जें काम सर्व विश्वांत नेमून दिलेलें आहे, तें काम हा गट मानवसमाजांत करणार ( पृष्ठ १६९-१७३ ). प्लेटोच्या ग्रंथामधून किंवा आमच्याकडील चातुर्वर्ण्यांतून ही कल्पना उचललेली दिसते ( रा. जोशी हे नीत्शे यानें मनूची फार स्तुति केली आहे, असें सांगतात पृष्ठ १८८ ), मग नीत्शेचे भगत काहीं म्हणोत. परंतु असल्या उद्दाम मताच्या नीत्शेनें सुद्धां शूद्र, क्षत्रिय व प्रभु असे तीनच गट मानले, तीन हजार मानले नाहींत, इतकें मात्र सनातनी म्हणविणारांनीं लक्षांत ठेवलें पाहिजे. त्याशिवाय हे गट जन्मानेंच बनणार किंवा निरनिराळ्या वेळीं त्यांत खालच्या वर्गांतून भरती होणार तेंही त्यानें स्पष्ट केलेलें दिसत नाहीं. ×

( ७ ) दयेला बहुतेक प्रत्येक धर्मांत प्रमुख सद्गुणांत गणलें आहे. परंतु नीत्शेच्या झरतुस्टानें तीव्र इच्छाशक्ति, हा सर्वश्रेष्ठ गुण मानला आहे. नीत्शेच्या मतानें दया हा मोठा सद्गुण नसून तो एक मोह आहे व मानवावर कोसळणाऱ्या सर्व अरिष्टांत दयेचें अरिष्ट मोठें आहे. दयेचा मोह पडला म्हणजे अतिमानुष सुद्धां पराजित होतो. प्राज्ञ पुरुषानें स्वतांबद्दल किंवा इतरांबद्दल दया म्हणून दाखवितां कामा नये. दुर्बल किंवा दुर्दैवी माणसांबद्दल दया दाखवून तीं जगविलीं, तर त्यांचेवर व समाजावर ती एक आपत्तीच म्हणावयाची. निसर्गानें दुर्बलांना चटकन् नाहींसें करून सोडविलें असतें, तें प्राज्ञ मनुष्य दया करूं लागले तर लांबणीवर पडेल ( पृष्ठ १७४-१७८). उपनिषदांत प्रजापतीनें 'दयध्वं' म्हणून जो संदेश दानवांना सांगितला, त्याच्याबरोबर उलट झरतुस्ट्राचा संदेश आहे. सनातनी म्हणविणारांनीं पाहिजे तर त्याचा अवलंब करून पाहावा.

( ८ ) नीत्शेच्या तत्त्वज्ञानाचें ध्येय हें कीं, मानवी समाजानें थोर पुरुष नेहमीं निर्माण करणें, हेंच आपल्या उद्योगाचें सारसर्वस्व समजलें पाहिजे. त्याच्या तत्त्वज्ञानाचें

---

× 'Slavery is one of the essential conditions of a high culture. The misery of the men who struggle painfully through life must be increased to allow a small number of Olymhic geniuses to produce great works of art' हें नीत्शेचें मत लक्षांत ठेवण्यासारखें आहे (J. M. Kennedy, p.60)

मुख्य सूत्र हें, कीं दौर्बल्यापासून जें उत्पन्न होतें तें वाईट व शक्तीपासून जें निर्माण होतें तें चांगलें.

नीत्शेचे इतके सिद्धान्त मासल्याकरितां पुरेत असें वाटतें. निदान कालमर्यादेमुळें मला तरी हात आंखडणें प्राप्त आहे. +

---

+ ' Thus spake Zarathustra ( translated by Thomas Common, 1909) या पुस्तकांत नीत्शेचें सूत्र ह्मणून दिलें आहे

'Mankind ought constantly to be striving to produce great men; this and nothing else is its duty ' ( p. XI Introduction )

The leading principle of this new system of valuing would be 'All that proceeds from power is good, all that springs from weakness is bad ' ( Thus spake Zarathustra, Intro. p XII).

# संस्कृति म्हणजे काय?

आम्हीं वरतीं वारंवार म्हटलें आहे कीं जातिसंस्था ही आमच्या संस्कृतीचें प्रधान अंग नव्हे, दुसरीं अनेक प्रधान अंगें आहेत. तेव्हां आतां आमच्या संस्कृतीचीं प्रधान अंगें कोणतीं हें थोडक्यांत दाखविणें प्राप्त आहे. प्रथम संस्कृति म्हणजे काय, याचा विचार केला पाहिजे. संस्कृति हा शब्द कल्चर (Culture) या इंग्रजी शब्दाचा पर्याय म्हणून योजलेला आहे. मानवांनीं समाजस्थापन करून जें जें ज्ञान संपादिलें, ज्या ज्या समजुती बाळगल्या, ज्या कला उदयास आणल्या, जे धर्मतत्त्वज्ञान पसरविलें, जे जे कायदे, नीतीचे सिद्धांत, व चालीरीति आणि वाङ्मय निर्माण केलें, त्या सर्वांचा संस्कृतीमध्यें अंतर्भाव होतो. + संस्कृति ही प्राधान्येंकरून त्या त्या समाजाच्या मानसिक सामर्थ्याची द्योतक असते. संस्कृतींत बाह्य सुखसोयींचाही अंतर्भाव होईल, परन्तु संस्कृतीचें तें प्रधान अंग नव्हे. नुसतीं सुखसोयीचीं साधनें वाढलीं म्हणजे संस्कृति श्रेष्ठ झाली असें नव्हे. मनुष्यानें आपल्या मानसिक गुणांचा विकास केला पाहिजे. त्यामुळें सुखसोयी वाढतीलच; पण तो संस्कृतीचा एक भाग किंवा परिणाम म्हणतां येईल. आमच्या समाजानें हजारों वर्षांच्या आपल्या अस्तित्वांत कोणत्या प्रकारांनीं आपल्या संस्कृतीचें वैशिष्ट्य दाखविलें तें आतां पहावयाचें आहे. या विषयावर किती तरी विवेचन करिता येईल. येथें फक्त दिग्दर्शन करावयाचें आहे. ज्या गोष्टी यां ठिकाणीं आमच्या संस्कृतीचीं अंगें म्हणून दाखविल्या जातील, त्यांतील कोणतीही एखादी इतर समाजात नव्हती असें समजण्याचें नाहीं. तर त्या सर्व गोष्टी मात्र दुसऱ्या कोणत्याच समाजांत आजपर्यंत एकत्र दिसल्या नाहींत, इतकेंच सांगण्याचा उद्देश आहे.

## आमच्या संस्कृतीचीं वैशिष्ट्यें

१ इंद्र, वरूण, अग्नि, सवितृ इत्यादि देवतांची पृथक् स्तुति जरी ऋग्वेदांत असली, तरी हळुहळू या देवता म्हणजे एकाच परमेश्वराचीं भिन्न भिन्न रूपें आहेत, व एकाच परमेश्वराला भक्तजन भिन्न भिन्न नांवांनीं भजतात, एकाच परमेश्वराचीं तीं भिन्न भिन्न नांवें आहेत असें 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' (ऋ. १,१६४,४६), 'एकं सन्तं बहुधा कल्पयन्ति' (ऋ. १०.१४४.५), 'इन्द्रो मायाभिः पुरुरूप ईयते' (ऋ. ६.७.१८), 'आनीदवातं स्वधया तदेकं' (ऋ. १०.१३२९.२) इत्यादि ठिकाणीं स्पष्ट सांगितलें आहे हें पूर्वी (पृष्ठ १८–१९) दाखविलेंच आहे. हीच कल्पना ऋग्वेदकालापासून तों तहत आजपर्यंत आपल्या लोकांची आहे. कोणत्याही रूपानें किंवा नांवानें परमेश्वराची भक्ति केली, तरी ती एकाच परमेश्वराला पोंचते, असा सिद्धान्त

---

+ डॉक्टर टायलर यांच्या Primitive culture या ग्रंथाचें पृष्ठ १ पहावें.

भगवद्गीतेनें वारंवार मांडला आहे. ' यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमर्हति । तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम्,' ७. २१; 'येप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः । तेपि मामव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम्, ' ९. २३; ' यजन्ते सात्त्विका देवान् यक्षरक्षांसि राजसाः । प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥' १७. ४

२ मनुष्य प्राण्याच्या पाठीमागें जन्मापासून तीन कर्तव्यें लागलेलीं असतात. प्रजा निर्माण करून मानववंशाचें सातत्य ठेवण्याचा प्रयत्न करणें ( हें पितृऋण ), ज्या परमेश्वरानें अखिल जगत् निर्माण केलें त्याचीं भिन्न भिन्न रूपें अशा ज्या देवता त्याना संतुष्ट करण्यासाठी याग करणें (हें देवऋण ), आणि ज्या ऋषींनीं बुद्धिसामर्थ्यानें वाङ्मय निर्माण केलें, त्या वाङ्मयाचा अभ्यास करण्यासाठीं ब्रह्मचर्य पाळणें हीं तीन ऋणें आहेत, असें तैत्तिरीय संहितेंत सांगितलेलें आहे (६-३-१०-५ जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते ब्रह्मचर्येण ऋषिभ्यो यज्ञेन देवभ्यः प्रजया पितृभ्यः) शतपथ ब्राह्मण (१.७.२. ११ ), ऐतरेय ब्राह्मण (ऋणमस्मिन्संनयाति),मनुस्मृति इत्यादि श्रुतिस्मृतींनीं या ऋणत्रयाच्या कल्पनेचा पुरस्कार केलेला आहे.

३ परमेश्वराची पूजा करण्याचे मार्ग भिन्न भिन्न आहेत. एकाच मोठया मनुष्यानें सांगितलेल्या मार्गानें परमेश्वराची पूजा केली, तरच पारमार्थिक कल्याण होतें, असें नाहीं. ही फार प्राचीन काळापासून आमच्यांतील सर्व विचारी लोकांची समजूत असल्यामुळें आह्मी धर्माचे बाबतींत, एकाच पुस्तकाला किंवा तात्त्विक सिद्धान्ताला खरा मानून त्यालाच कवटाळून बसलों नाहीं. मुसल्मान लोक फक्त कुराण हा ग्रंथ व ख्रिस्ती लोक बायबल प्रमाण मानतात; आणि महमद व जीजस हेच ईश्वराविषयक खरें ज्ञान सांगणारे झाले असें समजतात. आमच्या धर्मांत एकच ग्रंथ केवळ प्रमाण नाहीं, अनेक प्रमाण आहेत; आणि ईश्वराचा एकच प्रेषित नाहीं, तर अनेक आहेत. महंमदिय व ख्रिस्ती लोकांपैकीं बहुतेकाचीं समजूत अशी कीं इतर धर्मांचे लोक खऱ्या परमेश्वराला भजत नाहींत, यामुळें ते ईश्वराकडे न पोचतां नरकांत जातात. इतकेंच नव्हे, तर त्यांची परधर्मीयांबद्दल परम असहिष्णुता असते. आणि शेंकडों वर्षें त्यांच्याकडून आपल्याहून भिन्न मत असलेल्या लोकांना जुल्मानें, भीतीनें किंवा युक्तीनें आपल्या कळपांत ओढण्याचे प्रयत्न झाले आहेत व होत आहेत. धार्मिक बाबतींत ख्रिस्ती लोकांनी परधर्मीयांचेच केवळ नव्हे, तर रोमन कॅथोलिकांनीं प्रॉटेस्टंटांचें व प्राटेस्टंटांनीं रोमन कॅथोलिक लोकांचे अनन्वित हाल केले, हें इतिहासप्रसिद्ध आहे. एकट्या स्पॅनिश इन्किझिशननें आपल्या कारकीर्दींत सुमारें चार लक्ष लोकांचा अमानुष छळ करून वध केला, हें इतिहासज्ञाना विदित आहेच. आमच्या देशांत धर्माचे बाबतींत अगदींच छळ झाला नाहीं असें नाहीं. परन्तु एकंदरींत युरोपांतील किंवा महंमदीयांच्या असहिष्णुतेशीं तोलून पाहतां तो अगदींच थोडा होता. अशोक, हर्ष यांसारखे सम्राट्, बौद्ध व ब्राह्मणी

धर्मांना अगदीं समतेनें वागवितांना दिसतात. त्याच प्रमाणें कलिंगाधिपति खारवेल, क्षत्रप उषवदात, शातवाहन, गुप्तसम्राट्, वलभि येथील राजे हे स्वतः एका पंथाचे असतांना सर्व पंथांच्या लोकांना दानें देतांना आढळतात. विसाव्या शतकांत पाश्चात्त्य देशांत धर्ममतें ही खासगी स्वरूपाची बाब होत आहे. परन्तु आमच्या देशांतच उत्पन्न झालेल्या भिन्न भिन्न धर्ममताचे लोक दोन अडी-च हजार वर्षे परस्परांशीं सहिष्णुतेनें वागत आले आहेत. जगांतील प्रमुख आठ नऊ धर्मां पैकीं चार मुळीं आपल्याच देशांत उदयास आले, म्हणजे आपला सनातनधर्म, बौद्ध, जैन व शिखांचा धर्म. यांशिवाय आमच्याच धर्मांत द्वैती अद्वैती शैव, वैष्णव शाक्त वगैरे मतमतांचा गलबला आहे तो निराळाच; पण या सर्वांनीं इतरांशीं (विशे-षतः ख्रिस्ती व महमदीय यांशीं तुलना करितां) फार परमतसहिष्णुता दाखविली असें कबूल केलें पाहिजे.

४ संहिताकाळीं आर्यांचें ध्येय स्वर्ग प्राप्त करून घेणें होतें. हळुहळू तें ध्येय अपुरें वाटून उपनिषत् काळापासून आमच्यांतील सर्व श्रेष्ठ तत्त्ववादी पुरुषांचे (सांख्य, योगी वेदांती, नैयायिक) आत्मे एकाच ध्येयासाठीं तळमळत होते. जीवाची संसारांतील त्रिविध तापांपासून सुटका व्हावी, सर्व वस्तूंचें आदिकारण असें जें तत्त्व त्याची प्राप्ति जीवाला व्हावी, हें तें ध्येय होय.

५ मोक्ष, कैवल्य, किंवा निःश्रेयस हें श्रेष्ठ प्रतीचें ध्येय ठरविल्यावर तें मिळवि-ण्याच्या साधनांची चिकित्सा होऊन उपनिषत्कालीं असा सिद्धान्त प्रस्थापित झाला, कीं सर्व विश्व हें परमात्म्यापासून भिन्न नाहीं. त्याची उत्पत्ति, स्थिति आणि लय हीं परमा-त्म्यावरच अवलंबून आहेत, आणि जीवात्मे हेही परमात्म्याचेच अंश आहेत किंवा त्यापासून अभिन्न आहेत; आणि हें जें जगत्, जीव व परमात्मा यांच्या विषयींचें खरें ज्ञान तेंच सम्यग्ज्ञान आणि ह्या सम्यग्ज्ञानानेंच जीवाला मोक्ष मिळणार.

६ भौतिक सोयी, इंद्रियजन्य सुखांचा ध्यास, पुत्र, स्त्री, वित्त यांची तृष्णा हीं मनुष्याचें परमोच्च ध्येय जो मोक्ष, तो प्राप्त करण्याच्या मार्गांत मोठीं विघ्नें आहेत, त्याच्याच पाठीस लागणाराला मोक्षाची आशा नाहीं, विषयोपभोग जितका जास्त घ्यावा तितकी त्या विषयींची लालसा वाढते, म्हणून विषयांचा त्याग करावा, तृष्णा सोडावी, आणि शम, दम, उपरम, तितिक्षा, समाधान, श्रद्धा या गुणांचा परिपोष केला म्हणजे आत्मज्ञान होतें. 'सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति शान्त उपासीत (छान्दोग्य ३,१४,१); 'तस्मादेवंविच्छांतो दांत उपरतस्तितिक्षुः समाहितो भूत्वा आत्मन्येवात्मानं पश्यति' (बृहदारण्यकोपनिषद् ४,४,२३), 'त्यागेनैके अमृतत्वमानशुः' (महानारायण १०-५); 'अमृतत्वस्य तु नाशास्ति वित्तेन' [बृह. उप. ४,५,२]; 'त्यागाच्छान्तिरनन्तरम्' (गीता १२-१२);

यच्च काममुखं लोके यच्च दिव्यं महत्सुखम् । तृष्णाक्षयसुखस्यैते नार्हतः षोडशीं कलाम् ॥ ' ( शान्तिपर्व ७४.४६ ); ' न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति। हविषा कृष्णवर्त्मेव भूय एवाभिवर्धते ॥ या दुस्त्यजा दुर्मतिभिर्या न जीर्यति जीर्यतः । योसौ प्राणान्तिको रोगस्तां तृष्णां त्यजतः सुखम् ॥ ' ( आदिपर्व ८५.१२ व १४ ); ' सन्तोषादनुत्तमसुखलाभः ' ( योगसूत्र २–४२ ). हें ध्येय आपल्या लोकांत आबालवृद्ध व आशूद्रचाण्डल बिंबलेलें होतें. याचा अर्थ असा नव्हे कीं, आमचे सर्व लोक त्यागी, विषयसुखविमुख आहेत. याचा असा अर्थ आहे कीं, मनुष्यमात्राला विषयोपभोगाचा मोह सुटणें परम दुष्कर आहे; परंतु आमच्या देशांतील साधारण मनुष्यांसही विचारिलें तरी तो आपलें ध्येय वरीलप्रमाणें आहे असें सांगेल, व शिक्षित मनुष्यें तर नेहमींच तें ध्येय सांगत असत. खिस्तानें आपल्या अनुयायांना शान्ति वगैरे सद्गुणांचाच उपदेश केला, व पाश्चात्य देशांतील लोक आपणांला खिस्ती म्हणवितात. असें जरी आहे व जरी त्यांच्यांतही त्यागी, तृष्णाविरहित अशीं अनेक माणसें होऊन गेलीं तरी सर्वसाधारण माणसाचें ध्येय तें नव्हतें व अलीकडच्या दोन तीनशें वर्षें तर तें नाहींच. तिकडे सर्वसाधारण माणसाचें ध्येय भौतिक सोयी व सुखें मिळविणें व त्यासाठीं सततोद्योग करणें हेंच असतें.

( ७ ) मनुष्याच्या परम कल्याणाच्या दृष्टीनें त्याच्या आयुष्याला वळण लावलें पाहिजे, मोक्ष हा परमकल्याणप्रद असें ठरलें, व त्याच्या प्राप्तीसाठीं शमदमादि साधन-संपत्ति आवश्यक असें ठरलें; त्यामुळें चार आश्रमांची कल्पना निघाली. मनुष्यमात्रानें ज्ञानार्जन केलें पाहिजे, त्यासाठीं गुरुगृहीं वास करून साधी रहाणी व उच्च विचारसरणी साध्य केली पाहिजे यासाठीं ब्रह्मचर्य, त्याचेपुढें मानुषतासुलभ अशीं सुखें व वंशसातत्य आणि यज्ञयाग इत्यादि साध्य होण्याला आवश्यक असा गृहस्थाश्रम त्यांत विषयसुख धर्माविरुद्ध असें उपभोगल्या नंतर आपण कोण कोठून आलों, व कोठें जाणार, अशा बिकट प्रश्नांचा विचार करून सम्यग्ज्ञान व्हावें म्हणून वानप्रस्थ व संन्यास यांचा अवलंब केला. अशा रीतीनें मनुष्याच्या आयुष्याचे चार भाग करून त्या त्या विशिष्ट आयुर्भागांत त्याला पृथक् पृथक् कर्तव्यें लावून देणारी आश्रमव्यवस्था, हें आमच्या धर्माचें व समाजाचे एक वैशिष्ट्य होतें.

८ याच आश्रमव्यवस्थेंतील एक महत्वाचे अंग म्हणजे आमची प्राचीनशिक्षण-पद्धति होय. अध्ययनाचा प्रारंभकाळ, गुरुशिष्यांचें नातें व संबन्ध कशा प्रकारचे असावे, अध्यापनाची पद्धति व विषय, ज्ञान देणारानें तें फुकट दिलें पाहिजे यावरील आमचा कटाक्ष, गुरु ज्ञानदान करून जे उपकार करितो त्यांची फेड करणें अशक्य म्हणून गुरूची थोरवी ( आचार्यदेवो भव । तैत्तिरीय उप०; यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ । तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥ श्वेताश्वेतरोपनिषद् ६,२३;

उत्पादकब्रह्मदात्रोर्गरीयान् ब्रह्मदः पिता । मनुस्मृति २, १४६ ) इत्यादि आमच्या शिक्षणविषयक कल्पना आज विसाव्या शतकांतही शिक्षणशास्त्रज्ञांना माना डोलवावयास लावतील अशा होत्या.

९ श्रौत यज्ञयागांपासून निवृत्त होऊन उपनिषत्काळीं ब्रह्मचिन्तन व मोक्ष आणि तदर्थ संन्यास याचा विशेष बोलबाला झाल्यामुळें योग्य तयारी असो वा नसो, ज्यानें त्यानें उठावें व संन्यासाश्रमाकडे वळावें असें होण्याची प्रवृत्ति दिसूं लागल्यामुळें श्रीमद्भगवद्गीतेंत संन्यास व कर्मयोग या दोघांचें योग्य विवरण करण्यांत येऊन निष्काम कर्मयोगाची महती स्थापन करण्यांत आली. आपआपल्या दर्जाला योग्य अशीं कर्में सोडून देऊन नुसता वरकरणी संन्यास घेणें आणि मनानें तर विषयोपभोगांचा ध्यास घेणें यानें कांहीं साध्य होणें नाही. असें करणारा मिथ्याचारी किंवा ढोंगी होय. ( य आस्ते मनसा स्मरन् । इन्द्रियार्थान् विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ गीता ३. ६ ), आपआपलीं वर्णाचीं आश्रमाचीं, आपण स्वीकारलेल्या भूमिकेचीं कर्में स्वकर्तव्य म्हणून व त्या कर्मांच्या फलाची अपेक्षा आपल्या स्वतःच्या उपभोगासाठीं न ठेवितां करीत रहाणें, हेंच श्रेष्ठ आहे, असें भगवद्गीतेने सांगून कर्में सोडण्याचा मोह जो अनेक उतावळ्या व कच्या लोकांना होतो तो दूर करून कर्में करण्यानें बन्ध प्राप्त होत नाहीं तर त्यांच्या फलाच्या आशेनें होतो, असें सिद्ध करून उत्तम व्यवस्था लावून दिली.

१० कर्माचें फल भोगल्याशिवाय सुटका नाहीं, जसें करावें तसें भरावें, जगांत जें वैषम्य व दुःख दिसतें, तें ज्याच्या त्याच्या प्राक्कालीन बऱ्या वाईट कर्मांचें फळ आहे, हा कर्म व पुनर्जन्म यांचा सिद्धांत उपनिषत्काळापासून आजतागायत अखिल भारतवर्षांत लहान थोर, अडाणी, विद्वान् अशा सर्वांच्या हृदयांत पूर्ण ठसलेला आहे. या सिद्धान्ताचें वर्णन थोडक्यात वर केलेंच आहें. हा सिद्धान्त ‘ पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति पापः पापेन ’ ( बृह. उ. ३.२.१३ ), ‘ ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ’ ( गीता ४.११ ), ‘ वैषम्यनैर्घृण्ये न सापेक्षत्वात्तथाहि दर्शयाति’ ( ब्रह्मसूत्र २.१.३४ ) इत्यादि ठिकाणीं मांडलेला आहे. अशा प्रकारचा सिद्धान्त भारतवर्षांत उत्पन्न झालेल्या धर्मांखेरीज इतर धर्मांत क्वचितच मांडलेला आहे; व कांहीं धर्मग्रंथांत ( उदाहरणार्थ, बायबलमध्यें ) तो मांडलेला आहे असें मानिलें तरी त्या धर्मांचे अनुयायी म्हणविणाऱ्या सर्वसामान्य जनतेंत तो कधींच प्रसृत झालेला नव्हता. या सिद्धान्तामुळें आमचें फार नुकसान झालें, असें म्हणणारे पुष्कळ पाश्चात्त्य व कांहीं आमचे पण्डितही आहेत. पण त्याचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हे.

११ सर्व जगत् हें परब्रह्माचें रूप आहे ( सर्वं खल्विदं ब्रह्म—छान्दोग्य ), आत्मा व ब्रह्म हीं अनन्य आहेत ( ऐतदात्म्यमिदं सर्वं तत्सत्यं स आत्मा तत्त्वमसि—

छान्दोग्य ६.८.७ ) असें तत्त्वज्ञान पसरल्यावर भूतमात्राचे ठिकाणीं दया दाखविणें, आतिथिसत्कार, अहिंसा, दान इत्यादि गुणांचा परिपोष व्हावा म्हणून सर्वांना, विशेषतः गृहस्थांना रोजच्यारोज पंचमहायज्ञ लावून दिले, ते देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, ( अतिथिसत्कार ), भूतयज्ञ ( बलिहरण ) व ब्रह्मयज्ञ. यांमध्यें फार मोठें तत्त्व सांठविलेलें आहे. यांत ज्याला हल्लीं परसेवातत्त्व ( Social service ) म्हणतात त्याचा उगम आहे.

१२ चातुर्वर्ण्याचा उगम कसा झाला, तें वर दाखविलें आहेच ( पृष्ठें ५२–६२ ). मूळ चातुर्वर्ण्य हें संहिताकाळांत खरोखर अंमलांत असावें. कदाचित् तंतोतंत नसलें तरी त्याचें मुख्य स्वरूप संहिताकाळीं चांगल्या प्रकारचें होतें. त्यांत मनुष्यमात्राच्या ठिकाणीं असलेला स्वतः बद्दलचा योग्य अभिमान, श्रमविभाग, समाजाच्या धारण पोषणाला सर्व प्रकारच्या लोकांची जरुरी आहे हें तत्वज्ञान, आणि उच्च ध्येय हें व्यक्तीला श्रेष्ठत्व प्राप्त करून देणारें आहे; राजसत्ता ही निरर्गल होऊं नये, तीवर कोणाचा तरी दाब पाहिजे, तेव्हां तो फक्त ज्ञानी मनुष्यच ठेवूं शकेल म्हणून ज्ञान्यांची थोरवी, उलटपक्षीं ज्ञानी लोक आपलें ज्ञान गुप्त ठेवून आपल्या ज्ञानाचे बळावर सत्ता व संपत्ति बळकावून बसतील म्हणून त्यांना नियमित व थोड्या उत्पन्नाचे असे व्यवसाय लावून देण्याची व्यवस्था इत्यादि अनेक गुणसमुच्चयामुळें मूळचें चातुर्वर्ण्याचें ध्येय खरोखर अत्यंत प्रशंसनीय होतें. परंतु दुर्दैवानें तें ध्येयच बाजूला राहून चार वर्णांना हळुहळू फांद्या फुटून प्रथम शेंकडों व नंतर हजारों पोटजाति झाल्या. परन्तु हें चातुर्वर्ण्याचें ध्येय हजारों वर्षें आपल्या पुढें ठेऊन त्याप्रमाणें प्रत्यक्ष वागण्याचा जर कोणत्या देशानें बऱ्याच मोठ्या प्रमाणावर प्रयत्न केला असेल तर तो भारतवर्षानेंच केला आहे. हें आपलें वैशिष्ट्य आहे.

१३ आमच्या देशानें संस्कृत भाषेंत इतकें मोठें, इतकें विविध, इतकें उपयुक्त व इतक्या दीर्घकालपर्यंत वाङ्मय निर्माण केलें कीं, त्याच्या तोडीचें वाङ्मय आज तरी कोणत्याही प्राचीन देशाला दाखवितां येणार नाहीं. या प्रचण्ड वाङ्मयांत विशेषतः भाषाशास्त्र व तत्वज्ञानाचे विविधप्रान्त यांत तर आमच्या ग्रंथकारांचा हात धरणारा कोणी झाला नाहीं. प्रातिशाख्यें व पाणिनीची अष्टाध्यायी यांच्यासारखे भाषाशास्त्राचे ग्रंथ, वेदान्तादि षड्दर्शनें आणि अन्य तऱ्हेचीं तात्त्विक मतें यांमुळें आपल्या देशाचें सर्व जगांत इतकें नांव झालें आहे कीं, आपल्याला मॅक्समूलरसारखे पण्डित तत्त्वज्ञांचा देश ( nation of philosophers ) म्हणत आहेत.

१४ वेरूळ, नाशिक, कार्लें, कान्हेरी, बदामी इत्यादि ठिकाणचीं कोरींव लेणीं, अजण्ठा, बाग येथील चित्रें, काञ्ची वगैरे ठिकाणचीं अजस्र देवालयें हीं पाहून आम-

च्यांतील श्रेष्ठ शिल्प, चित्र आणि इतर कला यांची प्रगति यांबद्दल सर्वजण कौतुक करीत आहेत.

अशा प्रकारें आमच्या देशाच्या वैशिष्ट्याबद्दल कौतुक, अभिमान व प्रेम वाटण्यासारख्या अनेक गोष्टी आहेत. जातिसंस्था व तदन्तर्गत विवाह व भोजन यांच्या मर्यादा ह्याच केवळ आमच्या संस्कृतीचें प्रधान अंग आहेत असा आह्मांपैकीं पुष्कळांना भ्रम होतो तो होऊं नये, ह्मणून ही इतकी लांब यादी द्यावी लागली. वर दिलेल्या यादींतील बहुतेक सर्वांबद्दल बहुजनसमाज उपेक्षाशील आहे, आणि सनातन म्हणविणाऱ्यांच्या ओरडीमुळें त्याची अशी समजूत होण्याचा संभव वाटतो कीं, जातिसंस्थेंतच आमच्या संस्कृतीचें सारसर्वस्व सांठविलेलें आहे. वरील यादींपैकीं बहुतेक सर्व गोष्टी आमच्यामध्यें हजारों राहोत पण शेंकडों जाति होण्यापूर्वीच व जातिसंस्था लवचिक असतांना, अनुलोम विवाह होत असतांना, त्रैवर्णिक एकमेकांकडे निःशंक भोजन व्यवहार करीत असतांना, आम्ही साध्य करून आंगवळणीं पाडल्या होत्या. यांतील सर्व गोष्टी आह्मी ठेवाव्या असेंच आमचें आग्रहाचें सांगणें आहे. फक्त आतां कांहीं नवीन ध्येयें ( लोकशाही स्वराज्य, राष्ट्राभिमान, निदान आपल्या राष्ट्रापुरतें विश्वबन्धुत्व व संघटन ) आह्मी आपल्याला चिकटवून घेतलीं पाहिजेत व वरती वारंवार दिग्दर्शित केल्याप्रमाणें आपल्यातील कांहीं कडवीं मतें व आचार टाकले पाहिजेत इतकेंच आमचें ह्मणणें आहे.

आमच्या देशांत आम्ही हिंदु सुमारें तेवीस कोटी आहोंत, परन्तु आज जगाच्या व्यवहारांत आम्ही निर्माल्यवत् झालों आहों. अशी आमची स्थिति का व्हावी, आमचें कोठें बिघडतें आहे, याची तीव्र तळमळ सर्व हिंदुमात्राला लागली पाहिजे. आपल्या देशांत असलेले आठ धर्मांचे लोक, आमच्यांमधील परस्परद्वेष व कलह, आमची राजकीय व आर्थिक पराधीनता, इतक्या सर्व एकापेक्षां एक बलवत्तर दिसणाऱ्या अडचणींना न जुमानतां आपल्याला वर डोकें काढावयाचे आहे. आमच्या राष्ट्रापुढें जे बिकट प्रश्न आहेत, तशा प्रकारचे बिकट प्रश्न जगांतील आजपर्यंतच्या क्वचित्च कोणत्याही राष्ट्रापुढें उभे राहिले असतील. या प्रश्नांनींच जर आपण गांगरून गेलों, किंकर्तव्यमूढ झालों, व निराशेने कांहीं करावयाचें नाहीं असें ठरविलें; व त्यामुळें आमचें राष्ट्र विलयास गेलें, तर जगाच्या अन्तापर्यंत आपल्या नामुष्कीचा डंका वाजत राहील. उलटपक्षीं अशा प्रकारच्या बिकट परिस्थितींतही आपण आपला उद्धार केला, तर आपलें तर कल्याण होईलच: पण सर्व जगानें आपणांकडे मार्गदर्शक म्हणून पहावें, अशी पदवी आपल्याला प्राप्त होईल. आपण राष्ट्र म्हणून मरावें कीं तरावें, हा

आपल्या देशांतील प्रत्येक व्यक्तीपुढें प्रश्न आहे. प्रत्येक वस्तु, प्रत्येक प्राणी व प्रत्येक राष्ट्र यांना निसर्गाच्या जबरदस्त घडामोडींत नाश हा सहज व सुलभ आहे. पण मृत्यूशीं झुंजून प्रयत्नांची पराकाष्ठा करण्यात मनुष्यपणाचें सारसर्वस्व आहे. प्रयत्न करूनही नाश होणें संभवनीय आहे, तेव्हां आपणापैकीं प्रत्येकानें आपआपल्या शक्ती-प्रमाणें, बुद्धीप्रमाणें, अनुकूलतेप्रमाणें राष्ट्रीय दृष्टी ठेऊन देशोद्धाराच्या प्रयत्नाला लागणें हें कर्तव्य आहे, व तें करण्याची इच्छा आपणां सर्वांना होवो असें परमेश्वरा-पाशीं मागणें आहे.

---